# काश्यपशिल्प

('काश्यपशिल्पम्' या मूळ संस्कृत ग्रंथाचा अनुवाद)

अनुवादक-**डॉ. र. पु. कुलकर्णी**



महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

# काश्यपशिल्प

( ' काश्यपशिल्पम् ' या मूळ संस्कृत ग्रंथाचा अनुवाद )

– अनुवादक –

डॉ. र. पु. कुलकर्णी

बी. ई. (स्थापत्य), एम्. टेक्. (मृद्यांत्रिकी व आधारभूमी स्थापत्य), पीएच्. डी. (स्थापत्य)




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ

प्रथमावृत्ती : मार्च, १९८७

प्रकाशक : श्री. सू. द्वा. देशमुख,
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि
संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई–४०० ०३२



मुद्रक : श्री. ग. दीक्षित
व्यवस्थापक, दी प्राज्ञ प्रेस,
३१५ गंगापुरी,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

किंमत रु. ६०

# निवेदन

अजिंठा, वेरूळ, कारले इत्यादी ठिकाणची लेणी, कोणार्क, जगन्नाथपुरी, भुवनेश्वर तसेच दक्षिणेतील श्रीरंगम्, मदुरै, रामेश्वर वगैरे ठिकाणची देवळे आणि चिदंबरम्‌चा नटराज, वाशिमचा बालाजी आणि वेरूळ, अजिंठ्याच्या लेण्यांतील मूर्तिशिल्प आपण जेव्हा पाहतो, तेव्हा आपल्या मनात विचार डोकावतो तो हा की, आपल्या पूर्वजांना मूर्तिशिल्प आणि वास्तुशिल्प यांचे केवढेतरी ज्ञान असले पाहिजे. पण मूर्तिशिल्प आणि वास्तुशिल्प ज्या शास्त्रामुळे साकार होऊ शकते त्या शास्त्रातील आपल्या पूर्वजांच्या गतीबद्दल मात्र आपणास जाणीव नसते. या दृष्टीने डॉ. कुलकर्णी यांचे काश्यपशिल्प हा संस्कृत ग्रंथ मराठीत आणण्याचे कार्य फारच मोलाचे आहे. त्यामुळे आपल्या वास्तुशिल्पशास्त्राची माहिती मराठी वाचकास होणार आहे. या ग्रंथाच्या रूपाने डॉ. कुलकर्णी यांनी आपल्या प्राचीन संस्कृतीचा जणू एक ठेवाच मराठी माणसाला उपलब्ध करून दिला आहे.

डॉ. कुलकर्णी हे व्यवसायाने इंजिनिअर असले, तरी त्यांचा संस्कृतचा अभ्यास फार मोठा आहे. इंजिनिअरिंग आणि संस्कृत या दोन्ही विषयांचे ज्ञान असल्यावाचून "काश्यपशिल्प" सारख्या ग्रंथाचे भाषांतर करणे कोणासही अवघड झाले असते. डॉ. कुलकर्णी यांनी ही जी मोलाची कामगिरी बजावली आहे, त्याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. आपला हा ग्रंथ त्यांनी साहित्य आणि संस्कृती मंडळास प्रकाशित करावयास दिला याबद्दल मंडळ त्यांचे आभारी राहील.

४२, यशोधन,
मुंबई–४०० ०२०
दिनांक : १ मे, १९८६
[महाराष्ट्र दिन]

अध्यक्ष,
**सुरेन्द्र बारलिंगे**
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ,

# लेखकाचे दोन शब्द

भारतीय तत्त्वज्ञानांत सांख्यांची पुरुष व प्रकृति ही जोडी प्रसिद्ध आहे. देवमूर्ती ही पुरुष व देवालय ही त्याची प्रकृति. पुरुषापुढे प्रकृति जशी नाचत असते व संसृतीचा पिंगा चालू ठेवते तसे शंकराच्या मूर्तीसाठी देवालयाचा व देवमूर्तीच्या पूजेच्या साहित्याच्या निर्मितीचा पिंगा सुरू होतो. दक्षिण भारतात द्राविड देवालयाचा परिसर म्हणजे देवाच्या षोडशोपचार पूजेकरिता तसेच त्याच्या नवविधा भक्तीकरिता लागणाऱ्या साहित्याकरिता निर्माण केलेले एक शहरच असते. पुरुषाप्रमाणे देवमूर्ती ही केवळ पाहणारी, ज्ञाती व उपभोग घेणारी असून, देवालय, त्याच्या परिसरातील परिवार देवता व त्यांची लहान देवालये, देवासाठी लागणारे पत्र, पुष्प, फल, तोय वगैरेंची सोय करणारे निरनिराळे बाजार, देवाच्या निरनिराळ्या उत्सवांसाठी असलेले कल्याण मंडप, उत्सव मंडप, वसंत मंडप इत्यादी अनेक मंडप हे जणू त्याची प्रकृतिच होत. काश्यपशिल्प या ग्रंथात देवमूर्ती व देवालय, पुरुष आणि प्रकृति यांचे वर्णन आलेले आहे. जणू काही या ग्रंथाच्या रूपाने काश्यपमुनींनी पुरुष व प्रकृति यांची एकप्रकारे पूजाच बांधली आहे. मुखपृष्ठावर दिलेले चित्र हीच कथा सांगते. देवालयाच्या पार्श्वभूमीवर कल्याण सुंदराची मूर्ती दाखविली आहे. देवमूर्ती व देवालय, शिव व मायास्वरूप पार्वती किंवा पुरुष व प्रकृति यांचेच ते चित्रण आहे.

काश्यपशिल्पम् हा श्री. कृ. वि. वझे यांनी संपादित केलेला व आनंदाश्रम संस्था, पुणे यांनी संस्कृत ग्रंथावलि क्र. ९५ म्हणून १९२६ साली प्रकाशित केलेला ग्रंथ अनुवादासाठी घेतला आहे. स्थापत्यशास्त्रदृष्ट्या त्यावर लहानशी प्रस्तावनाही या अनुवादाला जोडली आहे.

काश्यपशिल्पम् या पुस्तकाचे मराठीत भाषांतर करूनच ही प्रक्रिया थांबली नाही तर ते छापून प्रकाशितही झाले ही प्रत्येक लेखकाला आपल्या हस्तलिखिताची हवीहवीशी वाटणारी परिणती केवळ डॉ. सुरेंद्र बारलिंगे, अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मण्डळ, मुंबई यांच्या प्रेरणेमुळेच होऊ शकली व याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे. नुसते मण्डळाचे अध्यक्ष, एक उच्च पदाधिकारी म्हणूनच नव्हे तर एक सहृदय व्यक्ती म्हणूनही या निमित्ताने त्यांचा परिचय झाला हे मी माझे भाग्य समजतो.

काश्यपशिल्प हे पुस्तक साहित्य संस्कृती मण्डळाने प्रकाशित करावे याबाबत अनाहूत पण अत्यंत जोरदार शिफारस कै. ग. ह. ऊर्फ तात्या खरे, अध्यक्ष, भारतीय इतिहास संशोधन मंडळ पुणे यांनी श्री. बारलिंगे यांच्याकडे केलेली मला आठवते. कै. तात्या खरे हे निस्वार्थी, निगर्वी व अभ्यासूस सर्व प्रकारची मदत करण्यात अग्रेसर होते. शिल्पशास्त्राच्या अभ्यासासाठी त्यांनी मला अनमोल असे साहाय्य व प्रोत्साहन दिले. या निमित्ताने त्यांचा ऋणनिर्देश करावयाची संधी मला मिळाली आहे. कै. ग. ह. खरे यांचा मी फार ऋणी आहे.

या पुस्तकात घातलेल्या आकृत्यांची अनुक्रमणिका दिली आहे. त्यांतील आकृती क्रमांक ८.६, १०.२–३, ११.१–४, १२.२–५, १३.१, १७.१, २८.२, २८.३, ३०.२, ४४.११ व ४६.१ या

आकृत्या 'The Chalukyan Architecture of the Canarese District– H. Cousens, New Imperial Series No. XLII Archaeological Survey of India ( 1926 ) या पुस्तकातून घेतल्या आहेत. या आकृत्या या पुस्तकात घालण्यासाठी Director (Publications), Archaeological Survey of India यांनी परवानगी दिल्याबद्दल लेखक त्यांचा आभारी आहे.

आकृती क्र. ६१.१, ६२.१, ६३.१, ६४.१, ६५.१–२, ६७.१, ६८.१, ६९.१, ७२.१, ७४.१, ७६.१ व ७७.१ या आकृत्या श्री. एन. आर. भट्ट यांनी संपादित केलेल्या व Institut Francais Dindologie, पांडेचरी यांनी प्रसिद्ध केलेल्या 'रौरवागम' भाग २ या पुस्तकातील आहेत. या आकृत्यांचा वापर काश्यपशिल्प या पुस्तकात करू देण्यासाठी या संस्थेच्या संचालकांनी परवानगी दिल्याबद्दल लेखक त्यांचा आभारी आहे.

शांतिनिकेतन येथील डॉ. के. एम्. वर्मा हे भारतीय मूर्तिशास्त्राचा गाढा अभ्यास केलेले विद्वान आहेत. काश्यपशिल्पात मूर्तीचा लाकडी सांगाडा करून, त्याला दोऱ्या बांधून व स्थिरीकृत माती लिंपून मूर्ती कशी तयार करावी याची माहिती दिली आहे. डॉ. वर्मा यांनी त्याबरहुकूम लाकडी सांगाडा तयार करून त्याला दोऱ्या, कापड, मातीचा लेप वगैरे लावून मूर्ती तयार केली. थोडक्यात, ते या विषयाचा नुसता पुस्तकी अभ्यास करून थांबले नाहीत तर त्यांनी त्याचे प्रात्यक्षिकही करून पाहिले. त्यांच्या 'The Indian Technique of Clay Modelling' या पुस्तकात त्यांनी यासंबंधीचे फोटो दिले आहेत. डॉ. वर्मा यांनी या फोटोंचे ब्लॉक्स करण्यायोग्य फोटो माझ्या विनंतीवरून पाठविले व ते पुस्तकात घालण्यासाठी परवानगी दिली (आकृत्या ८०.१–३) याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

काश्यपशिल्पम् या पुस्तकाचे प्रकाशन आनंदाश्रम संस्था, पुणे यांनी केलेले आहे. या संस्थेचे चालक श्री. मा. रा. आपटे यांनी पुस्तकाचे मराठी भाषांतर करण्यासाठी अनुमती दिली याबद्दल लेखक त्यांचा आभारी आहे.

हे पुस्तक महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने छापून प्रकाशित करावयाचे ठरल्यानंतर ते प्रत्यक्षात आणण्यात ज्यांचा महत्त्वाचा वाटा आहे त्या श्री. सू. द्वा. देशमुख, मंडळाचे सचिव यांचेही मी आभार मानतो. या पुस्तकाच्या छपाईचे काम व्यवस्थित व झपाट्याने केल्याबद्दल वाई येथील दी प्राज्ञ प्रेसचे व्यवस्थापक श्री. श्री. ग. दीक्षित यांचाही मी आभारी आहे.

काश्यपशिल्प हे द्राविड शिल्पशैलीची माहिती देणारे पुस्तक आहे. नागर शैलीबद्दल माहिती देणारे 'प्रासाद मण्डन' व ओरिसा शिल्पशैलीची माहिती देणारे 'शिल्पप्रकाश' या दोन्ही पुस्तकांचा मराठी अनुवाद करावा असा इरादा आहे. ह्या पुस्तकत्रयीतील शेवटची दोन पुस्तकेही प्रसिद्ध झाल्यास मराठी वाचकांस भारतीय शिल्पशास्त्रांबद्दल काहीशी व्यापक माहिती उपलब्ध होईल. ही पुढील कामाबद्दलची सूचना देऊन हे काहीसे लांबलेले दोन शब्द पुरे करतो.

अक्षयतृतीया १९८६ — र. पु. कुलकर्णी.

बाहेरी कर्मैं क्षाळला । भीतरीं ज्ञानें उजळला ।
इहीं दोहीं परी आला । पारवाळा एका ॥
किंबहुना यियापरी । बाह्य चोख अवधारी ।
आणि ज्ञान-दीप अंतरी । म्हणोनि शुध्दु ॥

— ज्ञानेश्वरी

**माझ्या मुलांस— चि. गिरीश व चि. योगेश यांस**

# अनुक्रमणिका

## प्रस्तावनेची अनुक्रमणिका



## काश्यपशिल्प विषयानुक्रमणिका

# आकृत्यांची सूची

* या आकृत्या The Chalukyan Architecture of the Kanarese District '–H. Cousens, New Imperial Series No. XLII, Archaeological Survey of India' (1926) या पुस्तकातून घेतल्या.

** या आकृत्या 'रौरवागम' भाग २, श्री. एन. आर. भट्ट यांनी संपादित केलेल्या व Institute Francais D'indologie, पाँडेचरी, यांनी प्रसिद्ध केलेल्या पुस्तकातील आहेत.

† या आकृत्या डॉ. के. एम. वर्मा, शांतिनिकेतन यांनी पाठविलेल्या फोटोंवरून घेतल्या.

या आकृत्यांसाठी त्या त्या संस्थांकडून किंवा व्यक्तींकडून योग्य ती परवानगी घेण्यात आली आहे.

# प्रस्तावना

## १. प्रास्ताविक

काश्यपशिल्पम् हा शिल्पशास्त्रावरील ग्रंथ श्री. कृष्णराय विनायक वझे यांनी संपादिला व तो पुण्याच्या आनंदाश्रमाने त्यांचा ग्रंथ क्रमांक ९५ म्हणून १९२६ साली छापून प्रकाशित केला. या ग्रंथाच्या आरंभी श्री. वझे यांनी जो उपोद्घात लिहिला आहे, त्यात त्यांनी या ग्रंथाची हस्तलिखित प्रत मद्रास येथील संस्कृत ग्रंथालयात आहे. ती व गुजराथ, सौराष्ट्र, माळवा इत्यादी प्रांतांतील शिल्पींकडे या शिल्पशास्त्राची जी फुटकळ प्रकरणे उपलब्ध झाली ती यावरून तयार केली असे उल्लेखिलेले आहे. त्यांनी संपादिलेल्या या काश्यपशिल्प ग्रंथाचे दोन स्वतंत्र विभाग करता येतात. पहिल्या भागात वास्तुशिल्प म्हणजे द्राविड प्रकारच्या प्रासादांविषयी माहिती आहे व दुसऱ्या भागात मूर्तिशिल्पाची माहिती येते. आपापल्या परीने हे विभाग परिपूर्ण आहेत. द्राविडप्रासादाची त्याच्या अंगोपांगांसह सर्व माहिती व्यवस्थितरीत्या दिली आहे. तसेच मूर्तिशिल्पाच्या भागात मूर्तींची मापे, निरनिराळ्या देवदेवतांच्या मूर्तींची लक्षणे, आयुधे यांची सांगोपांग माहिती दिली आहे. स्थिरीकृत मातीच्या मूर्ती कशा कराव्यात याचे येथे संपूर्ण वर्णन येते. या विषयावरील इतकी पूर्ण माहिती क्वचितच इतर कुठल्याही शिल्पशास्त्राच्या पुस्तकात मिळते. थोडक्यात ज्या दोन प्रमुख विभागांवर हे शिल्पशास्त्रावरील पुस्तक लिहिले गेले, त्यांची संगतवार व पूर्ण माहिती या पुस्तकात आलेली आहे. हे पुस्तक मराठी भाषांतराकरिता निवडण्याचे हे प्रमुख कारण आहे.

या पुस्तकातील पाठ अनेक ठिकाणी अशुद्ध आहेत. पुष्कळदा त्यामुळे अर्थ लावण्याचे काम दुर्घट होते. परंतु काश्यपशिल्पम् हे पुस्तक शिल्पशास्त्र म्हणून मान्यता पावलेले असावे; कारण याचे उतारे शब्दशः शिल्परत्नामध्ये येतात. तसेच फ्रेंच इंडॉलॉजिकल इन्स्टिटयूट, पांडेचरी, यांनी प्रसिद्ध केलेल्या रौरवागम या पुस्तकात अंशुमत्काश्यप या पुस्तकाचे भरपूर उतारे दिले आहेत व हे उतारे जसेच्या तसे काश्यपशिल्पम्मध्ये मिळतात. यांचाही उपयोग शुद्ध पाठ काय आहे ते समजण्यासाठी झाला.

काश्यपशिल्पम् व अंशुमद्भेदागम या दोघांची विषयानुक्रमणिका पाहिली तर ती एकच आहे असे समजून येते. अंशुमद्भेदागमाची अनुक्रमणिका श्री. प्र. कु. आचार्य यांच्या मानसारावरील लिहिलेल्या प्रबंधात दिलेली आहे. खुद्द काश्यपशिल्पम् मध्ये[1] काश्यपमुनि महादेवाला शिल्पशास्त्र सांगावे या अर्थी विनंती करताना म्हणतात की, पूर्वी जे तुम्ही अंशुमत् नावाचे महातन्त्र सांगितले होते, त्याच्यातीलच माहिती संक्षेपाने पुन्हा सांगावी. तेव्हा काश्यपशिल्पम् ही अंशुमत्काश्यपाची संक्षिप्त आवृत्ती असावी. यातील अंशुमद्भेदागम तसेच अंशुमत्काश्यप ही पुस्तके अजूनही हस्तलिखित स्वरूपातच दुर्मिळ ग्रंथ म्हणून उपलब्ध आहेत; ती छापली गेलेली नाहीत. त्यामुळे ती पाहण्याचा योग आलेला नाही. या तिघा ग्रंथांचा तौलनिक अभ्यास येथे दिलेल्या काश्यपशिल्पम्च्या

१. काश्यपशिल्पम् १·५

केवळ मराठी भाषांतरापेक्षा अधिक उपयोगी झाला असता. हा अभ्यास यदाकदाचित होईलही. पण आज घटकेला द्राविड पद्धतीच्या देवालयांची बांधणी तसेच त्यांच्या अंगोपांगांची माहिती होण्याच्या दृष्टीने सध्या केलेला प्रयत्न पुरेसा ठरावा. द्राविड पद्धतीच्या मूर्तीशिल्पाची माहितीही या प्रयत्नाने होईल. म्हणून सध्यातरी केवळ काश्यपशिल्पम् या ग्रंथाचे भाषांतर एवढाच मर्यादित हेतू पुढे ठेवून काम केले आहे.

काश्यपशिल्पम् या पुस्तकाचा लेखक हा कश्यप आहे की, काश्यप हे सांगणे अवघड आहे. कश्यपाचे शिल्पशास्त्र ते काश्यपशिल्प अशी उपपत्ती करता येते. कश्यपमुनींचेच उल्लेख वझे यांनी उपोद्घातात दिले आहेत. याउलट खुद्द काश्यपशिल्पात[२] काश्यप असे म्हणाले असा उल्लेख आहे. तसेच अंशुमत्काश्यप व काश्यपशिल्प ही एकाच लेखकाची आहेत असे मानले तर पुन्हा कश्यपाचे ते अंशुमत्काश्यप असा निर्वाह करावा लागणार व ते बरोबर वाटत नाही. तसेच जेव्हा लेखकाच्या नावावरून पुस्तकाला नाव मिळते तेव्हा लेखकाचे नावच तेथे असते. उदाहरणार्थ भृगूंची ती भृगु-संहिता, मनूची ती मनुस्मृति, अत्रींची ती अत्रिसंहिता; तिला आपण आत्रेय संहिता म्हणत नाही. तेव्हा असे वाटते की, या ग्रंथाचा लेखक कश्यप नसून काश्यप असावा.

वझे यांच्या मताने काश्यपशिल्पम् हा ग्रंथ बराच प्राचीन असावा. वझेदेखील ग्रंथकर्ता कश्यप असावा असे म्हणतात. मार्कण्डेय पुराणात दिले आहे की, ब्रह्मदेवाचा मुलगा मरीचि व त्याचा मुलगा कश्यप, तेव्हा कश्यपाची प्राचीनता जवळ जवळ जगाच्या उत्पत्तीइतकी ठरते. अर्थात प्रस्तुत ग्रंथाचा कर्ता इतका प्राचीन आहे असे वझेही म्हणत नाहीत. कश्यपाच्या प्राचीनत्वाचे दुसरे उदाहरण म्हणजे तैत्तिरीय संहितेत कोणा राजाचे मंत्री हे कश्यपा, तुझ्या मनोहर अशा शिल्पांत, प्राकारांत आमच्या राजाला आश्रय दे अशी प्रार्थना करतात असे दिले आहे.[३] तेव्हा येथे शिल्पाशी निगडित असा कश्यपाचा तैत्तिरीय संहितेहूनही जुना उल्लेख मिळतो. पुढे वझे म्हणतात की, प्रस्तुत ग्रंथ याच कश्यपाचा असे काही म्हणता येत नाही; मात्र कश्यपसंहिता भगवान कश्यपांनी स्वतःच्या नैध्रुव नावाच्या मुलाला उपदेशिली असेही सांगतात. भृगुसंहितेत कश्यपांचा आदरपूर्वक उल्लेख आलेला आहे, त्याअर्थी भृगुसंहितेच्या अगोदर काश्यपशिल्पम् लिहिले गेलेले असावे. श्रुतीतदेखील कश्यपाच्या शिल्पप्रभावाने पृथ्वी झाली म्हणून तिला ' काश्यपी ' म्हणतात, तेव्हा श्रुतिकालीदेखील कश्यप शिल्पज्ञ म्हणून प्रसिद्ध होते. तेव्हा कश्यप हा सर्वांत प्राचीनतम शिल्पशास्त्री म्हणावयास हवा. ही सर्व माहिती देताना ह्या प्राचीन कश्यपाने लिहिलेले ते प्रस्तुतचे काश्यपशिल्पम् असे स्पष्ट म्हणावयास ते टाळतात; कारण तसा पुरावा नाही असे ते स्पष्ट करतात.

मत्स्यपुराणात १८ शिल्पशास्त्रोपदेशकांची नावे आली आहेत. त्यांत कश्यप किंवा काश्यप याचे नाव नाही. विश्वकर्मवास्तुशास्त्र या ग्रंथात काश्यपाचा[४] वास्तुशास्त्रज्ञ म्हणून उल्लेख आहे.

---

२. काश्यपशिल्पम् १·२

३. यत्ते शिल्पं कश्यप रोचनावद् । इन्द्रियावत्पुष्कलं चित्रभानु ।।
यस्मिन्त्सूर्या अर्पिताः सप्तसाकम् । तस्मिन् राजानमधिविश्रयैनम् ।।

४. अगस्त्यो भगवान्नन्दी नारदश्च महामुनिः ।
बृहस्पतिस्तिम्यलोकः **काश्यपो** लोकदर्शकः ।। १८·१ ।।
वास्तुशास्त्रं महत्प्रोक्तं लोकरक्षणहेतवे ।। १८·३½ ।। विश्वकर्मवास्तुशास्त्र

वैखानस शाखेच्या प्रतिष्ठाविधिदर्पण नावाच्या आगम ग्रंथात आगमांच्या एकापाठोपाठ असलेल्या गुरूंचा उल्लेख आहे. त्यात आगम ही नारायणाने ब्रह्मदेवाला, त्याने वैखानसाला व वैखानसापासून काश्यपमुनींना ती प्राप्त झाली असे म्हटले आहे. वैखानस म्हणजे मरीचि. वैखानसागमाच्या संपादकांच्या म्हणण्यानुसार मरीचि हा इ. स. पूर्व ७ व्या शतकात झाला असावा.[५] तेव्हा काश्यपाचा काळ याच्या जवळपास असावा. प्रस्तुत लेखकाला या विषयात फारसे गम्य नसल्याने येथेच थांबतो.

प्रस्तुत लेखक हा अभियांत्रिकी विषयाचा विद्यार्थी असल्याने पुढे काश्यपशिल्पातील अभियांत्रिकी विषयाचा उहापोह केला आहे. प्रासादाची मापे, दाराची मापे, प्रासादाच्या इतर अंगोपांगांची मापे, तसेच पायासाठी वापरल्या जाणाऱ्या मातीचे गुणधर्म, मृत्तिकास्थिरीकरण, लाकूड व दगड यांचे गुणधर्म इत्यादींची माहिती आली आहे. दरवाजाची नक्षी, अधिष्ठानाचे थरविभाग, खांबांचे शैलीनुसार प्रकार वगैरेंचा ऊहापोह फारसा केलेला नाही. शिवाय मूर्तिशिल्पाबद्दलची चर्चा केलेली नाही. खुद्द भाषांतरात योग्य त्या आकृत्या दिल्या असल्यामुळे त्याहून जास्त निराळी चर्चा द्यावीशी वाटली नाही. असेही वाटते की, पुष्कळदा शिल्पविषयक पुस्तकात शिल्पाची शैली, शिल्पाचा काळ इत्यादी गोष्टींनाच महत्त्व दिले जाते व ज्या अभियांत्रिकी विषयावर ते शिल्पशास्त्रावरचे पुस्तक लिहिलेले आहे त्याबाबत काहीच माहिती दिलेली नसते. किंवा शिल्पशास्त्रावरच्या पुस्तकात प्रस्तुत लेखकाने शैली इत्यादीबाबत गोष्टींना महत्त्व दिलेले नाही ही वाटल्यास लेखकाच्या ज्ञानाची मर्यादा समजावी. तसेच काश्यपशिल्पम् हे द्राविडपद्धतीच्या प्रासादाबद्दल माहिती देते. तेव्हा वरील अभियांत्रिकी विषयावरील चर्चा शक्यतो द्राविड शिल्पशैलीच्या इतर शिल्पशास्त्रविषयक पुस्तकांत दिलेल्या माहितीच्या आधारे केली आहे. शक्यतो नागर प्रासादांची माहिती देणाऱ्या शिल्पशास्त्रविषयक ग्रंथांतली माहिती दिलेली नाही. प्रस्तावना आटोपशीर व्हावी व विषय एकाच शिल्पशैलीला धरून चर्चिला जावा म्हणून ही मर्यादा घालून घेतलेली आहे.

५. वैखानसागमाची प्रस्तावना.

## २. दिशासाधन

चार मुख्य दिशा– पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण या भारतीयांना फार पूर्वीपासून माहिती होत्या. ऋग्वेद, यजुर्वेद, शतपथ ब्राह्मण, श्रौतसूत्रे, पुराणे यांत दिशांबद्दल माहिती मिळते; एवढेच नव्हे तर एखाद्या विशिष्ट ठिकाणी या दिशा अचूक रीत्या कशा मिळवाव्यात याबाबतचे ज्ञानही उत्तरोत्तर वाढत गेलेले दिसते.

### दिशांबद्दलचे वैदिककालीन ज्ञान

ऋग्वेदात दिशा व उपदिशा यांचा उल्लेख आहे.[१] यजुर्वेदात पाच दिशांचा उल्लेख आहे. त्या आहेत दिश, प्रदिश, आदिश, विदिश आणि उद्दिश. या शब्दांचा अर्थ होतो अनुक्रमे

१. ऋग्वेद १·२·३१·१४

( मुख्य ) दिशा, पुढील दिशा, मागील दिशा, ( पुढील व मागील यांच्या ) मधली दिशा आणि ऊर्ध्व दिशा.[२]

शतपथ ब्राह्मणात दिशांची संख्या चार, पाच, सहा, सात, नऊ व दहापर्यंत वाढलेली दिसते.[३]

यजुर्वेदात[४] तसेच शतपथ ब्राह्मणात[५] पूर्व, दक्षिण, पश्चिम, उत्तर व बृहती ( कदाचित ऊर्ध्व ) अशी प्रादक्षिण्यक्रमाने दिशांची नावे दिली आहेत.

एका वर्षात ( संवत्सर ) ३६० दिवस असतात ही माहिती ऋग्वेदकाळीही होती[६]; येवढेच नव्हे तर अधिकमास धरून वर्ष ३९० दिवसांचे होते हे यजुर्वेदकाळी[७] व शतपथब्राह्मण-काळी[८] तरी निश्चित माहिती होते. शिवाय ३० मुहूर्तांचा एक दिवस होतो व वर्षात त्यांची संख्या १०,८०० मुहूर्त होते याचाही उल्लेख शतपथ ब्राह्मणात[९] मिळतो. तेव्हा सूर्य उगवतो ती पूर्व दिशा व मावळतो ती दिशा पश्चिम याबद्दलचे ज्ञान भारतीयांना ऋग्वेदकाळापासून असावे याबद्दल संशय राहत नाही. मात्र शंकूच्या सावलीवरून पूर्व व पश्चिम दिशा व त्यावरून दक्षिण व उत्तर दिशा कशा मिळविता येतात याचे स्पष्ट वर्णन वेदांत किंवा ब्राह्मण ग्रंथांतही मिळत नाही.

शतपथ ब्राह्मणात[१०] कृत्तिका नक्षत्र पूर्व दिशेला उगवते व ते पूर्व दिशा कधीच सोडीत नाही असे वर्णन आहे. यावरून शतपथब्राह्मणकाळी पूर्व दिशा निश्चित करावयाची रीत माहिती असावी असे अप्रत्यक्षरीत्या समजते. कारण अगोदर पूर्व दिशा कोणती हे निश्चित केल्याखेरीज अमुक एक नक्षत्र त्या दिशेला उगवते व ती दिशा सोडून कधीही जात नाही असे विधान करणे अशक्य आहे. शिवाय भारतीयांना शतपथब्राह्मणकाळी दिवसा पूर्व दिशा कशी ठरवावयाची याचे ज्ञान होतेच; पण रात्रीदेखील पूर्व दिशा कशी निश्चित करावी ते माहिती होते असे या विधानाने समजते.

यजुर्वेदात[११] यज्ञीय मंडपांच्या बाबतीत प्राचीनवंश, दक्षिणवंश असे शब्द मिळतात. जो मंडप प्राचीनवंश आहे त्याची तुळई पूर्वपश्चिम असावी व दक्षिणवंश मंडपाची तुळई दक्षिणोत्तर असावी असा त्यांचा अर्थ होतो. यावरून अप्रत्यक्षरीत्या यजुर्वेदकाळीदेखील दिशानिश्चितीबद्दलचे ज्ञान असावे असे अनुमानिता येते.

शतपथ ब्राह्मणात[१२] 'प्राची' हा शब्द बऱ्याचदा आला आहे. प्राचीचा अर्थ आहे पूर्व-पश्चिम जाणारी रेषा. कोणत्याही वेदीची अगर अग्निचितीची किंवा इतर वास्तूची आखणी करताना प्रथम प्राची निश्चित करतात. ही नुसती पूर्वपश्चिम रेषा नसून ती त्या वेदीची मध्यरेषाही असते. तेव्हा जरी शतपथ ब्राह्मणात प्रत्यक्ष दिशा कशा निश्चित कराव्यात हे दिलेले नसले तरी दिशा कशा ठरवाव्यात याचे ज्ञान त्या काळी निश्चित होते.

---

२. यजुर्वेद ६·१९
३. शतपथ ब्राह्मण ६·३·१·४४; २·४·४·२४; ६·७·१·१६, ९·५·२·८, ६·३·१·२१, ६·८·२·१२
४. यजुर्वेद १५·१०–१४
५. शतपथ ब्राह्मण ८·६·१·५–९, ८·३·१·१४
६. ऋग्वेद १.१६४·४८
७. यजुर्वेद ३०·१५
८. शतपथ ब्राह्मण ९·१·१·४३
९. शतपथ ब्राह्मण १०·४·२·२०
१०. शतपथ ब्राह्मण २·१·२·१–३.
११. यजुर्वेद २·१·३
१२. शतपथ ब्राह्मण १·२·५·१४, ३·५·१·९ वगैरे.

श्रौतसूत्रांत शुल्बसूत्रे नावाचा भूमितिविषयक व वेदी, चिती यांच्या आखणीसंबंधी तसेच विटांनी त्या कशा बांधावयाच्या या बाबतीत माहिती देणारा भाग येतो. त्यात पूर्व दिशा कशी निश्चित करावी याचे वर्णन येते.

### सूर्यावरून दिशा मिळविण्याची रीत

कात्यायन शुल्बसूत्रात[१३] पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर दिशा मिळवावयाची रीत खालील-प्रमाणे दिली आहे.

समपातळीत असलेल्या जमिनीत शंकू पुरून शंकूच्या लांबीइतकीच दोरी घेऊन शंकूचा मध्य धरून वर्तुळ काढावे. जेथे शंकूच्या टोकाची सावली सकाळी लहान होत असताना व संध्याकाळी पुन्हा मोठी होत असताना वर्तुळाला स्पर्श करील तेथे दोन शंकू ठोकावेत. त्या दोन शंकूंना जोडणाऱ्या रेषेला 'प्राची' म्हणतात. त्यानंतर पूर्व व पश्चिम दिशांकडे ठोकलेल्या शंकूंच्या मधील अंतराच्या दुप्पट लांबीची दोरी घेऊन तिची टोके या शंकूंना बांधावीत व दोरीचा मध्यबिंदू बोटात धरून दोरी दक्षिणेकडे ताणावी. जेथे दोरीचा मध्यबिंदू येईल तेथे शंकू ठोकावा. तो दक्षिण दिशा दाखवितो. हीच रीत वापरून व दोरी उत्तरेकडे ताणून उत्तर दिशा मिळवावी.

### नक्षत्रांवरून किंवा ताऱ्यांवरून दिशाज्ञान

मानवशुल्बसूत्रात[१४] चित्रा व स्वाती, श्रवण आणि प्रतिश्रवण, कृत्तिका आणि प्रतिकृत्तिका तिष्य व पुनर्वसू या ताऱ्यांच्या जोडी क्षितिजापासून युगप्रमाण (१६३ सें. मी.) वर आल्यावर त्यांच्या मध्यावर पूर्व दिशा असून त्या दिशेने दोरीच्या गाठी ठेवाव्यात असा उल्लेख मिळतो. या नक्षत्रांवरून पूर्व दिशा कशी निश्चित करावी याचे विज्ञान याहून अधिक दिलेले नाही.

### शिल्पशास्त्राच्या ग्रंथांतील माहिती

शिल्पशास्त्रात दिशा मिळविण्यासाठी शंकूच्या सावलीचा उपयोग दिला आहे. मात्र अधिक अचूक दिशा मिळविण्यासाठी दुरुस्त्या सांगितल्या आहेत.

शंकूची लांबी १२ अंगुले दिली आहे. परंतु जास्त अचूक दिशा मिळविण्यासाठी मानसारात[१५] उत्तम शंकूची उंची २४ अंगुले (४५·६ सें. मी.) दिली आहे तर विश्वकर्मवास्तुशास्त्रात[१६] देवालया-साठी, जेथे दिशासाधन फार अचूक करावयास हवे तेथे शंकूची उंची ४८ अंगुले सांगितली आहे. वर्तुळाचा व्यास २४ अंगुले किंवा शंकूच्या उंचीच्या दुप्पट बहुतेक सर्व ग्रंथांत दिला आहे. शिल्प-दीपक[१७], राजवल्लभ[१८] व कुण्डसिद्धी[१९] या ग्रंथांत शंकूची उंची १२ अंगुले असताना वर्तुळाचा व्यास ३२ अंगुले घ्यावा म्हणून सांगितले आहे. शंकू जमिनीला लंबरूप आहे हे अधिक अचूक रीत्या ठरविणे यामुळे शक्य होते. ($१२^२ + १६^२ = २०^२$)

---

१३. कात्यायनशुल्बसूत्र १·२–३

१४. मानवशुल्बसूत्र १०·१·१·३

१५. मानसार ६·७

१६. विश्वकर्मवास्तुशास्त्र ३·७–३४

१७. शिल्पदीपक १·२०–२१

१८. राजवल्लभ १·१०–११

१९. कुण्डसिद्धी श्लोक १०

शंकू जमिनीत पक्का रोवतात व जमीन कमळगर्भाप्रमाणे समतल करतात. जमीन समतल आहे की नाही हे पाहण्यासाठी वास्तुविद्येत[२०] अवनत नावाचे उपकरण वर्णिले आहे.

शुल्बसूत्रात दिलेली रीत वापरून अचूक दिशा मिळत नाहीत. सूर्याचा उदय व अस्त दररोज एकाच ठिकाणी होत असता तर कुठल्याही दुरुस्तीची गरज नाही. पण सूर्य सहा महिन्यांतून कर्कवृत्त ते मकरवृत्त असा ४७° फिरतो. त्यामुळे सकाळी व संध्याकाळी वर्तुळावर शंकूची सावली आल्यावर ज्या खुणा केल्यात त्या बरोबर परस्पर विरुद्ध दिशांना नसून त्यात सूक्ष्म चूक असते. ही चूक कमीत कमी व्हावी म्हणून हयशीर्षपंचरात्रात शंकूने दिशासाधन करताना ते शरद किंवा वसंत ऋतूत करावे म्हणून सांगितले आहे. याचे कारण या ऋतूत सूर्य विषुववृत्ताच्या आसपास असतो व वरील दुरुस्ती कमी प्रमाणात किंवा अजिबात न लावली तरी चालते हेच असावे.

ही चूक दुरुस्त करावयाच्या रीती शिल्पशास्त्रग्रंथात मिळतात. सूर्य सहा महिन्यांत ४७° फिरतो म्हणजे २४ तासात $\frac{१}{४}$°. वर्तुळाचा व्यास २४ अंगुले असेल तर २४ तासांतून सावली ३·८ मि.मी. दूर सरकेल. समजा, शंकूची सावली सकाळी व संध्याकाळी जेव्हा वर्तुळास स्पर्श करते, त्याला आठ तासांचा अवधी लागतो. तेव्हा सकाळी केलेली पश्चिम दिशेकडील खूण ३·८/३ = १·२ मि.मी. अंतराने बदलावयास हवी. काही ग्रंथांत या चुकीची दुरुस्ती प्रायोगिकरीत्या करावयाची रीत दिली आहे. वरीलप्रमाणेच शंकूची छाया सकाळी व संध्याकाळी जेथे वर्तुळास छेदते तेथे खुणा कराव्यात व या दोन खुणांमधील वेळेची नोंद ठेवावी. दुसऱ्या दिवशी सकाळी पुन्हा जेथे शंकूची छाया वर्तुळास छेदेल तेथे खूण करावी. ही खूण आदल्या दिवशी केलेल्या खुणेहून वेगळी येईल. या दोन खुणांमधले अंतर हे सूर्याचे २४ तासांतील त्याच्या पहिल्या ठिकाणाहून ढळल्यामुळे आले. आदल्या दिवशी केलेल्या खुणांमधली वेळ माहितीच असते. तेव्हा त्या वेळेच्या प्रमाणात दुरुस्ती करून या दोन्ही खुणांच्या मध्ये तिसरी खूण करावी. ही तिसरी खूण व पूर्वेकडील खूण यांना जोडणारी रेषा अचूक पूर्व व पश्चिम दिशा दाखविते.

ही दुरुस्ती निरनिराळ्या काळी सूर्याच्या स्थितीवरून निरनिराळी येईल. कुण्डसिद्धीत ही दुरुस्ती खालीलप्रमाणे दिली आहे,

सूर्य कन्या राशीत असेल तर दुरुस्ती तीन यूका (तीन मि.मी.) करावी. असेच वृषभ– १ यूक, मेष– २ यूका, मृग (कुंभ)– २ यूका, मकर– १ यूक, मिथुन व कर्क काही नाही, सिंह– ३ यूका, तुला– ३ यूका, वृश्चिक– १ यूक, धनु– काही नाही व मीन– २ यूका.

काही शिल्पशास्त्रग्रंथांत आणखी एक दुरुस्ती दिलेली असते. पूर्व–पश्चिम रेषा ही वर्तुळाच्या केंद्रस्थानावरून न जाता ती दूरवर असते. तेव्हा ही रेषा वर्तुळमध्यावर आणण्यासाठी ही दुरुस्ती असावी; कारण कोणत्याही वास्तूची प्राची ही केवळ पूर्व–पश्चिम रेषा नसून ती त्या वास्तूची मध्यरेषादेखील असते. ही दुरुस्ती ग्रन्थनामांसह खाली सारणीत दिली आहे. या सारणीवरून दिसून येईल की केवळ महिने, किंवा सूर्य ज्या राशीत असतो त्या राशीवरच ही दुरुस्ती अवलंबून नसून दुरुस्ती ज्या ठिकाणी करावयाची ती जागा ब्रह्मावर्त, आर्यावर्त व विन्ध्याच्या दक्षिणेकडे जशी असेल त्याप्रमाणे बदलते, व त्यावरूनही या अनुमानाला बळकटी मिळते.

२०. वास्तुविद्या १·३१–४$\frac{१}{२}$

## दुरुस्ती अंगुलांमध्ये

| राशी | इंग्रजी महिने | वास्तु-विद्या | मयमत | | | मानसार | | | विश्वकर्मवास्तुशास्त्र | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | १–१० | १०–२० दिवस | २०–३० | १–१० | १०–२० दिवस | २०–३० | विंध्याच्या दक्षिणेस | आर्या-वर्त | ब्रह्मा-वर्त |
| कन्या | ऑगष्ट ते सप्टेंबर | काही नाही | १ | २ | २ | – | १ | २ | – | २ | ५ |
| वृषभ | एप्रिल ते मे | ,, | १ | २ | २ | – | १ | २ | – | ४ | ३ |
| मेष | मार्च ते एप्रिल | २ | १ | ० | ० | २ | १ | ० | ४ | १ | ३ |
| कुंभ | जाने. ते फेब्रु. | ६ | ५ | ४ | ४ | ६ | ५ | ४ | ४ | १ | १ |
| मकर | डिसें. ते जाने. | ८ | ७ | ६ | ६ | ८ | ७ | ६ | ८ | १ | १ |
| मिथुन | मे ते जून | २ | ३ | ४ | ४ | २ | ३ | ४ | ३ | ६ | ५ |
| कर्क | जून ते जुलै | ४ | ३ | २ | २ | ४ | ३ | २ | ४ | – | – |
| सिंह | जुलै ते ऑगष्ट | २ | १ | ० | ० | २ | १ | ० | ४ | १ | ४ |
| तुला | सप्टें. ते ऑक्टो. | २ | ३ | ४ | ४ | २ | ३ | ४ | २ | १ | २ |
| वृश्चिक | ऑक्टो. ते नोव्हें. | ४ | ५ | ६ | ६ | ४ | ५ | ६ | ४ | – | १ |
| धनु | नोव्हें. ते डिसें. | ६ | ७ | ८ | ८ | ६ | ७ | ८ | ६ | १ | – |
| मीन | फेब्रु. ते मार्च | ४ | ३ | २ | १ | ४ | ३ | २ | ४ | १ | ५ |

## ताऱ्यांवरून दिशाज्ञान

मुहूर्तमार्तण्ड नावाच्या १६ व्या शतकातील ग्रंथात दिले आहे की, उज्जयनी शहराच्या दक्षिणेकडे जर दिशासाधन करावयाचे असेल तर चित्रा व स्वाती यांच्यातील अंतराच्या मध्यबिंदूवरून पूर्व दिशा मिळवावी व उज्जयनीच्या उत्तर दिशेला पूर्व दिशा मिळविण्यासाठी कृत्तिका नक्षत्राचा उपयोग करावा. दोन्ही टोकांना छिद्रे असलेल्या बांबूच्या पोकळ नळीचा वापर करून पूर्व दिशा नक्षत्रांवरून कशी मिळवावी ती रीतही या पुस्तकात दिली आहे. राजवल्लभ[२१] व शिल्पदीपकात[२२] ध्रुव व सप्तर्षींचे तारे यांवरून उत्तर दिशा निश्चित करावयाची रीत दिली आहे.

२१. राजवल्लभ १·११

२२. शिल्पदीपक १·२१

## ३. भारतीय भूमिपरीक्षा

भारतीय वास्तुशास्त्रज्ञ एखादे गाव वसविण्यापूर्वी किंवा घर बांधण्यापूर्वी त्यांना आधारभूत असलेल्या जमिनीची योग्यायोग्यता कशी ठरवीत असत याबद्दल बरीच माहिती उपलब्ध आहे. शिल्पशास्त्रावरील ग्रंथ इ. स. ५ वे शतक ते १५ वे शतक या कालखंडात लिहिले गेलेत. बहुतेक सर्व ग्रंथांत **'भूपरीक्षा'** नावाचा स्वतंत्र अध्याय आढळतो. त्यावरून असे वाटते की, गावासाठी किंवा घरासाठी जमीन कशी असावी याबाबत बराच विचार केला गेलेला असावा. एवढेच नव्हे तर बहुतेक शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत याबाबत दिलेली माहिती जवळ जवळ सारखीच आहे, त्यावरून वास्तूसाठी जमीन कशी असावी याबाबतची ठाम व निश्चित मते तयार झाली असावीत.

एखादे गाव जेथे वसवावयाचे असेल तेथील प्रदेशाची प्रथम पाहणी करून तेथे अनुकूल गोष्टींची समृद्धी आहे की नाही हे ठरवावयास हवे. यासाठी देशाचे तीन प्रमुख भाग पाडलेले आहेत. त्यांना अनूप, जांगल व साधारण देश अशी नावे आहेत.

जेथे गोड व शुद्ध पाणी भरपूर उपलब्ध आहे, ज्या प्रदेशातून पुष्कळ व मोठ्या नद्या वाहतात, जेथील जमीन मजबूत असून शेतीकामास उत्तम असते, जेथे तांदूळ, गहू व ऊस यांची निपज खूप मोठ्या प्रमाणात होऊ शकेल, जेथील जमीन कुश नावाच्या गवताने सतत झाकलेली असते व जेथील हवामान समशीतोष्ण असते अशा प्रदेशाला **'अनूप'** म्हणतात. भारतीय वास्तुशास्त्रज्ञांच्या मते असा प्रदेश गाव वसविण्यास प्रशस्त असतो.

**'जांगल'** देशात काटेरी व रुक्ष झाडे आणि उघडेवाघडे डोंगर असतात. या प्रदेशात पाण्याचे दुर्भिक्ष असून विहिरींना पाणी थोडे व फार खोलीवर लागते. सूर्याचे ऊन येथे अत्यंत प्रखर असल्याने येथील पशू, पक्षी हे निर्बल व मांसरहित असतात. हवेत धुळीचे प्रमाणही बरेच असते.

ज्या प्रदेशात अनूप व जांगल या दोन्ही विभागांचे गुण संमिश्र रीतीने असतात त्यास **'साधारण'** म्हणतात. अशा प्रदेशात पाणी फार कमी नसते पण त्याचप्रमाणे त्याचा भरपूर पुरवठा नसतो. अन्नधान्याची रेलचेल नसली तरी ते पुरेसे असते.[१]

सिंधू नदीचे खोरे, गंगा व यमुना या नद्यांची खोरी यांना अनूप प्रदेशाचे वर्णन बरोबर लागू पडते. मध्यप्रदेश, गुजराथ, दख्खन ही जांगल प्रदेशांत येतात तर दक्षिण हिंदुस्थानचे वर्णन साधारण-प्रदेश म्हणून करता येईल.

घराकरिता किंवा प्रासादाकरिता जागा ठरविताना तिचा आकार तसेच तिचा दिशापरत्वे उतार यांचा विचार करतात. जमिनीचा आकार वर्तुळाकार, अर्धचंद्राकार, त्रिकोणी, पाच किंवा सहा कोनी, शूल अथवा सापाप्रमाणे लांबलचक, मृदंगाप्रमाणे मध्यभागी रुंद व दोन्ही टोकांस अरुंद अशी, पक्ष्यांच्या चोचीप्रमाणे दोन बाजू खूप लांब व तिसरी बाजू एकदम लहान अशी, मासा हत्ती किंवा कासव यांच्या पाठीप्रमाणे आकार असलेली, जी आयताकार आहे पण जिची लांबी तिच्या रुंदीपेक्षा सवापटीने जास्त आहे अशी जमीन त्याज्य समजावी.[२,३]

जमिनीची युक्तायुक्तता ती कोणत्या दिशेला उतरत गेली आहे त्यावरूनही ठरविली जाते. पूर्व व उत्तर दिशांकडे उतार असलेली जमीन शुभ व धनदायक समजतात. पश्चिम व दक्षिणेकडे

१. समरांगणसूत्रधार ८.३–४ २. तन्त्रसमुच्चय १.३१ ३. मानसार ४.१३–१४

उतार असलेली जमीन त्याज्य समजतात. ज्या जमिनीचा उतार पश्चिमेकडे आहे ती धनक्षयकारक असते. दक्षिणेकडे उतार असलेली जमीन मालकाला मृत्युकारक होते.[४,५] पूर्व व वायव्य आणि वायव्य आणि उत्तर, उत्तर व ईशान्य, ईशान्य व पश्चिम या दिशांकडे जमीन उतरत गेली तर ती शुभ असते. पश्चिम व आग्नेय, दक्षिण आणि आग्नेय, नैर्ऋत्य व दक्षिण, पूर्व व नैर्ऋत्य, पश्चिम आणि वायव्य या दिशांना जमिनीचा उतार असेल तर ती जागा अशुभ समजून त्यागावी.[६]

जमिनीची त्याज्यात्याज्यता तिच्या दिशापरत्वे उतारावरून कुठल्या शास्त्रीय तत्त्वावरून ठरविली गेली हे कळणे अवघड आहे. पूर्वापार आलेल्या समजूतीवर बहुधा जमिनीची ही युक्तायुक्तता ठरविली गेली असावी. शतपथब्राह्मणात[७] यज्ञशालेकरिता जागेची निवड करताना ती कशी असावी याचे वर्णन आहे. यज्ञाचे स्थान उंच जागी असावे. त्याचा आकार चौरस असावा. जागेचा उतार पूर्व दिशेकडे असावा कारण ती देवांची दिशा आहे, किंवा जमीन उत्तरेकडे झुकलेली असावी कारण ती मानवांची दिशा आहे. जमिनीचा उतार दक्षिणेकडे नसावा कारण ती पितरांची दिशा आहे. यावरून असे वाटते की उताऱ्याच्या दिशेवरून जमिनीची परीक्षा याचे मूळ जुन्या समजुतीत आहे.

## जमिनीची सूक्ष्म परीक्षा

वर दिल्याप्रमाणे गाव वसविण्यासाठी किंवा घर बांधण्यासाठी स्थूलमानानें जागा निश्चित केल्यानंतर जमिनीची सूक्ष्म परीक्षा करून ती जमीन घराच्या, प्रासादाच्या अगर कोणत्याही वास्तूच्या पायासाठी योग्य आहे की नाही हे ठरवितात. सूक्ष्म परीक्षणाचे दोन प्रकार आहेत. जमिनीचे दृष्टि-निरीक्षण करणे म्हणजे केवळ पंचेन्द्रियांनी इतर कोठल्याही साधनांची मदत न घेता मातीची परीक्षा करणे हा पहिला प्रकार व मातीवर निरनिराळे प्रयोग करून वास्तूच्या पायासाठी ती योग्य तेवढी मजबूत आहे की नाही ते पाहणे हा दुसरा प्रकार.

दृष्टिनिरीक्षणाने जमिनीचा रंग, गंध, रस, ध्वनि व स्पर्शमान यांचा शोध करून तिची युक्तायुक्तता ठरवितात.

**रंग–** माती सर्वत्र एकाच रंगाची असावी. निरनिराळ्या जागी वेगवेगळ्या रंगच्छटा असलेली अथवा विवर्ण नसावी. पांढऱ्या रंगाची माती घराच्या पायासाठी सर्वोत्तम, त्यानंतर पिवळ्या व तांबड्या रंगांच्या मातीचा क्रम लागतो. काळ्या व निळ्या रंगाची माती निकृष्ट असते व शक्य तर अशा जमीनीवर घर बांधू नये[८-१२].

**गंध–** माती सुगंधित असावी. तिला कुंकू, अगरू, कापूर, चन्दन यांच्यासारखा किंवा यांच्या मिश्रणासारखा सुवास असावा. कमळ, कण्हेर, मालती, चाफा या फुलांप्रमाणे माती सुवासिक असावी. ज्या मातीला गोमूत्र, दूध, दही, दारू अथवा आसवाप्रमाणे किंवा नुकत्याच दळलेल्या पिठा-प्रमाणे वास येतो ती माती घराच्या पायासाठी उत्तम समजावी. गटारातून येतो तसा घाण वास,

---

४. वास्तुविद्या २.२–३
५. मानसार ३.९½, ११, १२½
६. वास्तुविद्या २.८–१५
७. शतपथब्राह्मण ३.१.१.१–२
८. समरांगणसूत्रधार ८.४८–५६
९. शिल्पदीपक १.२३
१०. राजवल्लभ १.१३
११. अग्निपुराण ९२.७
१२. मत्स्यपुराण २५३.११–१२

स्मशानातील मातीला असतो तसा वास, तेल, प्रेत किंवा माशांप्रमाणे ज्या मातीला दुर्गंधी येते ती त्याज्य समजावी.[१३-१५] ज्या मातीला शुद्ध तुपाप्रमाणे सुगंध आहे ती सर्वोत्तम. तिच्या खालोखाल ज्या मातीला रक्ताप्रमाणे, खाद्यान्नाप्रमाणे किंवा मद्याप्रमाणे वास येतो ती माती उत्तरोत्तर कमी दर्जाची समजावी.[१६-१७] ज्या मातीला जळकट वास आहे किंवा पक्षी, मासे अथवा प्रेत यांच्याप्रमाणे दुर्गंधी येते अशी जमीन त्याज्य समजावी.[१८]

**रस–** चवीप्रमाणे मातीचे तीन भेद केले आहेत. ज्या मातीचा स्वाद सुरुचीपूर्ण असतो ती उत्तम माती; जिची चव तिखट किंवा आंबट असते ती मध्यम प्रकारची माती व जिची चव कडू किंवा मिठाप्रमाणे खारट आहे ती माती कनिष्ठ समजून तेथे घर बांधू नये.[१९-२३]

**ध्वनी–** मातीला ठोकले असता जसा आवाज येईल त्यावरूनही तिची पायासाठी उपयुक्तता ठरविली जाते. ज्या मातीचा आवाज मृदंग, बासरी, नगारा किंवा हत्तीच्या तुतारीसारखा अथवा घोड्याच्या खिकाळण्याप्रमाणे खणखणीत किंवा सागरगर्जनेप्रमाणे गंभीर असतो ती माती उत्तम समजावी. उंटाच्या गडगडण्याप्रमाणे, गाढवाच्या ओरडण्याप्रमाणे किंवा ओढ्यात उथळपणे वाहणाऱ्या पाण्याप्रमाणे अथवा मातीच्या फुटक्या मडक्याप्रमाणे टिचका आवाज जी माती ठोकली असता येतो ती वास्तूच्या पायासाठी योग्य नाही.[२४-२६]

**स्पर्शमान–** जी जमीन स्पर्शास मऊ व सुखद असून हिवाळ्यात उष्ण व उन्हाळ्यात शीतल असते ती चांगली समजतात. ज्या जमिनीचा स्पर्श रुक्ष आहे व जिचे तपमान ऋतुमानाप्रमाणे न बदलता उष्ण किंवा थंडच रहाते अशी जमीन त्याज्य समजावी.[२७]

**त्याज्य जमिनीची आणखी काही लक्षणे–** ज्या जागेजवळ पूर्वी स्मशान होते, ज्या जमिनीत खोल खड्डे असून झाडांच्या मुळांनी फटा पडल्या आहेत; ज्या जमिनीत वारुळे, मृत प्राणी, केस, हाडे किंवा धान्याचे तुष हे जास्त प्रमाणात आहेत अशी जमीन त्याज्य समजावी. जमिनीत कुजक्या लाकडाचे तुकडे, अर्धवट जळालेले कोळसे अगर त्यांची राख किंवा मृत प्राण्यांची हाडे असतील तर अशी जमीन वास्तूच्या पायासाठी योग्य नाही.[२८-३१] ही सर्व लक्षणे पीट (peat) मातीची आहेत. अशा मातीवर वास्तू बांधली असता ती सतत दबत जाते व वास्तू शेवटी मोडकळीस येते म्हणून आधुनिक भूविज्ञानशास्त्राप्रमाणेही अशी जमीन पायासाठी अयोग्य समजतात.[३२-३६]

१३. समरांगणसूत्रधार ८.४६–४७, ५८
१४. शिल्पदीपक १.२३
१५. राजवल्लभ १.१३
१६. बृहत्संहिता ५३.९६
१७. अग्निपुराण ९२.७
१८. मानसार ४.११
१९. समरांगणसूत्रधार ८.४९, ६०
२०. शिल्पदीपक १.२४
२१. राजवल्लभ १.१३
२२. बृहत्संहिता ५३.९७
२३. मत्स्यपुराण २५३.१२–१३
२४. समरांगणसूत्रधार ८.५१, ६२
२५. तंत्रसमुच्चय १.३०, ३२
२६. शिल्पप्रकाश १.१३–१६
२७. समरांगणसूत्रधार ८.५०, ६१
२८. समरांगणसूत्रधार ८.५३–५४
२९. विश्वकर्मवास्तुशास्त्र ५.२६–२७
३०. मानसार ४.८
३१. तंत्रसमुच्चय १.३१
३२. बृहत्संहिता ५३.८८
३३. महाकपिल पांचरात्र, हयशीर्ष पांचरात्राच्या ८.१० ची टीका.
३४. हयशीर्ष पांचरात्र ८.१०
३५. वास्तुविद्या २.३९
३६. अपराजितपृच्छा ५१.२८

प्राचीन वास्तुशास्त्रीय ग्रंथांप्रमाणे मातीचे दोन प्रमुख प्रकार आहेत. स्निग्ध व अस्निग्ध माती. स्निग्ध माती चिकण असून तीत वाळूचे प्रमाण फार थोडे असते. अशी माती पाया खोदण्यास कठीण असते. अस्निग्ध मातीत वाळूचे प्रमाण जास्त असून तीत जाड वाळू तसेच दगडगोटेही असतात. ही माती खणावयास सोपी असते.[३७, ३८]

स्निग्ध आणि अस्निग्ध दोन्हीही तऱ्हेची माती पायाकरिता चांगली समजतात. मात्र स्निग्ध मातीत पाणी भरपूर असेल ( अतिपंकिला ) व क्षारही पुष्कळ असून तिला दुर्गंधी येत असेल तर अशी माती वास्तूच्या पायासाठी त्याज्य समजावी. ही सर्व समुद्रकाठच्या मातीची ( Marine clay) लक्षणे आहेत. ही मातीदेखील वास्तूच्या वजनाने फार दबली जाते म्हणून पायाकरिता ही माती सर्वथा अयोग्य आहे. अस्निग्ध मातीत दगड, गोटे व जाड वाळू असू नये. तिच्यात मणी, शंख, शिंपले, अथवा प्रवाळ असतील तर ती माती ग्राह्य समजावी.[३७,३८]

**मातीवरील चाचण्या**

वरील दृष्टिनिरीक्षणाच्या परीक्षेतून जी जमीन वास्तूच्या पायासाठी योग्य समजली जाईल तिच्यावर प्रयोग करून तिची अधिक परीक्षा घेतली जाते. या प्रयोगांनी मातीची घनता, तिचे सच्छिद्रत्व वगैरे गोष्टींबद्दल माहिती मिळते. असे प्रयोग बरेच आहेत पण त्यांतले प्रमुख दोन देतो.

**परीक्षा पहिली–** एक हात ( ४५.६ सें. मी. ) लांब, रुंद व तितकाच खोल खड्डा खणून, जी माती खड्डा खणताना बाहेर काढली ती पुन्हा या खड्डयात दाबून दाबून भरावयाची. खड्डा पूर्ण भरून जास्त माती वर उरली तर ती जमीन वास्तूच्या पायासाठी उत्तम असते. खड्डा पूर्ण भरून मातीचा थर पूर्वीइतकाच येण्यासाठी खड्डयातून काढलेली सर्व माती लागली तर ती जमीन मध्यम प्रतीची समजावी. याउलट, खड्डयातून काढलेली सर्व माती खड्डयात घालूनही जर तो पूर्ण भरला नाही व पूर्ववत भरण्यासाठी अधिक मातीची गरज लागली तर ती माती निकृष्ट समजून तिच्यावर वास्तू बांधू नये.[३९-४७]

मातीची मजबुती (घनता) जाणण्याची ही पद्धती वैदिककाळापासून भारतीयांनी शोधून काढली असावी असे म्हणण्यास जागा आहे. शतपथब्राह्मणात उल्लेख आहे, "आता तो खड्डा खोदतो आहे...; माती पूर्वदिशेकडे टाकीत आहे.... आता ती माती पुन्हा खड्ड्यात भरत आहे.... आता मंत्र म्हणत माती दाबून दाबून मजबूत करीत आहे... तो माती इतकी दाबतो की ती जमिनीच्या समतल होते; किंवा खड्ड्यातील माती जमिनीहून थोडी उंच होते. ही उंची देवतापण आहे म्हणजेच हा खड्डा असाधारण आहे."[४८]

---

३७. काश्यपशिल्प ४·२–४
३८. समरांगणसूत्रधार ८·७०
३९. सम. सू. धार ८·६७–६९
४०. मानसार ५·१७–१८
४१. बृहत्संहिता ५३·९२
४२. अपराजितपृच्छा ५१·७–८
४३. हयशीर्ष पंचरात्र ६·१०
४४. शिल्पदीपक १·२६
४५. राजवल्लभ १·१६
४६. अग्निपुराण ९२·८–९
४७. मत्स्यपुराण २५८·१६–१७.
४८. शतपथब्राह्मण ३·६·१·१६–१८

**परीक्षा दुसरी–** परीक्षा एक मध्ये दिल्याप्रमाणे एक हात लांबी, रुंदी व खोलीचा खड्डा तयार करून तो पाण्याने काठोकाठ भरावा. नंतर खड्ड्यापासून शंभर पावले सावकाश दूर जाऊन पुन्हा त्याच गतीने खड्ड्याकडे परत यावे. जर खड्ड्यातील पाण्याची पातळी पूर्वीइतकीच असेल तर ती जमीन उत्तम, पाण्याची पातळी एक यवापेक्षा (तीन मि. मी.) कमी खाली गेली असेल तर ती जमीन मध्यम प्रतीची व पाण्याची पातळी एक यवापेक्षा अधिक खाली गेली असेल तर ती माती कनिष्ठ प्रतीची समजावी.[४९-५४]

वास्तुशास्त्राच्या इतर ग्रंथांत ह्या परीक्षेचे वर्णन जरा निराळे केलेले असते. अपराजित-पृच्छात[५५] दिले आहे की, एक हात घनमानाच्या खड्ड्यात पाणी भरून, शंभर पावले अंतर जाऊन परत खड्ड्यापाशी आल्यावर जर पाण्याची पातळी ¼ हातापेक्षा (११·६ सें. मी.) कमी खाली गेली असेल तर ती जमीन उत्तम असते. जर पाण्याची पातळी ¼ हातापेक्षा जास्त पण ½ हातापेक्षा (२३·२ सें. मी.) कमी खाली गेली असेल तर ती जमीन मध्यम प्रतीची समजावी. खड्ड्यातील पाण्याची पातळी जर ½ हातापेक्षा जास्त खाली गेली असेल तर ती जमीन कनिष्ठ प्रतीची असते.

बृहत्संहितेप्रमाणे[५६] जर शंभर पावले जाऊन परतल्यावर पाण्याची पातळी पूर्वीइतकीच राहिली तर ती जमीन वास्तूच्या पायासाठी उत्तम, पण जर पाणी ६४ पल म्हणजे एक आढक (३·५ लिटर) इतके कमी झाले तर ती माती कनिष्ठ समजावी.

मानसारात[५७] याच प्रयोगाचे वर्णन निराळे दिले आहे. एक हात घनमानाच्या खड्ड्यात संध्याकाळी काठोकाठ पाणी भरावे व दुसऱ्या दिवशी सकाळी पाण्याची पातळी पहावी. जर खड्ड्यात थोडेफार पाणी उरले असेल तर ती जमीन वास्तूच्या पायासाठी उत्तम मानतात. त्या खड्ड्यात पाणी अजिबात उरले नाही व फक्त तळाची जमीन ओली असेल अथवा ती कोरडी पडून तिला भेगा पडल्या असतील तर ती जमीन अयोग्य समजावी.

या परीक्षांचे भूविज्ञानशास्त्रदृष्टचा केलेले परीक्षण कुलकर्णी[५८] (१९७२) या लेखात जिज्ञासूंनी पहावे.

४९. शिल्परत्न ३·१९
५०. ईशान शि. गु. देवपद्धति २३·३८
५१. हयशीर्ष पंचरात्र ६·१०
५२. शिल्पदीपक १·२६
५३. राजवल्लभ १·१६
५४. सम. सू. धार ८·७२
५५. अपराजितपृच्छा ५१·९
५६. बृहत्संहिता ५३·९३
५७. मानसार ११·१७
५८. 'प्राचीन भारतीय वास्तुसाहित्यमें भूमि-परीक्षण', जर्नल ऑफ द इन्स्टिटयूशन ऑफ इंजिनियर्स, हिंदी विभाग, जिल्द ५३, डिसेंबर.

## ४. मृत्तिका स्थिरीकरण

मृत्तिका स्थिरीकरणाचे दोन प्रमुख प्रकार आहेत. एखाद्या जागी वास्तू बांधावयाची असेल व तेथली पायाकरिता लागणारी जमीन योग्य इतकी मजबूत नसेल तर तिचे दृढीकरण करणे हा मातीच्या स्थिरीकरणाचा पहिला प्रकार. या रीतीत माती जेथे असेल तेथेच तिचे दृढीकरण करावे लागते. भारतीय शिल्पग्रंथांत या प्रकारच्या मृत्तिकास्थिरीकरणाबद्दल फारशी माहिती मिळत नाही.

पाणथळ जमिनीतील पाण्याचा निचरा करून ती मजबूत कशी करावी याबाबत फक्त उपाय दिला आहे. पूर्वीच्या काळी जनसंख्या कमी व त्यामानाने जमीन विपुल असल्याने वास्तूची उभारणी चांगल्या जमिनीवरच करीत असत. मातीच्या स्थिरीकरणाच्या दुसऱ्या प्रकारात जमिनीतून माती खणून काढून तिच्यावर योग्य त्या प्रक्रिया करून किंवा योग्य त्या वस्तू मातीत मिसळून नंतर ही स्थिरीकृत माती वापरणे हा भाग मोडतो. या प्रकारच्या मृत्तिकास्थिरीकरणाबद्दल बरीच माहिती शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत मिळते. या प्रकारची स्थिरीकृत माती भिंत बांधण्यासाठी, विटा तयार करण्यासाठी, भिंतीवर लेप (Plaster) देण्यासाठी, मातीच्या देवमूर्ती व त्या देवमूर्तींच्या बाहेरून लेप देण्यासाठी वापरीत असत. माती स्थिरीकरणाच्या पद्धती अर्थात माती कशाकरिता वापरावयाची यावर अवलंबून असत.

## वैदिककालीन मृत्तिका स्थिरीकरण

वेदकाळाच्याही अगोदर असलेल्या सिंधुसंस्कृतीच्या शहरांच्या उत्खननांत मातीची भांडी, कच्च्या व भाजलेल्या विटा वगैरे वस्तू मिळतात. ही भांडी जरी मजबूत व कलापूर्ण आहेत तरी त्यांच्या निर्मितीसाठी माती मुद्दामहून स्थिरीकृत करून वापरली असावी असे वाटत नाही. या मातीचे रासायनिक पृथक्करण केल्यानंतर तीत वाळू व चुना आहेत असे कळते. मात्र हे पदार्थ मूळचेच मातीत होते. मातीच्या स्थिरीकरणाकरिता ते मुद्दामहून घातले नसावेत. अर्थात मातीची भांडी भाजून पक्की करणे हा स्थिरीकरणाचा उपाय त्यांनी वापरला आहे.

महाराष्ट्रात ताम्रपाषाणिक युगात तयार केलेली जी मातीची भांडी सापडतात, त्यांच्या मातीत तिच्या दृढीकरणार्थ वाळू मुद्दामहून घातली असावी असे दिसते. ही मातीची भांडी आगीत भाजून इतकी पक्की केली होती की त्यांना ठोकले असता त्यांच्यातून खणखणीत आवाज निघतो.[१] तेव्हा भारतीयांना मातीच्या कणांची पुनर्रचना करून ( rearrangement and addition of soil particles) तिच्या भौतिक स्थिरीकरणाची (mechanical stabilization) युक्ती मूलऐतिहासिक काळापासून (protohistoric period ) प्रारंभिक स्थितीत माहिती होती.

यजुर्वेद संहितेत[२] विटा व मातीचे 'उखा' नावाचे भांडे तयार करण्याची रीत मिळते. माती खणून तीत बकऱ्याचे केस, अगदी बारीक वाळू, लोखंडाचे चूर्ण व दगडाची बारीक भुकटी मिसळून हे सर्व मिश्रण पुन: पुन्हा मळून व मर्दन करून एकजीव करीत. या मातीच्या विटा व उखा नावाचे भांडे तयार करीत. हे सावलीत एक दिवस वाळवून नंतर घोड्याच्या लिदीच्या आगीच्या धुरात खालीवर, आतून बाहेरून धूपित करीत. त्यानंतर एक खड्डा करून त्यात वीटा व उखा, औदुंबर, पलाल वगैरे झाडांच्या फांद्यांसकट ठेवून त्यांना एक दिवस व रात्र आगीत भाजून पक्के करीत.

शतपथब्राह्मणात[३] बारीक वाळू, दगड व लोखंडाचे चूर्णही मातीत तिच्या मजबुतीसाठी मिसळावीत असे स्पष्ट म्हटले आहे.

---

१. सांखलिया ह. (१९७०)

२. यजुर्वेद संहिता ११·१०–१४, १८, २५–२८, ३३–३७, ४०–४१, ४५, ४६, ४९, ५०, ५४–६२.

३. शतपथब्राह्मण– "अथैतत् त्रयं पिष्टं भवति । शर्कराऽश्माऽयोरसस्तेन स१ँसृजति स्थेम्ने ॥ ६·५·१·६ ॥ स्थेम्ने म्हणजे मजबुतीसाठी.

हे उखेचे भांडे जर भाजताना फुटले तर या भाजलेल्या मातीचे चूर्ण करून ते पहिल्या मातीत, म्हणजे जिच्यात बकरीचे केस वगैरे घातले आहेत त्या मातीत, मिसळून पुन्हा उखापात्र तयार करून भाजावे. ते फुटत नाही असा हवाला शतपथब्राह्मणात[४] दिला आहे. भाजलेल्या मातीच्या भुकटीस 'सुर्खी' म्हणतात. ती मातीत घातल्यास माती स्थिरीकृत होते. हे ज्ञान वैदिककालीही प्राथमिक स्वरूपात होते असे यावरून समजते.

वैदिककाली मातीत कोळशाची राख घालून ती स्थिरीकृत करावयाची पद्धत माहिती होती. बौधायन शुल्बसूत्रात[५] दिले आहे की, जो यज्ञ एक वर्षभर (संवत्सर) सतत चालेल त्याच्या वेदीच्या विटा तयार करताना त्या मातीत उख्मभस्म घालावे असा नियम दिला आहे. उखापात्रात विस्तव ठेवीत. त्याची जी राख जमे ते उख्मभस्म. बौधायनांनी असाही नियम दिला आहे, की एका रात्री-पुरतीच जी वेदी वापरावयाची तिच्या विटांत उख्मभस्म घालू नये. तेव्हा मातीत राख घालून ती स्थिरीकृत करावयाची पद्धत बौधायनांना ज्ञात होती.

## शिल्पशास्त्राच्या ग्रंथावरून मृत्तिकास्थिरीकरण

**मातीचे जेथल्या तेथेच स्थिरीकरण**– भृगुसंहितेत[६] पाणथळ जागेतील पाण्याचा निचरा करून ती माती मजबूत करावी असे म्हटले आहे. पाणथळ जमिनीत आडवे व उभे चर खणून ते दगडगोट्यांनी भरावेत. हे चर जवळच असलेल्या नाल्याला आणून सोडावेत म्हणजे त्यांच्यात जम-लेले पाणी नाल्यावाटे निघून जाईल व माती दृढीभूत होईल. पाणथळ मातीच्या स्थिरीकरणाची ही पद्धत अर्वाचीन काळीही स्वस्त व फार प्रभावी म्हणून वापरली जाते.

**स्थिरीकृत मातीचा वापर**– माती खोदून तिच्यात योग्य ते पदार्थ मिसळून ही स्थिरीकृत माती दुसरीकडे वापरायची या पद्धतीचे वर्गीकरण खालीलप्रमाणे करता येईल.

१) माती संपीडित करून (compaction) २) मातीच्या कणांची पुनर्रचना करून, ३) मातीत बन्धकद्रव्य घालून, ४) मातीचे रासायनिक स्थिरीकरण अ) चुना आ) क्षार व इ) जलाभेद्य पदार्थ मातीत घालून.

१) माती संपीडीत करणे– गावाच्या रक्षणाकरिता मातीचा तट बांधत. ही माती हत्तींच्या पायांनी तसेच धम्मसांनी धुमसून मजबूत करीत[७] या मातीच्या दोन्ही बाजूंना विटांची किंवा दगडांची भिंत बांधत.

---

४. शतपथब्राह्मण– "अथ मृदमाहृत्य । उखां चोपशयां च पिष्ट्वा संसृज्योखां करोति... ॥ ६.६.४.९ ॥

५. बौधायन शुल्बसूत्र– "उख्मभस्मना संसृज्येष्टकाः कारयेदिति ॥ २.७८ ॥ संवत्सरभृतं एवैतदुपपद्यते न रात्रिभृतः ॥ २.७९ ॥

६. भृगुसंहिता– "अनूपं जलपङ्कमयं देशं पूर्वोत्तरखाताभिरिष्टकोपलपूरिताभिर्गर्ताभिरास्रावयेत् ॥" अध्याय ८ ॥

७. समरांगणसूत्रधार १०.२०

वास्तूच्या पायासाठी खंदक खणत. ते वाळूच्या थरांनी भरत त्यावेळेला वाळू संतृप्त करीत व धुमसत. वाळूतून पाणी वाहून गेल्यास वाळू मजबूत होते हेदेखील दिले आहे.[८-१२]

२ ) मातीच्या कणांची पुनर्रचना करणे– मातीची भिंत बांधण्यासाठी पांढरी, तांबडी किंवा पिवळ्या रंगाची माती घ्यावी. या मातीत जाड वाळू, क्षार, लाकडाचे तुकडे, तांदुळाचे फोलकट ही असल्यास काढून टाकावीत. या मातीत त्रिफळाचा कषाय* घालून खूप दिवस ती पायांनी तुडवून एकजीव करावी.[१३-१५]

विटांसाठी स्थिरीकृत माती करण्यासाठी वर दिलेली माती खड्ड्यात घालून खूप दिवस तुडवावी. त्यांत क्षीरवृक्षांचा (अश्वत्थ, वट इत्यादी) डिंक आणि त्रिफळाचा कषाय घालावा व माती खूप तुडवावी व ती विटा तयार करण्यास वापरावी.[१६,१७] माती खूप तुडविल्यामुळे चिकणमातीची ढेकळे वगैरे पूर्ण मोडून सर्व कण त्यांच्या मूळ आकारांत येतात. हा एक मातीच्या कणांची पुनर्रचना करण्याचाच प्रकार आहे. क्षीरवृक्षाची साल आणि गोंद हे बन्धकद्रव्य म्हणून उपयोगात आणतात. त्रिफळाचा कषाय कृमिकिटाणूंचा नाश करतो.

३ ) मातीत बंधकद्रव्य व चुना वगैरे घालून रासायनिक स्थिरीकरण करतात. शंख, शिंपले भाजून त्यांचा चुना तयार करावा. त्यामध्ये बारीक वाळू समप्रमाणात घालावी. मुद्ग क्वाथाचे† पाणी, गुळाचे पाणी आणि खूप पिकलेल्या केळाचे चूर्ण हे सर्व अलग अलग चुन्याच्या एकचतुर्थांश भाग घेऊन चुना व वाळूच्या मिश्रणात घालावे. हे सर्व मिश्रण एकजीव होईपर्यंत मर्दन करावे. तीन महिन्यांनंतर यात पुन्हा गुळाचे पाणी घालून हे मिश्रण लोण्याप्रमाणे मऊ होईल इतके मर्दन करावे.

---

८. शिल्पप्रकाश १·८०

९. काश्यपशिल्प ४·६–७

१०. हयशीर्ष पञ्चरात्र– पूरयेत् खातकं यत्नात् पादंपादं यथाक्रमम् ॥ ११·१२ ॥
अष्टांगुलं मृत्तिकया हस्तकं चेष्टकादिभिः ।
सिक्त्वा सिक्त्वा तु तोयेन कलसैः काञ्चनादिभिः ॥ ११·१३ ॥
आकोटनं ततः कुर्यात् मुद्गरैः ब्रह्मवृक्षजैः ।

११. ईशान शि. गु. देवपद्धति. २७·४३–४४.

१२. शिल्परत्न – सशर्करैर्वालुकैश्च मृद्भिश्च दृषदादिभिः ।
दृढं प्रपूरयेत् शुद्धैः जलैराप्लुत्य मुद्गरैः ॥ १०.१४½ ॥
मुसलैर्बृहच्छिरस्कैस्तु निहत्य दृढतां नयेत् ।
गजसंचारणं तत्र बहुशः कारयेत् पुनः ॥ १०.१५½ ॥

१३. शिल्परत्न २१·१४–१५

१४. शिल्परत्न १४·४६

१५. वास्तुविद्या १६·२–३

१६. शिल्परत्न १४.४५–५७

१७. वास्तुविद्या १६·१–५

* त्रिफळाचा कषाय – हिरडा, बेहडा व आवळा यांची भुकटी चारपट पाण्यात घेऊन ते पाणी एकपट होईल इतके उकळावे. (अग्निपुराण २८१·१० ).

† मुद्गक्वाथ– क्षीरवृक्ष, कदंबवृक्ष यांचा डिंक, त्रिफळाचे पाणी, माष नावाचे बी व हरबऱ्याच्या डाळीचे किंवा गव्हाचे शिजलेले पीठ हे सर्व मिसळून त्यात सोळापट पाणी घालावे. पाणी एक भाग होईल इतके हे मिश्रण उकळावे.

हा लेप ज्या भिंतीवर बहुरंगी चित्र काढावयाचे आहे तिला द्यावा.[१८] काश्यपशिल्पात दिलेली रीत पुस्तकात दिली आहे.[१९]

तंत्रसमुच्चयात[२०] मातीची देवमूर्ती तयार करण्यासाठी माती कशी स्थिरीकृत करावी याचे वर्णन मिळते. पांढरी माती घ्यावी, नाहीतर तांबडी अथवा पिवळी माती वापरावी. काळी माती वापरू नये. या मातीत गाईचे दूध, दही, तूप व बेलतेल मिसळून, गोटे, दगड व लोखंड यांचे समभाग चूर्ण मातीत घालीत. चूर्ण मातीच्या एकचतुर्थांश भाग असावे. खैर व अर्जुन यांच्या झाडांच्या सालींचा कषाय या मिश्रणात घालून ते पिठाप्रमाणे मऊ होईल इतके मळावे. यात श्रीवेष्टकरस (turpentine), सर्जरस (शाल वृक्षाचा डिंक), कुंकू, कुष्ठ व कुन्दरू (एक प्रकारचे गवत) घालून पुन्हा नदीसंगमाजवळील गाळ यात मिसळावा. हे मिश्रण एक महिन्यापर्यंत मर्दन करावे. या मातीची मूर्ती करून ती तीन दिवस सुकत ठेवावी. ही माती दगडासारखी किंवा लोखंडासारखी मजबूत होते.

मूर्ती तयार झाल्यावर तिच्यावर अधिक संस्कारित मातीचा पुन्हा एक थर देतात. वरील मूर्तीकरिता तयार केलेल्या मातीत तिच्या $\frac{1}{२०}$ भागाइतके त्रिकटुक चूर्ण टाकतात. नारळाचा काथ्या अगदी बारीक भुगा करून घालतात. त्यात पुन्हा नारळाचे पाणी व त्रिफळाचा कषाय घालून ते मिश्रण एकजीव करतात. या मातीचे चार लेप मूर्तीवर एकावर एक असे क्रमशः लावतात. एक थर कोरडा झाला की, तो खरदुरा करतात व त्यावर दुसरा थर लावतात. चौथा शेवटचा थर असा लावावयाचा की, त्यात कोठेही छिद्र राहणार नाही. नंतर मूर्तीला शेवटचा लेप लावतात. यासाठी वर दिलेल्या मातीच्या मिश्रणात एक मूठ मातीचे मिश्रण व एक चिमटी दगडाचे चूर्ण या मापाने मिश्रण करून त्यात पुन्हा त्रिफळाचा कषाय घालतात व माती पिठाप्रमाणे मऊ होईल इतकी मळतात. नंतर एक मूठ वरील मिश्रण व एक चिमटी कापसाचे बारीक तंतू असे मिश्रण करून ते एकजीव करतात. हा लेप मूर्तीला शेवटचा थर म्हणून देतात व त्याला कोरडा होऊ देतात. नंतर मूर्तीला रंग वगैरे लावून ती सुशोभित करतात. काश्यपशिल्पात[२१] लाकडाच्या सांगाड्याला स्थिरीकृत माती लावून मूर्ती बनवावी याबद्दल जे वर्णन आले आहे त्यात मातीच्या स्थिरीकरणाकरिता दिलेली रीत वर दिलेल्या रीतीस पुष्कळशी मिळती जुळती आहे. अपराजितपृच्छातही[२२] आणखी एक निराळी रीत दिली आहे.

मूळ ऐतिहासिक काळापासून मेण वितळवून व साच्याचा उपयोग करून धातूची मूर्ती बनविण्याची पद्धती (Cire Purdue Technique) भारतीयांस माहीत होती.[२३] यातील साच्याचा जो बाहेरचा मातीचा थर तो कसा करावा याची माहिती मानसोल्लासात मिळते.[२४]

सोने, चांदी, लोखंड इत्यादी धातू शुद्ध करण्यासाठी मातीच्या मूषा बनवीत. त्यासाठी माती स्थिरीकृत कशी करावी याची माहिती रसरत्नसमुच्चयात मिळते.[२५]

वरील माहितीवरून मातीच्या स्थिरीकरणाच्या विज्ञानात[२६] भारतीयांनी मध्ययुगापर्यंत केलेल्या प्रगतीची कल्पना येते. या विषयावरील अधिक माहितीसाठी कुलकर्णी (१९७३) पहावे.

---

१८. शिल्परत्न अ. १४ १९. काश्यपशिल्प अ. ८३
२०. तंत्रसमुच्चय ११·११३ ची विमर्शिनी २१. काश्यपशिल्प अ. ८३
२२. अपराजितपृच्छा २३२·१–१५ २३. सांखलिया, ह. (१९७०)
२४. मानसोल्लास १·८१·८५ २५. रसरत्नसमुच्चय १०·५–७
२६. 'भारतीय शिल्पशास्त्र और मिट्टीका स्थिरीकरण' जर्नल ऑफ द इन्स्टिट्यूशन ऑफ इंजिनियर्स, एप्रिल

## ५. वास्तूकरिता लाकूड

लाकूड वृक्षापासून मिळते व त्याचे गुणधर्म झाडावर अवलंबून असतात. भारतीयांना वृक्षांबद्दलची माहिती वैदिक काळापासून किंवा त्याही अगोदरपासून असावी. त्यांनी वृक्षांना ओळखण्यासाठी म्हणून नावे दिलीत व त्यांना त्या वृक्षांच्या लाकडांचे गुणधर्म व त्यांनुसार उपयोग यांचेही ज्ञान होते. याबद्दलचे पुरावे ऋग्वेद, ब्राह्मणे वगैरेंत अप्रत्यक्ष रीत्या मिळतात.

शाल्मली नावाच्या झाडाचे ज्ञान ऋग्वेदकाळीही होते.[१] शतपथ ब्राह्मणात बऱ्याच झाडांची नावे दिली आहेत, जसे अश्मगन्धा, अध्यण्डा, पृश्निपर्णी, अश्वत्थ, विभीतक, बिल्वक, स्फूर्जक, हरिद्र, न्यग्रोध (१३·८·१·१६), अपामार्ग (५·२·४·१४), अश्ववाल (३·४·१·१७), उदुंबर (३·६·१·४), कश्मरी (३·४·१·१६), पलाश (३·३·४·१०), प्लक्ष (३·८·३·१२), बिल्व, वेणू, खदिर (३·४·४·१०), शमी (९·२·३·३७). खैराचे लाकूड मजबूत असते हे माहिती होते (३·४·४·१०). औदुंबराचे लाकूड सभामंडपाच्या खांबाकरिता वापरीत असत (३·६·१·४). मंडपाची तुळई बांबूची असे (३·१·१-६, ३·६·१·२३). सुतारकामाचे ज्ञान शतपथ ब्राह्मणकाळी बरेच प्रगतावस्थेत होते. लाकडाचे रथ, गाडी, आसन्दी वगैरे बनवीत. हे शब्द शतपथब्राह्मणात पुष्कळदा येतात. यजुर्वेद संहितेत लाकूडकाम करणाऱ्यांची नावे येतात. रथकार (३०·६), सुतार (३०·६), विदलकारी म्हणजे बांबू चिरणारी स्त्री (३०·८), पेशितृ म्हणजे लाकडावर नक्षी करणारा मिस्त्री (३·१२) वगैरे वगैरे.

**शिल्पग्रंथांतली माहिती**– वृक्षांचे वर्गीकरण त्यांच्या वयानुसार, दोषांनुरूप व लिंगांवरून करतात.

**झाडांचे वयानुसार वर्गीकरण**– वृक्षाचे वय १०३ वर्षे समजले जाते. १६ वर्षांहून कमी वयाचे वृक्ष 'बाल' समजतात. ५० वर्षांहून जास्त वयोमर्यादा असलेले वृक्ष 'वृद्ध' असतात. १६ ते ५० वर्षांपर्यंत ज्यांचे वय आहे अशा झाडांचे लाकूड बांधकामासाठी उत्तम समजतात.[२]

**झाडांचे दोषानुरूप वर्गीकरण**– लाकूड कापल्यानंतर त्याच्यावर ध्वज, छत्र, चामर, कुंभ, वृत्त यांच्यासारख्या आकृती दिसल्या तर तो वृक्ष शुभ समजावा. स्त्री, भुंगा, कावळा, साप, गिधाड, शीर्षविहीन पुरुष यांच्यासारखी आकृती दिसल्यास तो वृक्ष अशुभ असतो.[३]

लाकूड सुषिर, लहान लहान खूप छिद्रे असलेले, असे नसावे. निष्कुट, कोल, रानडुकरासारखे छिद्र, घृष्टिनेत्र, वत्सक व बन्धूक असे लाकडात असलेल्या छिद्रांचे प्रकार आहेत. फार मोठ्या छिद्राला, झाडांतल्या पोकळीला, निष्कुट म्हणतात. याहून लहान आकाराच्या छिद्राला कोल किंवा अर्धकोल म्हणतात. वृत्ताकार व बुबुळे गरगरा फिरणाऱ्या डोळ्यांप्रमाणे असलेल्या छिद्राला घृष्टिनेत्र म्हणतात. विवर्ण, लांबट व वामावर्त छिद्राला वत्सक व किडींनी खाऊन मोठे केलेल्या छिद्राला बन्धूक म्हणतात. मातीच्या मडक्याला असतात त्याप्रमाणे अगदी बारीक बारीक पण असंख्य छिद्रे असलेल्या लाकडाला सुषिर म्हणतात. छिद्रे व गाठी असलेले लाकूड बांधकामास अयोग्य समजतात.[४]

---

१. ऋग्वेद १०·८·५·२०,
२. सम. सू. धार १६·८,
३. विश्वकर्माप्रकाश ९·१११६–११२०.
४. विश्वकर्माप्रकाश (१०·११२७–११३२)

**लिंगानुसार वर्गीकरण**– मुळापासून अग्रापर्यंत जे गोलाकार असून ज्यांची जाडी सर्वत्र सारखीच असते[५, ६] चांगल्या जमिनीत उगवलेले, ज्यांची मुळे जमिनीत खूप खोलवर गेली आहेत, ज्यांच्या फळाफुलांना मन्द सुगंध येतो, दृढ, घनता जास्त असलेले, ज्यांचा स्पर्श समशीतोष्ण आहे अशा वृक्षांना पुल्लिंगी समजतात.[७]

ज्या वृक्षाचे मूळ स्थूल व अग्राकडील भाग निमूळता होत जातो[८, ९]. स्निग्ध, खूपच सुवासिक फुले ज्याला येतात, स्पर्शाला जे शीतल असते, ज्याच्यात द्रवपदार्थ जास्त असतात असे झाड स्त्रीलिंगी असते.[१०]

मुळापाशी बारीक व अग्र जाड असणारे[११] किंवा मध्यभागी जाड व मूळ आणि अग्र या दोन्हींकडे निमूळते होत गेलेले[१२] व ज्याची मुळे, फळे दुर्बल आहेत असे झाड नपुंसकलिंगी असते.[१३]

पुल्लिंगी वृक्षाचे लाकूड बांधकामासाठी उत्तम म्हणून गणले गेले आहे. स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी झाडांचे लाकूड अनुक्रमे मध्यम व कनिष्ठ प्रतीचे समजतात.[१४, १५]

### ग्राह्य व त्याज्य वृक्ष व त्यांचा उपयोग

**त्याज्य वृक्ष**– अश्वत्थ, औदुंबर, प्लक्ष, वट, सप्तपर्णी, बेल, पलाश, कुटज, पीलु, श्लेष्मातकी, लोध्र, कदंब, पारिजातक, शिरीष, कोविदार, तिन्त्रिणी, शिलीन्ध्र, सर्पसार, शाल्मली, सरल, किंशुक, अरिमेद, अभया, आमलक, कपित्थ, कण्टकी, पुत्रजीव, डुण्डुक, कारस्कर, करंज, वरण, अश्वमारी, बोरी, बकुल, पिण्डी, पद्मक, तीळ, पाटली, अगरु, कर्पूर हे वृक्ष देवासमान पूज्य आहेत म्हणून मानवाचे घर बांधण्यासाठी त्यांचा उपयोग करू नये.[१६–२०]

**ग्राह्य वृक्ष**– खदिर, शाल, मधूक, स्तम्बक, शिंशप, आजकर्णी, क्षीरिणी, पद्मचन्दन, पिशित, धन्वन, पिण्डी, राजादन, सिंह, शमी, तीळ या झाडांच्या लाकडाचा खांबासाठी उपयोग करावा.[२१,२२]

खदिर, खादिर, सिलिन्द्रक, तिन्दुक यांचे लाकूड खांबासाठी योग्य असते.[२३] ताल, नारळी, क्रमुक, बांबू, केतकी या झाडांच्या लाकडाचा उपयोग झोपडीच्या खांबासाठी करतात.[२४] निंब, असाणा, शिरीष, एक, काल, कट्फल, तिमिस, लिकुच, पनस, सप्तपर्णी या वृक्षांचे लाकूड तुळईसाठी वापरावे.[२५] चन्दन, चम्पक, रक्तचंदन, खादिर, सोमशीर्ष, अर्धनारीशिव, राजात, मयूरक, पद्मक,

---

५. मयमत ( १५·८४)
६. शिल्परत्न ( १४·९६ )
७. शिल्परत्न ( ७९·२–३ )
८. मयमत ( १५·८५)
९. शिल्परत्न १४·७९
१०. शिल्परत्न ७९·४–६
११. मयमत १५·८६
१२. शिल्परत्न १४·९७
१३. शिल्परत्न ७९·७
१४. मयमत १५·८६
१५. शिल्परत्न १४·९६
१६. मयमत १५·१०८–११३
१७. शिल्परत्न १४·८१–८४
१८. विष्णुधर्मोत्तर २·२९·५०–५०½, ३·८९·७–१०½
१९. सम. सूत्रधार १६·१९–२०
२०. विश्वकर्मवास्तुशास्त्र ४·८
२१. मयमत १५·६४–६५
२२. शिल्परत्न १४·९३–९४
२३. मयमत २५·१९८½
२४. मयमत २५·१८९½
२५. मयमत १५·६६–६७

कुटज, सप्तपर्णी, सत्वक या झाडांचे लाकूड वास्तूच्या बांधकामासाठी उपयुक्त असते.[२६] शाक, शाल, मधूक, सर्ज, खदिर, सरल, अर्जुन, पनस, श्रीपर्णी, शिशप, हारिद्र, चंदन, आंबा, पद्म, तिन्दुक या झाडांचे लाकूडदेखील बांधकामास चांगले असते. मात्र सर्व वास्तूत एकाच प्रकारच्या झाडाचे लाकूड वापरावे. दोन-तीन प्रकारच्या झाडांचे लाकूड वापरू नये.[२७, २८] आंब, नागरंग, तिन्दुक, खदिर, बांबू, पाटल, बिभीतक, कर्णिकार, सरल, कर्कन्धू, कश्मरी, पारिभद्र, श्रीपर्ण, तिलक, नक्तमाल, भद्रक, निंब या झाडांचे लाकूड खिडकी, तुळई, झोपाळा, छप्पर ( किंवा छत ), दरवाजा, जिना, खांब वगैरे साहित्य करण्यास चांगले असते. यांच्यावर कोरीव कामही चांगले करता येते. मधूक, तिनिश, पूतिक व क्षीरवृक्ष यांचे लाकूड तुळईसाठी व कोरीव कामासाठी चांगले नसते म्हणून ते यासाठी वापरू नये.[२९]

## लाकडाची विशिष्टी

**ग्राह्य वृक्ष–** स्निग्ध, दृढ, ज्यांचे वय फार कमी किंवा फार जास्त नाही, सरळसोट, व्रण-रहित, पवित्र डोंगर, जंगल, तीर्थस्थान इत्यादी ठिकाणी उगवलेले, दिसावयास मनोहर अशा झाडाचे लाकूड खांबासाठी योग्य असते.[३०]

लाकडाचा आतला भाग पांढऱ्या रंगाचा असेल, तर ते लाकूड उत्तम. तांबडा, पिवळा किंवा काळया रंगाचा आतला भाग असेल, तर ते लाकूड उत्तरोत्तर कमी प्रतीचे समजावे.[३१] सरळ, मजबूत, दृढ, हवा व पाणी या नैसर्गिक शक्तींचा ज्यांच्यावर परिणाम होत नाही, ज्या प्रदेशात भरपूर पाणी आहे अशा ठिकाणी उगवलेल्या झाडांची लाकडे चांगली असतात.[३२] झाड कापल्यानंतर त्यातून पाणी किंवा दुधासारखा पांढरा द्रवपदार्थ बाहेर आला, तर त्या झाडाचे लाकूड वास्तूच्या बांधकामासाठी योग्य समजतात. द्रवाचा रंग तांबडा असेल, तर अशा झाडाचे लाकूड त्याज्य समजावे.[३३-३५]

**त्याज्य वृक्ष–** देवालयानजीकचे, रस्त्याच्या कडेचे, गावातील झाडे, वीज पडून जळालेले, ज्या झाडांवर खूप पशुपक्षी वसती करून आहेत व त्यांची घरटीदेखील पुष्कळ आहेत अशी झाडे, वारा, पाऊस, आग यांमुळे छिन्नविछिन्न झालेली झाडे अशांची लाकडे वास्तुकामास वापरू नयेत. जेथे चांडाळांची वसती आहे, खूप वारुळे आहेत, ज्या झाडांना लतावेलींनी लपेटलेले आहे, ज्यांच्या फांद्यांवर दुसऱ्या वनस्पतींचे अंकुर उगवलेले आहेत, ज्यांच्यावर कीटक व कीटाणूंची वस्ती आहे, आतून जे कृमिकीटकांनी पोखरल्याने पोकळ झाले आहेत, ज्यांना ऋतुकाळाप्रमाणे फुले व फळे येत नाहीत, जे श्मशान, चैत्य वगैरेंच्या जवळ उगवलेले आहेत तसेच विहीर किंवा तलाव यांच्या मध्यावर किंवा तीरावर जी झाडे असतात अशांचे लाकूड वास्तूच्या बांधकामास चांगले नसते.[३६-४१]

---

२६. शिल्परत्न ७९.८–९
२७. राजवल्लभ ५.१७
२८. मत्स्यपुराण २५३.९–११½
२९. विश्वकर्मवास्तुशास्त्र ४.११.१८
३०. मयमत १५.६२–६३
३१. विष्णुधर्मोत्तर ३.८९.१२
३२. शिल्परत्न १४.८५–८६
३३. मयमत १५.९३–९३½
३४. शिल्परत्न १४.१०४
३५. विश्वकर्माप्रकाश ९.११२०–११२१
३६. शिल्परत्न १४.७६–८०
३७. मयमत १५.७१–७६
३८. विष्णुधर्मोत्तर २.२९.४५–४७
३९. विश्वकर्माप्रकाश ९.१०११–१०१४, ९.१०९७–१०९९
४०. बृहत्संहिता ५३.१२०; ५९.२–३
४१. सम. सूत्रधार १६.१२–१५

निर्बल, ज्यांची पाने जीर्ण झाली आहेत, जे मोडून पडले आहे, कोरडे पडले आहे, ज्याला फार गाठी आहेत अशा झाडांचे तसेच राजा किंवा शूद्र यांच्या वसतीजवळील झाडांचे लाकूड त्याज्य समजावे.[४२-४४]

ज्या झाडाला फार शिरा आहेत, ज्याला फारशा फांद्या नाहीत किंवा असल्यास फार बारीक आहेत, हत्तींनी टकरा देऊन जे छिन्नविछिन्न झालेले आहेत, वाकडे, ज्यांच्यावर अशुभ पक्ष्यांची वस्ती आहे, ज्या झाडांत व्याध वगैरेंचे बाण रुतून बसलेले आहेत. तसेच काटेरी झाडांची लाकडे वास्तुकामास अग्राह्य समजतात.[४५] चवीला कडू, खारट, तिखट किंवा क्षारयुक्त जमिनींत उगवणाऱ्या झाडांचे लाकूड त्याज्य समजावे. मोडलेले, खूप छिद्रे असलेले, डुकराच्या डोळ्यांइतके मोठे भोक असलेले, खरखरीत सालींचे, वाकडे, काटेरी, ज्यांची फळे सुरुचिपूर्ण आहेत असे, क्षीरवृक्ष, ज्यांना उत्तम सुगंध येतो अशी झाडे कृमिकीटकांना आकर्षित करतात आणि म्हणून बांधकामास योग्य समजत नाहीत. [४६]

वरील माहितीवरून समजून येईल की मध्ययुगकाळी भारतीयांना लाकडाच्या गुणधर्मांचे तसेच ग्राह्याग्राह्यतेचे चांगले ज्ञान होते. आधुनिक विशिष्टीदेखील वर दिलेल्या शिल्पशास्त्रातील लाकडाच्या विशिष्टींशी मिळत्याजुळत्या आहेत.

वर माहिती दिली आहे त्याशिवाय कोणत्या झाडांची लाकडे रथ बांधण्यासाठी, नावांसाठी एवढेच नव्हे तर विमानांसाठीही योग्य आहेत याची माहिती शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत मिळते. हा विषय प्रासाद या विषयाहून वेगळा असल्याने त्याचा येथे ऊहापोह केलेला नाही. जिज्ञासूंनी त्यासाठी मयमत, युक्तिकल्पतरू वगैरे ग्रंथ पहावेत.

४२. शिल्परत्न ७९·१०–१३
४३. मत्स्यपुराण २५७·४–७
४४. मुहूर्तमार्तण्ड श्लोक १७ ची टीका
४५. विश्वकर्मप्रकाश ४·१९–२०½
४६. समरांगणसूत्रधार १६·६, १०–११, २१.

## ६ बांधकामाकरिता दगड

**दगडाच्या खाणीची जागा–** दगड मुख्यतः दोन जागी मिळतात. डोंगरावरती व जमिनीत. डोंगरातून काढलेले दगड जमिनीखालून मिळणाऱ्या दगडांपेक्षा चांगले समजतात.[१] जमिनीखालचे दगड बाहेर काढल्यावर त्यांच्यावर वारा, ऊन, पाऊस या नैसर्गिक शक्तींचा परिणाम फार लवकर व जास्त प्रमाणात होतो. या शक्तींचा परिणाम त्या मानाने डोंगरावरून काढलेल्या दगडांवर होत नाही असे दिसून आलेले आहे. म्हणून डोंगरावरील खाणीतून काढलेले दगड हे भूमिगत दगडांपेक्षा केव्हाही चांगले समजतात.

डोंगर, समुद्र किंवा नदीचा काठ, तीर्थक्षेत्र तसेच जंगल आणि क्षीरवृक्ष आणि देवालयांच्या जवळ असलेले दगड बांधकामासाठी चांगले असतात. याशिवाय इतर जागी सापडणारे दगड बांधकामास वापरू नयेत.[२] जेथे चाण्डाळ, पुल्कस, धीवर, बर्बर अशा लोकांची वस्ती आहे, जेथे खूप

१. सनत्कुमारसंहिता (ब्रह्मरात्र) ७·४
२. काश्यपशिल्प ४९·३१–३१½

वारुळे आहेत, स्मशान किंवा चैत्यमंदिर तसेच जेथे थडगी आहेत अशा जमिनीत असलेले दगड त्याज्य समजावे. गाव किंवा घर बांधण्यास जी जमीन अयोग्य म्हणून सांगितली आहे अशा जमिनीतील दगड बांधकामांस अग्राह्य समजतात.[३]

## दगडांचे वर्गीकरण

दगडांची ग्राह्याग्राह्यता त्यांच्या रंगावरून, त्यांच्यात असलेल्या दोषांवरून, त्यांच्या वयोमानावरून आणि त्यांच्या लिंगावरून ठरवितात.

**रंगांवरून दगडांचे वर्गीकरण–** दगड मुख्यतः चार रंगांचे असतात. पांढरे, तांबडे, पिवळे व काळे. पांढऱ्या रंगाचे दगड बांधकामास सर्वोत्तम असतात. त्यांच्यानंतर तांबडचा, पिवळचा व काळचा रंगांच्या दगडांचा क्रम लागतो.[४,५] हिरवे, काळे आणि विशेषतः पांढऱ्या रंगाचे दगड उत्तम असतात.[६] असेही मत दिसते. पांढऱ्या किंवा फिकट पांढऱ्या रंगाचे, निळे कमळ, काळे मूग किंवा भुंगा यांप्रमाणे काळचा रंगाचे दगड, कबुतराप्रमाणे पारव्या रंगाचे दगड हे बांधकामाकरिता चांगले समजतात.[७]

दगड एकरंगी असावेत. मिश्र वर्णांचे दगड चांगले नसतात.[८] वारा, ऊन, पाऊस इत्यादींनी दगडांतील लोखंडाचे क्षार बनतात व या लोहक्षारांचे त्यांच्या रूपांतरानुसार लाल, पिवळा, काळा असे रंग बनतात व ते अशा दगडांमध्ये दिसतात. तेव्हा जो दगड मिश्रवर्णांचा आहे त्यावर नैसर्गिक शक्तींचा परिणाम होऊन त्याचे रूपांतर व्हावयाची क्रिया सुरू होऊन तो दगड दृढ न राहता जीर्ण-शीर्ण होण्याच्या पंथाला लागतो. तेव्हा मिश्रवर्णाचा दगड त्याज्य ठरवितात ते योग्यच आहे.

**दगडांचे त्यांच्या दोषांनुरूप वर्गीकरण–** दगडांवर रेघा, डाग व कलंक असता उपयोगी नाही. तरीही इतर रंगांच्या दगडावर पांढऱ्या रंगाची रेघ असेल तर तो दगड उत्तम समजावा. काळचा दगडांत काळचाच रंगाच्या रेघा असलेला दगड किंवा पांढऱ्या दगडावर काळ्या रंगाच्या रेघा असलेले दगड अयोग्य असतात. तेव्हा सर्व प्रयत्नांनी असले दगड बांधकामांस घेऊ नयेत.[९,१०] पांढऱ्या रंगाच्या रेघा या बहुधा स्फटिकाच्या (Quartz) असतात. हे खनिज कठोर असल्याने त्याच्या रेघा दगडांत असल्या तरी दगड कमजोर नसतो. याउलट, काळचा रंगाची रेघ मातीमुळे किंवा गौण खनिजांची (Secondary minerals) असते. ही खनिजे कमजोर असल्याने असे दगड या रेघांपाशी कमजोर असतात व म्हणून त्याज्य ठरतात.

दगडावरती डाग असू नयेत[११] हा सर्वसाधारण नियम झाला. परंतु येथेदेखील काळचा दगडावर पांढऱ्या रंगाचे डाग असतील तर ते दगड ग्राह्य समजावेत; परंतु कोणत्याही रंगाच्या दगडा-वर काळे किंवा हिरवे ठिपके असतील तर तो दगड त्याज्य समजावा[१२] असा विकल्प दिला आहे.

---

३. शिल्परत्न १४·२–४; १४·१४–१४½
४. काश्यपशिल्प ४९·३२–३८
५. मयमत ३३·४
६. विष्णुधर्मोत्तरपुराण ३·९०·२
७. काश्यपशिल्प ४९·५०
८. विष्णुधर्मोतर पुराण ३·९०·२१–२३
९. काश्यपशिल्प ४९·४९
१०. विष्णुधर्मोत्तर पुराण ३·७·२४
११. काश्यपशिल्प ४९·५२
१२. विष्णुधर्मोत्तर पुराण ३·९०·२३–२४

विष्णुधर्मोत्तर पुराणांत[१३] ठिपके व खुणा (कलंक) यांना 'विमल' ही संज्ञा दिली आहे. त्यांचे तीन प्रकार आहेत. लोखंड, कासे व सोने यांच्या रंगासारखे तीन प्रकारचे विमल. काळ्या रंगांचे विमल हे गौण खनिजांच्या अस्तित्वामुळे दगडात दिसतात. दगडात लोहक्षार जर जास्त असतील तर कासे व सोने यांच्या रंगाप्रमाणे असलेले विमल दगडात दिसतात. असल्या दगडांचे संपीडन सामर्थ्य (Compressive strength) फार कमी असते म्हणून असले दगड त्याज्य समजतात. ज्या दगडांत– मग ते कोणत्याही रंगाचे असोत– रेघा, ठिपके व कलंक जास्त असतील तर ते दगड बांधकामास त्याज्य समजतात.[१४] महाराष्ट्रातील मांजऱ्या दगड हा अशा प्रकारचा दगड असतो व तो लवकर ठिसूळ बनतो. तसेच त्याचे संपीडन सामर्थ्य कमी असते हे माहीतच आहे.

**दगडाचे वयानुसार वर्गीकरण**– दगडांचे वयोमानाप्रमाणे तीन प्रकार होतात. बाला, यौवना व वृद्धा शिला.

ज्या शिळेला ठोकले असता तिच्यातून बारीक व ऱ्हस्व स्वर निघतो,[१५] घणाच्या घावाखाली मातीप्रमाणे वागणारी, अर्ध्या पक्क्या विटेप्रमाणे विसविशीत असलेली,[१६] द्राक्षवेलीप्रमाणे (जिला रुंदी नसून नुसती केवळ लांबलचक असते) किंवा झाडाच्या पानाप्रमाणे (केवळ लांब व रुंद व जाडीला एकदम कमी) अशा आकाराच्या शिळेला 'बाला' म्हणतात.[१७]

आकाराने मोठी व घंटेप्रमाणे खणखणीत व दीर्घकाळपर्यंत निनादणारा आवाज ज्या शिळेतून येतो[१८], स्पर्शास जी मृदु आणि शीतल आहे, जिला उत्तम वास येतो व जिच्यात लहानमोठी छिद्रे नाहीत[१९] अशा शिळेला 'युवति' म्हणतात.

ज्या दगडाला ठोकले असताना त्यातून खणखणीत आवाज येत नाही[२०], ज्याला फोडले असता मासा किंवा बेडूक याप्रमाणे दीर्घ (elongated) किंवा शंखाप्रमाणे (conchoidal) विभंग (fracture) मिळतो, जो स्पर्शाला रुक्ष लागतो[२१]; सापाच्या कातीप्रमाणे खूप छिद्रे असलेली व नैसर्गिक शक्तींनी शीर्णविशीर्ण झालेली[२२] अशी शिळा 'वृद्धा' असते.

बाला व वृद्धा शिळा या बांधकामास अयोग्य व युवति शिळा ग्राह्य समजतात.[२३]

**दगडाचे लिंगानुसार वर्गीकरण**– आकाराने खूप मोठी, वृत्ताकार, दहा किंवा बारा बाजू असलेली, जिला ठोकले असता घण्टीप्रमाणे खणखणीत आवाज येतो[२४], आयताकृती, युवति, सौंदर्यपूर्ण, मुळापासून अग्रापर्यंत सर्वत्र एकाच आकाराची व रंगाची[२५], वजनदार, घणाचा घाव घातला असता जिच्यातून अग्निस्फुल्लिंग बाहेर पडतात अशी, न्यग्रोध किंवा वड या झाडांच्या पानासारखा

१३. विष्णुधर्मोत्तर पुराण ३·९०·८–१०
१४. मयमत ३३·१३–१६
१५. काश्यपशिल्प ४९·५३
१६. मयमत ३३·१३
१७. शिल्परत्न १४·८
१८. काश्यपशिल्प ४९·५३
१९. मयमत ३३·१४
२०. काश्यपशिल्प ४९·५४
२१. मयमत ३३·१५
२२. शिल्परत्न १४·८
२३. मयमत ३३·१५
२४. काश्यपशिल्प ४९·५५
२५. मयमत ३३·३८

आकार असलेली, जिचे अग्र* पूर्व किंवा उत्तर दिशेकडे आहे अशा शिळेला 'पुल्लिंगी' म्हणतात[२६,२७].

फार मोठी नाही त्याचप्रमाणे फार लहानही नाही अशी मध्यम आकाराची, चार किंवा आठ बाजू असलेली, तालवाद्याप्रमाणे सुस्वर जिच्यातून येतो अशी[२८], मुळाच्या बाजूला स्थूल व त्यामानाने लहान रुंदीचे अग्र असलेली[२९], मध्यम वजनाची, स्पर्शाला शीतल लागणारी अशा शिळेला 'स्त्रीलिंगी' म्हणतात.[३०, ३१]

आकाराने लहान, गोलगरगरीत, रुक्ष, बद्द आवाज येणारा, मुळापाशी बारीक व त्यामानाने अग्राची जाडी जास्त असलेला[३२] त्रिकोणाकार किंवा ज्याच्या एका बाजूची लांबी समोरील बाजूच्या लांबीपेक्षा फारच लहान असते असा दगड नपुंसकलिंगी असतो.[३३]

पुल्लिंगी दगड भिंत, शिखर वगैरे वास्तूचे भाग बांधताना उपयोगात आणावे, स्त्रीलिंगी दगड अधिष्ठान व उपपीठ बांधताना वापरावेत व नपुंसकलिंगी दगड पायासाठी योग्य समजतात.[३४,३५]

## बांधकामासाठी अयोग्य व योग्य दगड

**अयोग्य दगड**– पाऊस, ऊन इत्यादींमुळे विशीर्ण झालेला, किंवा क्षारयुक्त पाण्याचा ज्याच्यावर परिणाम झाला आहे, नदी किंवा समुद्राच्या काठावरील, ज्यामध्ये वाळूचे प्रमाण फार आहे (ज्यात वाळू जास्त व बंधकद्रव्य कमी असे वाळूचे दगड. हे दगड पाण्यात टाकल्याबरोबर विरघळून जातात), किंवा जे मातीचे बनले आहेत (शेल दगड), जे कमजोर व रुक्ष आहेत असे दगड त्याज्य समजावेत.[३६, ३७]

अशुभ जागी असलेले, दुसऱ्या कुठल्यातरी कामास अगोदरच वापरलेले, रेघा, ठिपके, कलंक असलेले, वृद्ध, वक्र, गौण खनिजे खूप असलेले, फिक्या रंगाचे व भेगा असलेले दगड अग्राह्य समतात.[३८,३९]

ज्या दगडांची लांबी रुंदी व जाडी जवळजवळ सारखी नाही, जे निमूळते होत गेले आहेत असे दगड वापरू नयेत.[४०]

---

* दगड खाणीतून काढताना त्याच्या वरच्या भागास अग्र व खालच्या भागास मूळ म्हणतात. दगडाचे अग्र पूर्व किंवा उत्तरदिशेकडे असेल तर तो ग्राह्य समजतात. दगडाचे अग्र नैर्ऋत्य किंवा अग्नेयदिशेकडे आणि मूळ ईशान्य किंवा वायव्य दिशेकडे असेल तर तो दगड चांगला समजतात. याउलट, दगडाचे अग्र वायव्य दिशेकडे व मूळ ईशान्य दिशेकडे असेल तर तो दगड त्याज्य समजावा (मयमत ३३ · १७–१८½)

२६. शिल्परत्न १४·१५
२७. तंत्रसमुच्चय १·१३३
२८. काश्यपशिल्प ४९·५५–५६
२९. मयमत ३३·८
३०. शिल्परत्न १४·१५
३१. तंत्रसमुच्चय १·१३३
३२. मयमत ३३·९
३३. शिल्परत्न १४·१७
३४. काश्यपशिल्प ४९·६०
३५. मयमत ३३·१०
३६. काश्यपशिल्प ४९·४२–४३
३७. शिल्परत्न १४·५
३८. मयमत ३३·६–७
३९. विष्णुधर्मोत्तर ३·९०·६–८
४०. शिल्परत्न १४.४

कावळा, ससाणा, ऊंट, माकड यांच्या रंगासारखा रंग असलेला दगड; मांजर, गिधाड, साप, कोल्हा, रानडुक्कर, बेडूक यांच्या आकाराप्रमाणे आकार असलेले दगड, घणाच्या घावाखाली ज्यांचे फार लहान लहान तुकडे होतात, जे एका रंगाचे नसून ज्यांत निरनिराळ्या रंगच्छटा आहेत, वृत्ताकार, बृहादाकार किंवा अत्यंत लहान, भेगा असलेले दगड त्याज्य असतात.[४१] ज्या दगडांत लहान-मोठी अनेक छिद्रे आहेत तो दगड बांधकामास अयोग्य समजतात.[४२]

**बांधकामास योग्य दगड** – ज्या डोंगरातील खाणीतील दगड उत्तम आहेत याची प्रसिद्धी आहे किंवा जमिनीखालचे असे दगड खूप जास्त घनता असलेले, स्निग्ध, घणाच्या घावाखाली जे सहजपणे फुटत नाहीत व त्यांच्यातून स्फुल्लिंग बाहेर पडतात, गंभीर व खणखणीत आवाज असणारे, ज्यांचे अग्र मुख्य दिशांकडे आहे असे दगड बांधकामास योग्य समजावेत.[४३,४४] ज्या शिळेत वाळू किंवा चिकणमाती नाही अशी शिळा ग्राह्य समजावी.[४५]

वरील बांधकामासाठी योग्यायोग्य दगडाची विशिष्टी ही आधुनिक स्थापत्यशास्त्रानेदेखील ग्राह्य ठरविली आहे.

---

४१. शिल्परत्न १४·६–७
४२. विश्वकर्माप्रकाश ६·७३७
४३. शिल्परत्न १४·११
४४. तंत्रसमुच्चय १·१३१
४५. विष्णुधर्मोत्तर ३·९०·३–५

## ७. जमीनीतील शल्य

जमीनीची परीक्षा करून वास्तु बांधावयाची जागा निश्चित केल्याकर वास्तुकरिता आखणी करावयास हवी. आखणी करताना जमिनीत काही शल्य आहे का ते पाहिले जाते. जमीनीतील शल्य असणे म्हणजे तिच्यात काहीतरी केस, हाडे वगैरे अशुभ पदार्थ असणे. वास्तूचा पाया खणण्याअगोदर हे शल्य काढून टाकले पाहिजे नाहीतर वास्तूच्या कर्त्यावर अनेक आपत्ती येतात असे शिल्पशास्त्र-कारांचे मत आहे. हे शल्य कोठे आहे, किती खोलीवर आहे हे माहिती होण्यासाठी शकुनांचा उपयोग केला जातो.

हयशीर्षपंचरात्रांत हे निरनिराळे शकुन थोडक्यात दिले आहेत-

दर्शनैः कीर्त्तनैः शब्दैः यजमानस्य चेष्टितैः।
यथावत् लक्षयेत् शल्यं वास्तुदेहे विचक्षणः॥ ८·१०॥
लङ्घनादथसूत्रस्य दर्शनान्नामभाषणात्।
श्रवणादथशब्दस्य जानीयात् शल्यमादरात॥ ८·११॥
दर्शनं लङ्घनं यस्य गदितं नामकीर्त्तितम्।
तस्य सत्त्वस्य तत् शल्यं जानीयाल्लङ्घनादिभिः॥ ८·१२॥
आदिशेद् वास्तुतः शल्यं गृहिणोङ्गविकारतः॥ ८·१३॥
शकुनो दृश्यते वापि यस्य वा श्रूयते ध्वनिः।
कीर्त्यंते यस्य वा नाम शल्यं तस्य विनिर्दिशेत्॥ ८·१४॥

अशुभ अशा स्त्रीपुरुषादिकांचे तसेच पशुपक्ष्यांचे दर्शन आखणीच्या वेळेस झाले तर जमिनीत शल्य आहे असे समजावे. त्या वेळी कोणी कोणाला हाक मारली तर त्या हाकेवरूनही जमिनीत शल्य आहे असे समजावे. हत्ती, घोडा, कुत्रा यांचे रडणे आखणीच्या वेळी ऐकावयास[1] आले, किंवा मांजर, कोल्हा, उंट, गाढव इत्यादींचे ओरडणे ऐकावयास आले तर ते अशुभ असते व वास्तूत शल्य आहे असे समजावे.[2]

यजमानाने जर आखणी करताना स्वतःच्या शरीराचा एखादा अवयव खाजविला तर जमिनीत शल्य असते व ते काढले पाहिजे नाहीतर नाना आपत्ती त्याच्यावर येतील. हयशीर्षपंचरात्रा-वरील श्लोकांवर दिलेल्या टीकेत महाकपिल पंचरात्राचा उतारा दिला आहे त्यावरून याबाबतची संपूर्ण माहिती मिळते.

कर्त्याने जर डोके खाजविले तर पुरुषाचे डोके ( कवटी ) जमिनीत दोन हात खोलीवर असते. हे शल्य जर काढले नाही तर आग लागणे, रोग होणे, वित्तहानी इत्यादि अशुभ फळ मिळते. म्हणून ते शल्य प्रयत्नाने अवश्य खणून बाहेर काढावे.

दंड खाजविले तर जमिनीत दोन हात खोलीवर लोखंडाची साखळी असते. ती जर खणून काढली नाही तर कर्त्याचे मरण ओढवते किंवा परदेशाचा प्रवास त्याच्या नशिबी येतो.

कर्त्याने जर मांडी खाजविली तर एक हात खोलीवर पितळेचे (भांडे वगैरे) शल्य असते. जर ते खणून काढले नाही तर पत्नी व्यभिचारी होते व कर्त्याला त्याच्या कार्यात अपयश येते.

हात खाजविले तर तीन हात खोलीवर हाडांचा सांगाडा असतो. तो जर काढून टाकला नाही तर आगीचे भय, रोगाची पीडा तसेच मृत्युदेखील ओढवतो.

पाठ खाजविली तर एक हात खोलीवर हाताचे हाड आहे व ते खणून काढले पाहिजे; नाहीतर कर्त्याचा नाश होतो व पत्नी व्यभिचारी होते.

पाय खाजविल्यास दीड हात खोलीवर हाताचे हाड असते. ते खणून बाहेर काढावे नाहीतर कर्त्याच्या त्या अवयवाचा नाश, राजाचा दण्ड तसेच धान्याची नुकसानी सोसावी लागते.

कुशी खाजविल्या तर दोन हातांवर दगड लागतो. तो काढला नाही तर भुजंगाच्या दंशाने मृत्यू संभवतो. गुडघे खाजविले तर दोन हातांवर राख असते. ती काढून टाकली नाही तर आगीचे भय, मनःस्ताप, त्रास, दुःख, भीति यांचे प्राबल्य माजते.

या माहितीवरून यजमानावर येणाऱ्या आपत्तींची कल्पना येऊ शकेल. खाली दिलेल्या तक्त्यांत याबद्दल शिल्परत्न ( ४·१३–१७ ) व ईशानशिवगुरुदेवपद्धतीत या शल्यप्रकाराबद्दल दिलेली माहिती सांगितली आहे. ईशानशिवगुरुदेवपद्धतीत तर जर खाजविलेले अवयव दोन किंवा तीन असतील तर शल्यें देखील तितकी असतात अशी जास्तीची माहिती दिली आहे. या तक्त्यात शल्य काढले नाही तर काय आपत्ती येतील त्याची माहिती दिलेली नाही.

१. विश्वकर्मप्रकाश १२·१२३९

२. हयशीर्षपंचरात्र दिलेल्या श्लोकांची टीका.

| खाजविलेला अवयव | शिल्परत्न | | ईशानशिवगुरुदेवपद्धती | |
|---|---|---|---|---|
| | शल्याचे नाव | किती हात खोल आहे | शल्याचे नाव | किती हात खोल आहे |
| डोके | कवटी | १ | कवटी | १ |
| मुख | कवटी, लाकडे | २ | कवटी, लाकडे | २ |
| मान | — | — | लोखंडाची साखळी | ३ |
| कान | लोखंडाची साखळी | ३ | — | — |
| दंड किंवा खांदे | लोखंड | कंबरेइतक्या | दंड व खांद्याची हाडे | २½ |
| प्रकोष्ठ | — | — | कवटी | गुडघ्याइतक्या |
| मांड्या | लाकूड, हाडे | १ | छातीची हाडे किंवा लाकूड | छातीइतक्या |
| छाती | हाडे | छातीइतक्या | — | — |
| गुडघे | खांब | १ | खांब | १ |
| जंघा | केस | — | केस किंवा जंघेची हाडे | — |
| पाय | हत्तीची हाडे | — | हत्तीची हाडे | — |
| कंबर | — | — | लोखंड | कंबरेइतक्या |
| आंगठा | — | — | मडके | — |
| बोटे | — | — | घोड्याचा पाय किंवा पितळी पदार्थ | ¾ |

यजमान जेव्हा जमिनीस प्रथम भेट देतो तेव्हा त्याने विचारलेल्या पहिल्या प्रश्नाच्या आद्याक्षरावरूनही शुभाशुभ शकुन ठरतो व त्याप्रमाणे जमिनीत शल्य असते.

यजमानाच्या प्रश्नाचे आद्याक्षर अ या अक्षराने किंवा अ वर्गातील (अ, आ, इ, ई वगैरे स्वरांनी) अक्षरांनी सुरू होत असेल तर पूर्वेकडे माणसाची हाडे दीड हात खोलीवर आहेत व हे शल्य काढून टाकावयास हवे; न काढल्यास आपत्ती ओढवणारच. ही माहिती खाली आकृती व तक्त्यात एकत्र दाखविली आहे. शिल्पदीपक (१·२९–३९) व राजवल्लभ (१·१९–२१) या ग्रंथात ही माहिती एकच आहे, विश्वकर्माप्रकाशात (१२·१२२४–१२३३) थोडी निराळी माहिती दिली आहे.

पू

| श | अ | क |
|---|---|---|
| य | ॐ | च |
| प | त | ट |

प

विश्वकर्माप्रकाश

पू

| प | अ | क |
|---|---|---|
| श | य | च |
| ह | ए | त |

प

राजवल्लभ व शिल्पदीपक

| राजवल्लभ, शिल्पदीपक | | | | विश्वकर्माप्रकाश | | |
|---|---|---|---|---|---|---|
| दिशा | आद्याक्षर | शल्याचे नाव | हात खोल | आद्याक्षर | शल्याचे नाव | हात खोल |
| पूर्व | अ | माणसाची हाडे | १½ | अ | माणसाची हाडे | १½ |
| आग्नेय | क | गाढवाची हाडे | २ | क | गाढवाची हाडे | २ |
| दक्षिण | च | माणसाची हाडे | – | च | माणसाची हाडे | कंबरेपर्यंत |
| नैर्ऋत्य | त | कुत्र्याची हाडे | १½ | ट | कुत्र्याची हाडे | १½ |
| पश्चिम | ए | – | १½ | त | लहान मुलाची हाडे | १½ |
| वायव्य | ह | माणसाची हाडे | ४ | प | भूस, कोळसे | ४ |
| उत्तर | श | गाढवाची हाडे | ४½ | य | माशाची हाडे | कंबरेपर्यंत |
| ईशान्य | प | गाईची हाडे | १½ | श | गाईची हाडे | १½ |
| मध्य कोष्ठ | य | केस, कवटी, हाडे, राख, लोखंड | छातीपर्यंत | ॐ | केस, कवटी, हाडे, राख, लोखंड | छातीपर्यंत |

आखणी करताना जर कोणी प्राणी दोरी ओलांडून गेला किंवा पक्ष्याने प्रवेश केला तर पुन्हा त्या जागेत शल्य आहे असा बोध होतो. आखणी करताना पक्ष्यांपैकी ससाणा, कबूतर, वटवाघूळ, गिधाड किंवा पोपट यांनी जागेत प्रवेश केल्यास तेथे माणसाची हाडे आहेत असे समजावे[३]; किंवा तेथे राख, कोळसा, भूस आहे असे समजावे.[४] तसेच विश्वकर्माप्रकाशाप्रमाणे (१२·१२२१) कोणी प्राणी आखणीच्या दोऱ्या ओलांडून गेला तर तेथे शल्य असते. ते शल्य त्या प्राण्याच्या हाडाचे असते व ते एक पुरुष खोल असते. निरनिराळ्या प्राण्यांनी दोरी ओलांडली तर कुठल्या प्राण्याच्या हाडाचे शल्य असते याची माहिती ईशानशिवगुरुदेवपद्धति (२६·९२) तसेच शिल्परत्न (४·१८–२१) या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत दिली आहे. त्याचे कोष्टक खाली तक्त्यात दिले आहे. ज्या प्राण्याने दोरी ओलांडली असेल त्याच्या उंचीइतक्या खोलीवर ते शल्य असते. पुढे असेही दिले आहे की, याचप्रमाणे त्या त्या प्राण्याच्या दर्शनाने, त्याचे ओरडणे ऐकल्याने किंवा त्याने वास्तूच्या जागेत प्रवेश केल्याने हीच शल्ये समजावीत. तसेच ही शल्ये त्या त्या प्राण्याइतक्या खोलीवर आहेत असे समजावे, अशीही जास्त माहिती दिली आहे.

| दोरी ओलांडणारा प्राणी | मांजर | कुत्रे | मेंढी | घोडा | म्हैस | कोल्हा | रान डुक्कर | वाघ | हत्ती | मनुष्य | गाढव |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| कोणत्या प्राण्याची हाडे शल्य म्हणून असतात | गाढव | गाय | मेंढी किंवा कुत्रे | म्हैस | कोल्हा | रान डुक्कर | वाघ | हत्ती | मनुष्य | गाढव | मेंढी |

वर दिल्याप्रमाणे शल्यांचे बरेच प्रकार आहेत. फलज्योतिषाच्या पुस्तकात याबद्दल बरीच माहिती मिळते. असे दिसते, की पाया जमिनीत खोल खणलेला असावा याकरिता या शकुनाच्या

३. विश्वकर्माप्रकाश १२·१२४०–४१.

४. ईशानशिवगुरुदेवपद्धति २६·९२.

युक्त्या आहेत. जयार्णव या ग्रंथात शल्योद्धारणासाठी जमीन गुडघ्यापर्यंत किंवा एक पुरुष खोल खणावी असा सर्वसामान्य आदेश दिला आहे. प्रतिष्ठासारसमुच्चयात दिले आहे, की पुरुषाहून अधिक खोलीवर जर शल्य असेल तर ते दोषास्पद नसते. थोडक्यात म्हणजे वास्तूचा पाया कमीत कमी एक पुरुष तरी खोल घ्यावा. राजप्रासादाच्या बाबतीत मात्र जमिनीतील पाण्याच्या पातळीपर्यंत पाया खोदावा अशा सूचना आहेत.[५]

५. राजवल्लभ १·२० ची टीका.

## ८. वास्तुपदमण्डल

वास्तुप्रतिष्ठेच्या पूजेसाठी जे मंडल वापरतात त्यास वास्तुपदमंडल म्हणतात. ही मंडले ६४ तसेच ८१ घरांची असतात. वैखानसागमात[१] ६४, ८१ व २५६ घरे असलेल्या वास्तुमण्डलाचे वर्णन दिले आहे. ही मण्डले गाव, शहर, घर व देवालय बांधावयाच्या अगोदर वास्तुप्रतिष्ठेच्या पूजेकरिता वापरावीत असे उल्लेखिलेले आहे. ८१ घरे असलेले मण्डल हे देवालयप्रतिष्ठेसाठी योग्य समजत. इ. स. पूर्व पाचव्या शतकातील बृहत्संहितेत[२] तसेच इ. स. चवथ्या शतकातील हयशीर्ष पंचरात्र[३] या ग्रंथातही फक्त ६४ व ८१ घरांचीच वास्तुमण्डले दिली आहेत. येथे ६४ घरे असलेले मंडल प्रासादाच्या व ८१ घरे असलेले मंडल घराच्या प्रतिष्ठेसाठी वापरावे असे म्हटले आहे. मध्ययुगीन काळापर्यंत या मंडलांची संख्या ३२ पर्यंत वाढली. ही माहिती या काळच्या मयमत,[४] अपराजितपृच्छा[५] (इ. स. ११ वे ते १२ वे शतक), शिल्परत्न[६] (इ. स. १६ वे शतक) आणि इतर शिल्पशास्त्रावरील ग्रंथांत मिळते. ही मंडले एका घरापासून २, ३, ४ ते ३२ आकड्यांच्या वर्गाइतके अशी ३२ प्रकारची दिली आहेत. या मंडलांना नावेही दिली आहेत ती खाली सारणीत दिली आहे.

वास्तुपदमंडलांची नावे[४,६,७]

| घरांची संख्या | वास्तुमंडलाचे नाव | घरांची संख्या | वास्तुमंडलाचे नाव |
|---|---|---|---|
| १ | सकल | ४ | पेचक |
| ९ | पीठ | १६ | महापीठ |
| २५ | उपपीठ | ३६ | उग्रपीठ |
| ४९ | स्थंडिल | ६४ | मण्डूक |
| ८१ | परमशायिक | १०० | आसन |
| १२१ | स्थानीय | १४४ | देशीय |
| १६९ | उभयचण्डित | १९६ | भद्रमहासन |

१. वैखानसागम, पटल २
२. बृहत्संहिता ५३·४२–५६
३. हयशीर्ष पंचरात्र ८·१६–३०
४. मयमत ७·१–२१
५. अपराजितपृच्छा ५७·१–६
६. शिल्परत्न ६·१–२३½
७. मानसार ७·९–२५

| | | | |
|---|---|---|---|
| २२५ | पद्मगर्भ | २५६ | त्रियुत |
| २८९ | व्रतभोग | ३२४ | कर्णाष्टक |
| ३६१ | गणित | ४०० | सूर्यविशाल |
| ४४१ | सुसंहित | ४८४ | सुप्रतिकान्त |
| ५२९ | विशाल | ५७६ | विप्रगर्भ |
| ६२५ | विश्वेश | ६७६ | विपुलभोग |
| ७२९ | विप्रतिकान्त | ७८४ | विशालाक्ष |
| ८४१ | विप्रभक्ति | ९०० | विश्वेशसार |
| ९६१ | ईश्वरकान्त | १०२४ | इंद्रकांत |

तसेच खाली दिलेल्या सारणीत अपराजितपृच्छाप्रमाणे (५७·१–६) ही निरनिराळी मंडले कोणत्या वास्तूच्या व इतर प्रतिष्ठेच्या वेळेस वापरावीत त्याची माहिती दिली आहे.

| घरांची संख्या | मंडलाचे नाव | मंडलाचा उपयोग |
|---|---|---|
| १ × १ = १ | स्वस्तिक | विद्या शिकावयास सुरुवात करताना |
| २ × २ = ४ | पुष्पक | यात्रेला जाण्यापूर्वी, कन्येच्या लग्नात |
| ३ × ३ = ९ | नन्द | जंगलात जाण्यापूर्वी |
| ४ × ४ = १६ | षोडश | लतिन, रुचक इत्यादी प्रासाद तसेच मंडपाच्या प्रतिष्ठेसाठी |
| ५ × ५ = २५ | कुलतिलक | दीक्षेसाठी |
| ६ × ६ = ३६ | सुभद्रक | शुभकर्मासाठी व प्रस्थानासाठी |
| ७ × ७ = ४९ | मरीचिगण | सर्व प्रकारच्या जीर्णोद्धारासाठी |
| ८ × ८ = ६४ | भद्रक | खेट, खर्वट, ग्राम, पुर, कूप, राजवाडा इत्यादी वास्तूंच्या प्रतिष्ठेसाठी |
| ९ × ९ = ८१ | कामद | घराच्या प्रतिष्ठेसाठी |
| १० × १० = १०० | भद्र | प्रासाद, मंडप, जगती, लिंगपीठ यांच्या प्रतिष्ठेसाठी |
| ३२ × ३२ = १०२४ | सर्वतोद्भव | मेरु, मंदार इत्यादी प्रासादांच्या प्रतिष्ठेसाठी. |

**वास्तुपदमंडलाचा आकार** हा वास्तूप्रमाणे असतो. वास्तू वर्तुळाकार, त्रिकोणी, आयताकार जशी असेल त्याप्रमाणे असतो. वास्तुमंडलाच्या रेषांना नावे दिलेली आहेत. ती शिल्पशास्त्राच्या ग्रंथांनुसार थोड्याफार फरकाने निरनिराळी आहेत.

## वास्तुमंडलातील देव

वास्तुमंडलात जास्तीत जास्त ४५ देव असतात. ब्रह्मा मध्यभागी असतो. अष्टदिक्पाल आठ दिशांना असतात. या देवांची नावे निरनिराळ्या शिल्पशास्त्रग्रंथांप्रमाणे थोड्याफार फरकाने सारखीच आहेत. काश्यपशिल्पातील दुसऱ्या अध्यायात ही माहिती येते. तेथे आकृतीत प्रत्येक देवांची स्थाने व ते जितक्या घरांचे स्वामी (पदभोगी) आहेत ते दाखविले आहे. या पददेवतांशिवाय वास्तु-पदमंडलाच्या बाहेरच्या बाजूला मुख्य दिशांना पूर्वेकडून सुरुवात करून अनुक्रमे स्कंद, अर्यमा, जंभक

व पिलिपिंछ असतात. उपदिशांना ईशान्येपासून अनुक्रमे चरकी, विदारी, पूतना व पापराक्षसी या राक्षसी असतात. या देवांच्या नावांचा अर्थ समरांगणसूत्रधार (१४·१३–३०) तसेच अपराजित पृच्छात (५६·१–१६) दिला आहे. दोन्हीकडे अर्थ सारखाच आहे व तो खाली सारणीत दिला आहे. जेथे अर्थ समरांगणसूत्रधारात दिल्याहून वेगळा आहे तेथे तो वेगळा अर्थ कंसात दिला आहे.

| देवनाम | अर्थ | देवनाम | अर्थ | देवनाम | अर्थ |
|---|---|---|---|---|---|
| ब्रह्मा | जगाचा प्रभू | ईश | शंकर | पर्जन्य | अंबुदाधिप |
| जयन्त | काश्यप | महेन्द्र | इंद्र | आदित्य | सूर्य |
| सत्य | धर्म | भृश | मदन | अंतरिक्ष | आकाश |
| अग्नि | अग्नि | मारुत | वायू | पूषा | मातृगण |
| वितथ | कलीचा मुलगा | गृहक्षत | बुध | यम | प्रेताधिप |
| वैवस्वत | प्रेताधिप | गंधर्व | नारद | भृंगराज | निर्ऋतीचा मुलगा |
| मृग | अनन्त | पितर | (विश्वेदेव) | सुग्रीव | आदि प्रजापति मनु |
| दौवारिक | (नन्दी) | पुष्पदन्त | गरुड | वरुण | सलिलाधिप |
| असुर | राहू | शोष | शनि | रोग | ज्वर |
| पापयक्ष्मा | क्षय | नाग | वासुकी | मुख्य | त्वष्टा |
| भल्लाट | चंद्र | सोम | कुबेर | गिरी | (हिमवान्) |
| चरक | व्यवसायाख्य | आदिति | श्री | दिति | शूलधारी वृषभारूढ शंकर |
| आप | हिमालय | आपवत्स | पार्वती | अर्यमा | सूर्य |
| सावित्र | वेदमाता | सविता | गंगा | विवस्वान् | मृत्यू |
| जय | इंद्र (कालानल) | मित्र | बलराम | रुद्र | महेश्वर |
| रुद्रदास | (कार्तिकेय) | राजयक्ष्मा | गुह, कार्तिकेय | महीधर | अनन्त (विष्णू) |

भविष्यपुराणात[८] निरनिराळ्या देवांची लक्षणे, त्यांच्या हातांची संख्या, हातात असलेली आयुधे, पोषाख, वर्ण, त्यांचे वाहन, छन्द, ऋषी, विनियोग वगैरे अधिक माहिती दिली आहे. जिज्ञासूंनी ती तेथे पहावी.

भविष्यपुराण[८], विश्वकर्माप्रकाश[९] व शिल्परत्न[१०] यांत वास्तुमण्डलातील प्रत्येक घराला कुठला रंग द्यावा याचीही माहिती दिली आहे. मात्र निरनिराळ्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांचे रंगांच्या बाबतीत एकमत नाही. तसेच देवांच्या रंगावरून घरांना हे रंग दिले जातात असेही नाही, त्यात कदाचित फक्त सौंदर्यदृष्टीच अभिप्रेत असावी.

८. भविष्यपुराण मध्यमपर्व, भाग २, अ. १०
९. विश्वकर्माप्रकाश ५·५१९–५४१
१०. शिल्परत्न ७·४१–४५

## वास्तुमंडलाचा वास्तुरचनेसाठी उपयोग

गाव वसवितांना जातिवार, धंद्याप्रमाणे वगैरे घरांची जी मांडणी दिली जाते ती पद-देवतांची नावें देऊन सांगितली जाते व पुष्कळ वेळा देवांच्या वरूनही त्या पदावर काय वास्तू असावी तेही दिलेले असते. गंधर्वपदावर नाट्यगृह, गायनशाळा असावी, रोगपदावर वैद्यशाळा असावी अशा सूचना असतात. शहरातील देवालयांचे स्थान व त्या देवालयातील निरनिराळे उत्सवमण्डप वगैरेंची व्यवस्था वास्तुपदमंडलांच्या साहाय्याने दिलेली असते. राजवाड्यातील निरनिराळ्या दालनांची किंवा इमारतींची मांडणी वास्तुपदमंडलावरून देतात व त्यांचे स्थान त्या त्या पदाच्या देवतेच्या गुणांवरून ठरविले गेले असावे. सत्यपदावर न्यायालय, गंधर्वपदावर नाट्यमंदिर, नट, नर्तक यांची रहावयाची व्यवस्था यांचे स्थान आहे. वरुणपदावर विहीर व रोगपदावर दवाखाना असावा असे म्हटले आहे. सोमपदापाशी राजाचे छत्र, चामर तसेच त्याचा राज्याभिषेकमंडप यांचे स्थान दाखविले आहे.[११] यावरून असेही वाटते की वास्तुपदमंडलांचा उपयोग केवळ पूजेअर्चेसाठीच नसून वास्तूतील निरनिराळ्या इमारती, कार्यालये, दालने तसेच शहरातील घरे, देवालये यांच्या व्यवस्थितीसाठी-देखील केला जात असे, असे सबळ पुराव्यानिशी म्हणता येईल.

या विषयावरची अधिक माहिती पाहिजे असल्यास कुलकर्णी[१२] (१९७९) पहावे.

---

११. समरांगणसूत्रधार १५·१८–४९.

१२. जर्नल ऑफ द ओरिएन्टल इन्स्टिटयूट, भाग २८, क्र. ३–४, मार्च–जून १९७९.

## ९. आयव्ययादि

वास्तू कर्त्याला लाभदायक आहे की अशुभ ठरेल हे पाहण्यासाठी, ज्याप्रमाणे लग्न ठरवितांना नियोजित वर व वधू यांचे गुण बघितले जातात त्याचप्रमाणे वास्तू व यजमान यांच्यातील शुभाशुभ गुण पाहण्यासाठी वास्तूच्या आयव्ययादिंचा विचार केला जातो.

कश्यपमुनींनी[१] वास्तूचे आय, व्यय, तिथी, नक्षत्र इत्यादी जाणण्यासाठी प्रत्येकी दोन निरनिराळी सूत्रे दिली आहेत ती सूत्ररूपाने येथे देतो–

१)अ ८/१० × प्रासादाची उंची यांचा शेष तो आय.
१)ब ८/१२ × प्रासादाची परिमिती यांचा शेष तो आय.
२)अ ९/१० × प्रासादाची उंची यांचा शेष तो व्यय.
२)ब ९/१२ × प्रासादाची परिमिती यांचा शेष तो व्यय.
३)अ ८/२७ × प्रासादाची उंची यांचा शेष ते नक्षत्र.
३)ब ८/२७ × प्रासादाची परिमिती यांचा शेष ते नक्षत्र.
४)अ ९/७ × प्रासादाची उंची यांचा शेष तो वार.
४)ब ९/७ × प्रासादाची परिमिती यांचा शेष तो वार.

---

१) काश्यपशिल्प अध्याय २५.

५)अ $\frac{३}{३०}$ × प्रासादाची उंची यांचा शेष ती तिथी.

५)ब $\frac{३}{३०}$ × प्रासादाची परिमिती यांचा शेष ती तिथी.

६)अ $\frac{३}{६ \times ८}$ × प्रासादाची रुंदी यांचा शेष ती योनी.

६)ब $\frac{३}{८}$ × प्रासादाची परिमिती यांचा शेष ती योनी.

विमानार्चनकल्प अथवा वैखानसागमात[२] आयव्ययादिंच्या व्याख्या खालीलप्रमाणे दिल्या आहेत—

$\frac{८}{१२}$ × प्रासादाची उंची यांचा शेष तो आय.

$\frac{९}{८}$ × प्रासादाचा व्यास यांचा शेष तो व्यय.

$\frac{८}{२७}$ × प्रासादाची उंची यांचा शेष ते नक्षत्र.

$\frac{३}{८}$ × प्रासादाचा व्यास यांचा शेष ती योनी.

काश्यपशिल्पांत प्रथम (अ) जी सूत्रे दिली आहेत ती वैखानसागमांत दिलेल्या सूत्रांशी मिळतीजुळती आहेत. आता नंतर आयव्ययादिंकरिता मयमतात[३] दिलेली सूत्रे उद्‌धृत केली आहेत. त्यांनी काश्यपशिल्पात आयादिंकरीता जी दुसरी सूत्रे दिली आहे त्यांचा उलगडा होतो.

$\frac{८}{१२}$ × प्रासादाची परिमिती यांचा शेष तो आय.

$\frac{९}{१२}$ × प्रासादाची परिमिती याचा शेष तो व्यय.

$\frac{३}{८}$ × प्रासादाची परिमिती याचा शेष ती योनि ( ध्वज, धूम इत्यादि ).

$\frac{८}{२७}$ × प्रासादाची परिमिती याचा शेष ते नक्षत्र.

$\frac{८}{३०}$ × प्रासादाची परिमिती याचा शेष ती तिथी.

$\frac{८}{७}$ × प्रासादाची परिमिती यांचा शेष तो वार.

काश्यपशिल्पात पुन्हा दिलेली आयादिंकरिता सूत्रे ( ब ) मयमतांत दिलेल्या सूत्रांना मिळतीजुळती आहेत तेव्हा कश्यपमुनींनी वैखानसागम व मयमत या दोन्हींनी दिलेली सूत्रे सांगितली आहेत असे दिसते. काश्यपशिल्प हे पुस्तक यावरून वैखानसागम व मयमत यांच्याहून अर्वाचीन असावे असे वाटते. आता आय, व्यय इत्यादिंबद्दल थोडक्यात माहिती देतो.

आय आठ आहेत. १ ) ध्वज, २ ) धूम्र, ३ ) सिंह, ४ ) कुत्रा, ५ ) बैल, ६ ) गाढव, ७ ) हत्ती व ८ ) कावळा. यांतील विषम आय शुभ व सम आय अशुभ समजतात.

शिल्पदीपकाप्रमाणे (३·३) व्ययदेखील आठ आहेत. १) शांता, २) प्रौर, ३) प्रद्योत, ४) श्रीयानंद, ५) मनोहर, ६) श्रीवत्स, ७) विभव व ८) चिंतात्मक. आय व्ययाहून नेहमी जास्त असावा.

समरांगण सूत्रधाराप्रमाणे (२६·३३–३६$\frac{१}{२}$) व्यय तीन प्रकारचे असतात (व्यय = $\frac{१}{८}$ × नक्षत्र यांचा शेष ). व्यय एक आला तर पिशाच, एकाहून जास्त आला तर राक्षस व एकाहून कमी आला तर यक्ष. तेव्हा व्यय एकाहून कमी असावा.

योनी व आय यांची काही शिल्पग्रंथांत उलटापालट झाली आहे. शिल्पदीपकाप्रमाणे ( ३·२२–२४ ) योनी १४ आहेत. १) अश्व, २) हत्ती, ३) बकरी, ४) सर्प, ५ ) कुत्री, ६ ) मांजर,

---

२) विमानार्चन कल्प, पटल ६ ३) मयमत ९·१९–२४

७) उंदीर, ८) गाय, ९) म्हैस, १०) वाघीण, ११) हरिणी, १२) माकडीण, १३) मुंगुस व १४) सिंहीण.

नक्षत्रे २७ आहेत. त्यांचे पुन्हा अधोमुख, तिर्यङ्मुख व ऊर्ध्वमुख नक्षत्रे असे तीन प्रकार आहेत.

अधोमुख नक्षत्रे– मघा, मूळ, विशाखा, कृत्तिका, भरणी, पूर्वाफाल्गुनी, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा व आश्लेषा.

तिर्यङ्मुख नक्षत्रे– ज्येष्ठा, अश्विनी, रेवती, मृग, पुनर्वसू, अनुराधा, स्वाती, हस्त व चित्रा.

ऊर्ध्वमुख नक्षत्रे – पुष्य, आर्द्रा, श्रवण, उत्तराफाल्गुनी, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी, शतभीषा व धनिष्ठा.

यजमानाचे नक्षत्र, तिथी, वार इत्यादी यांचा वास्तूच्या नक्षत्र, तिथी, वार इत्यादींशी मेळ घालून वास्तू कर्त्यास शुभ आहे की अशुभ आहे ते पाहिले जाते. खाली दिलेल्या सारणीत द्राविड तसेच उत्तर हिंदुस्थानी पद्धतीच्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत आयादींची सूत्रे एकत्रित दिली आहेत, त्याने त्यांच्यामध्ये तुलना करणे सोपे जाईल. या विषयावर अधिक माहिती पाहिजे असल्यास खाली दिलेले ग्रंथ पहावेत–

समरांगण सूत्रधार, अध्याय २६; शिल्पदीपक, अध्याय २ व ३; राजवल्लभ, अध्याय ३; दीपार्णव, अध्याय १; अग्निपुराण, अध्याय ६५ व १०५; मत्स्यपुराण, अध्याय २५७; मनुष्यालयचंद्रिका, अध्याय ३; तंत्रसमुच्चय, २·३; वास्तुविद्या, अध्याय ८; विमानार्चनकल्प, पटल ६; विश्वकर्माप्रकाश, २·१७०–२२०; मयमत, अध्याय ९; ईशानशिवगुरुदेवपद्धति (सामान्य पाद) ५·१९–२०. 'ज्योतिर्निबंध' या ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथात या विषयावर बरीच माहिती मिळते.

ज्याप्रमाणे कर्त्याला वास्तू लाभेल की नाही हे पाहण्यासाठी वास्तूचे तिथी, नक्षत्र, वार इत्यादी ठरवितात त्याचप्रमाणे कर्त्याला देवमूर्ती लाभेल की नाही हे पाहण्यासाठी मूर्तीच्या मापावरून तिचे आय, व्यय, योनी, वार इत्यादी कशी मिळवावीत याबद्दलची सूत्रे मयशास्त्र (२·१०–२४) या पुस्तकात दिली आहेत; ती सूत्रे खाली देतो–

$\frac{१}{१२}$ × मूर्तीची उंची यांचा शेष तो आय.

$\frac{९}{७}$ × मूर्तीची उंची यांचा शेष तो वार.

$\frac{३}{८}$ × मूर्तीची उंची यांचा शेष ती योनी.

$\frac{१२}{२७}$ × मूर्तीची उंची यांचा शेष ते युग.

$\frac{१२ \times ४}{२७}$ × मूर्तीची उंची यांचा शेष ते नक्षत्र.

$\frac{१२}{९ \times २७}$ × मूर्तीची उंची यांचा शेष तो शक.

स्थपतीला ज्योतिषशास्त्राची माहिती हवी असे स्थपतीची लक्षणे देताना सांगितले आहे. वरील माहितीवरून याचा उलगडा होतो.

# आर्यादिची सूत्रे

| ग्रंथनाम | आय | व्यय | नक्षत्र | तिथी | वार | आयुष्य |
|---|---|---|---|---|---|---|
| १) ई. शि. गु. देव पद्धती सामान्य पाद पूर्वार्ध | $\frac{३}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{\text{नक्षत्र}}{८}$ | $\frac{९}{२७}$ क्षेत्रफळ | | | $\frac{९}{६०}$ क्षेत्रफळ |
| २) तंत्रसमुच्चय | $\frac{३}{८}$ (लांबी + रुंदी) | $\frac{१\times}{८}$ (लांबी + रुंदी) किंवा $\frac{९}{१०}$ ( ,, ) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{३०}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{७}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी) |
| ३) मयमत | $\frac{९}{१२}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{१४}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{३०}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{७}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी) |
| ४) वैखानसागम | $\frac{९}{१२}$ (उंची) | $\frac{९}{८}$ (उंची) | $\frac{९}{२७}$ (उंची) | | | |
| ५) काश्यपशिल्प | $\frac{९}{१२}$ (लांबी + रुंदी)<br>$\frac{९}{१०}$ (उंची) | $\frac{९}{१२}$ (लांबी + रुंदी)<br>$\frac{९}{१०}$ (उंची) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी)<br>$\frac{९}{२७}$ (उंची) | $\frac{३}{३०}$ (लांबी + रुंदी)<br>$\frac{३}{३०}$ (उंची) | $\frac{९}{७}$ (लांबी + रुंदी)<br>$\frac{९}{७}$ (उंची) | |
| ६) मनुष्यालयचंद्रिका | $\frac{९}{१२}$ (लांबी + रुंदी) | $\frac{३}{१४}$ (लांबी + रुंदी) किंवा $\frac{९}{१०}$ ( ,, ) | $\frac{९}{२७}$ (लांबी + रुंदी) | $\frac{९}{३०}$ (लांबी + रुंदी) | | |
| ७) समरांगणसूत्रधार | $\frac{१}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{१}{८}$ नक्षत्र | $\frac{\text{क्षेत्रफळ}}{८ \times २७}$ | | | |
| ८) शिल्पदीपक | $\frac{१}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{१}{८}$ नक्षत्र | $\frac{८ \times \text{क्षेत्रफळ}}{२७}$ | | | |
| ९) राजवल्लभ | $\frac{१}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{३}{८}$ नक्षत्र | $\frac{\text{क्षेत्रफळ}}{८ \times २७}$ | $\frac{१}{१५}$ (आ + न + ता + व्य + अं)[२] | $\frac{१}{७}$ (आ + न + ता + व्य + अं) | $\frac{९}{६०}$ (क्षेत्रफळ) |
| १०) अग्निपुराण | $\frac{१}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{१}{७\times८}$ (लांबी×रुंदी) | | | | |
| ११) दीपार्णव | $\frac{१}{८}$ (लांबी × रुंदी) | $\frac{१}{७\times८}$ (लांबी×रुंदी) | $\frac{८ \times \text{क्षेत्रफळ}}{२७}$ | $\frac{९}{१५}$ × (लग्न)[3] | $\frac{९}{७}$ (तिथी) | |

सूचना :– १) प्रत्येक ठिकाणी भागाकाराचा शेष घ्यावयाचा.

२) आ = आय, न = नक्षत्र, ता = तारा, व्य = व्यय, अं = अंशक

३) लग्न = $\frac{१}{१२}$ (आय + नक्षत्र + तारा + व्यय + अधिपति + क्षेत्रफळ)

## १०. अधिष्ठान

शिल्परत्नात अधिष्ठानाची व्याख्या दिली आहे:—

प्रासादादिं निर्जैरङ्गैरधितिष्ठति यत् सदा ।
दृढं शिलादिघटितं तदधिष्ठान संज्ञितम् ॥ १७·१–१½ ॥

प्रासाद इत्यादी वास्तूचा एक भाग असलेला व ज्याच्यावर त्यांची उभारणी केलेली असते अशा दगड वगैरेंनी मजबूत केलेल्या भागास अधिष्ठान अशी संज्ञा आहे. अधिष्ठानाला धरातल, आधार, धरणी, भुवन, पृथ्वी, भूमी वगैरे पर्यायी शब्द आहेत[१]. अधिष्ठानाला मसूरक, वस्त्वाधार, धरातल, तल, कुट्टिम, आद्यंग, जगती अशीही नावे आहेत.[२-५] अधिष्ठान देवालय, पूर्वमण्डप, अभिषेकमंडप, विहारमण्डप, वाहनमण्डप वगैरे मण्डपांना, गर्भगृह, बलीपीठ, ध्वजस्तंभ, गोपुरद्वार यांच्यासाठी तसेच राजा, धनिक यांच्या भवनांना, नृत्यशाला, नाटकशाला, वैद्यशाला, पाठशाला, न्यायशाला इत्यादी शालांना अवश्य असावे.[६]

### अधिष्ठानाची उंची

घराची उंची तीन किंवा चार हात असेल तर अधिष्ठानाची उंची एक हात असते. घराची उंची पाच हात असेल तर अधिष्ठानाची उंची ३० किंवा ३२ अंगुले असते. घराची उंची सहा हात किंवा ११ हात असेल तर अधिष्ठानाची उंची अनुक्रमे ३१ व ३२ अंगुले असते. घराची उंची ११ हातांपासून १४ हातांपर्यंत असेल तर अधिष्ठानाची उंची दर हाताला दोन अंगुलांनी वाढते व १४ हात उंचीच्या घराच्या अधिष्ठानाची उंची ३८ अंगुले असते. घराची उंची १५ हात असेल तर अधिष्ठानाची उंची ३९ अंगुले असते.[७] वरील माहितीवरून अधिष्ठानाची उंची व घराची उंची यांच्यातील संबंध दाखविणारे सूत्र येते.

अधिष्ठानाची उंची = ०·०५८ ( घराची उंची ) + १८·४ अंगुले–( १ )
(अंगुले) (अंगुले)

अनेक मजली प्रासादाच्या बाबतीत तो जर तीन मजली असेल तर अधिष्ठानाची उंची १¾ हात असावी व ती वाढवीत १२ मजली घराच्या अधिष्ठानाची उंची चार ते सहा हात असावी.[८] हीच माहिती मयमतात ( १४·१४ ) दिली आहे. बारा मजली प्रासादाच्या अधिष्ठानाची उंची चार हात असावी व प्रत्येक मजल्यास सहा अंगुले कमी करून तीन मजल्याच्या प्रासादाच्या अधिष्ठानाची उंची १¾ हात असावी. शिल्परत्नात ( १७·१३ ) दुसरेही प्रमाण दिले आहे. तीन मजल्याच्या प्रासादाच्या अधिष्ठानाची उंची तीन हात असावी व प्रत्येक मजल्याला अर्ध्या हाताने अधिष्ठानाची उंची वाढवावी. याप्रमाणे ११ मजली प्रासादाच्या अधिष्ठानाची उंची ७ हात येते. १२ मजली प्रासादाच्या अधिष्ठानाची उंची ७½ हात न ठेवता आठ हात ठेवावी.

---

१. काश्यपशिल्प ६·१–२
२. शिल्परत्न १७·६
३. मयमत १४·४०
४. प्रासादमन्डन २·१
५. ई. शि. गु. दे. पद्धति ३०·६६
६. विश्वकर्मवास्तुशास्त्र ७२·१–२
७. शिल्परत्न १७·६–९ तसेच मयमत १४·१५–१६ काही फरकाने
८. शिल्परत्न १७·४–५

## अधिष्ठानाचे थरविभाग व त्यावरील कोरीव काम

अधिष्ठान सुंदर दिसावे म्हणून त्याच्या उंचीचे विभाग पाडून त्यांना कमळ, पट्टी वगैरेंचा आकार देतात. या प्रत्येक विभागावर पुन्हा कोरीव काम केलेले असते. उपान, जगती, कुंभ, कन्धर व प्रस्तर ही अधिष्ठानाची पाच प्रमुख अंगे आहेत.[९,१०] यांच्या निरनिराळ्या मांडणीने मयाने अधिष्ठानाचे १४ प्रकार सांगितले आहेत, पराशरांनी दोन व इतरांनी तीन प्रकारची अधिष्ठाने सांगितली आहेत.[११]

अधिष्ठानाचे मंचक, पादबन्ध व प्रतिबन्ध हे तीन प्रकार आहेत. यांपैकी मंचक कनिष्ठ, पादबन्ध मध्यम व प्रतिबन्ध पद्धतीचे अधिष्ठान श्रेष्ठ समजतात. प्रतिबन्धालाच प्रतिक्रमही म्हणतात. ज्या अधिष्ठानाच्या थरविभागांत कुमुद नसते त्याला मंचक म्हणतात. पादबन्धांत कुमुद अष्टकोनी असते व सर्वप्रकारच्या प्रतिबन्धांचे कुमुद वृत्ताकार असते, हा मंचक, पादबंध व प्रतिबन्ध यांतील मुख्य फरक असतो.[१२,१३]

शिल्परत्न[१४], मयमत[१५] व काश्यपशिल्प[१६] यांत अधिष्ठानाचे वरील तिन्ही प्रकारांचे अनेक प्रकार दिले आहेत. त्यातील काश्यपशिल्पात दिलेले प्रकार पुस्तकात आकृती काढून दाखविले आहेत. शिल्परत्न, मयमत व काश्यपशिल्प यांत अधिष्ठानाच्या कुमुद इत्यादी निरनिराळ्या अंगांचे निर्गमन किंवा अंतर्गमन काय असावे याची माहिती दिली आहे. ती एकत्रित खाली सारणीत दिली आहे.

### निरनिराळ्या अंगांचे निर्गमन

| अधिष्ठानाचे अंग | शिल्परत्न (१९·११६–११९) | मयमत (१४·४१–४३) | काश्यपशिल्प (६·१८–२०) |
|---|---|---|---|
| कुमुद | उंचीइतके किंवा १$\frac{3}{4}$ उंची | उंचीइतके किंवा १$\frac{3}{4}$ उंची, १$\frac{1}{2}$ उंची | उंचीइतके |
| कुमुदपट्टी | शोभून दिसावी | — | उंचीइतके |
| कंप अथवा वेत्र (अंतर्गमन) | उंचीच्या $\frac{1}{4}$ | उंचीच्या $\frac{1}{4}$ | उंचीच्या $\frac{1}{4}$ |
| महावाजन | उंचीइतके, $\frac{3}{4}$ उंची, $\frac{1}{2}$ उंची, $\frac{1}{4}$ उंची | उंचीइतके, $\frac{3}{4}$ उंची | उंचीइतके, $\frac{1}{2}$ उंची, १$\frac{1}{3}$ उंची |

काश्यपशिल्पात[१७] प्रतीची किंवा प्रस्तराची पट्टी हंस, मकर, व्याल, विद्याधर यांच्या आकृती काढून भूषवावी असे एके ठिकाणी म्हटले आहे तर त्याच पटलात पण दुसऱ्या ठिकाणी[१८] म्हटले आहे

९. शिल्परत्न १९·३
१०. काश्यपशिल्प ६·२२
११. शिल्परत्न ९·१
१२. शिल्परत्न १९·१–५
१३. काश्यपशिल्प ६·२५–२६
१४. शिल्परत्न १९·५–९४
१५. मयमत १४·१६–३९
१६. काश्यपशिल्प ६·१–११९
१७. काश्यपशिल्प ६·११७
१८. काश्यपशिल्प ६·२१–२९

की, प्रतिबंधात प्रतीवर कोठल्याही तऱ्हेची नक्षी काढू नये. तसेच प्रतिबंध व पादबंध प्रकारच्या अधिष्ठानांत पादुकेवरही नक्षी कोरू नये; कोरल्यास त्यामुळे संकटे येतात. तेव्हा काश्यपशिल्पात दोन परस्परविरुद्ध मतांचे संकलन केलेले दिसते.

प्रस्तर, गल व विशेषतः कपोताच्या ठिकाणी दोन खांबांच्यामध्ये एकमेकांपासून विरुद्ध दिशेला तोंड असलेले सम वा विषम संख्येचे व्याल काढावेत. वलभी पट्टीवरती प्राणी, हंस वगैरे कोरून ती भूषवावी.[१९] प्रतीवर घोडे, मगराचे तोंड, सिंहमुख यांची नक्षी कोरावी.[२०]

पादबंधाच्या तळाशी कुमुद काढावयाचे असेल तर त्या कुमुदाच्या उंचीचे सहा भाग करून खालची पट्टी एक भाग, मधली पट्टी तीन भाग व वरची पट्टी दोन भाग असावी व कुमुद अष्टकोनी काढावे.[२१] प्रतिबंधात कमळाचा आकार दिवस पूर्ण भरलेल्या गर्भिणी स्त्रीच्या पोटाच्या आकाराप्रमाणे असावा.[२२] ज्या कुमुदाच्या खाली व वर अंबुज आहे ते कुमुद वृत्ताकार असावे.[२३]

द्राविड प्रासादांचे अधिष्ठान पाहून वर दिलेले कोरीव कामाविषयीचे नियम पाळले गेले आहेत की नाही हे पाहवयास हवे. पुढील संशोधनास हा विषय चांगला आहे.

## ११. उपपीठ

अधिष्ठानाच्या खाली उपपीठ असते. उपपीठ पाया मजबूत होण्यासाठी, प्रासादाची उंची वाढविण्यासाठी किंवा प्रासादाची शोभा वाढावी म्हणून उपयोगात आणतात.[२४–२६]

**उपपीठाची रुंदी**– अधिष्ठानाच्या पादुकेचे जेवढे निर्गमन असते तितकेच निर्गमन उपपीठाचे असते.[२७,२८] किंवा अधिष्ठानाच्या पादुकेपासून एक ते नऊ दंडांपर्यंत उपपीठांचे निर्गमन असते. येथे खांबाच्या वरच्या टोकाची जी रुंदी तिला दंड समजून माप दिले आहे.[२९] मयमताप्रमाणे[३०] अधिष्ठानाच्या पादुकेबाहेर उपपीठाचे निर्गमन १, १$\frac{१}{२}$, २ किंवा तीन दंड असते.

काश्यपशिल्प[३१] तसेच तंत्रसमुच्चयात[३२] उपपीठाच्या रुंदीचा आणखी एक नियम दिला आहे व त्यावरून उपपीठाची रुंदी अधिष्ठानाच्या उंचीवरून ठरवितात. उपपीठाचे निर्गमन अधिष्ठानाच्या पादुकेच्या बाहेर अधिष्ठानाच्या उंचीच्या $\frac{१}{१०}$, $\frac{१}{५}$, $\frac{३}{१०}$, $\frac{२}{५}$, $\frac{१}{२}$, $\frac{३}{४}$, दुप्पट किंवा तिप्पट असते. यापुढे, जाऊन तंत्रसमुच्चयात[३२] पुढे म्हटले आहे की उपपीठाचे अधिष्ठानाबाहेर निर्गमन जसे सुंदर दिसेल तसे करावे.

---

१९. शिल्परत्न १९·१२२–१२४
२०. तंत्रसमुच्चय २·१३–१४
२१. वास्तुविद्या ९·१५–१६
२२. शिल्परत्न १९·९८–१००
२३ काश्यपशिल्प ६·११८–११९
२४ शिल्परत्न १७·२५
२५. मयमत १३·१
२६. विश्वकर्म वास्तुशास्त्र ७७·१
२७. शिल्परत्न १७·२८
२८. काश्यपशिल्प ५·५$\frac{१}{२}$
२९. शिल्परत्न १७·२८–२९
३०. मयमत १३·४–५
३१. काश्यपशिल्प ५·४–५
३२. तन्त्रसमुच्चय २·११

**उपपीठावरील कोरीव काम–** उपपीठावरील कोरीव काम अधिष्ठानाप्रमाणे असावे व निरनिराळ्या थरविभागांचे निगर्मन अधिष्ठानाप्रमाणेच असावे[३३-३५] निरनिराळे प्राणी, व्याल, सिंह, मकर, पानांचे प्रकार यांनी उपपीठ भूषवावे. प्रतीवरती मकर, कमळे कोरावीत.[३६, ३७]

उपपीठाच्या थरविभागांचे व त्यांच्या रचनेचे निरनिराळे प्रकार काश्यपशिल्पात दिलेले आहेत, व त्याहून जास्त माहिती थोडयाच इतर शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत मिळते.

अधिष्ठान व उपपीठ याविषयी अधिक माहिती पाहिजे असल्यास कुलकर्णी (१९७५) पहावे.

## १२. प्रासादाचे द्वार

कोणत्याही वास्तूचे दार हे सर्वांत दर्शनीय स्थान असते. प्रासादाच्या प्रमाणात योग्य मापाचे दार असले म्हणजे तो प्रासाद अधिक शोभून दिसतो. अनेक प्रकारच्या वेलबुट्ट्या, मूर्ती, कमळे, फुले वगैरे कोरून व दाराच्या कवाडांच्या उभ्या व आडव्या पट्ट्यांवर, चौफुली, मिटलेली कमळे वगैरे आकारांचे शीर्ष असलेले खिळे ठोकून ते दार फार शोभिवंत करता येते. दाराच्या निरनिराळ्या अवयवांवरील म्हणजे खांब, उंबरठा, उत्तरंग, कवाडे वगैरेंवरील नक्षीकाम डोळ्यांच्या पातळीत येत असल्याने प्रासाद पाहणाऱ्याच्या मनात ही नक्षी प्रथमदर्शनीच भरते. उत्तरंगावरील गणेशाची अथवा गजलक्ष्मीची मूर्ती यासाठीच फार उत्तम कोरलेली असते. याचबरोबर दाराच्या ठिकाणी भिंतीत पोकळी येते व ती जागा मजबुत असावयास हवी. त्यासाठी दाराची मापे सौंदर्यदृष्टीतूनच नव्हे तर वास्तूच्या मजबूतीच्या दृष्टीनेही ठरवावयास हवीत.

प्रत्येक दिशेला प्रादक्षिण्य क्रमाने दार असावे.[१] वास्तुपदमंडलांतील कोणत्या पदावर दार असावे याबद्दल नियम दिले आहेत. मयमताप्रमाणे[२] पूर्वेकडे माहेन्द्र व दक्षिणेकडे राक्षसपदावर दार असावे. पश्चिम व उत्तर दिशांना अनुक्रमे पुष्पदंत व भल्लाटपदावर दार असावे. वास्तुविद्येत[३] जातीप्रमाणे दारे कुठल्या पदावर असावीत ते दिले आहे. ब्राह्मणाच्या घराला दार पूर्वेकडे असून ते महेन्द्र व जयन्तपदावर असावे. क्षत्रियांच्या घराला दक्षिण दिशेकडील गृहक्षतपदावर दार असावे. वैश्याचे दार गन्धर्वपदावर म्हणजे पुन्हा दक्षिण दिशेकडे असावे. शूद्राच्या घराचे दार पश्चिमेकडे पुष्पदन्त किंवा सुग्रीवपदांवर असावे. सर्वजातींकरिता उत्तरेकडील भल्लाटपदावर किंवा मुख्य पदावर दार असावे, मात्र भल्लाट व मुख्य या दोन्ही पदांवर दारे असू नयेत; कारण ही पदे एकमेकांस चिकटून आहेत. इतर कुठल्याही पदांवर दारे असू नयेत.

कोणत्या पदावर दार ठेवावयाचे निश्चित झाले की, त्या पदावर ते नक्की कोठे ठेवावयाचे याचा नियम तंत्रसमुच्चयात[४] दिला आहे. मुख्य दाराच्या रुंदीचे २१ भाग करून डाव्या बाजूचा एक

---

३३. शिल्परत्न १८·२०
३४. काश्यपशिल्प ५·२८
३५. मयमत १३·२१
३६. काश्यपशिल्प ५·२८–२९
३७. मयमत १३·१९–२०

---

१. वास्तुविद्या १३·२४
२. मयमत ३०·४४–४५½
३. वास्तुविद्या ४·३–४
४. तंत्रसमुच्चय २·२६

अंश काढून तेथे दाराचा मध्यभाग व पदाचा मध्यभाग एकाच जागी यावेत. उरलेल्या दिशांकडील दारांच्या बाबतीत प्रदक्षिणक्रमाने दाराच्या रुंदीचे ३६, ६४ व ८१ भाग करून त्यातील एक एक भाग सोडून द्वारमध्य ठरवावा.

तसेच भिंतीच्या जाडीमध्ये दाराची जाडी कुठे असावी त्याबद्दल नियम आहे. भिंतीच्या जाडीचे १२ विभाग करून त्यांतील ५ व ७ व्या विभागांच्या रेषेशी दाराच्या जाडीचा मध्य यावा किंवा भिंतीच्या जाडीचे ७ किंवा ५ भाग करून त्यांच्या चवथ्या किंवा तिसऱ्या भागापाशी दाराच्या जाडीचा मध्य यावा. आणखी एक सामान्य नियम म्हणजे देवप्रासादापासून मनुष्याच्या घरापर्यंत कुठल्याही वास्तूच्या भिंतीच्या जाडीचे पाच भाग केले असता तिसऱ्या भागाशी दाराच्या जाडीचा मध्य यावा.[५]

## दाराची मापे

दाराची उंची, रुंदी व जाडी ही मापे प्रासादाच्या मापांवरून ठरवितात किंवा दाराची उंची प्रासादाच्या खांबाच्या उंचीवर अवलंबून असते. काही शिल्पशास्त्रग्रंथांत दाराचे माप हात व अंगुले या मापांनी दिले आहे.

**प्रासादाच्या प्रमाणात दाराचे माप–** विष्णुमंदिराच्या गर्भागाराच्या रुंदीचे १४ किंवा १२ भाग केले असता दाराची उंची अनुक्रमे ११ व १० भाग असावी.[६] शिवालयाच्या गर्भागाराच्या दाराचे माप निरनिराळ्या प्रमाणात दिले आहे. गर्भागाराच्या रुंदीचे १२ भाग करून ८ भाग दाराची उंची असते. रुंदी उंचीच्या निम्मी असावी. गर्भागाराच्या रुंदीच्या ४/७ दाराची उंची असून, रुंदी उंचीच्या ६/१३ असावी. दाराची उंची गर्भागाराच्या रुंदीच्या ५/९ असून त्याची रुंदी उंचीच्या ५/११ असते. गर्भागाराच्या रुंदीच्या ५/८ दाराची उंची असावी व त्याच्या निम्मे दाराची रुंदी असते. गर्भागाराच्या रुंदीच्या ३/५ किंवा ७/१२ दाराची उंची असून रुंदी अनुक्रमे ६/१७ व १/१५ असते[७]

गर्भगृहाच्या रुंदीच्या १/४ रुंदी दाराची असावी व उंची रुंदीच्या दुप्पट असावी.[८] गर्भागाराच्या रुंदीचे ११, ८, १२, ७ किंवा १५ भाग करुन अनुक्रमाने ७, ५, ७, ४, व ८ भाग गर्भागाराच्या दाराची उंची असते. गर्भागाराच्या रुंदीचे २१, १९, १५, १३ किंवा ९ भाग करून अनुक्रमाने १०, ९, ७, ६ व ४ भाग गर्भागाराच्या दाराची रुंदी असते. शिवालयाच्या गर्भागाराच्या रुंदीचे ३, ५, ९ किंवा २ भाग केले तर अनुक्रमे २, ३, ५ व १ भाग दाराची उंची असते. त्या दाराच्या उंचीचे २, १७, ११ किंवा ७ भाग केले असता अनुक्रमे १, ८, ५ व ३ भाग दाराची रुंदी असते.[९]

**खांबाच्या उंचीवरून दाराचे माप–** प्रासादाची उंची खांबाच्या उंचीवरून ठरते. तेव्हा एक प्रकारे खांबाच्या उंचीवरून दिलेले दाराचे माप प्रासादाच्या उंचीच्या प्रमाणात असते. प्रासाद १ ते १६ मजल्यांपर्यंत उंच असतो व प्रत्येक मजल्याच्या खांबाची उंची दिलेली असते. तेव्हा प्रत्येक मजल्याला असलेल्या दाराची उंची खांबाच्या उंचीच्या विशिष्ट प्रमाणात असते.

---

५. शिल्परत्न २२·२९–३१

६. शिल्परत्न २२·९–९½

७. शिल्परत्न २२·१०–१६

८. विश्वकर्माप्रकाश ७·९३८

९. तंत्रसमुच्चय (२·२७ व त्यावरील टीका)

दाराच्या खांबाची उंची अधिष्ठानाच्या वरपासून ते उत्तरापर्यंत असते.[१०] खांबाच्या उंची-इतकी दाराची उंची असावी. रुंदी उंचीच्या निम्मे असावी. रुंदीत १ ते ८ अंगुले (१.२ ते १५.२ सें. मी ) मिळवून दाराची रुंदी नऊ प्रकारची असते. दाराच्या उंचीचे १६ भाग करून १३ भाग किंवा ७ भाग शुद्धद्वाराची ( दाराचा मोकळा भाग ) उंची असते.[११] खांबाच्या उंचीचे ७, ८, ९ किंवा १० भाग करून अनुक्रमे ६, ७, ८ व ९ भाग दाराची उंची असते. दाराची रुंदी उंचीच्या निम्मी असावी.[१२-१५] खांबाच्या उंचीच्या $\frac{९}{१०}$ उंची दाराची असते. दाराच्या उंचीच्या $\frac{५}{९}$ त्याची रुंदी असते किंवा उंचीचे १०, ९, ८ व ७ भाग करून अनुक्रमे ७, ६, ५ व ४ भाग दाराची रुंदी असते.[१६] दाराच्या रुंदीच्या तिप्पट त्याची उंची असावी[१७-१९] असेही एक मत दिसते.

**दाराचे हातात व अंगुलात माप**– अपराजितपृच्छात[२०] १ हातापासून ५० हातांपर्यंत ( ०.४५६ मीटर ते २२.८० मीटर ) लांबी असलेल्या नागर, भूमिज व द्राविड प्रासादांच्या दारांचे माप अंगुलांमध्ये खालील सारणीत दिल्याप्रमाणे सांगितले आहे. त्यावरून दिसून येते की द्राविड प्रासादाच्या दाराची उंची नागरप्रासादाच्या दाराच्या उंचीहून कमी असते. हा उंचीतला फरक प्रासादाची रुंदी जसजशी वाढत जाते तसतसा कमी होत जातो.

| प्रासादाची रुंदी | | दारांची उंची | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | नागर प्रासाद | | भुमिज प्रासाद | | द्राविड प्रासाद | |
| हात | मी. | अंगुले | मीटर | अंगुले | मीटर | अंगुल | मीटर |
| १ | ०.४५६ | १६ | ०.३०४ | १२ | ०.२२८ | १० | ०.१९ |
| २ | ०.९१२ | ३२ | ०.६०८ | २४ | ०.४५६ | २० | ०.३८ |
| ३ | १.३६८ | ४८ | ०.९१२ | ३६ | ०.६८४ | ३० | ०.५७ |
| ४ | १.८२४ | ६४ | १.२१६ | ४८ | ०.९१२ | ४० | ०.७६ |
| ५ | २.२८० | ६७ | १.२७३ | ६० | १.१४ | ५० | ०.९५ |
| ६ | २.७३६ | ७० | १.३३ | ६७ | १.२७३ | ६० | १.१४ |
| ७ | ३.१९२ | ७३ | १.३८७ | ७४ | १.४०६ | ६५ | १.२३५ |
| ८ | ३.६४८ | ७६ | १.४८४ | ८० | १.५६ | ७० | १.३३ |
| ९ | ४.१०४ | ७८ | १.५२२ | ८६ | १.६७४ | ७५ | १.४२५ |
| १० | ४.५६ | ८० | १.५६ | ८८ | १.७१२ | ८० | १.५२० |
| ५० | २२.८ | १६० | ३.१२ | १६८ | ३.२७२ | १६० | ३.१२ |

१०. वास्तुविद्या १३.२४
११. विमानार्चनकल्प } द्वारलक्षण
१२. विमानार्चनकल्प }
१३. शिल्परत्न २२.३,४
१४. तंत्रसमुच्चय २.२९
१५. मयमत ३०.१०
१६. शिल्परत्न २२.४–६
१७. शिल्परत्न २२.७
१८. विश्वकर्माप्रकाश २.२९१
१९. वास्तुविद्या १३.२४–२५
२०. अपराजितपृच्छा १३०.१–३०

**दाराचे खांब** – दाराच्या खांबांचे भिंतीच्या बाहेर निर्गमन असे असते की, खांबांची जाडी दाराच्या जाडीच्या २ १/४, २ किंवा १ ३/४ पट होईल.[२१] दाराच्या खांबांचे त्रिशिख, पंचशिख, सप्त-शिख व नवशिख असे प्रकार आहेत. खांबाच्या रुंदीचे तीन विभाग करून मधला विभाग खांबाच्या रुंदीच्या निम्मे व बाजूचे दोन विभाग खांबाच्या रुंदीच्या १/४ असतात. मधला विभाग बाजूंच्या भागांच्या बाहेर आलेला असतो. या खांबास त्रिशिख खांब म्हणतात. याचप्रमाणे खांबाच्या रुंदीचे ५, ७, ९ विभाग करून त्यांना अनुक्रमे पंच, सप्त व नवशिख खांब म्हणतात.

दुसऱ्या मताने दाराच्या उंचीच्या पावपट रुंदी खांबाची असते; शाखांची जाडी रुंदीच्या पावपट असते. तीन, पाच, सात किंवा नऊ शाखांचे दार असते [२२,२३]. दोन्ही बाजूंच्या शाखांची जाडी दाराच्या जाडीच्यानिम्मे असते[२४]. द्वारशाखेची रुंदी खांबाच्या रुंदीइतकी, त्याच्या सवापट किंवा दीडपट असते.[२४]

**दाराचा उंबरठा व उत्तरंग** – दाराच्या खांबाच्या उंचीच्या १/६ भागाचे १२ भाग करून उत्तरंग सात भाग व उंबरठा पाच भाग करावा. किंवा दाराच्या खांबाच्या उंचीच्या १/८ भागाचे ९ भाग करून उत्तरंग पाच भाग व उंबरठा चार भाग करावा.[२५]

**दाराची कवाडे** – दोन्ही कवाडांची रुंदी व उंची शुद्धद्वाराइतकी असून त्यांची जाडी दाराच्या जाडीच्या पाऊणपट, निम्मे किंवा पावपट असावी. दाराच्या पट्टीची लांबी दाराच्या लांबी-इतकी असून तिची रुंदी दाराच्या रुंदीच्या १/८ व जाडी रूंदीच्या निम्मे किंवा पावपट असावी. द्वारपट्टिका डाव्या कवाडाला लावावी.* कवाडाच्या रुंदीइतकी लांबी असलेल्या पार्श्वपट्टिका असतात. त्यांना तीन गाठी असून त्या पट्ट्या ५, ७ व ९ इत्यादी विषम संख्यांच्या असाव्यात. या पट्ट्यांना वरून लोखंडी पट्ट्या ठोकाव्यात. लोखंडी पट्ट्या घट्ट बसण्यासाठी चौफुली, अर्धचंद्र, वज्र, आंबा किंवा मिटलेले कमळ असे वरच्या बाजूला आकार असलेले खिळे वापरावेत. याने दार सुंदर दिसते व मजबूतही होते.[२६]

दाराच्या उजव्या कवाडाला पुत्रिका व डाव्या कवाडाला माता म्हणतात. कवाडाची जाडी दाराच्या रुंदीच्या १/८ ते १/२४ असावी. दाराच्या रुंदीचे ४, ५, ६, ७ किंवा ८ भाग केले असता एक भाग सूत्रपट्टीची रुंदी असते. सूत्रपट्टी डाव्या कवाडाला असून दोन कवाडे ज्या अंगाला मिळतात तेथे असते. तिची जाडी तिच्या रुंदीइतकी, पाऊणपट किंवा निम्मे असते. कवाडाच्या रुंदीइतकी लांबी असलेल्या पट्टीला पंक्ती म्हणतात. त्यांची संख्या सम असते. त्यांची संख्या दोनापासून १६ पर्यंत असते. पंक्तीच्या अग्रसंधीपाशी (पंक्ती व सूत्रपट्टी यांच्या संधीपाशी) तीनापासून १७ कमळे असतात. त्यांची उंची सूत्रपट्टीच्या रुंदीच्या निम्मे किंवा १/३ असते. किंवा त्यांची उंची सूत्रपट्टीच्या जाडीच्या निम्मे असते. पंक्तीवरील व सूत्रपट्टीवरील (धातूचा) पट्ट सूत्रपट्टीच्या रुंदीच्या १/४ रुंदीचा असतो.

मातृकवाडाची रूंदी ही सूत्रपट्टीच्या रुंदीचा १/२ भाग, दाराच्या रुंदीचा निम्मा भाग व

* घरातून बाहेर पडताना जे कवाड डाव्या हाताला येते त्याला डावे कवाड म्हणतात. (शिल्परत्न ३२.९४).

२१. विमानार्चनकल्प, द्वारलक्षण
२२. विश्वकर्माप्रकाश ७.९३८–९४०
२३. बृहत्संहिता ५६.१३–१३ १/२
२४. बृहत्संहिता ५३.२६
२५. तंत्रसमुच्चय, २.२९
२६. विमानार्चनकल्प, द्वारलक्षण

कवाडाची जाडी यांच्या बेरजेइतकी असते. दाराच्या रुंदीतून मातृकवाडाची रुंदी काढून टाकल्यावर पुत्रिकाकवाडाची रुंदी मिळते.[२७]

सूत्रपट्टी मातृकवाडाला बसवायची रीत अशी – सूत्रपट्टीच्या रुंदीचे चार भाग करून त्यांतील एक भाग सोडून तीन भाग मातृकवाडाला लावावेत. निर्गमन एक भाग येते. सूत्रपट्टीची लांबी कवाडाच्या लांबीतून उत्तरंग व उंबरठा यांच्या उंचीच्या बेरजेहून काहीसा अधिक भाग वजा करून जी लांबी येईल तेवढी असते. सूत्रपट्टी मातृकवाडाला पक्की बसविण्याकरिता चौफुली किंवा कमळाच्या आकारासारखे डोके असलेले खिळे वापरावेत.[२८]

कवाडे बसविण्यासाठी त्यांच्या एका बाजूला वरती व खाली शिखा व रंगपाद असतात. या शिखा वर्तुळाकार असून त्यांना लोखंडी वलये लावून मजबूत केलेले असते. खालच्या (मूळ) शिखेची जाडी कवाडाच्या जाडीइतकी, किंवा त्याच्या दीडपट असते. वरच्या (अग्र) शिखेची जाडी कवाडाच्या जाडीइतकी, तिच्या दीडपट किंवा दुप्पट अथवा जसे सुंदर दिसेल व मजबूत होईल तसे असावे. मूलशिखेची लांबी उंबरठ्याच्या उंचीच्या निम्मे असावी.[२९]

मूलशिखा व अग्रशिखा ज्या खोबणीत बसवतात त्यांना अनुक्रमे भुवंग व पतंग म्हणतात. दाराच्या खांबाच्या उंचीचे ७, ८, ९ किंवा १० भाग करून त्यांपैकी अर्धा भाग उंचीचे भुवंग व पतंग करावेत.[३०]

शिल्परत्न, अध्याय २२; मयमत, अध्याय ३० वगैरे ग्रंथांतही कवाडांबद्दल हीच माहिती दिली आहे.

### दारांचे गुणदोष

दार योग्य त्या जागी, आयताकार म्हणजे चारी कोन काटकोन असलेले, दिसावयास सुंदर व योग्य त्या पदार्थांनी केलेले असावे. दार सरळ, फार उंच नाही, फार ठेंगणेही नाही, फार अरुंद तसेच वाकडे नाही, भिंतीच्या बाहेर आलेले नाही असे असावे. खाली व वरती जास्त रुंदी व मध्यभागी कमी रुंदी किंवा वरच्या भागाची खालच्या भागापेक्षा रुंदी जास्त किंवा खालच्या भागाची रुंदी वरच्या भागापेक्षा जास्त असे दार असू नये. दारे नेहमी आतल्या बाजूनेच उघडावी.[३१]

दार घराच्या कोपऱ्यापाशी असू नये, घराचे पुढचे व मागचे दार एका सरळ रेषेत असू नये.[३१] दार आपोआप उघडू किंवा बंद होऊ नये.[३२-३६]

दारासाठी नेहमी पुल्लिंगी झाडाचे लाकूड वापरावे. संपूर्ण दार जर लाकडाचे असेल तर खांब, कवाडे, उंबरठा व उत्तरंग ही सर्व एकाच प्रकारच्या झाडाच्या लाकडाचे करावेत. असे लाकूड मिळत नसल्यास, खांब दगडाचे करावेत व दाराचे इतर भाग लाकडाचे करावेत.[३७]

खाली सारणीत चालुक्य कालीन देवालयांमधील[३८] दारांची मापे उदाहरणार्थ दिली आहेत. याविषयावरील अधिक माहितीसाठी कुलकर्णी (१९७५) पहा.

---

२७. वास्तुविद्या १४·१–९½
२८. वास्तुविद्या १४·२२–२३.
२९. वास्तुविद्या १४·१०–११½, १४·२०½
३०. विमानार्चनकल्प, द्वारलक्षण
३१. बृहत्संहिता ५३·७९-८०
३२. विश्वकर्माप्रकाश ७·९४७
३३. मत्स्यपुराण २५५·७५
३४. विश्वकर्माप्रकाश ७·९४८
३५. बृहत्संहिता ५३·७९
३६. राजवल्लभ ५·२६
३७. विमानार्चनकल्प, द्वारलक्षण
३८. हेन्री कसेन्स (१९२६)

## चालुक्यकालीन वास्तुकला – हेन्री कसेन्स (१९२६)

| चित्र क्रमांक | देवळाचे नाव | दाराची जागा | शाखांची संख्या | मोकळ्या दाराचे माप उंची | मोकळ्या दाराचे माप रुंदी | मोकळ्या दाराचे माप जाडी | दाराचे बाहेरून माप उंची | दाराचे बाहेरून माप रुंदी | भिंतीची जाडी | उत्तरंगावरील मूर्ती |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| XVI | ऐहोल, देवालय क्र. ९ | गर्भागार | शाखा नाहीत | ५′ | २′–३/८″ | १′–५/१६″ | ८′–५/१६″ | ६′ | | गरुड |
| XXIV | ऐहोल, देवालय क्र. ११ | – | – | ५·०५′ | २·३६′ | ०·९२′ | ७·०८′ | ५·५२′ | | पूर्णकलश |
| LIV | पट्टडकल | जैन देवालयाचा मंडप | ७ | ७′ | ३·६२५′ | १·६२५′ | ९′ | ८½′ | २½′ | – |
| LIV | पट्टडकल | जैन देवालयाचे गर्भागार | ७ | ७′ | ३·६२५′ | ¾′ | ९′ | ८½′ | | मकरतोरण |
| LXIV | लक्कुण्डि | जैन देवालयाचे गर्भागार | ५ | ६′ | ३′ | १०″ | ८′ | ८′ | १½′ | जिन |
| LXX | लक्कुण्डि, काशीविश्वेश्वर | गर्भागार | ५ | ५′–७″ | २′–९″ | – | ७′–७″ | ६′–९″ | | गजलक्ष्मी |
| XCII | बांकापूर, अर्वत्तुकुंभड | देवालयाचे | ५ | ७′–६″ | ३′–९″ | – | ९′–६″ | ९′–९″ | | गजलक्ष्मी |
| CVI | इट्टगी, महादेवाचे देवालय | उत्तरेकडील दरवाजा | ७ | ६′–९″ | ३′–४″ | ७″ | ८′–३″ | ९′–२″ | २′–२″ | गजलक्ष्मी |
| CXV | बालगाम्वे, त्रिपुरान्तक | – | – | ६′ | ३′–१″ | १०″ | ७′–३″ | ४′–१″ | १′–३″ | महिषासुरमर्दिनी |
| CXLVIII | भटकळ, नारायणेश्वर | – | – | ५′ | २½′ | – | ६′ | ४′ | – | – |

## १३. प्रासादाची भिंत

भिंतीला पर्यायी शब्द आहेत कुड्य, जंघा, बाड, मंडोवर वगैरे. कुड्य व भित्ती हे शब्द दक्षिण भारतीय शिल्पग्रंथांत मिळतात.[१-३] मंडोवर हा शब्द राजस्थानी शिल्पग्रंथांत[४,५] तसेच अपराजितपृच्छात[६] मिळतो. ओरिसाकडील शिल्पपद्धतीत जंघा व बाड हे शब्द भिंतीसाठी वापरतात.[७]

भिंती दगडांच्या, विटांच्या, मातीच्या व लाकडाच्या फळयांच्या बनवितात.[८-१०] मातीत कषाय वगैरे घालून व तिचे खूप मर्दन करून मातीची भिंत बांधतात.[११] लाकडाच्या निरनिराळ्या तऱ्हेच्या जाळ्या वापरून जी भिंत करतात तिला जालकामय[१२] भिंत म्हणतात. लाकडाच्या फळयांनी व खांब यांनी जी भिंत बांधतात तिला फालक[१३] म्हणतात. फालकेच्या बाबतीत खांबातील अंतराच्या तीन चतुर्थांश भाग लाकडी फळयांनी बनविलेला असतो किंवा शिबिकेप्रमाणे सर्व भिंत लाकडी फळयांची करतात.[१३] तेव्हा फळयांनी बनविलेली भिंत म्हणजे हल्लीची लाकडी पडदी.

भिंतीकरिता वापरण्यात येणाऱ्या द्रव्याप्रमाणे घरांना निरनिराळी नावे दिली आहेत. दगडाचे घर ते **मन्दिर**, भाजलेल्या विटांचे घर ते **भवन** व कच्च्या विटांच्या घराला **सुमन्त** म्हणतात. मातीने बांधलेल्या घराला **सुधार** म्हणतात. लाकडाच्या घराला **वर्धित** व बांबूच्या घराला **नन्दन** म्हणतात. कापडाने बांधलेल्या घराला **विजय** व गवताने तयार केलेल्या घराला **कालिम** म्हणतात. सोन्याच्या घराला **पुष्कर**, चांदीच्या **श्रीभव**, तांब्याच्या **सुब्रमन्त** व लोखंडाच्या घराला **चण्ड** म्हणतात. यांपैकी पहिली चार घरे गृहस्थाला राहण्यास योग्य व शेवटची चार घरे ही देव, दानव, गन्धर्व, यक्ष, राक्षस आणि किन्नरांसाठी असतात.[१४]

भिंतीची मर्यादा सांगितली आहे की अधिष्ठानाच्या प्रतिपासून उत्तरापर्यंत भिंत असते. भिंतीच्या खालच्या बाजूस वेदिका असून ती पंजर वगैरेंनी भूषवावी.[१५]

### भिंतीची जाडी

भींतीची जाडी ती जे द्रव्य वापरून करतात त्यावरून ठरते. तसेच घराच्या प्रकारावरून प्रासाद, गृहस्थाचे घर इत्यादींवरूनही ठरते. दगडी व विटांच्या भिंतींची जाडी बहुधा सारखी असते.[१६] मातीच्या भिंतीच्या जाडीबद्दल माहिती आढळत नाही. मातीचे घर अल्पमोली व बैठे असल्याने तेथे भिंतीची जाडी अनुमानाने ठरवीत असतील. प्रासादास वापरावयाची भिंत विशेष जाड असते. या उलट गृहस्थाला वापरावयाच्या घराच्या भिंतींची जाडी बरीच कमी असते. प्रासाद हा अनेक मज-

---

१. शिल्परत्न २१·१
२. वास्तुविद्या १५·१
३. मयमत १६·६३-६५
४. प्रासादमण्डन ३·२४
५. दीपार्णव ५·१
६. अपराजितपृच्छा, सूत्र १२८
७. शिल्पप्रकाश १·२३५, १·२४६
८. वास्तुविद्या १५·१
९. शिल्परत्न २१·१०
१०. तंत्रसमुच्चय २·३६ च्या टीकेतील श्लोक–
शिलामयं चैष्टकंच जालकामयमित्यपि ।
फलकामयमित्यन्यत् मृण्मयं चापरं क्रमात् ॥
११. शिल्परत्न २१·१४
१२. शिल्परत्न २१·१२
१३. मयमत १६·६६
१४. वास्तुविद्या सव्याख्या १५·१-२ ची टीका
१५. शिल्परत्न २१·१६
१६. शिल्परत्न २१·११

त्यांचा व देवालयासाठी बांधत असल्याने भिंतींवर येणारे वजन बरेच असते. प्रासाद दीर्घकाळ टिकावा म्हणूनही त्याच्या भिंती अधिक जाड ठेवीत असतील. भिंतीची जाडी, खांबाच्या रुंदीवरून, गर्भगृहाच्या रुंदीवरून वगैरे ठरविली जाते. खाली सारणीत निरनिराळ्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांवरून प्रासादाची रुंदी व भिंतीची जाडी यांचे प्रमाण दिले आहे. त्यानंतरच्या सारणीत पल्लव तसेच चालुक्यकालीन प्रासादांच्या भिंतींच्या जाडीची माहिती हेच प्रमाण (ratio) देऊन सांगितले आहे.

| संदर्भ | भिंतीची जाडी / प्रासादाची रुंदी | |
|---|---|---|
| तंत्रसमुच्चय ( २·१८ ) | $\frac{१}{६}$, $\frac{१}{५}$, $\frac{३}{१४}$, $\frac{२}{९}$, $\frac{५}{२२}$, $\frac{३}{१३}$, $\frac{७}{३०}$, $\frac{३}{१६}$, $\frac{१}{४}$ (०·१६७, ०·२०, ०·२१४, ०·२२, ०·२२७, ०·२३, ०·२२३, ०·१८७, ०·२५) | |
| शिल्परत्न २१·३<br>तंत्रसमुच्चय २·१९ | $\frac{१}{४}$ (०·२५) | |
| शिल्परत्न २१·४<br>तंत्रसमुच्चय २·२० | $\frac{१}{५}$ (०·२०) | |
| शिल्परत्न २१·५<br>विश्वकर्माप्रकाश ६·७८९ | $\frac{१}{३}$ (०·३३)<br>$\frac{३}{१४}$ (०·२१४) | काश्यपमत |

| | पल्लव वास्तुशिल्प[17] ( कांचीपुरम् ) | | |
|---|---|---|---|
| देवालयाचे नांव | बाहेरील मापे फूट | आतील मापे फूट | भिंतीची जाडी / प्रासादाची रुंदी |
| कैलासनाथ | २१ × २१ | ९ × ९ | ०·२८५ |
| वैकुंठपेरुमल | २० × २० | ७ × ७ | ०·३२५ |
| मतंगेश्वर | २५$\frac{१}{२}$ × २५$\frac{१}{२}$ | ९ × ९ | ०.३२२ |
| मुक्तेश्वर | २१$\frac{३}{४}$ × २१$\frac{३}{४}$ | ७ × ७ | ०·३३७ |
| त्रिपुरांतकेश्वर | १५$\frac{१}{४}$ × १५$\frac{१}{४}$ | ७ × ७ | ०·२७ |
| ऐरावतेश्वर | १४$\frac{३}{४}$ × १४$\frac{३}{४}$ | ६$\frac{३}{४}$ × ६$\frac{३}{४}$ | ०·२७ |

१७. कसेन्स, हेन्री. (१९०९)

चालुक्य वास्तुशिल्प[१८]

| गांव | देवालयाचे नांव | बाहेरील मापे फूट | आतील मापे फूट | भिंतीची जाडी / प्रासादाची रुंदी |
|---|---|---|---|---|
| बदामी | मालेगिट्टी शिवालय | १४½ | ८ | ०·२२ |
| बदामी | भूतनाथ | १२½ | ८ | ०·१८ |
| पट्टडकल | संगमेश्वर | २३ | ११ | ०·२६ |
| ,, | मल्लिकार्जुन | २२ | १२ | ०·२२७ |
| ,, | पापनाथ | १५ | १२ | ०·१ |
| ,, | जैन | १४ | ९ | ०·१८ |
| कुक्नूर | महामाया | २४ | १८ | ०·१२५ |
| ,, | कल्लेश्वर | १९ | ११ | ०·२१ |
| लक्कुंडि | मोठे जैन | १७½ | ९½ | ०·२२८ |
| ,, | नन्नेश्वर | १२ | ६ | ०·२५ |
| ,, | काशीविश्वेश्वर | १४ | ७ | ०·२५ |
| निरागी | सिद्धरामेश्वर | १७ | ११ | ०·१४७ |
| हवेरी | सिद्धेश्वर | १५ | ८½ | ०·२१६ |
| हरलहल्ली | सोमेश्वर | १३½ | ८ | ०·२० |
| | गल्गेश्वर | २४ | १४ | ०·२० |

वर प्रासादाच्या भिंतींची जाडी दिली आहे. मनुष्याच्या रहावयाच्या घराच्या भिंतीबाबत माहिती अशी– दगडाच्या भिंतीची जाडी घराच्या रुंदीच्या १/१६. विटेची भिंत असल्यास तिची जाडी घराच्या रुंदीच्या १/१६, १/२०, १/२४, १/२८ किंवा १/३२ अशी पाच प्रकारची असू शकते. शालेच्या बाबतीत मात्र भिंतीची जाडी शालेच्या रुंदीच्या १/४ असावी.[१९]

### भिंतीवरील कोरीव काम

भिंतीवरील कोरीव कामाच्या बऱ्याच पद्धती आहेत व त्या निरनिराळ्या प्रदेशांच्या शैलीनुसार वेगवेगळ्या आहेत. त्यातील फक्त द्राविड प्रासादांच्या भिंतीवरील कोरीव कामाची माहिती पाहू. ती मी द्राविड पद्धतीच्या प्रासादाचे वर्णन ज्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत मिळते त्यांचा आधार देवून अलग अलग देतो.

तंत्रसमुच्चय (२·३६) मध्ये दिले आहे की, स्तंभाच्या खालच्या भागात भिंत वेदीने भूषवावी. त्यावरील भागांत ती पंजर वगैरेनी अलंकारावी. प्रतीच्या उंचीइतकी, खांबाच्या उंचीच्या १/८, १/७ किंवा १/६ भागाने, किंवा स्तंभाच्या रुंदीच्या दीडपट, दुप्पट किंवा तिप्पट वेदिकेची उंची असते. वेदिकेच्या उंचीचे दोन भाग करुन तीन मेखला व एक अतरी असावी. किंवा वेदिकेच्या उंचीचे ८, ७, किंवा ६ भाग करुन एक अंश कंप, दोन अंश अब्ज व पुन्हा एक अंश कंप असतो; उरलेला भाग खालच्या बाजूस गल असतो.

१८. हेन्री कसेन्स (१९२६) १९. सम. सूत्रधार २४·२१–२४

काश्यपशिल्पांतील माहिती (अध्याय १०) पुस्तकात आलीच आहे तेव्हा ती माहिती तेथेच पहावी.

शिल्परत्न (२१·१८–२४, २१·३४–३८) भूषणांप्रमाणे वेदिकेचे चार प्रकार होतात. १) पुष्पखण्डा २) चित्रखण्डा ३) शैवला व ४) चित्रशैवला. कंप व निद्राकंप(?) असलेली व फुले कोरून जी सुशोभित केलेली आहे व जिच्या मुळापाशी पादुका असते त्या वेदिकेला पुष्पखण्डा म्हणतात.

वरीलप्रमाणेच वेदी असते. तिच्या निद्राकंपाच्या पट्टावरती कमळे चित्रित केलेली असली व प्रत्येक पाव भागावर चित्र कोरलेले असले तर तिला चित्रखण्डा वेदी म्हणतात.

स्तंभ, कंप व पट्ट असून पट्टावरती शैवल चित्रीत केलेले असते, पट्टाच्या वर व खाली प्रत्येक पाव भागावर कमलपत्रे काढलेली असतात, पुरुष व स्त्रिया रेखलेल्या असतात तिला शैवला वेदी म्हणतात.

पुरुष व स्त्रिया यांची युगुले हातात कमळ किंवा छडी (वेत्र) धरलेली व चित्रविचित्र वेश धारण केलेली अशी चित्रे ज्या वेदीवर कोरतात तिला चित्रशैवला म्हणतात. या वेदीच्या खाली दीड किंवा दोन भाग पद्म असते.

ही माहिती मयमतातही (१६·५१–५३) मिळते.

## १४. नागर, द्राविड व वेसर प्रासाद

प्रासादांचे तीन प्रमुख प्रकार सांगतात, नागर, द्राविड व वेसर प्रकाराचे प्रासाद. काश्यपशिल्पात या विषयावर एक सपूर्ण पटल (२५वे) वाहिलेले आहे. स्टेला क्रॅमरिश[1] यांनी नागर, द्राविड व वेसर या शब्दांचे कोशांप्रमाण निरनिराळे अर्थ दिले आहेत, पण प्रासादांचे हे वर्गीकरण कोणत्या पायाभूत तत्त्वांवर केलेले आहे याचा निर्णय दिलेला नाही. त्या लिहितात की, वराहमिहिराच्या बृहत्संहितेत फक्त नागर प्रासादांचे वीस प्रकार दिले आहेत व यावरून त्याकाळी प्रासादांचे नागर द्राविडादी वर्गीकरण नव्हते व ते त्यानंतरच्या शिल्पशास्त्रग्रंथांत मिळते. परंतु केवळ बृहत्संहितेत, जी शिल्पावरील संहिता नाही, प्रासादांच्या वर्गीकरणांचा उल्लेख नाही यावरून त्याअगोदर असे वर्गीकरण करतच नसत असे म्हणणे धाष्टर्याचे ठरेल. नागर प्रासाद उत्तर हिंदुस्थानात हिमालय ते विंध्य पर्वतापर्यंतच्या प्रदेशांत व द्राविड प्रासाद दक्षिण हिंदुस्थानात, अगस्त्य (नाशिक) किंवा कृष्णा ते कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशात असतात. तसेच वेसर याचा अर्थ आहे खेचर म्हणजे मिश्रसंतती. तेव्हा उत्तरेकडील प्रासादांची शैली व दक्षिणेकडील प्रासादांची शैली यांचे मिश्रण असलेल्या शैलीचे प्रासाद हे या दोन्ही प्रदेशांच्या मध्यभागी असलेल्या प्रदेशात, विंध्याद्री ते कृष्णा नदीपर्यंत असतात, असे हे वर्गीकरण असावे असे त्यांना वाटते. मात्र त्यांनी हेही दाखवून दिले आहे की, तिन्ही प्रकारचे प्रासाद हिंदुस्थानात सर्वत्र आढळतात. तेव्हा प्रासादांचे प्रदेशांवरून केलेले वर्गीकरण योग्य नाही.

ग्रॅव्हली व रामचंद्रन[2] यांच्या मते मुळापासून शिखरापर्यंत जे चौकोनी ते नागर प्रासाद. तेव्हा गोल आमलसार असलेले शिखर हे नागर पद्धतीच्या प्रासादाचे लक्षण नव्हे तर वेसर प्रकारच्या प्रासादाचे लक्षण आहे. कारण वेसर प्रासाद खालच्या बाजूला चौकोनी असला तरी त्याचे शीर्ष गोल असते. तेव्हा सध्या ज्याला नागर प्रासाद म्हणतात तो वस्तुतः वेसरप्रासाद आहे.

---

१. हिन्दु टेम्पल, भाग १ २. संदर्भसूची पहा.

खालच्या बाजूला चौकोनी पण शीर्ष षट्कोनी किंवा अष्टकोनी असलेला प्रासाद हा द्राविड प्रासाद असतो व तो द्राविड प्रदेशांत असतो. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे पल्लव शैलीचे प्रासाद हे द्राविड पद्धतीचे आहेत.

विंध्याद्री ते कृष्णा नदीचा प्रदेश हा द्राविड प्रदेशाच्या उत्तरेकडील भाग आहे. नागर शैलीचा प्रासाद या प्रदेशांत असतो. चालुक्य शैलीचे प्रासाद जे पल्लव राजांच्या प्रदेशांच्या उत्तरेकडील प्रदेशात आहेत ते नागर प्रासाद होत.

शीर्षावरील आमलसारांचा आकार गोल आहे म्हणून ज्यांना सध्या नागरद्धतीचे प्रासाद म्हणतात, ते खरोखर वेसरपद्धतीचे आहेत हे म्हणणे योग्य वाटत नाही. अपराजितपृच्छात[3] नागर-प्रासादाचे एक व्यवच्छेदक लक्षण म्हणून आमलसाराचा उल्लेख आहे.

आता इतर आणखी निरनिराळ्या पंडितांचे या बाबतीत काय म्हणणे आहे ते न पाहता निरनिराळ्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत प्रासादांचे वर्गीकरण कसे केले आहे ते पाहू. वर या विषयावरील अधिकारी विद्वानांची मते दिली आहेत त्यावरूनही खुद्द शिल्पशास्त्रग्रंथकर्ते काय म्हणतात हे पाहिलेले अधिक उत्तम.

मार्कंडेय संहितेत[4] प्रासादांचे पाच प्रकार दिले आहेत. १) नागर, २) द्राविड, ३) वृत्त, ४) वृत्तायत व ५) वेसर. त्यांचे थोडक्यात वर्णन दिले आहे. नागरप्रासाद नासिकेच्या आकाराचा असतो. त्याला कूट व शाला असतात. नासिकेचा आकार म्हणजे दोन बाजू परस्परांना समान्तर, एक बाजू त्या समान्तर बाजूंना लंबरूप व उरलेली बाजू अर्धवर्तुळाकार. थोडक्यात 'द्व्यश्र' आकार. पुढे असेही वर्णन दिले आहे की (प्रासाद) पुढच्या बाजूला गोल (वृत्तायत) असून मागे चतुरश्र असतो. मात्र हा श्लोक कूट व शाला यांच्या उल्लेखानंतर आलेला असल्याने त्याचा अर्थ पहिल्या मजल्यावरील कूट व शाला चौरस असून वरच्या मजल्याच्या कूट व शाला वृत्तायत आकाराच्या असतात असाही करता येईल. अशा प्रासादाला नागर म्हणतात.

खांबापासून स्तूपिपर्यंत सर्वांचे आकार चौरस किंवा षट्कोनी असले म्हणजे तो द्राविड-प्रासाद होतो.

खांबापासून शिखरापर्यंत गोल (वृत्त) व वृत्तायत आकार असल्यास त्या त्या प्रकारचे ते प्रासाद होतात.

वेसरप्रासादाला कूट व शाला असतातच; परंतु सर्व दिशांना नासिका असतात. खांबापासून शिखरापर्यंत सर्व अष्टकोनी किंवा बाराकोनी असतात. वेसर प्रकारात कूट व शाला यांच्याशिवाय असलेल्या प्रासादाला निगम म्हणतात.

तंत्रसमुच्चयकारांच्या मताने[5] नागर प्रासाद मुळापासून शिखरापर्यंत चौकोनी असतो. खाली चौकोनी व ग्रीवेपासून शिखरापर्यंत षटकोनी आकार असेल तर ती प्रासादांची द्राविड पद्धती. मुळापासून किंवा गळापासून वरचा भाग वर्तुळाकृती असेल तर तो वेसर प्रकारचा प्रासाद होय. तंत्रसमुच्चयकारांच्या शिष्याने या पुस्तकावर विवरण म्हणून टीका लिहिली आहे. त्यात हिमालय ते

---

३. अपराजितपृच्छा १०६

४. मार्कंडेय संहिता ४·१–५

५. तंत्रसमुच्चय २·७१

विंध्यपर्वत या प्रदेशांत नागर प्रासाद, विंध्याद्री ते अगस्त्यपर्यंतच्या प्रदेशांत वेसर प्रासाद व तेथून कन्याकुमारीपर्यंत असलेल्या द्राविड प्रदेशांत द्राविड पद्धतीचे प्रासाद बांधतात अशी जास्तीची माहिती दिली आहे.

ईशानशिवगुरुदेवपद्धतीप्रमाणे[६] चौरस किंवा आयताकार प्रासाद नागरपद्धतीचा असतो. द्राविड प्रासादाचे दोन निरनिराळ्या लक्षणांनी दोन प्रकार सांगितले आहेत. सम(भुज) षटकोनी किंवा सम अष्टकोनी किंवा विषम(भुज) षटकोनी अथवा अष्टकोनी प्रासाद हा द्राविड पद्धतीचा असतो. दुसरा प्रकार म्हणजे गळाच्या खाली चौकोनी व गळाच्या वर सम अथवा विषम षटकोनी किंवा अष्टकोनी असलेला प्रासाद. वेसर प्रासादांचेही दोन प्रकार दिले आहेत. वृत्त, वृत्तायत किंवा द्व्यश्र आकाराचा प्रासाद वेसर प्रकारचा असतो. दुसऱ्या प्रकाराने कण्ठाच्या खाली चौकोनी व वरती वर्तुळाकार हा देखील वेसरप्रासाद असतो.

हिमालय ते विंध्य हा नागर प्रासादांचा प्रदेश, विंध्य ते अगस्त्य हा वेसर प्रासादांचा व अगस्त्य ते कन्याकुमारी हा द्राविड प्रासादांचा प्रदेश आहे. मात्र पुढे असेही म्हटले आहे की, सर्व प्रकारचे प्रासाद सगळीकडे आहेत असेही काही म्हणतात.

अपराजितपृच्छाच्या सूत्र १०४ व १०५ यांत नागर व द्राविड प्रासादांचा उल्लेख आहे; पण वेसर प्रासादांचा नाही. येथे प्रासादांचे प्रकार दिले आहेत ते असे– १) नागर, २) द्राविड, ३) लतिन, ४) वराट, ५) विमान, ६) सान्धार, ७) मिश्रक, ८) भूमिज, ९) वलभि, १०) फांसनाकार, ११) सिंहावलोकन, १२) दारुज व १३) विमानपुष्पक. यांतले पहिले आठ प्रकार शुद्ध छन्द प्रकारचे आहेत असे उल्लेखिलेले आहे. या आठ प्रकारांचे जे पुन्हा उपप्रकार दिले आहेत ते आकारावरून केले आहेत. त्यांपैकी फक्त नागर व लतिन प्रकारच्या प्रासादांचे उपप्रकार तक्त्यांत दिले आहेत. या तक्त्यावरून दिसेल की, अपराजितपृच्छेप्रमाणे नागर पद्धतीचा प्रासाद वर्तुळाकार, वृत्तायत व अष्टाश्र असू शकतो. हे मत तंत्रसमुच्चय तसेच ईशानशिवगुरुदेवपद्धती या पुस्तकांत दिल्यापेक्षा निराळे आहे. द्राविड प्रासादांचे उपप्रकार दिले आहेत ते म्हणजे १) स्वस्तिक, २) सर्वतोभद्र, ३) वर्धमान, ४) सूत्रपद्म व ५) महापद्म. तेव्हा द्राविड प्रासाद आकाराने चौरस तसेच अष्टाश्र असू शकतात.

| प्रासादाचा आकार | नागर | लतिन |
|---|---|---|
| चौरस | वैराज्य | रुचकादि |
| आयत | पुष्पक | भवादि |
| वृत्त | कैलास | पद्मादि |
| वृत्तायत | मणिपुष्पक | मलयादि |
| अष्टाश्र | त्रिविष्टप | वज्रकादि |

सूत्र १०६ मध्ये नागर व द्राविड प्रासादांमध्ये काय फरक असतो ते दिले आहे. नागर प्रासादांत अनेक शृंग, उरुशृंग, प्रत्यंग, तवंग इत्यादी भूषणे असतात. ही शृंगे अनेक आकारांची असतात असेही सांगितले आहे. रेखा गर्भगृहाच्या वरपासून सुरू होतात. शुकनासी असतात, अमलसार असतो.

द्राविड प्रासादाच्या बाबतीत रेखा अधिष्ठानाच्या वरपासून सुरू होतात. मेष, मकर, कूट, कण्टक इत्यादींनी हा प्रासाद भूषविलेला असतो. यालाही वेदी, नासिका, घण्टा असतात. स्पष्ट म्हटलेले नसले तरी समजू शकते की, याला अमलसार नसतो.

---

६. ई. शि. गु. देवपद्धति (३०·४२–४८)

वरील माहितीवरून असे म्हणता येईल की, अपराजितपृच्छाप्रमाणे आकारामुळे नागर, द्राविड असे प्रासादांचे प्रकार पडत नाहीत. तसेच कोणत्या प्रदेशात कोणत्या प्रकारचे प्रासाद बांधतात याची माहिती सूत्र ११२ त दिली आहे. तेथे प्रासादांचे आठही प्रकार कोणकोणत्या प्रदेशांत असतात ते दिले आहे. त्यावरूनही असे समजते कीं प्रासादांचे सर्व प्रकार, काही अपवाद वगळता, सर्व प्रदेशांत असतात.

आता खुद्द काश्यपशिल्पांत[७] काय माहिती दिली आहे ते पाहू. येथे प्रासादांचे नागर, द्राविड व वेसर यांचे वर्गीकरण कुठल्या पायाभूत तत्त्वांवर केले आहे ते दिले आहे. काश्यपमुनींच्या मताने प्रासादांचे वर्गीकरण कसे केले जाते याचा बोध खाली दिलेल्या तक्त्यावरून होईल.

शिल्परत्नांत[८] दिलेली माहिती काश्यपशिल्पात दिल्याप्रमाणेच आहे. वेसर व द्राविड यांच्या प्रदेशात काश्यपशिल्पात जशी उलटापालट केली आहे, तशीच उलटापालट शिल्परत्नातही झालेली आहे.

थोडक्यात असे म्हणता येईल की, राजस्थानी किंवा ओरिसा शैलीची देवालये त्यांच्या शिखरावर आमलसार असतो म्हणून वेसर पद्धतीची किंवा ती देवालये अधिष्ठानापासून शिखरापर्यंत चौकोनी असतात म्हणून नागर पद्धतीची अशी आकारावरून प्रासादांची वर्गवारी करणे बरोबर नाही. अपराजितपृच्छाप्रमाणे नागरप्रासादातही वर्तुळाकार, वृत्तायत इत्यादी आकारांचे उपप्रकार आहेत. कूट, कोष्ठ असलेला प्रासाद द्राविड असेही नव्हे. कूट, कोष्ठ यांचे निर्गमन मानसूत्राच्या बाहेर

| वर्गीकरणाचा विषय | नागर | द्राविड | वेसर |
|---|---|---|---|
| १) गुण | सात्विक | राजस | तामस |
| २) देश | हिमालय ते विंध्याद्री | विंध्याद्रि ते कृष्णा, वेण्णा नद्या | कृष्णा, वेण्णा नद्या ते कन्याकुमारी |
| ३) लिंग | पुं | स्त्री | नपुंसक |
| ४) देव | विष्णु | ब्रह्मा | महेश्वर |
| ५) जाति | ब्राह्मण | नृप | वैश्य |
| ६) भूषण | काही नाही | भोग, वीर, नृत्य | वाहने, सैन्य |
| ७) कूटकोष्ठांचे निर्गमन | मानसूत्राच्या बाहेर नाही | मानसूत्राच्या बाहेर | समसूत्रांत (?) |
| ८) कूट | वर | खाली | वर |
| कोष्ठ | खाली | वर | खाली |
| ९) कूटाचा आकार | चौकोनी | चौकोनी, अष्टकोनी, गोल, निरनिराळ्या मजल्यांना | गोल |
| १०) अधिष्ठान, खांब, कंठ, शीर्ष | एक आकाराचे चौकोनी | निरनिराळ्या आकाराचे, चौकोनी, अष्टकोनी, गोल | वर्तुळाकार, गर्भगृह आतून, बाहेरून किंवा केवळ बाहेरून गोल, वृत्तायत अथवा द्वयश्र |

७. काश्यपशिल्प, अध्याय २५.

८. शिल्परत्न, १६.४०–८०.

नसले की झाला तो नागर प्रासाद. तेव्हा असे वाटते की, निरनिराळ्या शिल्पशास्त्रींच्या मते नागर, द्राविड व वेसर हे प्रासादांचे वर्गीकरण निरनिराळ्या तत्त्वांनुसार केले गेलेले आहे, त्यांच्यात देखील या संबंधी एकवाक्यता नाही.

प्रस्तुत लेखकाच्या मताने प्रासादाकडे पाहिले असता ज्याच्यात उभ्या रेषा प्रामुख्याने दिसतात तो नागर प्रासाद. राजस्थानी, ओरिसा शैलीची देवालये या पद्धतीचे उत्तम उदाहरण आहे. जेथे आडव्या रेषांचे प्राबल्य आहे, मग प्रासाद कितीही उंच असू दे, तो प्रासाद द्राविड पद्धतीचा. गोपुरे देखील कितीही उंच असली तरी त्याच्या आडव्या रेषा मनात भरतात तेव्हा गोपुरे हा प्रकार द्राविड शैलीचा. या दोन्ही शैलींचा जेथे मिलाफ झाला आहे, जेथे उभ्या व आडव्या रेषा यांना समप्रमाणात किंवा एकीला दुसरीपेक्षा कमी अथवा अधिक प्राधान्य दिलेले असते परंतु दोन्हींचे अस्तित्व जाणवते असा प्रासाद म्हणजे वेसर प्रासाद. तेव्हा पल्लव व चालुक्य शैलीचे प्रासाद हे द्राविड प्रासाद आहेत. सिन्नरचे गोंडेश्वर व त्याप्रकारचे शिखर असलेली दख्खनमधील[१] देवालये ही वेसर प्रकारची म्हणावयाची. शिंगणापूर येथील शंभूमहादेवाचे देऊळ हा देखील वेसर पद्धतीचा प्रासाद (?) म्हणावयाचा व ते त्याचे उत्कृष्ट उदाहरण आहे.

## १५. द्राविड विमानाची मापे

काश्यपशिल्पात अनेकमजली विमानांचे वर्णन आहे. एक मजली ते १२ मजली विमानापर्यंत तसेच तेरा व सोळा मजली विमानांच्या मापांची माहिती दिली आहे. अधिष्ठान, खांब, मंच, वेदिका, शिखर वगैरे प्रत्येक अवयवाची मापे दिली आहेत.

विमानांचे चार मुख्य प्रकार आहेत : आभास, विकल्प, छन्द व जाति. यांतील आभास प्रकारचे विमान अल्पप्रासादात मोडते. ते चार मजल्यांहून अधिक मजल्यांचे नसते. या उलट विकल्प ते जाती या प्रकारची विमाने चार मजल्यांपासून बारा मजल्यांपर्यंत उंच असतात. आभास प्रकारच्या विमानाचे पुन्हा पाच उपप्रकार आहेत. ते म्हणजे शान्तिक, पौष्टिक, जयंत, अद्भुत व सार्वकामिक. सारणी 'अ' मध्ये आभास ते जाती विमानांची मजल्यांनुसार कमीत कमी, मध्यम व जास्तीत जास्त रुंदी काय असावी ते दिले आहे. आभास प्रकारच्या विमानांची उंची पाच उपप्रकारांनुसार वेगळी आहे ती अशी :

| आभास प्रासादाचा प्रकार | प्रासादाची उंची / रुंदी |
|---|---|
| शान्तिक | १३/७ |
| पौष्टिक | ११/६ |
| जयंत | ९/५ |
| अद्भुत | २ |
| सार्वकामिक | २$\frac{१}{४}$ |

१. Mediaeval Temples of Dekhan by H. Cousens. Archaeological Survey to India, Imperial Series No. XLII.

विकल्प प्रकारच्या प्रासादाची उंची काय असावी ते काश्यपशिल्पात दिलेले नाही अंशुमत-काश्यपात (२२·४५–४८ १/२)[१०] ही माहिती आहे. विकल्प, छन्द व जाती तऱ्हेच्या प्रासादाची उंची त्यांच्या मजल्यांच्या संख्येनुसार दिली आहे ती माहिती सारणी 'आ' मध्ये दिली आहे त्यानुसार प्रासादाची उंची व रुंदी यांचे गुणोत्तर येते ते असे.

| मजल्यांची संख्या | प्रासादाची उंची / रुंदी | |
|---|---|---|
| | छन्द | जाती |
| ६ | ३१/२९ | ४६/५१ |
| ७ | ४०/३५ | ५५/५७ |
| ८ | ४९/४१ | ६४/६३ |
| ९ | ५८/४७ | ७३/६९ |
| १० | ६७/५३ | ८२/७५ |
| ११ | ७६/५९ | ९१/८१ |
| १२ | ८५/६५ | १००/८७ |

निरनिराळ्या शिल्पशास्त्रांच्या ग्रंथांप्रमाणे आभास विमानांच्या उपप्रकारांचे उंची व रुंदी यांचे गुणोत्तर खालील सारणीत दिले आहे.

| आभास प्रासादाचा प्रकार | वैखानसागम पटल ६ | ई; शि. गु. दे. पद्धति ४·३१ | मयमत ११·८–९ | मानसार ३५·२१–२५ |
|---|---|---|---|---|
| शान्तिक | १०/७ | १०/७ | १०/७ | १ |
| पौष्टिक | ३/२ | १२/७ | ९/६ | ५/४ |
| जयंत | ७/४ | १६/७ | ८/५ | ३/२ |
| अद्भुत | २ | २ | २ | २ |
| सार्वकामिक | १५/७ | – | ७/४ | ७/४ |

काश्यपशिल्पाप्रमाणे एक ते बारा मजली प्रासादांच्या प्रत्येक अंगाच्या विभागांची माहिती खाली सारणावलीत देतो. त्यावरून या विषयाची जटिलता कळून येते. तसेच ही माहिती फक्त काश्यपशिलपातून घेतलेली आहे. इतर शिल्पशास्त्रींची मते पुन्हा देऊन त्यांच्या बाबतीत तौलनिक अभ्यास करणे हे त्याहून अवघड आहे. पण हा विषय अभ्यासावयास हवा. त्याच्याही पुढचा अभ्यास म्हणजे दक्षिणेतील जी निरनिराळ्या मजल्यांची देवळे आहेत त्यांची मापे घेऊन ती मापे कोणत्या शिल्पशास्त्राच्या ग्रंथाला अनुसरून आहेत हे पडताळून पाहणे. हे अर्थात खर्चाचे काम आहे पण ते करावयास हवे. जेव्हा हा अभ्यास हाती घेतला जाईल तो सुदिन.

१०. रौरवागम, भाग २, पान १४३.

## सारणी अ

### प्रासादाची रुंदी ( हातांमध्ये )

| मजल्यांची संख्या | आभास | विकल्प | | | छंद | | | जाती | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | कनिष्ठ मध्यम उत्तम<br>दोन हातांनी वाढ | कनिष्ठ | मध्यम | उत्तम<br>दोन हातांनी वाढ | कनिष्ठ | मध्यम | उत्तम<br>दोन हातांनी वाढ | कनिष्ठ | मध्यम | उत्तम<br>दोन हातांनी वाढ |
| १ | ३ ५ ७ ९<br>४ ६ ८ १०<br>आठ प्रकार | | | | | | | | | |
| २ | | | | | | | | | | |
| ३ | ५, ७, ९, ११, १३ व १५<br>६, ८, १०, १२, १४ व १६ | | | | | | | | | |
| ४ | ७, ९, ११, १३, १५ व १७<br>८, १०, १२, १४, १६ व १८ | | | | १३ | १५ | १७ | ३५ | ३७ | ३९ |
| ५ | | ९ | ११ | १३ | १९ | २१ | २३ | ४१ | ४३ | ४५ |
| ६ | | १५ | १७ | १९ | २५ | २७ | २९ | ४७ | ४९ | ५१ |
| ७ | | २१ | २३ | २५ | ३१ | ३३ | ३५ | ५३ | ५५ | ५७ |
| ८ | | २७ | २९ | ३१ | ३७ | ३९ | ४१ | ५९ | ६१ | ६३ |
| ९ | | ३३ | ३५ | ३७ | ४३ | ४५ | ४७ | ६५ | ६७ | ६९ |
| १० | | ३९ | ४१ | ४३ | ४९ | ५१ | ५३ | ७१ | ७३ | ७५ |
| ११ | | ४५ | ४७ | ४९ | ५५ | ५७ | ५९ | ७७ | ७९ | ८१ |
| १२ | | ५१ | ५३ | ५५ | ६१ | ६३ | ६५ | ८३ | ८५ | ८७ |

## सारणी आ

### प्रासादांची उंची ( हातांमध्ये )

| मजल्यांची संख्या | विकल्प कनिष्ठ | विकल्प मध्यम | विकल्प उत्तम | छद कनिष्ठ | छद मध्यम | छद उत्तम | जाती कनिष्ठ | जाती मध्यम | जाती उत्तम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | (३ हातांनी वाढ) | | | (३ हातांनी वाढ) | | | (तीन हातांनी वाढ) | | |
| ४ | | | | ७ | १० | १३ | २२ | २५ | २८ |
| ५ | ७ | १० | १३ | १६ | १९ | २२ | ३१ | ३४ | ३७ |
| ६ | १६ | १९ | २२ | २५ | २८ | ३१ | ४० | ४३ | ४६ |
| ७ | २५ | २८ | ३१ | ३४ | ३७ | ४० | ४९ | ५२ | ५५ |
| ८ | ३४ | ३७ | ४० | ४३ | ४६ | ४९ | ५८ | ६१ | ६४ |
| ९ | ४३ | ४६ | ४९ | ५२ | ५५ | ५८ | ६७ | ७० | ७३ |
| १० | ५२ | ५५ | ५८ | ६१ | ६४ | ६७ | ७६ | ७९ | ८२ |
| ११ | ६१ | ६४ | ६७ | ७० | ७३ | ७६ | ८५ | ८८ | ९१ |
| १२ | ७० | ७३ | ७६ | ७९ | ८२ | ८५ | ९४ | ९७ | १०० |

## प्रासादाच्या अंगांची मापे

### एकमजली प्रासाद

| अंग | शान्तिक | पौष्टिक | जयन्त | अद्भुत | सार्वकामिक |
|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | १ | १ | १ | १½ | १ |
| खांब | २ | २½ | २½ | २½ | २ |
| प्रस्तर | १ | १ | १ | १ | — |
| कण्ठ | १ | १ | १½ | २½ | — |
| शिखर | २ | २½ | ३ | १½ | ३ |
| स्तूपि | १ | १ | १ | २ | १ |
| एकूण | ८ | ९ | १० | ११ | ७ |

### दोन मजली प्रासाद

| अंग | शान्तिक | पौष्टिक | जयन्त | अद्भुत | सार्वकामिक |
|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | ३ | ३½ | ३½ | ४ | ४ |
| स्तंभ | ६ | ७ | ७ | ८ | ८ |
| मंच | ३ | ३ | ३ | ३ | ३ |
| स्तंभ | ५ | ६½ | ६½ | ७ | ७½ |
| मंच | २ | ३ | ३ | ३ | ३ |
| वेदिका | १ | १ | १ | १ | २ |
| गल | २ | ३½ | २½ | ३ | ३ |
| शीर्ष | ४½ | ५ | ५ | ५ | ७ |
| स्तूपि | १½ | १½ | ½ | १½ | २½ |
| एकूण | २८ | ३४ | ३३ | ३६ | ४० |

## तीन मजली प्रासाद

| अंग | शान्तिक | पौष्टिक | जयन्त | अद्भुत | सार्वकामिक |
|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | २ | २ | २ | ३ १/२ | ४ |
| खांब | ४ | ४ | ४ | ७ | ८ |
| मंच | २ | २ | २ | ३ १/२ | ४ |
| खांब | ३ ३/४ | ३ ३/४ | ४ | ६ १/२ | ७ १/२ |
| मंच | २ १/२ | १ १/२ | १ ३/४ | ३ | ३ १/२ |
| खांब | ३ १/२ | २ १/२ | ३ १/२ | ६ | ७ |
| मंच | १ १/४ | १ १/२ | १ १/२ | २ १/२ | ३ |
| वेदिका | १/२ | १ १/२ | १ | १ | १ |
| गल | १ | १ | २ | २ | २ |
| शिखर | २ १/२ | ३ | ४ | ५ | ६ |
| स्तूपि | १ | १ १/४ | १ १/४ | २ | २ |
| बेरीज | २४ | २४ | २७ | ४२ | ४८ |

## चार मजली प्रासाद

| अंग | शान्तिक | पौष्टिक | जयन्त | अद्भुत | सार्वकामिक |
|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | ३ | ३ | ३ १/२ | ३ १/२ | १ १/२ |
| खांब | ६ | ६ | ७ | ७ | ७ |
| मंच | २ १/२ | ३ | ३ १/२ | ३ १/२ | ३ |
| खांब | ४ ३/४ | ५ | ६ | ६ १/२ | ६ १/२ |
| मंच | २ | ३ | ३ | ३ १/४ | ३ १/४ |
| खांब | ४ १/२ | ५ १/३ | ६ | ६ | ६ १/२ |
| मंच | २ | २ २/३ | ३ | ३ | ३ |
| खांब | ४ १/४ | ४ १/२ | ५ १/२ | ५ १/२ | ५ १/२ |
| मंच | १ ३/४ | २ | ३ | २ १/२ | २ ३/४ |
| वेदिका | १ | १ | १ | १ | १ |
| गल | २ | १ १/२ | २ | २ | २ |
| शिखर | ४ १/२ | ३ | ५ | ५ | ५ |
| स्तूपि | २ | २ | १ १/२ | २ १/४ | १ |
| बेरीज | ४० १/४ | ४२ | ५० | ५१ | ४८ |

## पाच मजली प्रासाद

| अंग | शांतिक | पौष्टिक | जयद | अद्भुत | सार्वकामिक |
|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | २ ३/४ | ३ | ३ | ३ | १ १/२ |
| खांब | ५ १/२ | ५ | ४ | ४ | ३ |
| मंच | २ १/२ | ३ | १ ३/४ | २ | १ १/२ |
| खांब | ५ १/४ | ४ १/२ | ३ १/२ | ३ १/२ | २ ३/४ |
| मंच | २ १/२ | २ १/४ | १ ३/४ | १ ३/४ | १ ३/८ |
| खांब | ५ | ४ १/४ | ३ १/४ | ३ | २ १/२ |
| मंच | २ १/४ | २ | १ १/२ | १ १/२ | १ १/४ |
| खांब | ५ १/२ | ४ | ३ १/४ | २ १/२ | २ १/४ |
| मंच | २ | २ | १ १/४ | १ १/४ | १ १/६ |
| खांब | ४ १/२ | ३ १/२ | ३ | २ १/४ | २ १/८ |
| मंच | १ ३/४ | १ १/२ | १ १/४ | १ १/४ | १ |
| वेदिका | १ | १ | १ | १ | १/२ |
| कंठ | २ | २ | १ ३/४ | १ १/२ | ३/४ |
| शीर्ष | ४ १/२ | ४ १/२ | ३ १/४ | ३ १/२ | १ ३/४ |
| स्तूपि | २ | १ १/२ | ३ १/२ | २ | ७/८ |
| बेरीज | ४८ | ४४ | ३६ | ३३ | २४ १/४ |

## सहा व सात मजली प्रासाद

| अंग | सहा | सात |
|---|---|---|
| अधिष्ठान | २ १/२ | ३ १/४ |
| खांब | ६ | ६ १/२ |
| मंच | २ ३/४ | ३ १/४ |
| खांब | ५ १/२ | ६ |
| मंच | २ ३/४ | २ ३/४ |
| खांब | ५ १/४ | ५ १/२ |
| मंच | २ १/२ | २ १/२ |
| खांब | ५ | ५ १/४ |
| मंच | २ १/२ | २ १/२ |
| खांब | ४ ३/४ | ५ |
| मंच | २ | २ १/४ |
| खांब | ३ १/२ | ४ ३/४ |
| मंच | १ ३/४ | २ |
| खांब | | ४ १/२ |
| मंच | | १ ३/४ |
| वेदिका | १ | १ |
| कंठ | १ ३/४ | १ ३/४ |
| शीर्ष | ४ १/२ | ५ १/२ |
| स्तूपि | २ | २ |
| एकूण | ५७ | ६७ |

## मजल्यांची संख्या

| अंग | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १६ |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अधिष्ठान | ३½ | ३¾ | ४ | ४½ | ५ | ५ | ७ |
| खांब | ७ | ७½ | ८ | ८½ | ९ | १० | १३ |
| मंच | ३¼ | ३½ | ३¾ | ४ | ४½ | ५ | ६½ |
| खांब | ६½ | ७ | ७½ | ८ | ८½ | ९ | १२ |
| मंच | २½ | ३¼ | ३½ | ३¾ | ४ | ४½ | ६ |
| खांब | ६ | ६½ | ७ | ७½ | ८ | ८½ | ११ |
| मंच | २½ | ३ | ३¼ | ३½ | ३¾ | ४ | ५½ |
| खांब | ५¼ | ६ | ६¼ | ७ | ७½ | ८ | १० |
| मंच | २½ | २¾ | ३ | ३¼ | ३½ | ३¾ | ५ |
| खांब | ५¼ | ५½ | ६ | ६½ | ७ | ७½ | ९ |
| मंच | २½ | २½ | २¾ | ३ | ३¼ | ३½ | ४½ |
| खांब | ५ | ५¼ | ५½ | ६ | ६½ | ७ | ८½ |
| मंच | २¼ | २½ | २½ | २¾ | ३ | ३¼ | ४ |
| खांब | ४¾ | ५ | ५¼ | ५¾ | ६ | ६½ | ८ |
| मंच | २ | २¼ | २½ | २½ | २¾ | ३ | ४ |
| खांब | ४½ | ४¾ | ५ | ५¼ | ५¾ | ६ | ७½ |
| मंच | ¾ | २ | २¼ | २½ | २½ | २¾ | ३½ |
| खांब | | ४½ | ४¾ | ५ | ५¼ | ५¾ | ७¼ |
| मंच | | १¾ | २ | २¼ | २½ | २½ | ३¼ |
| खांब | | | ४½ | ४¾ | ५ | ५¼ | ६½ |
| मंच | | | १¾ | २ | २¼ | २½ | ३ |
| खांब | | | | ४½ | ४¾ | ५ | ६ |
| मंच | | | | १¾ | २ | २¼ | २¾ |
| खांब | | | | | ४½ | ४¾ | ५½ |
| मंच | | | | | १¾ | २ | २½ |
| खांब | | | | | | ४½ | ५¼ |
| मंच | | | | | | १¾ | २½ |
| खांब | | | | | | १¾ | ५ |
| मंच | | | | | | | २¼ |
| खांब | | | | | | | ४¾ |
| मंच | | | | | | | २ |
| खांब | | | | | | | ४½ |
| मंच | | | | | | | १¾ |
| वेदिका | १ | १ | — | ¾ | ¾ | ¾ | १ |
| गल | २¼ | ½ | १½ | १½ | १½ | १½ | २ |
| शीर्ष | ४½ | ४¼ | ४½ | ४½ | ४½ | ४½ | ४½ |
| स्तूपि | २¼ | १¾ | १¾ | १¾ | १¾ | १¾ | १¼ |
| बेरीज | ७७ | ८७½ | ९९ | १२७ | १४२ | १४२ | १९९ |

## १६. काश्यपशिल्पातील मूर्तिकला

काश्यपशिल्पांत पटल ४६ पासून ८५ पर्यन्त मूर्तिकलेसंबंधी माहिती मिळते. पटल ४६ ते ४८ पर्यन्त मुख्यतः प्रमुख देवतेच्या मंदिराच्या चोहोबाजूस ज्या परिवारदेवता असतात, त्यांच्या मूर्तींची लक्षणे दिलेली आहेत. मुख्य मंदिर मध्यभागी असून त्या त्या परिवारदेवतेचे स्थान कुठल्या दिशेला असावे एवढेच नव्हे तर परिवारदेवतांच्या संख्येनुसार त्यांची स्थापना तीन किंवा पाच प्राकारांमध्ये कोठे कोठे असावी त्याचीही माहिती दिली आहे.

त्यानंतर पटल ४९ व्यात शिवलिंगाविषयी सांगोपांग माहिती दिली आहे. त्यात शिवलिंग जर पाषाणाचे करावयाचे असेल तर त्यासाठी पाषाणाची निवड कशी करावी, त्या पाषाणात कोठले दोष असू नयेत याचीही सविस्तर माहिती दिली आहे.लिंगपीठाविषयी माहिती पटल ५८ मध्ये दिली आहे. शिवलिंग व लिंगपीठ यांच्यात काही दोष असेलच किंवा दोष नसले तरी ते चुकून राहिल्यास मंदिर बांधणाऱ्या शिल्पीला व त्याच्या मालकाला त्यामुळे काही भय असू नये म्हणून लिंग व लिंगपीठ यांचा लक्षणोद्धार कसा करावा याची माहिती अनुक्रमे पटल ४९ व ५९ यांमध्ये दिली आहे.

शंकराच्या प्रतिमा तयार करावयाच्या असतील तर प्रतिमेच्या तालमानाची व त्या तालमानाला अनुसरून निरनिराळ्या अवयवांची मापे यांची माहिती असावयास हवी. उत्तम दशताल ते सात तालापर्यंतच्या मूर्तींच्या बाबतची ही माहिती पटल ५० ते ५७ पर्यंत दिली आहे. तालमान हे प्रतिमेची उंची देते. एक ताल म्हणजे बारा अंगुलांचे माप. तेव्हा दहा तालांची मूर्ती १२० अंगुले उंचीची असते. प्रतिमा ज्या आसनावर उभी असेल त्याच्या वरपासून ते प्रतिमेच्या डोक्याच्या केसांच्या हद्दीपर्यंत ही उंची धरतात. डोक्यावरील मुकुट, जटाभार वगैरेंची उंची या तालमानात येत नाही. काहींच्या मते एक ताल म्हणजे मनगटाच्या मुळापासून पसरलेल्या तळव्याच्या मधल्या बोटाच्या टोकापर्यंत अंतर ( आकृती १ ). साधारणपणे कोणत्याही तालमानाचे तीन प्रकार होतात : उत्तम, मध्यम व अधम ताल. हे प्रत्येक तालमानाचे तीन प्रकार दहा ते पाच तालांपर्यंत होतात. त्याहून प्रतिमेची उंची लहान असेल तर त्या मापाचे आणखी तीन प्रकार करीत नाहीत. दहा ताल प्रतिमेची उंची १२० अंगुले असते, पण हे झाले मध्यम दशतालाचे माप. उत्तम दशताल प्रतिमेची उंची असते १२४ अंगुले. तर अधम दशताल म्हणजे ११६ अंगुले उंचीची मूर्ती. तेव्हा तक्ता १ मध्ये दिल्याप्रमाणे १२ अंगुलांच्या पट्टीने येणारी उंची ही मध्यम तालाची असते. त्याहून उंची चार अंगुलांनी वाढविली म्हणजे ते उत्तम तालाचे माप होते. याउलट, उंची चार अंगुलांनी कमी केली तर ते अधम तालाचे माप होते. या तक्त्यातच कोठल्या देवतेची मूर्ती किती ताल मापात करतात त्याचीही माहिती काश्यपशिल्पावरून







आकृती १ : तालाचे माप

दिली आहे. तेथेच कंसामध्ये ज्या देवतांच्या उंचीची ही माहिती काश्यपशिल्पात दिलेली नाही पण इतर आगम ग्रंथांत आहे त्यांची नावे दिली आहेत.

**अंगुल हे माप–** मूर्तीची उंची अंगुलांत आहे तेव्हा अंगुलाच्या मापाची माहिती असणे आवश्यक आहे. अंगुलाचे तीन प्रमुख प्रकार आहेत : मानांगुल, मात्रांगुल व देहलब्धांगुल.

यांतील मानांगुल हे माप अपरिवर्तनीय आहे. अणु नावाच्या धान्याचे किंवा तिळाचे अथवा तांदळाचे दाणे यांच्या मापापासून मानांगुलाचे माप मिळविता येते. हे माप अशा रीतीने मिळवावयाच्या बऱ्याच पद्धती पूर्वापारपासून चालत आल्या आहेत. बौधायन शुल्बसूत्रांत ३४ अणु किंवा १४ तिळाचे दाणे त्यांच्या रुंदीला एकमेकास चिकटून ठेवले म्हणजे जे लांबीचे माप येते त्याला अंगुल म्हणावे असे सांगितले आहे ( १·३–५ ). मानव शुल्बसूत्रांत ( १०·१·४·१–४ ) सहा कमल परागांच्या अग्रांची एकत्र जाडी ही एक वासरू झालेल्या तीन वर्षांच्या गाईच्या केसाच्या जाडीइतकी असते असे दिले आहे. पुढे गाईच्या सहा केसांच्या जाडीइतकी जाडी मोहरीच्या दाण्याची असते. सहा मोहरीचे दाणे एकमेकांस लागून ठेवले म्हणजे एका यवाच्या जाडीइतके माप मिळते व असे सहा यव त्यांच्या जाडीला लागून ठेवले म्हणजे येणारी लांबी एक अंगुल इतकी असते. अशी अगदी सूक्ष्म परिमाणापासून अंगुलाचे माप मिळविण्याची पद्धत दिली आहे. शिल्पशास्त्राच्या ग्रंथांत अंगुलाचे माप हे उन्हाच्या कवडशात दिसणाऱ्या परमाणूंपासून सुरुवात करून दिलेले असते. मात्र येथे सहा यवांनी मिळणारे अंगुलाचे माप हे कनिष्ठ अंगुलाचे असून अनुक्रमे सात व आठ यवमध्यांनी मध्यम व उत्तम अंगुलांचे माप मिळते असे म्हटलेले आहे. काश्यपशिल्पात तांदुळाच्या दाण्याच्या मापाने अंगुलाचे माप दिले आहे. तांदुळाचे पांढरा, मोठा, तांबडा, सुगन्धी व सोनेरी रंगाचा असे पाच प्रकार सांगून दोन तांबड्या तांदुळांनी एका अंगुलाचे माप मिळते असे सांगितले आहे.

अंगुलाचा दुसरा प्रकार म्हणजे मात्रांगुल. यजमानाच्या उजव्या हाताच्या मधल्या बोटाच्या मधल्या पर्वाची जाडी किंवा लांबी हे माप अंगुलाइतके असते. यजमानाच्या देहावरून अंगुलाचे माप ठरवावयाची ही रीत फार पूर्वीपासून प्रचलित आहे. मानव शुल्बसूत्रांत ( १०·१·४·५ ) यजमानाची उंची जमिनीपासून त्याच्या वर केलेल्या हाताच्या ( मधल्या बोटाच्या अग्रा ) इतकी घेऊन ती १२० अंगुले आहे असे समजून एक अंगुलाचे माप घ्यावे. किंवा यजमानाच्या बोटाच्या पर्वांमधील अंतर एक अंगुल समजावे असे सांगितले आहे.

शरीराच्या निरनिराळ्या अवयवांची मापे व त्यांचे परस्परांशी प्रमाण ही माहितीदेखील श्रौतसूत्रकालाइतकी (इ. स. पूर्व ८०० वर्षे किंवा त्या अगोदर) जुनी आहे असे म्हणण्यास हरकत नाही. शुल्बसूत्रांत, जी श्रौतसूत्रांचा एक भाग आहेत, शरीराच्या निरनिराळ्या अवयवांची जी मापे दिली आहेत त्यावरून हे समजून येते व तालमानांत जी मूर्तीच्या शरीराच्या अवयवांची मापे दिली आहेत त्यांचे मूळ शुल्बसूत्रांत दिलेल्या मापांत दिसून येते. बौधायन शुल्बसूत्रांत एक जानु म्हणजे ३२ अंगुले हे माप दिले आहे; म्हणजे जमिनीपासून गुडघ्यांपर्यंतचे अंतर ३२ अंगुले असते. आपस्तंब शुल्बसूत्रांत नाभीपर्यंत अंतर ६४ अंगुले व एक आस्य म्हणजे मुखापर्यंतचे अंतर ९६ अंगुले असते असे दिले आहे. याचाच अर्थ मानवी शरीराच्या उंचीचे तीन समान विभाग पाडलेले आहेत व ते प्रत्येकी ३२ अंगुलांचे आहेत. निरनिराळ्या तालमानांतील मूर्तींच्या या मापांचा अभ्यास केल्यास हे जमीन

ते गुडघा, गुडघा ते नाभी व नाभी ते मुख यांचे प्रमाण थोडयाफार फरकाने तसेच ठेवण्यात आले आहे असे दिसेल. इतर मापांसंबंधीही तसेच म्हणता येईल. किंबहुना मापे घेण्यासाठी मनुष्याच्या हाताच्या मापापासून सुरुवात केली गेली असे म्हटले तरी चालेल, व त्याचीच परिणती म्हणजे एक ताल म्हणजे मनगटापासून पसरलेल्या तळहाताच्या मधल्या बोटाच्या अग्राइतके अंतर हे शेवटी शरीराच्या मापाचे प्रमाणमाप घेतले गेले. एक प्रादेश किंवा एक वितस्ति किंवा एक अर्व ही सर्व मापे १२ अंगुलांची लांबी दाखवितात. हे अंतर म्हणजे पसरलेल्या हातातील अंगठयाच्या अग्रापासून करंगळीच्या अग्रापर्यंतचे अंतर. हल्लीदेखील आपल्याला एखाद्या वस्तूची साधारण लांबी पाहिजे असेल तर आपण आपल्या हाताने अशा रीतीने माप घेतो इतके हे माप सोईस्कर आहे. म्हणूनच ते अगदी पहिल्यापासून प्रचारात आले असावे; नंतर त्याचा व अंगुलमापाचा संबंध जोडण्यात आला असावा. १४ तिळांचे दाणे किंवा सहा कमल परागांपासून अथवा परिमाणूंपासून सुरुवात करून अंगुलाचे माप ठरविणे ही नंतरची गोष्ट झाली. अंगुलाचे अपरिवर्तनीय असे शास्त्रशुद्ध माप असावे या दृष्टीने हे परिणतावस्थेतील माप झाले. एक व्यायाम किंवा व्याम म्हणजे दोन्ही हात जमिनीशी समांतर व परस्परविरुद्ध दिशांना पसरले म्हणजे त्या हातांच्या पसरलेल्या मधल्या बोटांच्या टोकांमधील अंतर. हे मापदेखील ९६ अंगुलेच असते व ते श्रौतसूत्र काळापासून निश्चित झाले आहे. तेव्हा मानवी शरीराच्या अवयवांच्या मापावरून अंगुलाचे माप मिळविणे व मानवी शरीराच्या निरनिराळ्या अवयवांची अंगुल परिमाणात मापे सांगणे ही मूर्तिकलेतील मापांबद्दलची स्थिती फार पूर्वीपासून प्रचलित असावी असे दिसते.

या मापांबद्दलचे शिलालेखांतील उल्लेखही देता येतील. हात हे माप राज्यव्यवहारात राजाच्या हाताच्या मापाने ठरविले जाई. वैल्लभट्टस्वामी देवालयातील शिलालेखात जमिनीची मोजणी राजाच्या हाताच्या मापाने ( परमेश्वरीय हस्त ) केली असा उल्लेख आहे. तसेच शिवचंद्र-हस्त म्हणजे शिवचंद्र राजाच्या हाताचे माप अशा अर्थी उल्लेख शिलालेखात मिळतो. एवढेच नव्हे, तर काही बंगाली शिलालेखांत सुतारकामाचा हात (दर्वीकर्महस्त) असेही उल्लेख मिळतात. आताआतापर्यंत उत्तर आर्कोट जिल्ह्यात नारायणवनम् या गावाजवळील कंपुलपालियम् या देवळातील देवीच्या पायाचे माप वापरीत असत. देवीच्या पायांची लांबी आहे २६ सें. मी. (श्रीनिवासन् १९७९).

मूर्तीची उंची वर दिलेल्या अंगुलांच्या मापाने ठरविता येते, त्याप्रमाणे अंगुलाच्या तिसऱ्या प्रकारच्या मापाने ठरविता येते. हा अंगुलाचा तिसरा प्रकार मात्र गमतीचा आहे. देहलब्धांगुल हे अंगुलाचे माप मूर्तीच्या मधल्या बोटाच्या मधल्या पर्वाच्या लांबीचे माप. हे माप मूर्ती तयार करावयाच्या अगोदर ठरवावयास हवे. हे माप कसेही बदलू शकते. दहा ताल मूर्तीची उंची असते १२० अंगुले. आता मूर्तीचे देहलब्धांगुलाचे माप समजा दोन सें. मी. आहे तर त्या मूर्तीची उंची असेल २४० सें. मी.; पण जर मूर्तीच्या देहलब्धांगुलाचे माप समजा $\frac{1}{2}$ सें. मी. असेल तर पुन्हा दहा तालच उंचीच्या मूर्तीची उंची मात्र ६० सें. मी. मात्र मूर्तीच्या निरनिराळ्या अवयवांची लांबी ही देहलब्धांगुलावरूनच घेतलेली असल्याने मूर्तीची उंची २४० सें. मी. असो की ६० सें. मी. असो; या दोन मूर्तींच्या अवयवांच्या लांबी, रुंदी वगैरेंचे परस्परप्रमाण सारखेच असणार व दोन्ही मूर्ती दहा ताली

आहेत असेच त्यांचे माप सांगितले जाईल. तेव्हा शंकराची मूर्ती उत्तम दहा ताल (१२४ अंगुले) मापाची असली व गणपतीची एकटी मूर्ती जर असेल व ती तालमानाप्रमाणे पाच ताल (६० अंगुले) उंचीची असेल तरीही गणपतीची मूर्ती शंकराच्या मूर्तीपेक्षा कितीतरी पट मोठी असू शकेल व तरीही तालमानाप्रमाणे सर्व अवयवांची मापे अचूक असतील. याउलट शंकर, उमा व स्कंद अशी तिघांची 'सोमास्कंद' एकत्र मूर्ती असेल तर त्यांची उंची शंकराच्या देहलब्धांगुलाच्या प्रमाणात असल्याने, उमा, शंकराच्या मुखाइतक्या किंवा त्याच्या स्तनसूत्राच्या इतक्या उंचीची असेल तर स्कंद शंकराच्या गुडघ्याच्या उंचीचा असेल व त्यांचे परस्परप्रमाण योग्य असेल. तेव्हा देहलब्धांगुल हे माप मूर्तीच्या मापासाठी तरी फारच सोयीस्कर आहे व त्याबाबतीत भारतीय मूर्तीकारांच्या मापांच्या सर्जनशीलतेबद्दल कौतुकच करावयास हवे.

काश्यपशिल्पात निरनिराळ्या मूर्तींची लक्षणे काय दिली आहेत याचा संक्षिप्त आढावा तक्ता क्र. २ मध्ये दिला आहे. मूर्तीच्या हातांची संख्या, त्या हातांत धारण केलेली आयुधे, वाहन अथवा पीठाचे नाव यांची माहिती या तक्त्यात दिली आहे. आयुधे देताना प्रथम उजव्या हातातील व नंतर डाव्या हातातील दिली आहेत. तसेच ती उजव्या हाताची खालून वर व डाव्या हातातील वरून खाली या क्रमाने दिली आहेत. या तक्त्यात शंकराच्या सोमास्कंद, भिक्षाटन, चंद्रशेखर वगैरे विविध प्रकारच्या मूर्तींच्या माहितीचा मात्र अंतर्भाव नाही. काश्यपशिल्पात त्यांचे वर्णन फारच उत्कृष्ट केलेले असून त्या प्रत्येक मूर्तीची आकृती दिली आहे. तेव्हा पुन्हा तक्त्यात ही माहिती देणे अनावश्यक वाटले.

शंकराची मूर्ती उत्तम दशताल मापाची असते. त्यामुळे या मापाच्या मूर्तीच्या सर्व अवयवांची लांबी, रुंदी, जाडी, परिमिती, पुढले व मागले माप इत्यादी सांगोपांग व सूक्ष्म माहिती काश्यपशिल्पात दिलेली आहे. ती व इतर आगम ग्रंथांत दिलेली एकत्रित माहिती तक्ता क्र. ३ मध्ये दिली आहे. ही माहिती मात्र प्रमुख अवयवांच्या लांबी-रुंदीइतकीच सीमित करून दिली आहे. अधिक संपूर्ण माहिती पाहिजे असल्यास टी. गोपिनाथराव (१९७७) यांचा मूळ लेख पहावा. वरील माहितीही त्याच संदर्भलेखातून घेतली आहे. या माहितीमुळे शरीराच्या वेगवेगळ्या अवयवांची मापे किती सूक्ष्मपणे दिली आहेत व त्याच्यावर किती खोलवर विचार झाला होता याची झलक मिळेल.

मातीची मूर्ती कशी करावी, उत्तम चुन्याचा लेप तीवर कसा लावावा व नंतर रंगकाम कसे करावे याचीही माहिती पुढील पटलात दिली आहे. मूर्तीसाठी वापरावयाची माती कोठून आणावी, तिचे स्थिरीकरण कसे करावे, तसेच ही माती ज्या लाकडी सांगाड्यावर थापून मूर्ती तयार करावयाची त्या लाकडी सांगाड्याचे (शूलाचे) संपूर्ण मापांसह वर्णन दिले आहे. शांतिनिकेतनातील प्रो. मित्र यांनी या विषयाचा सखोल अभ्यास करून हा सांगाडा तयार केला. त्याला माती थापून, मजबुतीसाठी दोऱ्या बांधून काश्यपशिल्पात दिल्याप्रमाणे मातीची मूर्ती त्यांनी तयार केली. या सांगाड्याच्या निरनिराळ्या लाकडी अवयवांचे, तो संपूर्ण सांगाडा व त्यावर माती थापून तयार केलेली पण प्राथमिक स्वरूपाची मूर्ती यांची छायाचित्रे त्यांच्या अनुमतीने मिळवून या पुस्तकात घातली आहेत. त्यामुळे वाचकांस हा भाग समजण्यास मदत होईल.

**मूर्तींचे प्रकार** – मूर्तींचे चार प्रमुख प्रकार आहेत. ते म्हणजे–

१) चित्रजा – कागदावर, कापडावर, भिंतीवर किंवा भांड्यांवर काढलेले चित्र.

२ ) लेपजा – मातीची मूर्ती किंवा मूर्ती आतून कागदाची, कापडाची कशाचीही केलेली असो, तिला बाहेरून मातीचा किंवा चुन्याचा लेप दिलेली.

३ ) पाकजा – मातीची मूर्ती पण भाजलेली किंवा धातू वितळवून तयार केलेली मूर्ती; मेणाच्या ठशावरून तयार केलेली– Cire purdue method – धातूची मूर्ती.

४ ) शस्त्रोत्कीर्णा – लाकूड, दगड, रत्न अशा कठीण पदार्थांमधून कोरून काढलेली मूर्ती.

ज्या पदार्थापासून मूर्ती तयार केली असेल त्यावरून मूर्तीचे सात प्रकार होतात :

१. मृण्मयी – मातीची कच्ची किंवा पक्की, हाताने घडविलेली किंवा साच्यातील.
२. दारुघटिता –लाकडाची मूर्ती. उदाहरणार्थ पुरी येथील पुरुषोत्तम, बलराम व सुभद्रा यांच्या लाकडाच्या मूर्ती.
३. लोहजा – धातूची बनविलेली, जिला वर पाकजा म्हटले आहे अशी.
४. रत्नजा – रत्नावर कोरीव काम करून बनविलेली मूर्ती.
५. शैलजा – दगडाची, वाळूच्या दगडाची वगैरे.
६. गन्धजा – चंदन उगाळून त्याच्या गन्धापासून तयार केलेली मूर्ती.
७. कौसुमी – निरनिराळ्या फुलांच्या मांडणीने तयार केलेली मूर्ती.

शुक्रनीतिसारात ( ४·४·७२ ) पुन्हा ज्या पदार्थांपासून मूर्ती तयार केली त्यावरून तिचे आठ प्रकार दिले आहेत. यातील उत्तरोत्तर पदार्थांच्या मूर्ती या अधिकाधिक टिकावू असतात.

१ ) सैकती – ओल्या वाळूची, शिवलिंग वगैरे क्षणभंगुर मूर्ती.
२ ) पैष्टी – पिठापासून केलेली मूर्ती.
३) लेख्या – आलेखलेली ( ? ).
४ ) लेप्या – वर सांगितलेली लेपजा.
५ ) मृण्मयी – मातीची.
६ ) वार्क्षी – वृक्षापासून म्हणजे लाकडापासून बनविलेली.
७ ) पाषाण – अखंड दगडाची.
८ ) धातू – सोने, चांदी, तांबे, पितळ, लोखंड, पंचधातू यांच्यापासून बनविलेल्या मूर्ती.

काश्यपशिल्पात ( ५०·१–९ ) मूर्तीचे तीन प्रकार दिले आहेत.

१) अर्धचित्र, २) चित्र व ३) चित्राभास.

केवळ पुढचा भाग उठावाने दाखविलेला असतो ते अर्धचित्र. सर्व अवयव पुढून, पाठीमागून संपूर्णपणे दाखविलेले असतात ते चित्र. कापडावर, भिंतीवर, उठाव खोली वगैरे दाखवून जे चित्र काढतात त्याला म्हणतात चित्राभास.

द्रव्याच्या वापराप्रमाणे मूर्तीचे प्रकार होतात. विटा, माती, लाकूड, दगड, लोखंड, तांबे, चांदी व सोने. उत्तरोत्तर द्रव्ये ही उत्तम द्रव्ये होत.

याचप्रमाणे मूर्तीचे तिच्या भावाभिव्यक्तीप्रमाणे तीन प्रकार होतात. ते म्हणजे सात्त्विक, राजस व तामस. एकाच देवतेच्या अशा निरनिराळ्या मूर्ती असू शकतात. तामस किंवा उग्रमूर्तीत पुन्हा अभिचारमूर्ती म्हणजे जादूटोणा करताना पूजावयाच्या मूर्तींचाही उपप्रकार असतो. सात्त्विक मुद्रेतील मूर्तीचे हात योग, अभय व वरदमुद्रेत असतात. पुष्कळदा त्या मूर्तीची इंद्र व इतर क्षुद्रदेवता

पूजा करीत आहेत असे दाखविलेले असते. राजसी मुद्रेच्या मूर्तींच्या हातात शस्त्रे धारण केलेली असतात. दोन हात अभय व वरद मुद्रेत असतात. ही मूर्ती पीठावर किंवा तिच्या वाहनावर बसलेली दाखवितात. भरपूर दागिने व वस्त्रे घातलेली अशी ही मूर्ती असते. असुरांना मारीत असलेली मूर्ती तामस समजतात.

आकृती २ मध्ये मूर्तींच्या हातांत धारण केलेली निरनिराळी शस्त्रे दाखविली आहेत.




आकृती २ : निरनिराळी शस्त्रे

तक्ता क्र. १

## मूर्तींचे तालमान

| तालाचा प्रकार | उंची (अंगुले) | मूर्तींची नावे |
|---|---|---|
| उत्तम दशताल | १२४ | ब्रह्मा, विष्णू, महेश्वर. |
| मध्यम दशताल | १२० | उमा, सरस्वती, उषा, भूमि, दुर्गा, लक्ष्मी, सप्तमाता, ज्येष्ठा. |
| अधम दशताल | ११६ | चंद्र, सूर्य, अश्विनी, ऋषी, ग्रह, शर्व, षण्मुख, चण्डेश, क्षेत्रपाल (इंद्र, लोकपाल, शेष, दुर्गा, सप्तर्षि, गुरु). |
| उत्तम नवताल | ११२ | अष्टवसू, विघ्नेश, लोकपाल, इतर देवता (दैत्येश, यक्षेश, नागेश, सिद्ध, गंधर्व, चारण व शिवाच्या अष्टमूर्ती). |
| मध्यम नवताल | १०८ | यक्ष, अप्सरा, अस्त्रमूर्ति, मरुद्गण, विद्याधर. |
| कनिष्ठ नवताल | १०४ | असुर, सिद्ध, गंधर्व, पितर. |
| उत्तम आठताल | १०० | |
| मध्यम आठताल | ९६ | पिशाच (माणसे). |
| कनिष्ठ आठताल | ९२ | |
| सात ताल | ८४ | पिशाच (वेताळ, प्रेत). |
| सहा ताल | ७२ | कुबडी माणसे (प्रेत). |
| पाच ताल<br>मध्यम व अधम पाच ताल | ६० | कुबेर (कुबडा, विघ्नेश्वर),<br>निरनिराळे प्राणी. |
| चार ताल | ४८ | बालक (वामन, खुजी माणसे). |
| तीन ताल | ३६ | बालक (भूत, किन्नर). |
| दोन ताल | २४ | किन्नर (कूष्मांड). |
| एक ताल | १२ | कासव. |

तक्ता क्र. २

## काश्यपशिल्पात वर्णिलेल्या मूर्तींची लक्षणे

| नाव | हात | आयुधे | बैठक |
|---|---|---|---|
| १) अनल | ७ | शक्ति, अग्नि, स्रुक, स्रुव/तोमर, व्यजन, घृतपात्र. | मेष |
| २) ब्राह्मी | ४ | अभय, शूल/अक्षमाला, वरद. | हंस |
| ३) माहेश्वरी | ४ | अभय, शूल/जपमाला, वरद. | वृषभ |
| ४) कौमारी | ४ | वरद, शक्ति / कोंबडा, अभय. | मोर |
| ५) वैष्णवी | ४ | वरद, शंख / चक्र, अभय. | गरुड |
| ६) वाराही | ४ | —— | रेडा |
| ७) इन्द्राणी | ४ | अभय, अंकुश / शक्ति, वरद. | गज |
| ८) चामुण्डा | ४ | वरद, कपाल / शूल, अभय. | प्रेत |

| | नाव | हात | आयुधे | बैठक |
|---|---|---|---|---|
| ९) | विनायक | २ | स्वतःचा दात / कपिण्डक | पद्मपीठ |
| | | ४ | अभय ?, अंकुश / पाश किंवा नाग, अक्षमाला | |
| १०) | षण्मुख | १२ | शक्ति, बाण, खड्ग, चक्र, प्रास, पसरलेला / पीस, खड्ग, खेटक, धनुष्य, दण्ड, हल | |
| | | ६ | दोन तलवारी, शक्ति / खेटक, अक्षमाला, कोंबडा | |
| | | ४ | अभय, शक्ति / कोंबडा, अक्षमाला | |
| | | २ | शक्ति / कोंबडा | |
| ११) | ज्येष्ठादेवी | २ | उत्पल / कटक | भद्रपीठ |
| | | २ | दण्ड / सूचि | |
| १२) | दुर्गा | ४ | अभय, चक्र / कटक, शंख | पद्मपीठ |
| १३) | विष्णू | ४ | अभय / कटक<br>शंख, चक्र / गदा, पद्म | पद्मपीठ |
| १४) | इंद्र | २ | शक्ति / अंकुश | सिंहासन/गज |
| १५) | अश्विन | २ | कमंडलू | |
| | | २ | अभय / पुस्तक | |
| १६) | वैवस्वत | २ | खड्ग / खेटक | महामहिष/सिंहासन |
| १७) | रोहिणी | २ | नाग | |
| १८) | निर्ऋति | २ | खड्ग / खेटक | शवारूढ |
| १९) | वरुण | २ | पाश | मकर |
| २०) | ऋषी | २ | दण्ड / छत्री | |
| | | २ | ज्ञानमुद्रा / डावा गुडघ्यावर | |
| २१) | मरुत् | २ | ध्वज / दण्ड | सिंहासन |
| २२) | रुद्र | ४ | अभय, परशू / लोखंड, वरद | पद्मपीठ |
| २३) | चंद्र | २ | कुमुद / उत्पल | सिंहासन |
| २४) | क्षेत्रपाल सात्त्विक | ४ | अभय, खट्वाङ्ग / खड्ग, वरद | पद्मपीठ |
| | राजस | ६ | शूल, खड्ग, घंटा / खेटक, कपाल, नाग | भद्रपीठ |
| | तामस | ८ | शूल, खड्ग, धनुष्य, बाण / खेटक, कपाल,नाग, पाश | |
| २५) | ईश | २ | शूल / कपाल | पांढरे कमळ |
| २६) | अनन्त | ४ | अभय, कटक / शूल, वरद | पद्मपीठ |
| २७) | सूर्य | ४ | अभय, खड्ग / खेटक, वरद | |
| २८) | भव | ४ | अभय, शूल / पाश, वरद | पद्मपीठ |
| २९) | गौरी | ४ | अभय, टंक / शूल, वरद | पद्मपीठ |
| ३०) | शर्व | ४ | अभय, खड्ग / खेटक, वरद | |
| ३१) | ब्रह्मा | ४ | अक्षमाला, कूर्च / कमण्डलू, कुश<br>स्रुक्, स्रुव / घृतपात्र, कुश<br>अभय, घृतपात्र / कुश, वरद<br>अक्षमाला / कमण्डलू, उरलेले दोन हात एकमेकांवर ठेवलेले—ही बसलेली मूर्ती असते. | |

किंवा त्या होमाचे व प्रकृतीचे निर्गमन दोन किंवा तीन दण्ड असावे... (श्लोकार्धाचा अर्थ समजत नाही.) (९)




होमाचे उपपीठापासून निर्गमन = उपपीठाचे अधिष्ठानापासून निर्गमन
= क्ष

आकृती ६·१ : प्रासादाची आखणी

होमाचे निर्गमन त्याच्या उंचीइतके किंवा हे ब्राह्मणा, त्याच्या दुप्पट असते. होम .........
होमाच्यावर अब्जाची कल्पना करावी. ( १० )

कमळाचा आत प्रवेश त्याच्या उंचीइतका असतो. कमळाच्या ( उंचीच्या ) निम्मे उपान असते. त्याच्या ( उपानाच्या ) वर अधिष्ठान उपपीठासहित ( किंवा उपपीठाशिवाय ) असते. ( ११ )

[ अधिष्ठानाच्या अंगांच्या विभागांत उपानाची उंची सांगितली असते. त्याच्या दुप्पट उंची उपानाच्या खाली असलेल्या कमळाची ( अब्जाची ) असते. या उंचीइतका कमळाचा आत प्रवेश असतो व कदाचित त्याच्या निम्मे उपानाचा आत प्रवेश असतो. म्हणजेच उपानाचा प्रवेश त्याच्या उंचीइतका असतो. ]

जिन्याकरिता प्रकृतीच्यावर होमाची कल्पना करावी. त्याच्यावर तरताल ( अधिष्ठान ? ) उपपीठासहित ( किंवा उपपीठाशिवाय ) असावा. ( १२ )

होमाच्या वरती ( अब्ज न ठेवता ) कोणत्याही आधाराशिवाय कमळाच्या पाकळीप्रमाणे पादुकेची कल्पना करावी. हे ब्राह्मण श्रेष्ठा, प्रकृति समसूत्रांत कल्पावी. (१३)

प्रासादाचे होम, उपान वगैरेंचे निर्गमन अथवा अंतर्प्रवेश या सूत्राला धरून असावे. ( १३½ )

अधिष्ठानाची उंची खांबाच्या उंचीच्या निम्मे किंवा खांबाच्या उंचीइतकी किंवा ( खांबाच्या उंचीच्या ) आठ भागाच्या सहा भाग ( तीन चतुर्थांश उंची ) इतकी असावी. ( १४, १४½ )

खांबाच्या वरील टोकाच्या रुंदीस 'दण्ड' असे म्हणतात. ( १५ )

एका दण्डापासून सुरुवात करून अर्ध्या दण्डाने वाढवीत तीन दण्डांपर्यंत ( निर्गमनाचे ) पाच प्रकार होतात. खांबाच्या बाहेर असलेल्या या निर्गमनाचे तीन भाग करून त्यांतील एका भागाइतकी उपानाची रुंदी ( निर्गमन ) असते, व उरलेल्या भागाइतकी जगतीची रुंदी असते. ( १६, १७ )

आमुदावंश ( वेलबुट्टी काढलेली पट्टी ) एक अंश असून त्याचे निर्गमन जगतीइतके असते. कुमुदांत पट्ट एक अंश असतो व तितकेच त्याच्या कर्णाचे अंतर्गमन असते. ( १८ )

[ कर्ण व कंठ हे समानार्थी शब्द आहेत. ]

सर्व कमळांचे निर्गमन त्यांच्या उंचीइतके असते. कंपाचे व इतर भागांचे निर्गमन त्यांच्या उंचीच्या पावपट असते. ( १९ )

महावाजनाचे निर्गमन त्याच्या उंची इतके, त्याच्या दुप्पट किंवा ( उंचीच्या ) पाऊणपट जसे पाहिजे असेल तसे असावे. ( २० )

जन्म ( पादुका ) इत्यादी पाच वर्गांच्या त्या त्या अंगांच्या शेवटापर्यंत, दारापर्यंत किंवा स्थळापर्यंत अधिष्ठानाची उंची असावी. ( २१ )

उपान, जगती, कंप, खण्ड आणि त्याचप्रमाणे पट्टिका असे अधिष्ठानाचे पाच वर्ग प्रसिद्ध आहेत. शहाण्या माणसाने त्यांच्या वरती दार, जलधारा ( नालिका ) आणि जमीन हे सर्व अप्रतिबन्धपणे प्रतीच्यावर ठेवावेत. त्यांच्यासाठी ( उपानापासून ) प्रतीपर्यंतच्या अंगांमध्ये खण्ड पाडू नये. ( २२, २३ )

प्रतीत खण्ड पाडला असता ते सर्व दुःखास नेहमीच कारणीभूत होते; तेव्हा सर्व प्रयत्नांनी प्रतीच्या अंगांत कधीही छेद पाडू नये. ( २४ )

अधिष्ठानाचे प्रतिबन्ध व पादबन्ध असे दोन प्रकार जाणावेत. हे श्रेष्ठ ब्राह्मणा, प्रत्येका-मधील फरक आता सांगतो. ( २५ )

सर्व प्रतिबंधातील कुमुद वृत्ताकार असते असे सांगतात. पादबन्धप्रकारच्या अधिष्ठानाचे कुमुद अष्टकोनी असते. ( २६ )

त्या दोघांचा ( प्रतिबद्ध व पादबन्ध यांचा ) संकर केल्यास ते कर्त्याच्या नाशास कारणीभूत होते. प्रासाद जर प्रतिबद्ध ( प्रकारच्या अधिष्ठाना ) वर असेल तर अनेक प्रकाराने संकर होऊ शकतो, आणि कूटकोष्ठादिकांचेही ( अधिष्ठान ) प्रतिबद्ध प्रकारचे असावे म्हणजे ते शुभावह होते. त्याचप्रमाणे ( प्रासादाचे अधिष्ठान ) पादबन्ध प्रकारचे असेल तर ( कूटकोष्ठादिकांचे अधिष्ठान ) त्याच प्रकारचे असावे, त्यात संकर झाल्यास ते चांगले नाही. ( २७, २८ )

या उलट केल्यास त्या वास्तूचा, राष्ट्राचा आणि राजाचा नाश होतो. तेव्हा सर्व प्रयत्नांनी या तऱ्हेचा संकर होऊ देऊ नये. ( २९ )

अधिष्ठानाच्या उंचीचे २१ भाग करून उपान एक भाग व जगती सात भाग असावी. (३०)




आकृती ६·२

कुमुदाची उंची सहा भाग असून आलिंग एक भाग असतो. त्रिपट्ट एक भाग व प्रतीची उंची दोन भाग असते. ( ३१ )

वाजिन एक भाग असते असे जगत् नावाचे प्रतिबन्ध होते. किंवा हे अधिष्ठान उपाना-शिवाय असून उरलेली अंगे पूर्ववत असतात, त्यातील एक अंश कमी होतो. ( ३२ )

अधिष्ठानाच्या उंचीचे २५ भाग करून पादुकाची उंची एक भाग व जगती आठ भाग असते. ( ३३ )

कुमुदाची उंची सात भाग व कंपाचे माप एक भाग असते. गलाची उंची तीन भाग व ऊर्ध्वकंप एक भाग असतो. ( ३४ )

महापट्टी तीन भाग व तिच्यावरील कंप एक भाग असतो. हे पादबन्ध म्हणून प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणे उपानाशिवायही ( या प्रकारचे अधिष्ठान ) असते. (३५)

आणि या पादबंधाचे निरनिराळे प्रकार वर्णन केले आहेत. ( ३५½ )

अधिष्ठानाच्या उंचीचे २१ भाग करून पादुका एक अंश असते, अंबुज दीड भाग व कंप अर्धा भाग असतो असे सांगतात. जगतीची उंची सात भाग व कुमुदाचा उदय सहा भाग असतो. ( ३६, ३७ )

आलिंग एक भागाचे असून त्रिपट्ट एक भागाचा असतो, प्रतीची उंची दोन भाग व एक भागाचे वाजन असते. ( ३८ )

प्रतिबद्धाचा हा 'प्रतिवक्त्र' नावाचा प्रकार आहे. वरीलप्रमाणेच परंतु उपान ( एक भाग नसून ) दोन भाग असते व आलिंग ( एक भाग नसून ) दोन भाग असते व उरलेले भाग वरीलप्रमाणेच असतात. उपानावरील पद्म व एक कंप काढून टाकावेत तेव्हा सर्व देवालयांना योग्य असे प्रसिद्ध 'प्रतिक्रम' होते. ( ३९–४०½ )



प्रतिवक्त्र



अंभोजकेसर

आकृती ६·३

( अधिष्ठानाच्या ) उंचीचे २६ भाग करून एक भाग उपान असावे. दोन भागांनी दल करावे. कंप एक भागाने करावा. जगतीची उंची सहा भाग, दलाचे माप एक अंश असावे. (४१–४२)

खण्ड एका भागाने करावे व एकाने अब्ज करावे. कुमुदाची उंची तीन भागांची व पद्म एक भागाने करावे. ( ४३ )

कंप एकाने करावा व कंठाची उंची दोन भाग असावी. कंठतुंग एक अंश व तितकीच दलाची ( कमलपाकळीची ) उंची असावी. ( ४४ )

महापट्टी दोन भागांची, दल एक मापाचे व कंप एक भाग करावेत. कुमुद ( तीन भागांचे, श्लोक ४३ ) अष्टकोनी असावे. (४५)

या ( अधिष्ठानाच्या प्रकाराला ) 'अंभोजकेसर' म्हणतात व हा पादबन्धाचा प्रकार आहे. (४५½)

अधिष्ठानाच्या उंचीचे १९ भागात विभाग करून, उपान एक भागाने, कमळाची उंची तीन अंश, कंपाची उंची अर्धा भाग, जगतीची उंची चार भाग, (४६, ४७)

अंबुज अर्ध्या भागाने, दल अर्ध्या अंश मापाचे, पद्माची उंची अर्धा अंश व पट्टाचे माप तीन अंश, (४८)

पद्म अर्ध्या अंश मापाचे व तितकाच ( अर्धा अंश ) कंप असतो. खण्डाची उंची दीड भाग व कंप एक भागाने करावेत. (४९)

पद्म एक भागाने करावे व पट्टिका दीड भाग, अंबुज दीड भागांनी ( व ) कंप अर्ध्या भागाने करावेत. (५०)

[एकंदर १९ भाग न होता २१ भाग होतात. श्लोक ५० मधील पट्टिका व अंबुज जर प्रत्येकी अर्धा भाग घेतलेत तर १९ भागांचा हिशोब बरोबर लागतो व त्याप्रमाणे आकृतीत त्यांचे माप घेतले आहे.]

हा 'पुष्पपुष्कल' नावाचा पादबन्धाचा प्रकार आहे. (५०½)




पुष्पपुष्कल




श्रीबद्धान्त

आकृती ६.४

अधिष्ठानाच्या उंचीचे ३२ भाग केले असता उपोपान दोन भाग, उपान तेवढेच भाग असावे. कमळाची उंची सात अंश व कंठ एकाने करावेत. पद्म एकाने करावे. ( ५१, ५२ )

कुमुदाची उंची चार भाग (व) दल एक भाग असते. कंप एक भागाने करावे, गलाचे माप तीन अंश, ( ५३ )

कंप एकाने करावेत. हा ऊर्ध्वकंप कल्पावा. कपोताची उंची तीन अंश व आलिंग एक भाग असावे. ( ५४ )

एकाने अंतरित करावे, प्रतीची उंची दोन भाग व वाजन दोन भागांचे क्रमशः कल्पावे. (५५)

हा 'श्रीबद्धान्त' नावाचा प्रतिबन्धाचा प्रकार सांगितला. ( ५५½ )

अधिष्ठानाच्या उंचीच्या २८ भागांत उपान एक भागाने, जगतीची उंची सहा भाग, कुमुद पाच भागांनी ( व ) कंप एक भागाने करावा. ( ५६, ५७ )

गलाचे माप तीन अंश असून कंप एकाने कल्पावा. पद्म एकाने करून कपोताची उंची तीन अंश असावी. ( ५८ )

आलिंग एक भागाने व अंतरित एक भागाने कल्पावे. प्रती दोन भागांनी व वाजनाची उंची दोन भागांची असावी. ( ५९ )

प्रतिबंधाचा 'मंचमन्थ' ( मंचबन्ध ?) म्हणून प्रकार वर्णिला आहे. वरीलप्रमाणेच पण आलिंगाच्या वरील भागाचे २० विभाग करून श्रीकान्ताप्रमाणे त्याच्या अंगांची रचना केली असता प्रतिबन्धाचा वेगळा प्रकार मिळतो. ( ६०, ६०½ )

[ श्रीकान्त प्रकारच्या प्रतिबन्धाचे वर्णन ६·८७–८९½ येथे पहावे. ]




मंचमंथ




श्रेणीबद्ध

आकृती ६·५

अधिष्ठानाच्या उंचीचे २६ विभाग केले असता एक अंशाची पादुका असावी, दलाचे माप दोन भाग असावे व कंपाची उंची एक भाग असावी, जगतीची उंची सहा अंश व घटाची उंची चार भाग असावी. ( ६१, ६२ )

कंप एकाने करावा व पद्माची उंची दोन भाग असावी आणि वरील कंप एक अंश असून गलाचे माप दोन भाग असते. ( ६३ )

वाजन एक भागाने, कमळाची उंची दीड अंश व कंप एकाने करावेत, याला 'श्रेणीबद्ध' म्हणतात. ( ६४ )

[ २६ भाग न होता २३½ भाग होतात. मयमतांत ( १४·३३ ) अधिक अचूक माहिती या पादबन्धाबद्दल दिली आहे. ]

सिंह, हत्ती इत्यादींनी भूषविण्याच्या प्रकारांनी या पादबंधाचे भेद होतात. ( ६४½ )

अधिष्ठानाच्या उंचीचे १८ भाग करून पादुका दीड भाग ( व ) कंप अर्धा भाग सांगतात. कमळाची उंची पाच भाग, गल एक भागाने करावा. पद्म एकाने करावे. ( ६५, ६६ )

कुमुदाची उंची तीन भाग, दल एकाने करावे. आलिंग एक भागाने व त्वरित ( अंतरित ?) त्याच्या इतकेच ( एक भाग ) असावे. ( ६७ )

प्रतीची उंची दोन भागाने व वाजन एक भागाने ( करावे ). 'अब्जबन्ध' नावाचा हा प्रतिबंधाचा प्रकार आहे. ( ६८ )



अब्जबन्ध



वप्रबन्ध



प्रतिसुंदर

आकृती ६·६

अधिष्ठानाची उंची २२ अंश असून पादुकेची उंची दोन भाग, अब्ज एकाने व कंप देखील एका अंशाने कल्पावा. ( ६९ )

जगती पाच भागांची, कुमुद चार अंशांचे, पद्म एकाने करावे, कंप एकाने करावा. ( ७० )

कंठाची उंची दोन भागांनी, कंप एकाने करावे; दलाची उंची एक अंश व महापट्टी दोन भाग असते. (७१)

कंप एकाने करावा. (याला) 'वप्रबन्ध' म्हणतात. हा पादबन्धाचा प्रकार असून सर्व प्रकारच्या घरांना योग्य असतो. (७२)

याच्या (वप्रबन्धाच्या) महापट्टिकेच्या मापाने कपोत असला व कपोतच्या वर कंप (व) त्याच्यावर एक भागाचा त्रिपट्ट असला व प्रतीची उंची दोन भागांनी व वाजन एक भागांचे असेल तर उंचीचे २६ विभाग असलेल्या याला (अधिष्ठानाला) 'प्रतिसुंदर' म्हणतात. (७३, ७४)

अधिष्ठानाच्या उंचीचे २३ विभाग करून उपान एक भागाने, पद्म एक भागाने, कंप एक भागाने, (७५)

पट्टिका एक अंशाने करावीत. कंप एकाने कल्पावा. पद्म एकाने, कंठ एक अंशाने कल्पावेत. (७६)

एका अंशाने अंबुज करावे. कुमुदाची उंची तीन अंश, पद्म एकाने करावे; आलिंग एक भाग करावे. (७७)

त्रिपट्ट एक भाग व प्रतीचे माप दोन भाग असावे, वाजन एक भागाने असे क्रमाने कल्पावे. (७८)

हा प्रतिबन्धाचा 'श्रीकण्ठान्त' नावाचा प्रकार सांगितला (७८$\frac{१}{२}$)

[विभाग एकंदर १७ आहेत, दिल्याप्रमाणे २३ होत नाहीत.]

श्रीकण्ठान्त करीरबन्ध

आकृती ६·७

उपान एक भागाने, पद्म एक, कंप एक, दोन अंशांनी पट्टिका, कंप एका अंशाने कल्पावेत. गल एकाने करावा, पद्म एकाने करावे. (७९, ८०)

कुमुद तीन अंशांनी, पद्म एक अंश मापाने, आलिंग एक भागाने व त्वरित (अंतरित) एक भागाने (असावीत). (८१)

अधिष्ठानाची उंची २२ भागांत विभागली असून हा प्रतिबन्धाचा 'करीरबन्ध' (नावाचा) प्रकार आहे. (८१$\frac{१}{२}$)

[ यात एकंदर २२ विभाग नसून १४ भागांचाच फक्त हिशोब दिला आहे. आकृतीत तीन भाग जास्त दिले आहेत, एकूण १७ भाग. ]

पादुका एक भागाने आणि एका भागाने पद्म व कंप (एका भागाने), कंप एकानें करावा. कण्ठाचे माप दोन भाग. ( ८३ )

कंप एका भागाने, पट्टिका एक अंशाने, कंपक (एक भागाने), दल दोन भाग व गल एक अंश मापाचा ( असतो ) ( ८४ )

अंबुज एक भाग, कुम्भाचे माप तीन भाग, एक अंश दलाचे माप व दोन अंशांनी आलिंग होतो. ( ८५ )

एक भागाचा त्रिपट्ट, प्रतीचे माप दोन भाग, वाजन एक भागाने असे २२ विभाग (असलेला) हा 'कलशबन्ध' म्हणून प्रतिबन्धाचा प्रकार आहे. ( ८६, ८६½ )

[ विभाग एकूण २२ नसून २३ आहेत. ]

अधिष्ठानाच्या उंचीचे २४ ( १४ ? ) विभाग करून, पादुका एका विभागाने, कमळ तेवढ्याच ( एक भाग ) उंचीचे, अब्ज एकाने करावे. जगतीची उंची सहा भाग, ( ८७, ८८ )



कलशबन्ध श्रीकान्त

आकृती ६·८

पद्म एक भागाने, कंठ व पद्म प्रत्येकी एक भागाने, कलशाची उंची एक अंश व कमल एक भागाने ( असते ). ( ८९ )

'श्रीकार' ( श्रीकान्त ? ) नावाचा हा प्रतिबन्धाचा प्रकार सांगितला जातो. ( ८९½ )

[ विभाग अपुरे दिले आहेत. प्रतिबन्धाचा प्रकार असूनही प्रतीच्या अंगाचा उल्लेख नाही. शिल्परत्न ( १९·३३–३४½ ) यात २१ विभागांचे 'श्रीकान्त' नावाचे अधिष्ठान दिले आहे. त्याचे थर विभाग येथे दिल्याहून वेगळे आहेत व तेथेही प्रतीचा उल्लेख नाही. मयमतात ( १४–३२ ) या नावाचा पादबन्धाचा प्रकार दिला आहे. ]

अधिष्ठानाच्या उंचीचे २२ भाग करून पादुकेचा उदय दोन भाग, उपोपान एक भाग, दलाचे माप सहा भाग, कंठ एका अंशाने करावा. अब्ज एक अंशाचे करावे. ( ९०, ९१ )

खंडाचे माप तीन अंश व वृत्ताकार दल एकाने, कंप एकाने, कंठ तीन अंश, दलाचे माप एक अंश व दोन भाग पट्टिका असावी. एक अंश दलाचे माप व कंप एकाने करावा. ( ९२, ९३ )

पादबन्धाचा 'सुंदरअंबुज' नावाचा हा प्रकार आहे. ( ९३½ )

अधिष्ठानाचे २८ भागात विभाग करावेत. पादुका दोन भाग असतात असे सांगतात. दलाचे माप तीन अंश, गल एकाने करावा. अंबुज तीन भागांनी करावे. ( ९४, ९५ )

पट्टिकेचे माप दोन भाग, पादुका एक अंश असते असे सांगतात. हे उत्तम ब्राह्मणा, जगती चार भाग व पद्म एक अंश असते. ( ९६ )

सुंदरअम्बुज

नलिनकान्त

आकृती ६.९

कंठ एक भाग व पत्र एक भाग असावेत. कुमुदाची उंची तीन अंश व पद्म एक अंशाने कल्पावे. ( ९७ )

कंप एक अंशानें करावा, त्रिपद्म ( त्रिपट्ट ? ) एक भागाने ( व ) प्रतीचे माप दोन भाग असावे. वाजन एक अंश असावा. ( ९८ )

अशा प्रकारचे 'नलिनकान्त' सर्व देवांना प्रियकर आहे. ( ९८½ )

अधिष्ठानाची उंची २३ भागांत विभागून पादुकेची उंची दीड भाग, उपोपान साडेतीन भाग ( ? ) ( व ) खालील पद्म एक भाग असावेत, व कण्ठ एक अंश असतो असे सांगतात. (९९, १००)

तसेच उद्वेपन ( ? ) एक अंश, कुमुदाची उंची तीन अंश, त्याच्यावर पद्म एक अंश व एक अंश अपमानक ( ? ) असते. ( १०१ )

कंठ दोन अंशांचा असावा व पट्टिका एक अंश असावी. पद्माची उंची एक अंश व आलिंग एक विभागाचा (असावा) (१०२)

त्रिपट्ट तितक्याच अंशांचा (एक अंश), प्रतीचे माप तीन भाग व वाजन एक भाग करावे त्यास श्रीसौंदर्य म्हणतात. (१०३)

हा प्रतिबद्धाचा प्रकार आहे व त्याच्या पुढील प्रकार म्हणजे– (१०३½)

अधिष्ठानाची उंची २४ भागांत विभागून, उपान एक भागाने, दलाची उंची दोन भाग, त्याच्यावर एक अंश कंप, जगति सहा अंशांनी, (१०४, १०५)

श्रीसौन्दर्य

स्कन्दकान्त

अम्बुजकान्त

आकृती ६·१०

कुमुदाची उंची तीन भाग, (व) पद्म एक अंशाने कल्पावे. कंठ एक अंश असतो असे सांगतात. ऊर्ध्वपद्म एक अंश, वाजनाची उंची दोन भागांनी व पद्माची उंची एक अंश, आलिंग एक भागाने, व त्रिपट्ट तेवढाच (एक भाग) असावा. (१०६,१०७)

प्रतीचे माप दोन भाग असावे, वाजन एक भाग (असावा). 'स्कन्दस्कन्द' (स्कंदकान्त ?) नावाचा हा प्रतिबन्धाचा प्रकार आहे. (१०८)

अधिष्ठानाची उंची २३ भागांत विभागून उपानाची उंची एक अंश, अंबुजाचा उदय सहा अंश, (१०९)

कण्ठाचे माप एक अंश, त्यावरील पद्म एक अंश, घटाची उंची तीन अंश, एक अंश पद्म (व एक अंश) कंप (असतो). (११०)

कंप एकाने करावा, कंधराचा उदय दोन भाग असावा. कंपाचे माप एक अंश असून त्यावर तेवढेच (एक अंश) पद्म (असावे.) (१११)

कपोताची उंची तीन अंश व अलिन्द्र (आलिंग ?) एक भाग असते. हा 'अंबुजकांत' नावाचा पादबन्धाचा प्रकार आहे. (११२)

असे अधिष्ठानाचे अनेक प्रकार सांगितले आहेत. अधिष्ठानाची उंची थोडीफार कमीजास्त झाली तरी ते दोषास्पद असत नाही. एक, अर्धा किंवा पाऊण अंश अंगांच्या मापात कमीजास्त झाले तरी चालते. (११३,११३½)

त्रिपट्टाच्या रुंदीचे दोन प्रकार आहेत. खांबाच्या मुळाच्या व्यासाइतकी रुंदी असलेले त्रिपट्टक खांबाच्या मुळापाशी असते. खांबांच्या मधील अंतरात असलेल्या त्रिपट्टाची रुंदी पाऊण दण्ड असते. (११४,११५)

(त्रिपट्टाचे) खांबाच्या बाहेर निर्गमन अथवा अंतर्प्रवेश सारखाच असतो. पट्टाची संख्या, खांबांच्या मधील अंतरात सम (दोन) अथवा विषम (एक किंवा तीन) असावी. (११६)

हंस, मकर, व्याल, भूत यांनी अलंकारिलेल्या प्रतीच्या अग्रावर व्याल, विद्याधर कोरलेले असतात. त्रिपट्टाच्या वर जर प्रती असेल तरच हे कोरीव काम प्रतीवर करावे. (११७, ११७½)

ज्या कुमुदाच्या वर व खाली अंबुज असते ते कुमुद वृत्ताकार असावे. (११८)

इतर सर्व कुमुदांचा आकार प्रतिबन्ध व पादबन्ध जसे असेल त्याप्रमाणे क्रमशः वर्तुळाकार व अष्टकोनी असावा. (११९)

**काश्यपशिल्पातील अधिष्ठानविधी हे सहावे पटल संपले.**

# सातवे पटल

## [ नालीची स्थापना ]

आता विशेषतः निर्माल्यद्वाराचे लक्षण सांगतो. प्रतिबन्धात प्रतीच्या वर व इतरत्र ( इतर प्रकारच्या अधिष्ठानांच्या बाबतीत ) पट्टिकेच्या वर, त्याचप्रमाणे गलाच्या वर, कुमुदाच्या ठिकाणी, वप्राच्यावर किंवा पादुकांच्या वर छिद्र करावे. त्याचप्रमाणे त्याच्यावरती गलाची योजना करावी. ( १, २ )

१२ अंगुलांनी ( २२·८ सें. मी. ) सुरुवात करून तीन तीन अंगुलांनी ( ५·७ सें. मी. ) वाढवीत २४ अंगुलांपर्यंत ( ४५·६ सें. मी. ) ( नालीच्या उंचीचे ) पाच प्रकार होतात. ( ३ )

( नालीच्या उंचीचे ) हे माप भिंतीच्या बाहेरील भागाचे आहे. गर्भगृहातील ( नालीची उंची ) याच्या निम्मे असते; किंवा भिंतीतील भाग सोडून ( नालीची उंची भिंतीच्या ) आत ( गर्भ-गृहात ) व बाहेर सारखीच असते. ( ४ )

आठ अंगुलांनी ( १५·२ सें. मी. ) सुरुवात करून दोन दोन अंगुलांनी ( ३·८ सें. मी. ) सोळा अंगुलांपर्यंत ( ३०·२ सें. मी. ) ( नालीची रुंदी ) पाच प्रकारची असते. ( ५ )

[ नालीचे माप–

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| उंची ( अं. ) | १२ | १५ | १८ | २१ | २४ |
| रुंदी ( अं. ) | ८ | १० | १२ | १४ | १६ ] |

तिच्या ( नालीच्या ) मुळापाशी जेवढी रुंदी असते तिच्या एकपंचमांश किंवा एकतृतीयांश अग्राची रुंदी असते किंवा त्या ( मुळाच्या ) रुंदीइतकीच किंवा पाऊणपट तिची ( नालीची ) रुंदी असते. ( ६ )

नालीच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग छिद्राचे अग्र त्याच्या मुळाहून उंच असावे व तिच्या लांबीत कोठेही उंचसखलपणा नसावा. ( ७ )

मुळापेक्षा अग्र किंचित उंच पाहिजे. मुळापाशी हंसाची आकृती असावी किंवा हत्तीच्या ओठाप्रमाणे ती ( खालच्या बाजूला ) लांबट करावी; ते ( मूळ ) ज्यामुळे सुंदर दिसेल तसे करावे. ( ८ )

व्याल, सिंह किंवा भूत यांनी नाली धरून ठेवली आहे ( असे दाखवावे ). हे सौम्य, अशी नाली प्रासादाच्या मध्यभागी करावी. ( ९ )

या रीतीने ( वर दिलेल्या मापाच्या ) नालीची रचना करून दिव्य अशा गंधोदकाने व आनंदाने नालीची स्थापना करावी. ( १० )

स्थापकाने ( प्रासादाच्या मालकाने ) प्रसन्न मनोवृत्तीने, चांगल्या मुहूर्तावर, शुभ लग्नावर वारुण सूक्त म्हणून शांतिहोम करावा. ( ११ )

स्थापकासह बुद्धिमान स्थपतीने सर्व अलंकारांनी व सर्व प्रकारच्या पाण्याने युक्त अशा नालीची स्थापना करावी. ( १२ )

चुना व गुळाचे पाणी यांनी (नाली) मजबूत बांधावी. नालीसाठी दोन दलांप्रमाणे (कमळाच्या पाकळीप्रमाणे आकार असलेले) घडविलेले पुल्लिंगी दगड वापरावेत. ( १३ )

अशा रीतीने नालीची स्थापना (सांगितली), आता खांबाचे लक्षण सांगतो. ( १४ )

**काश्यपशिल्पातील नाललक्षण हे सातवे पटल संपले.**

# आठवे पटल

## [ खांब ]

हे सुव्रता, आता विशेषतः खांबांची उंची, रुंदी, आकार त्याचप्रमाणे अलंकार (वगैरे) संक्षेपाने (सांगतो) ते ऐक. ( १ )

स्तंभ, तलिप तसेच चर, जंगम किंवा स्थाणू, स्थूण, पाद ही खांबाची पर्यायी नावे आहेत. ( २ )

सांगितलेल्या उंचीच्या मापाची खांबाची उंची असावी किंवा खांबाची उंची अधिष्ठानाच्या उंचीच्या दुप्पट असते. ( ३ )

[ प्रासादाच्या उंचीवर खांबाची उंची अवलंबून असते किंवा धोपट नियम म्हणजे अधिष्ठानाच्या उंचीच्या दुप्पट उंची खांबाची असावी. ]

खांबाच्या तळाची रुंदी खांबाच्या उंचीच्या एकषष्ठांश किंवा अधिक असते. खांबाची रुंदी खांबाच्या उंचीच्या दहा, नऊ (किंवा) आठ भागांपैकी एक भाग असावी. ( ४ )

वरील माहिती लाकडाच्या खांबाच्या तळाची (खांबाच्या खालच्या भागाच्या रुंदीची) आहे. कुडचस्तंभाचे (भितीतील खांबाचे माप) आता सांगतो. त्याच्या (कुडचस्तंभाची रुंदी लाकडाच्या खांबाच्या रुंदीच्या) निम्मे, तीन भागांपैकी एक भाग किंवा चवथा भाग कमी इतकी असते. या सर्व (मापांप्रमाणे) चांगल्या (सुलक्षणी) घरातील कुडचस्तंभाची रुंदी असावी. ( ५, ५$\frac{१}{२}$ )

प्रतीपासून उत्तरापर्यंत असलेल्या खांबाला विशाल स्तंभ म्हणतात. उपानापासून उत्तरापर्यंत असलेल्या खांबाला निखात स्तंभ म्हणतात. ( ६, ६$\frac{१}{२}$ )

(खांबाची) रुंदी उंचीच्या $\frac{१}{७}$ वा $\frac{१}{९}$, $\frac{१}{१०}$ किंवा $\frac{१}{११}$ किंवा $\frac{१}{१२}$ असते. खांबाच्या मुळापासची रुंदी सांगितली. वर सांगितल्याप्रमाणे खांबाच्या उंचीला भागून (म्हणजेच खांबाच्या उंचीचे ७, ९, १०, ११ किंवा १२ भाग करून) खांबाच्या वरच्या टोकाची रुंदी याच्या एक भागाने (मुळाच्या रुंदीपेक्षा) लहान असते. एक ते सोळा मजल्यांपर्यंत असेच करावे. ( ७–९ )

[ खांबाची उंची क्ष अंगुले असेल तर त्याच्या मुळाची रुंदी समजा क्ष/७ असेल. खांबाच्या वरच्या टोकाची रुंदी क्ष ( $\frac{१}{७}-\frac{१}{७}\times\frac{१}{७}$ ) इतकी येईल. ]

मुळापासून अग्रापर्यंत चौकोनी व कुंभ, मण्ड इत्यादींसह असलेला खांब 'ब्रह्मकान्त' म्हणून प्रसिद्ध आहे; अष्टकोनी खांबास 'विष्णुकान्त' म्हणतात. (१०)



आकृती ८·१ : चौकोनी खांब



आकृती ८·२ : ब्रह्मकान्त




आकृती ८·२

[ मण्ड म्हणजे खांबावरील अलंकार, नक्षी वगैरे. विष्णुकान्त नावाचा खांब खालपासून वर-पर्यंत अष्टकोनी असून कुंभ, मण्ड इत्यादींसह असतो. ह्याच अर्थ खाली आलेल्या खांबांसाठी घ्यावयाचा.]



आकृती ८·३ : अष्टकोनी खांब



आकृती ८·४ : वर्तुळाकार खांब

षट्कोनी खांबास 'इन्द्रकान्त' (व) सोळा कोनी खांबास 'चंद्रकान्त' (म्हणतात). कण्ठाच्या मापाने त्याचे (खांबाचे) मूळ व तसेच अग्र कल्पावे. ( ११ )

[ खांबाचा तळ व वरचा भाग सोडल्यावर राहिलेल्या मधल्या भागास कण्ठ म्हणतात. ]

खांबाच्या अग्रापाशी (व मुळापाशी ) त्या प्रमाणात ( श्लोक ९ मध्ये दिलेल्या मापात ) चौकोनी व त्याच्या मध्यभागी अष्टकोनी, सोळाकोनी किंवा वृत्ताकार व कुंभ व मण्ड असलेला ( किंवा ) कुंभ व मण्ड यांच्याशिवाय असलेल्या त्याला ( अशा खांबास ) 'रुद्रकान्त' असे म्हणतात. ( १२, १३ )




रुद्रकान्त




शिवच्छन्द

आकृती ८·५

मुळापेक्षा अग्र ( लांबीने ) मोठे असलेला, मध्यभागी अष्टकोनी व दोन मण्डक असलेल्या खांबास 'रुद्रकान्त' म्हणतात. मुळापासून अग्रापर्यंत वर्तुळाकृती ( गोल ) कुंभ, मण्ड इत्यादी असून त्यांच्यामध्ये (कुंभ व मण्ड यांच्यामध्ये) अष्टकोनी (अशा खांबासही ) तेच ( ' रुद्रकान्त ' ) म्हणतात. ( १४, १४½ )

[ मध्यभागाच्या अष्टकोनी आकाराच्या खाली व वर दोन्ही ठिकाणी भूषविलेला असा दोन मण्डक असलेला या शब्दाचा अर्थ होतो. ]

खालच्या भागास चौकोनी, मध्यभागी अष्टकोनी, त्याच्या वरचा भाग गोल असे असतात की त्यांनी खांबाचे तीन (समान ? ) भाग होतात. (अशा खांबास) शिवच्छन्द म्हणतात व शिवालयात त्याची स्थापना करावी. ( १५, १६ )

( खांबाच्या) मुळाजवळील पद्मासनाची उंची एक, दीड किंवा दोन दण्ड असते. त्याच्या दुप्पट (उंचीचा) कमळाच्या आकाराप्रमाणे पाकळ्यांचा विस्तार करावा. ( १७ )

[ दण्डाची व्याख्या श्लोक ६.१५ मध्ये दिली आहे. ]

त्याच्या मध्ये पायापाशी कर्णिकेची ( कमळाच्या मधल्या भागाची ) स्थापना करावी. जी आवडेल ती आकृती असलेला (व) कुंभमण्डांसह असावा. ( १८ )

पद्मपादुकांत ( मुळापाशी कोरलेल्या कमळाच्या ) तळाशी चक्रवाक दाखवितात. वर असलेल्या पत्रविस्ताराच्या ( पाकळ्यांच्या विस्ताराच्या ) खाली व्याल असेल तर त्याला ' व्यालपादुक ' (खांब) म्हणतात. ( १९ )

(खांबाचे) मूळ जर हत्तीच्या पायासारखे असेल तर त्याला ' गजपाद ' म्हणतात. (अशा खांबाच्या ) मुळापाशी बिंब ( मूर्ती ) वगैरे कोराव्यात व त्याला ( खांबाला ) जसा आवडेल तसा आकार द्यावा. ( २० )

कुंभमण्ड इत्यादींसह असलेले व त्या त्या नावांनी माहीत असलेले (खांब सांगतो). लांबीत वृत्ताकार ( गोल ), हत्तीच्या सोंडेप्रमाणे ( उंचीबरोबर व्यास कमी होत गेलेले ), कुंभमण्ड इत्यादी असलेल्या ( खांबास ) 'शुण्डुपाद ' म्हणतात. ( वरीलप्रमाणेच पण ) मोत्यांच्या हारांनी अलंकारिलेल्या ( खांबास ) पिण्डिपाद म्हणतात. ( २१, २२ )

खांबाच्या अग्रापाशी त्याच्या रुंदीच्या कर्णाच्या मापाचा चौरस असतो ( चौरसाची लांबी व रुंदी $\sqrt{२}$ दण्ड असते. ) त्याच्या खाली अर्धा दण्ड उंचीचे अष्टकोनी कमळ, त्याच्या खाली नक्षी केलेला ( मण्ड ) अष्टकोनी भाग, त्याच्या खाली पूर्वीप्रमाणेच (अर्धा दण्ड उंचीचे ) पद्म व त्याच्या खाली मुळापाशी एक दण्ड मापाच्या चौरसासह ज्याला पूर्वीप्रमाणेच ( ? ) छत्र असते; उरलेला भाग चौकोनी असतो त्यास ' छत्रखण्ड ' म्हणतात. ( २३–२५ )

( वरील खांबास ) अष्टकोनी मध्यपट्ट असल्यास ( त्या खांबास ) ' श्रीकण्ठ ' म्हणतात. मध्यपट्ट जर सोळाकोनी असेल तर त्याला ' श्रीवज्रस्तंभ ' असे म्हणतात. ( २६ )

मुळापासून अग्रापर्यंत चौकोनी असून क्षेपण केलेले ( नक्षी काढलेले ) त्रिपट्ट असतील व पट्ट पानांनी भूषविलेले असतील ( तर अशा खांबास ) क्षेपण स्तंभ म्हणतात. ( २७ )

खांबाच्या आकाराच्या तीन किंवा चार भागांपैकी एक भाग खांबाच्या मध्यभागी शिखा करावी. हा खांब विशेष ( प्रकारचा ) समजतात. ( २८ )

खांबाच्या मुळापाशी खांबाच्या ( मापाच्या ) प्रमाणात कमळे असावीत. खांबाची लक्षणे सांगितली; बोधिकेची लक्षणे ऐक. ( २९ )

**काश्यपशिल्पातील खांबाची माहिती हे आठवे पटल संपले.**

# नववे पटल

## [ बोधिका ]

आता विशेषतः बोधिकेचे पूर्ण लक्षण सांगतो. खांबाच्या मुळाच्या ( रुंदीहून ) सवापट रुंदीची बोधिका श्रेष्ठ, तितक्याच रुंदीची (बोधिका) मध्यम व खांबाच्या अग्राइतक्या रुंदीची कनिष्ठ बोधिका असते. जिची उंची रुंदीइतकी व लांबी पाच दंड असते ती उत्तम बोधिका म्हणून प्रसिद्ध आहे. जिची उंची रुंदीच्या दोनतृतीयांश असते व लांबी चार दंड असते ती मध्यम (बोधिका) सांगितली जाते. जिची उंची अर्ध्या रुंदीइतकी व लांबी तीन दंड असते ती कनिष्ठ बोधिका म्हणून प्रसिद्ध आहे. बोधिका असलेल्या खांबाच्या (बोधिकेचे हे वर्णन आहे. ) (१–४)

बोधिकेच्या तीन भागांपैकी एक अंशाने अर्धपट्टिक (ऊर्ध्वपट्टी ?) असतो. मधल्या अंशात तरंग असतो किंवा (तो भाग) लतादिकांनी भूषविलेला असतो. त्याच्या खाली एक भाग मुष्टिबंध असतो. या अंशात ( खालच्या तिसऱ्या) एक किंवा तीनचतुर्थांश किंवा अर्धा दंड मापाची छाया असते. (५, ६)

[ छाया– मुष्टिबंध म्हणजे मुठीसारखा आकार. हा स्वरूपतः कोरून न काढता मुठीची सावली जशी दिसेल तसा आकार कोरल्यास त्यास छाया म्हणतात. ]

वरती व खाली (तसेच) पट्टिकेच्या खाली छायेचा आकार द्यावा. खालच्या बाजूला बोधिकेच्या आकाराचे अलंकार मी सांगतो. (७)

मध्यभागी रुंदीच्या एकतृतीयांश किंवा एकद्वितीयांश (रुंदीचा) पट्ट असून त्याच्या दोन्ही बाजूंना उरलेल्या जागांना तरंगस्थान म्हणतात. (८)

मधल्या पट्टावर अगदी बारीक कोरीव काम असून तो पाने इत्यादींनी अलंकृत केलेला असतो. त्याच्या दोन्ही बाजूंना तरंग असून ते परस्परांस पूरक असतात. (९)

बोधिकेच्या अग्राची (टोकाची) रुंदी बोधिकेच्या (वर सांगितलेल्या) रुंदीच्या १० (?) किंवा तीनचतुर्थांश किंवा बोधिकेच्या मुळाच्या रुंदीइतकीच असावी. (१०)

बोधिकेचे सहा भाग करून त्यांतील एका भागाइतक्या पट्टिकेसहित ऊर्ध्वपद्म (बोधिकेच्या) कंठाच्या मध्यभागी एक अंशाने करावे. (११)




आकृती ९·१ : श्रेष्ठ बोधिका

अधोपद्म ( कमळाचा दांडा वर व पाकळ्या खाली आलेल्या ) दोन भाग असून वरती पट्ट एक अंश असतो असे सांगतात. खाली असलेले कमळ मधल्या अंशात कल्पावे, असे क्रमाने करावे. ( १२ )

कमळाचा मुकुलाकार ( मिटलेल्या पाकळ्यांच्या आकाराच्या ) भागाचे अग्र खाली जाईल असे करावे. ( कमळाचे ) अग्र बाहेर आहे असे किंवा कमळाच्या छायेप्रमाणे फक्त बाहेरील आकार दिसेल असे करावे. ( १३ )

[ कमळ कोरून काढावे किंवा त्याची फक्त बाह्यरेषा दाखवावी. ]

मुष्टिबंधाच्या अग्राच्या दोन्ही बाजूंना व्याल आदींच्या हाताची ( हाताने आधार दिला आहे अशी ) कल्पना करावी. किंवा मकर, व्याल, पट्टिका इत्यादींनी त्यांना ( दोन्ही बाजूंना ) भूषवावे. ( १४ )

रत्नांचे निरनिराळे बंध, वेली किंवा ( निरनिराळी ) चित्रे यांनी भरलेली पट्टिका असून ज्या बोधिकेच्या मध्ये एक दंड मापाचे ( रुंदीचे ) तरंग असतात, चारी कोनांपाशी पट्ट असून लांबी व उंची ( कोनापाशी ) वर्तुळाकार असते, जी निरनिराळ्या चित्रांनी अलंकृत केलेली आहे अशा बोधिकेला ‘ चित्रबोधिका ’ म्हणतात. ( १५, १६ )

पानांनी जी चित्रित केलेली आहे तिला पत्रबोधिका म्हणतात. महासागराच्या लाटांप्रमाणे दिसणारा तरंग कल्पावा. ( १७ )

( भितीतील ) चौकोनी, अष्टकोनी व गोल खांबांच्या बाबतीत त्यांच्या बोधिकेचे निर्गमन भितीच्या बाहेर अनुक्रमे ( खांबाच्या रुंदीच्या ) पाव, अर्धा व पाऊण भाग असते. ( १८ )

तसेच बोधिकेच्या अग्राच्या वर चौकोनी वीरकण्ठ असतो, त्याची लांबी-रुंदी खांबाच्या अग्राइतकी असून उंची ( लांबी-रुंदीच्या ) पाऊणपट असते. ( १९ )

सर्व तऱ्हेच्या खांबांचा वीरकण्ठ चौकोनी असतो. खाली वीरकण्ठ असतो. ( आता ) फलिकेचे लक्षण ऐक. ( २० )

## फलिका

आता विशेषतः फलिकेचे लक्षण सांगतो. फलिकेची रुंदी तीन दण्ड असल्यास ती कनिष्ठ, अर्ध्या दण्डाने जास्त असल्यास ( साडेतीन दण्ड ) ती मध्यम फलिका. ( २१ )

चार दण्ड रुंदीची लम्भका ( फलिका ) उत्तम असते; किंवा फलिकेची रुंदी कुंभाच्या कर्णा-इतकी असावी. ( २२ )

[ कुंभकर्ण– घटाच्या रुंदीच्या कर्णाइतकी म्हणजे $\sqrt{2}$ × घटाची रुंदी इतकी फलिकेची रुंदी असावी असा अर्थ असावा. कुर्भ असा शब्द नसून कुंभ असा शब्द असावा. श्लोक २५ त फलिकेच्या खाली असलेल्या घटाचा उल्लेख आहे. ]

सर्व प्रकारच्या ( उत्तम ते कनिष्ठ ) फलिकांची उंची पाऊण दण्ड असते. तिच्या उंचीचे तीन भाग केले असता वरच्या एका भागाला ' फलिकासंधी ' म्हणतात. ( २३ )

त्याखाली एक भाग असून त्याच्या खाली असलेला एक अंश कमळ असते किंवा त्याचा आकार नागपत्राप्रमाणे ( नागवेलीच्या पानाप्रमाणे ) असतो. ( २४ )

सर्व फलिकांच्या उंचीचा अर्धा भाग चौकोनी असतो. अशी फलिका करून त्याच्या खाली घट करावा. ( २५ )

दोन दण्ड, पावणेदोन किंवा दीड दण्ड अथवा सवा दण्ड असे घटाच्या उंचीचे चार प्रकार आहेत. ( २६ )

प्रियदर्शन, सौम्य, चन्द्रकान्त आणि श्रीकर अशी अनुक्रमाने या कलशांची नावे आहेत. ( आणि ) ते अनुक्रमाने ( वर्णन करून सांगतो ). ( २७ )

हृदयाच्या भागापाशी घटाच्या उंचीचे नऊ अंश कल्पावेत. कलशाची उंची चार अंश, कंठ एक अंश मापाचा, तोंडाची उंची एक भागाने, पद्म एक भागाने करावे. खालची अर्ध्याहून कमी बाजू वर्तुळाकार नाही अशी शहाण्या माणसाने ( घटाची ) कल्पना करावी. ( २८, २९ )

वरच्या बाजूला अधिक उंची असलेला अशा क्रमाने ( घट ) करावा. ही घटाची उंची सांगितली, आता रुंदी ऐक. ( ३० )

## (घटाची) रुंदी

त्या (घटाच्या) कंठाची रुंदी खांबाच्या रुंदीइतकी कमी असावी. ( कंठाची व खांबाची रुंदी सारखी असावी. ) घटाच्यावरील कंठाचे तोंड विशेषतः ( खांबापेक्षा अधिक ) रुंद असावे. ( ३१ )

[ अस्य शब्द नसून आस्य हा शब्द असावा. ]




आकृती ९·२ : प्रियदर्शन घट

खांबाच्या रुंदीच्या कर्णाइतकी ( $\sqrt{२}$ × खांबाची रुंदी ) घटाची रुंदी सांगितली आहे. हे कल्प जाणणाऱ्या काश्यपा, त्याच्या खाली ( खांबाच्या ) मुळापाशी लसूणाची कल्पना करावी.( ३२ )

[ कल्प– यज्ञयागाविषयी माहिती ज्यात सूत्ररूपाने दिलेली असते त्यास कल्पसूत्रे म्हणतात.]

किंवा ( निराळ्या रीतीने ) बोधिका वगैरेंची उंची मी सांगतो. खांबाच्या उंचीचे ४५ भाग करून खालचा भाग ( मूळ ) दोन अंश असावा. ( ३३ )

( खांबाचा ) वरील भाग एकत्र २२ अंश असतो. बोधिकेची उंची चार अंश व वीरकण्ठ तितकेच ( चार अंश उंचीचे ) असावे. (३४)

फलिकेची उंची पाच अंश व मध्यमूळ एक अंश असावे. घटाची ( ? ) उंची चार अंश व कंठाचे माप एक अंश असावे. ( ३५ )

त्याच्या तोंडाची उंची एक अंश व पद्म एकाने करावे. ( घटाचा खालचा भाग ) वर्तुळाकार अर्ध्याने कमी करावा असे सांगतात. ( ३६ )




आकृती ९·३ : खांबाचे अवयव

[ २२ भाग न होता २१ भाग होतात. त्यांत खांबाचे २४ भाग, दोन भाग मूळ व २२ भाग वरचा भाग हे मिळविले असता एकूण ४५ भाग होतात. खांबाचे मूळ –दोन भाग, वरचा भाग – २२ भाग, बोधिका –४ भाग, वीरकण्ठ –४ भाग, फलिका –५ भाग, मध्यमूळ –१ भाग, कलश –४ भाग, कंठ –१ भाग, तोंड– १ भाग व पद्म –१ भाग असे एकंदर ४५ भाग होतात. ]

लसूण, कमळ, लता, मोती, माळा वगैरे पूर्वीप्रमाणेच करावेत. अशी खांबांची भूषणे असावीत. त्यानंतर वेदिकेचे लक्षण ( ऐक. ) ( ३७ )

**काश्यपशिल्पातील फलकलक्षणविधान हे नववे पटल संपले.**

# दहावे पटल

## [ वेदिकेचे लक्षण ]

आता विशेषत: वेदिकेची सर्व लक्षणे सांगतो. वेदिका अधिष्ठानाच्या वरती व खांबाच्या मुळापाशी असते. ( १ )

[ वेदिका हा भिंतीचा खालचा भाग असतो व तिची उंची खांबाच्या मुळाच्या उंचीइतकी असते. ]

हे ब्राह्मणा, ( मजल्याच्या घराला ) प्रस्तराच्या वरतीदेखील वेदिका करावयास हवी. ( $१\frac{१}{२}$ )

दीड दण्ड मापाची वेदिका कनिष्ठ समजली जाते. दोन दंड उंचीची मध्यम व श्रेष्ठ ( वेदिकेची ) उंची तीन दण्ड असते. ( २, $२\frac{१}{२}$ )

किंवा दुसऱ्या प्रकाराने वेदिकेची उंची सांगतात. खांबाची उंची सहा, सात व आठ भागांत विभागून एक भाग वेदिका असावी व त्याप्रमाणे ( वेदिकेचे ) श्रेष्ठ, मध्यम व कनिष्ठ प्रकार होतात. ( ३, ४ )

[ श्रेष्ठ वेदिकेची उंची = $\frac{१}{६}$ खांबाची उंची;

मध्यम वेदिकेची उंची = $\frac{१}{७}$ खांबाची उंची; कनिष्ठ वेदिकेची उंची = $\frac{१}{८}$ खांबाची उंची. ]

अशी खांबाच्या मुळापाशी वेदिकेची उंची असते. मजल्यांच्या घराबाबतीत वरील मजल्याच्या खांबाच्या उंचीचे सात भाग केले असता एक भाग वेदिकेचा उदय असतो. ( ५, $५\frac{१}{२}$ )

गलाच्या ( खांबाच्या ) उंचीच्या निम्मे ( उंचीचे ) तीन, चार ( किंवा ) पाच भाग केले असता त्यांतील एक भाग वेदिकेची उंची असेल तर तिचे ( अनुक्रमे ) श्रेष्ठ, मध्यम व कनिष्ठ असे प्रकार होतात. ( ६, ७ )







आकृती १०·१ : वेदिका

[ वरच्या मजल्यावर प्रस्तरांच्या वर जी वेदिका असते तिचे उत्तम, मध्यम व कनिष्ठमान दिले आहे. त्या त्या मजल्याच्या खांबांच्या उंचीच्या $\frac{1}{6}$ उंचीइतकी वेदिका श्रेष्ठ, $\frac{1}{8}$ उंचीइतकी वेदिका मध्यम व $\frac{1}{10}$ उंचीइतकी वेदिका कनिष्ठ समजली जाते. नंतर वेदिकेचे अंगविभाग देतात. ]

वेदिकेची उंची सहा अंश असेल तर गलाचे माप तीन अंश, गलाच्या वरील कंप एक अंश व एक अंशाने कमळ कल्पावे. हे श्रेष्ठ ब्राह्मणा, त्याच्यावर एक अंश कंप असावा. ( ८, ८१/२ )

वेदिकेची उंची सात किंवा आठ भागांत विभागून गल अनुक्रमे चार व पाच भाग असतो. कंप, पद्म आणि कंप पूर्वीप्रमाणेच कल्पावेत, किंवा कंठाच्या मानाने त्याच्या मुळापाशी एकच कंप कल्पावा. ( ९, १० )

उरलेली उंची कंठाची सांगितली आहे, किंवा वेदिका कंपाशिवायच असावी, किंवा कमळाची उंची अडीच अंश अथवा दोन अंश असावी. ( ११ )

| [ वेदिकेचा प्रकार | कंप ( भाग ) | कंठ ( भाग ) | किंवा गल ( भाग ) | कमळ ( भाग ) |
|---|---|---|---|---|
| श्रेष्ठ वेदिका | ३ | ३ | ३१/२ | २१/२ |
| मध्यम वेदिका | ३१/२ | ३१/२ | ४१/२ | २१/२ |
| कनिष्ठ वेदिका | ४ | ४ | ५१/२ | २१/२ ] |

किंवा कमळ, डोंगर, उत्तम पानें यांनी वेदिका चित्रित करावी. सर्व वेदिकांचा कंठ खांबांनी भूषविलेला असावा. ( १२ )

भितीतील खांबांच्या रुंदीइतके वेदीच्या स्तंभाचे निर्गमन असावे. ( शेवटल्या मजल्याच्या ) प्रस्तरावर ( व शिखराच्या खाली असलेल्या ) वेदिकेचा प्रवेश हे सुव्रता, ऐक.

[ भितीतील खांबांचे भितीबाहेर जितके निर्गमन असते तितकेच निर्गमन वेदिकेच्या गलावर कोरलेल्या खांबाचे असावे. मजल्यांच्या प्रासादाच्या बाबतीत शेवटल्या मजल्याचा प्रस्तर व शिखर यांच्यामध्ये जो भाग असतो त्यालाही वेदिकाच म्हणतात. तिचे वर्णन खाली श्लोक १५–१६१/२ मध्ये केले आहे. ]

गर्भभितीच्या ( पायातील भितीच्या रुंदीच्या ) तीन भागांपैकी एक भाग किंवा चार भागांपैकी एक भाग अथवा पाच भागांपैकी एक भाग वेदिकेच्या खांबाचा प्रवेश असतो. एक भाग कमी करून उरलेली वेदिकेची रुंदी असते. ( १४, १४१/२ )

प्रस्तरावर वेदिकेचा आकार नागरपद्धतीत चौकोनी असतो. द्राविड व वेसर पद्धतीच्या हर्म्यात ( प्रासादात ) वेदिकेचा आकार अष्टकोनी असतो किंवा वेसर पद्धतीच्या हर्म्यातील वेदिकेच्या अग्रावरील भाग अष्टकोनी असतो. वेदिकेच्या बाजूंच्या मानाने कंठ हा अनेक कोनी ( बाजूंचा ) असतो. ( १५–१६१/२ )

वेदिकालक्षण सांगितले, त्यानंतर जालकलक्षण ( सांगतो. )

**काश्यपशिल्पातील वेदिकालक्षण हे दहावे पटल संपले.**



आकृती १०·२ : वेदिकेवरील नक्षी



आकृती ११-१ : निरनिराळ्या जाळ्या





आकृती ११·४ : निरनिराळ्या जाळ्या



चित्रतोरण



पत्रतोरण

आकृती १२·२



आकृती १२·३ : मकर तोरण



आकृती १२·४ : मकर तोरण

# अकरावे पटल

## [ जाळीचे लक्षण ]

आता विशेषत: जाळीचे लक्षण सांगतो ( ते ) ऐक. खांबांच्या कंठापाशी जाळीचे स्थान असते असे सांगतात. ( १ )

प्रासादात किंवा मोठ्या वास्तूत अंतराळाच्या मध्यभागी फक्त ( जाळी असते ) (एका) खांबापासून ( दुसऱ्या ) खांबापर्यंत अशी ( जाळी ) शहाण्या माणसाने करू नये. ( २ )

हे द्विजोत्तमा, वेदिकेच्या वर जाळीची योजना करावी. जाळीसाठी वेदिकेत कधीही छिद्रे पाडू नयेत. ती सर्व विनाशास कारण होते तेव्हा ज्यामुळे जाळीसाठी वेदिकेत छिद्रे पडणार नाहीत असे करावे. ( ३, ३½ )

कनिष्ठ जाळीची रुंदी दोन दण्ड, तीन दण्डांची जाळी मध्यम ( व ) उत्तम जाळीची रुंदी चार दण्ड सांगितली आहे ( ४, ४½ )

जाळीची उंची तिच्या रुंदीइतकी किंवा एक एक दण्डाने वाढवीत रुंदीच्या दुप्पट असली तर ती जाळी उत्तम समजतात किंवा जाळीची रुंदी व उंची जी योग्य वाटेल ती घ्यावी. (५, ६)

[ वरील श्लोकद्वयांचा अर्थ खाली दिल्याप्रमाणेही लावता येईल.

| जाळीचा प्रकार | रुंदी (दण्ड) | उंची (दण्ड) |
|---|---|---|
| कनिष्ठ | २ | ३ |
| मध्यम | ३ | ५ |
| उत्तम | ४ | ७ किंवा ८ ] |

खांबाच्या रुंदीच्या अर्ध्या मापाने ( जाळीचा ) खांब व कंप यांची जाडी असावी व रुंदी (जाडीच्या) निम्मे किंवा पाऊणपट असावी. ( ७ )

जाळी करताना मधल्या भागी रन्ध्रे टाळावीत. खांब समसंख्यांचे व कंप विषमसंख्यांचे असावेत. ( ८ )

जाळीचे सहा प्रकार आहेत. गोनेत्र, हस्तिनेत्र, नन्द्यावर्त, ऋजुक्रिया, पुष्पकर्ण आणि सकर्ण. ( ९ )

लांबट असून कंठापाशी छिद्र असते त्याला गोनेत्र म्हणतात, चौकोनी असून कर्णापाशी छिद्र असते त्याला हस्तिनेत्र म्हणतात. ( १० )

जीत छिद्रे पंचकोनी असून प्रदक्षिणक्रमाने नन्द्यावर्ताप्रमाणे फुलांची रचना केल्यासारखी मांडलेली असतात अशा ( जाळीस ) नन्द्यावर्त म्हणतात. ( ११ )

दोन्ही खांब व कंप सरळ असून जाळीदेखील सरळ असते ( म्हणजे उभ्या व आडव्या पट्टयांनी चौरस छिद्रे करतात ) त्याला ऋजुक्रिया ( म्हणतात ). नन्द्यावर्तासारखी आकृती असून छिद्रे पुष्पकण्ठाप्रमाणे किंवा देठाप्रमाणे असली ( म्हणजे पुष्पकर्ण व सकर्ण प्रकारची जाळी होते ). ( १२ )

(जाळीचे) दोन्ही खांब व दारे भिंतीच्या मध्यभागाच्या बाहेर असतात. दारे एक किंवा दोन असून ती उघडता किंवा बंद करता येण्यासारखी असतात. (१३)

सभा वगैरेंची जाळी खांबाच्या अर्ध्या उंचीवर असावी. लोखंड, लाकूड यांची किंवा विटांची भिंतीत जाळी असावी. जेथे जे द्रव्य योग्य वाटेल तेथे त्या द्रव्याची जाळी करावी. (१४, १४½)

अशी जाळी (ची माहिती) सांगितली. त्यानंतर तोरणाचे लक्षण (सांगतो). (१५)

**काश्यपशिल्पातील जाळीची माहिती हे अकरावे पटल संपले.**

# बारावे पटल

## [ तोरणाची माहिती ]

आता विशेषतः तोरणांचे लक्षण सांगतो. खांबाच्या उंचीचे दहा भाग केले असता त्यांतील सात भाग चरणोदय असतो. (१)

उरलेल्या तीन भागांना 'झषभाग' म्हणतात. खांबाच्या उंचीचे नऊ भाग केले तर सहा भाग चरणोदय व उरलेले (भाग) झषाची उंची सांगतात. खांबाच्या उंचीचे आठ भाग केले तर पाच भाग खांबांची उंची (चरणोदय) व तीन भाग कंपाची उंची असते. (२, ३)

खांबाच्या उंचीचे किंवा रुंदीचे चार, पाच, सहा (किंवा) सात भाग खांबाच्या बाहेर अशी तोरणाची रुंदी चार प्रकारची असते. (४)

[देव शब्द वेद असावा असे समजून अर्थ केला आहे.]

प्रासाद, मण्डप वगैरेंच्या मध्यभागी तोरण असते. हे ब्राह्मणा, अशा रीतीने भिंतीच्या बाहेर तोरण असावे. (५)

पत्र या नावाचे एक तोरण आहे, दुसरे मकरतोरण, तिसऱ्यास चित्र ही संज्ञा आहे. (असे) तोरणाच्या आकाराचे तीन प्रकार आहेत. (६)

अर्धचंद्रासारखा आकार असलेले, पानाच्या हारांनी भूषविलेले ते पत्रतोरण म्हणून सांगतात. नंतर मकरतोरण सांगतो. (७)

पाच तोंडे असलेले, दोन्ही बाजूंना मगराचे तोंड असलेले, मध्यभागी तळे (किंवा नदी) असून निरनिराळ्या फळांनी व वेलींनी ते वेढलेले असते. (८)

निरनिराळे अलंकार असलेले, वर्तुळाकृती असे मकरतोरण असते. (८½)

वरीलप्रमाणेच (परंतु) मध्यभागी तळे (किंवा नदी) असून त्याच्या दोन्ही बाजूंना नक्राचे तोंड करावे. तसेच भूत, विद्याधर, सिंह, व्याल, हंस इत्यादींनी (व) मोत्यांच्या माळांनी, इतर निरनिराळ्या छत्रांनी, रत्नांच्या समूहांनी भूषविलेले असे चित्रतोरण असते. ही तीनही तोरणे सांगितलीत. (९–११)




आकृती १२·१ : तोरण

चाणाक्ष माणसे अंतराळाच्या खाली तोरणाची योजना करतात. .........त्यांच्या दोन्ही बाजूंना करण्डक पक्षी असतात. ( १२ )

[ श्लोक १३ येथे संदर्भहीन आलेला आहे. तो पुन्हा पटल १५ त श्लोक ७ व ८ म्हणून आला आहे. ]

**काश्यपशिल्पातील तोरण ( व ) कुंभलतालक्षण हे बारावे पटल संपले.**

# तेरावे पटल

## [ वृत्तस्फाटिताचे लक्षण ]

आता विशेषतः वृत्तस्फाटिताचे लक्षण सांगतो. सहा अंगुलांनी ( ११·४ सें. मी. ) सुरुवात करून दोन दोन अंगुलांनी ( ३·८ सें. मी. ) वाढ करीत १६ अंगुलांपर्यंत ( ३०·४ सें. मी. ) त्याच्या रुंदीचे ( व्यासाचे ) सहा प्रकार होतात. ( १, १½ )

त्याचे निर्गमन त्याच्या अर्ध्या रुंदीच्या २/३२ किंवा ३/३२ भाग असते. ते वर्तुळाकार असून तोरणस्तंभाइतकी त्याची रुंदी असते. ( २, २½ )

त्याच्या ( तोरणस्तंभाच्या ) वर ( वृत्तस्फाटित ) कंधरासहित किंवा शुकनासीसह असते; किंवा ते वर्तुळाकार कर्णकूटाच्या आकृतीप्रमाणे कल्पावे. ( ३, ३½ )

[ शुकनासीसाठी पटल २२ पहा व कर्णकूटाच्या माहितीसाठी पटल ३१ पहा. ]

खांबाची उंची चार भाग इतकी असेल तर दोन भाग चरणोदय असतो. प्रस्तराची उंची एक भाग ( व ) शुकनासीची उंची एक अंश असते. तसेच कूटाचे माप असून ते जसे सांगितले असेल त्याप्रमाणे करावे. (४, ५)

किंवा सांगितल्याप्रमाणे आंतरमंच करावा. वर्तुळाकार लतेने भूषविलेले हे वृत्तस्फाटित असते. ( ६ )

[ आंतरमंचाची माहिती पटल २५ त दिलेली आहे. ]

हे ब्राह्मणा, खांबाचे तोरण आणि त्याचप्रमाणे कुंभलता तसेच वर्तुळाकार स्फाटित हे हाराच्या रुंदीवर योजावेत. विशेषाने हर्म्य ( मजल्यांच्या प्रासादांच्या ) इत्यादींच्या खांबांच्या मधील अंतरावर ( ते ) करावेत. ( ७, ८ )

**काश्यपशिल्पातील वृत्तस्फाटितलक्षण हे तेरावे पटल संपले.**

# चवदावे पटल

## [ स्तंभतोरण ]

आता विशेषतः स्तंभतोरणाचे लक्षण सांगतो. खांबाच्या उंचीचे दहा भाग केले तर नऊ भाग शुद्धद्वार होते. ( १ )

[ शुद्धद्वार—दाराची मोकळी चौकट. ]

खांबाचे नऊ भाग केले तर आठ भाग दार असते. किंवा खांबाच्या उंचीचे आठ भाग केले असता दार सात भाग असते. किंवा ( खांबाच्या उंचीचे ) सहा भाग केले तर ५½ भाग दार असावे. भवंगांची उंची, खाली व वर, खांबाच्या उंचीच्या २½ भाग सांगतात. (२–३½ )

[ दार वर व खाली ज्या खोबणींत बसवितात त्यांना भवंग म्हणतात. ]

शुद्धद्वाराची रुंदी शुद्धद्वाराच्या उंचीच्या निम्मे असते. (शुद्धद्वाराच्या) उंचीच्या निम्मे भागात एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात, आठ व नऊ अंगुले मिळवून किंवा कमी करून दाराच्या रुंदीचे असे १९ प्रकार होतात. ( ४, ५ )

असे (दाराचे) प्रकार सांगितले. दाराची उंची तीन प्रकारची असते. सर्व प्रकारच्या हर्म्यांची ( मजल्यांच्या प्रासादांची ) दारे मध्यभागी योजावीत. ( ६ )

[ श्लोक १ व २ मध्ये दिल्याप्रमाणे दाराचे उंचीनुसार चार प्रकार होतात. ]

( दाराच्या ) खांबाच्या रुंदीइतके किंवा त्याच्या सवापट अथवा दीडपट द्वारयोगाची रुंदी असते व त्याच्या निम्मे जाडी असते. ( ७ )

[ द्वारयोग– दाराची कवाडे जेथे येऊन मिळतात त्यास द्वारयोग म्हणतात. ]

किंवा त्याची (द्वारयोगाची ) जाडी १$\frac{१}{८}$, १$\frac{१}{२}$ किंवा $\frac{३}{४}$ असते. ( द्वार ) योगाच्या उंचीचे चार भाग करून उत्तम अग्र एक भाग असते. ( ८ )

बाहेरच्या बाजूला कमळे कोरलेला वरील भाग तीन भाग सांगतात. बाहेरील बाजूला कमळे कोरलेला भूतार त्याच्या खाली असतो. ( ९ )

( द्वार ) योगाइतकी पतंगाची रुंदी असते. मात्र तो ( कोरलेल्या ) कमळाशिवाय असतो. भुवन ( भुवंग ) व पतंग हे मध्यभागी वलयासह ( छिद्रासह ) असतात. ( १० )

( भुवंग व पतंग यांना ) तांबे किंवा लोखंड यांची वळी खिळ्यांनी पक्की ठोकलेली असतात. त्यांच्या ( वळ्यांच्या ) व्यासाचा एकतृतीयांश भागाचा शेंडा जोडणीत ( खोबणीत ) प्रवेश केलेला असतो. ( ११ )

भुवंग इत्यादी जोडणीचे ( खोबणीचे ) भाग दगडाचे असतील तर भुवंग व पतंगांच्या शिखा त्या छिद्रात जातील इतपत असाव्यात. ( १२ )

याप्रमाणे चांगले मजबूत ( दाराची कवाडे ) केल्यानंतर, चांगल्या नक्षत्रावर, शुभ वारी, शुभ होरा व मुहूर्तावर योग ( दाराची कवाडे खोबणीत ) बसविण्याचे काम करावे. ( १३ )

हे ब्राह्मणा, योग स्थापिल्यानंतर पूर्ण शान्तिहोम करावा. ( १३½ )

भिंतीच्या रुंदीचे बारा भाग करून ( योग असा बसवावा की ) बाहेर पाच भाग राहतील व आतील सात भागांच्या सीमेपाशी योगाचा मध्य येईल. योगाची रुंदी त्याच्या आत व बाहेर अशी सारखी असावी. ( १४–१५½ )

[ भिंतीच्या पाच भाग व सात भाग यांच्या सीमारेषेवर योगाची, दरवाजाच्या चौकटीच्या जाडीची मध्यरेषा यावी. श्लोक १ ते १५½ हे पटलाच्या विषयाला धरून नाहीत. पटलाचा विषय आहे स्तंभतोरण हा; पण येथे आला आहे दाराचा विषय. हे श्लोक येथे चुकून आले आहेत. ते वास्तविक सतराव्या पटलातील आहेत. त्यामुळे हे श्लोक व सतराव्या पटलातील पहिले पंधरा श्लोक तेच आहेत. तेव्हा दाराची अधिक माहिती सतराव्या पटलात पाहावी. ]

सर्व अलंकारांसहित ............ किंवा पाच, सहा अगर सातव्या भागात दोन तोरणाग्रे असावीत. ( १६ )

उरलेला (भाग) पादोदय (चरणोदय) म्हणून सांगतात. चौकोनी, अष्टकोनी किंवा वर्तुळाकृती अशा तीन प्रकारची ती दोन तोरणे असावीत. ( १७ )

कुंभ, मण्ड यांच्यासह, पोतिकेने (बोधिकेने) युक्त किंवा पोतिकेशिवाय वीरकाण्ड (वीरकण्ठ) असलेला, भितीतील खांबाच्या रुंदीच्या निम्मे, पाऊणपट किंवा तितकीच (रुंदी) असलेला असा हा, हे ब्राह्मणश्रेष्ठा, तोरणांघ्रिविशाल (नावाचा खांब) सांगतात. ( १७–१९ )

उत्तर, वाजन, कोरलेल्या कमळांचा भाग, क्षुद्रवाजन या क्रमाने व या रीतीने, शहाण्या माणसाने, तोरणांघ्रिविशाल (करावा) किंवा (त्याच्या) उत्तराची उंची पाऊणपट, त्याच्या निम्मे वाजनाची उंची (व) त्याच्या निम्मे गलाचे माप (असावे). ( २०, २१ )

गलाच्या निम्मे क्षेपण (कोरीव काम) सांगितले आहे. त्याच्या निम्मे क्षुद्रवाजन असावे. उत्तर व पोतिकेच्यावर वीरकाण्ड (वीरकण्ठ) असावे. ( २२ )

त्याच्या संधीच्या ठिकाणी (उत्तर व वीरकण्ठ यांच्या संधीपाशी), खाली गेलेल्या अग्रापाशी मकर दाखवावेत. तोरणाच्या पुढील भागाची (अग्राची) रुंदी भितीतील खांबाच्या (रुंदीच्या) निम्मे असावी. ( २३ )

किंवा भितीतील खांबाच्या रुंदीइतकी तोरणाग्राची रुंदी असावी. कुडचस्तंभाच्या वेत्राच्या शेवटाइतकी ( ? ) किंवा त्याच्यापेक्षा एका दण्डाने जास्त असे तोरणाग्राच्या रुंदीचे चार प्रकार सांगतात. ( २४, २४½ )

भितीतील खांबावरील तोरणाची (माहिती) सांगितली, (आता) द्वारतोरण सांगतो. (२५)

दाराच्या इतकी उंची व रुंदी (द्वार) तोरणाच्या खांबाची असते. इतर सर्व (मापे) वरीलप्रमाणेच असतात. (म्हणजे) उत्तर, वाजन किंवा कोरलेली कमळे आणि अष्टमंगल, पाच तोंडे असलेले फलक (हे सर्व) पूर्वी सांगितलेल्या रीतीने करावेत. (द्वारतोरण) वक्त्राख्य, मकराख्य किंवा चित्रतोरणाप्रमाणे करावेत. ( २६, २७ )

[ वक्त्राख्यच्या ठिकाणी पत्रतोरण या अर्थी पत्राख्य हा शब्द असावयास हवा. श्लोक १२·६ पहा. ]

मध्यभागी, वरच्या बाजूला, दोन्ही पार्श्व बाजूंना असलेल्या शूलांसह आरसा, (पाण्याने) पूर्ण भरलेला कुंभ, बैल, चामराची जोडी, श्रीवत्स, स्वस्तिक, शंख (व) दीप हे देव अष्टमंगल असावे. श्रीवत्स मध्यभागी ठेवून उरलेले भाग त्याच्या आजूबाजूंना असतात. ( २८, २९ )

लोखंड, लाकूड किंवा दगड यांनी द्वारतोरण करावे. असे द्वारतोरण असते, (आता) स्तंभतोरण सांगतो. ( ३० )

खांबाची उंची तिनाने विभागून दोन भाग चरणोदय असतो. खांब सर्व अंगांसह पण पोतिकेशिवाय करावा. ( ३१ )

उत्तर, वाजन, अब्ज, क्षेपण व खालचे (निम्न) वाजन, त्याच्यावर निरनिराळी पाने चित्रिलेले असे झषकर्ण असते. ( ३२ )

[ झषकर्ण, श्लोक १२·२ पहा. ]

हे तोरण मकरतोरण असून त्याच्या कंठावर कमळ असावे. सर्व अलंकारांनी भूषविलेले असे हे स्तंभतोरण असते. ( ३३ )

खांबांमधील अंतरांत, हारान्तरांत किंवा कर्णप्रासादाच्या मध्यभागी, शालेच्या अंतराळाच्या मध्यभागी किंवा सर्व घरांना (स्तंभतोरण) असावे. ( ३४ )

स्तंभतोरण सांगितले, कुंभलतेचा विधी ऐक. ( ३५ )

**काश्यपशिल्पातील स्तंभतोरणविधी हे चवदावे पटल संपले.**

## पंधरावे पटल

### [ कुंभस्थललक्षण ]

खांबाच्या मुळापाशी पण वेदिकेच्या वर पद्मासनाची कल्पना करावी. खांबाच्या रुंदीइतकी (त्याची) उंची असते व कमळाची रुंदी खांबाच्या रुंदीच्या सवापट असते. ( १ )

पद्माच्या उंचीचे आठ भाग करून कंप एक अंश असावा. खालील पद्म तीन अंश व गल एक अंश सांगतात. ( २ )

वरचे पद्म दोन भाग व कंप एकाने करावा. त्याच्यावर कमळाच्या उंचीइतकीच उंची असलेला कुंभ असावा. ( ३ )

कुंभाची रुंदी त्याच्या उंचीच्या दुप्पट सांगतात. कुंभाच्या तोंडाच्या वर वलिमण्डलांनी युक्त असा खांबाचा वरचा भाग असतो. (४)

(खांब) कुंभ, मंड यांच्यासह (मात्र) वीरकांडाशिवाय असतो. फलकावर कुंभाच्या मापाचे पद्म कल्पावे. (५)

असे कुंभ व कुंभलता (सांगितल्यात) त्यांचा निराळा प्रकार पुन्हा सांगतो. वरीलप्रमाणेच परंतु संधिकेच्या वर (फलिकासंधी श्लोक ९·२३) प्रयत्नाने बोधिका न ठेवलेल्या (पण) वीरकाण्ड असलेल्या खांबाची कुंभलता (किंवा कुंभ व कुंभलता) सांगितली आहे. स्तंभतोरणाप्रमाणे वरती तोरणालय करावे. ( ७ )

[ स्तंभ कुंभलता या शब्दाऐवजी कुंभ कुंभलता असा शब्द असल्यास त्याचा अर्थ कंसात दिला आहे. ]




आकृती १५·१ : कुंभस्थललक्षण

हे ब्राह्मणा, कुंभलतेची अशी तीन प्रकारची रचना सांगतात. (८)

[ वस्तुतः तीन नसून फक्त दोन प्रकार सांगितले आहेत. पहिल्या प्रकारात बोधिका असते परंतु वीरकण्ठ नसतो, तर दुसऱ्या प्रकारात बोधिका नसून वीरकण्ठ असतो. ]

**काश्यपशिल्पातील कुंभस्थललक्षण हे पंधरावे पटल संपले.**

# सोळावे पटल

## [ वृत्तस्फुटित ]

आता विशेषतः वृत्तस्फुटिताचे लक्षण सांगतो. सहा अंगुलांनी ( ११·४ सें.मी. ) सुरुवात करून दोन दोन अंगुलांनी ( ३·८ सें.मी. ) वाढ करीत सोळा अंगुलांपर्यंत ( ३०·४ सें.मी. ) त्याच्या रुंदीचे ( व्यासाचे ) सहा प्रकार होतात. ( १, १½ )

त्याचे निर्गमन त्याच्या रुंदीच्या निम्मे ( किंवा ) दोनतृतीयांश असते. ( २ )

आतल्या वर्तुळाचा व्यास तोरणस्तंभाच्या रुंदीइतका असतो. त्याच्यावर डुकराच्या तोंडासहित अथवा त्याशिवाय कंधर असतो. ( ३ )

किंवा तेथे वर्तुळाकार कर्णकूटाची आकृती कल्पावी. खांबाच्या उंचीचे चार भाग केले तर दोन भाग चरणोदय असतो. ( ४ )

प्रस्तराची उंची एक अंश व शुकनासीची उंची एक अंश असते. त्याच मापाने कूट असते. ते जसे ( शास्त्रात ) सांगितले आहे त्याप्रमाणे करावे. ( ५ )

किंवा ( शास्त्रात ) सांगितल्याप्रमाणे आंतरमंच करावा. वर्तुळाकार लतेने भूषविलेले असे वृत्तस्फुटित असते. ( ६ )

हे ब्राह्मणा, खांबाचे तोरण ( स्तंभ नावाचे तोरण ) आणि त्याचप्रमाणे कुंभलता तसेच वर्तुळाकार स्फुटित हे हाराच्या रुंदीवर योजावेत. विशेषतः हर्म्य इत्यादींच्या खांबांच्या मधील अंतरावर ( ते ) करावे. ( ७, ८ )

**काश्यपशिल्पातील वृत्तस्फुटिताचे लक्षण हे सोळावे पटल संपले.**

# सतरावे पटल

## [ द्वाराची स्थापना ]

[ या व चवदाव्या पटलातील श्लोक १ ते १५ सारखेच आहेत. तेव्हा १ ते १५ श्लोकांचा अर्थ १४.१–१५ तेथे बघावा. ]

दक्षिणेकडील ( उजव्या हाताच्या ) कवाडाला द्वारपट्टिका असावी. द्वारपट्टिकेची रुंदी तीन, चार किंवा पाच अंगुले ( ५·७, ७·६ किंवा ९·५ सें. मी. ) असावी. ( १६ )

[ घरातून बाहेर पडताना उजव्या हाताकडे जे कवाड येते त्याला द्वारपट्टिका असावी. शिल्परत्न २२·९४ पहा. ]

तिच्या ( द्वारपट्टिकेच्या ) तीन भागांपैकी एक भाग निर्गमन असते; किंवा या कवाडांचे निर्गमन या निर्गमनाच्या दुप्पट सांगतात. ( १७ )

द्वारपट्टिकेच्या दोन्ही बाजूंस निर्गमनाच्या आत ( निर्गमन सोडून उरलेल्या भागात ) परंतु मध्यभागी लोखंडी वर्तुळाकृती कड्या असाव्यात व त्या खिळ्यांनी पक्क्या बसविलेल्या असाव्यात. ( १८ )

कवाडाच्या बाहेरील व तसेच आतील बाजूंना लोखंडाचे किंवा लाकडाचे त्रिमंगल असावे. त्याचे निर्गमन त्याच्या उंचीच्या निम्मे असावे. ( १९ )

कवाडे जेथे एकमेकांस मिळतात तो भाग लोखंडानें व लाकडाने मजबूत करावा. ( साखळी-प्रमाणे असलेल्या ) कडीसह ती कवाडे ( सहज ) उघडता व बंद करता येण्यासारखी असावीत. ( २० )

तेथे सर्व अवयव मजबूत असून दार मध्यसूत्रात असावे. प्रासादात, मण्डपात त्याचप्रमाणे गोपुरातदेखील अशीच ( दारांची ) योजना करावी. ( २१ )

[ श्लोक २०½ सर्वेषां घटयन् तत्र मध्यसूत्रक्रिया चरेत् । असा घेऊन अर्थ लावला आहे. मूळ पुस्तकातील श्लोकार्ध अशुद्ध आहे ]

असे दार सांगितले, आता कंपद्वार ऐक. ( २२ )

**काश्यपशिल्पातील दाराच्या स्थापनेबद्दलचे सतरावे पटल संपले.**

# अठरावे पटल

## [ कंपद्वाराचे (खिडकीचे) लक्षण ]

आता कंपद्वाराचा संपूर्ण विधी सांगतो. ( कंपद्वार ) प्रासाद, मण्डप यांच्या चारी दिशांना किंवा उपदिशांना असते. ( १ )

त्यांच्यामधील ( प्रासाद, मंडप यांच्यामधील ) अंतराळात किंवा आकाशाकडे जेथे मुख येईल अशा ठिकाणी, हे ब्राह्मणश्रेष्ठा, चांगल्या कंपद्वाराची योजना करतात. ( २ )

दोन कवाडे असलेले, पाच हात ( २.२८ मीटर ) इतकी मोठी रुंदी असलेले, जमिनीपासून उत्तराच्या कडेपर्यंत उंची असलेले कंपद्वार असावे. ( ३ )

[ येथे वस्त्रद्वीतकृतं हा शब्द पत्रद्वीतकृतं असा घेतलेला आहे तसेच पत्तिव्यासयुक्तं हा शब्द पंक्तिव्यासयुक्त असा घेऊन वरील श्लोकाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न केला आहे. ]

भुवंग, पतंग आणि योग मागे सांगितलेल्या जाडीचे करून आतमध्ये ( खिडकीच्या आत ) मजबूत बसवावेत. ( ४ )

योगाच्या व्यासाइतकी जाडी असलेला, खांबाच्या इतकी उंची असलेला, मूळ व अग्र यांच्यासह तरंग खांब असावा. ( ५ )




आकृती १८·१ : कंपद्वार

भुवंग व पतंग यांच्या छिद्रात तरंग खांब मजबूत बसवावा. ( ५½ )

आंतर खांबांची संख्या चार, सहा, आठ किंवा दहा, बारा किंवा १४ अथवा १६ असते. आंतरखांबांतील अंतर असे असावे की, कोणीही त्यांच्यामधील अंतरातून आत किंवा बाहेर जाऊ शकणार नाही. ( ६, ७ )

कवाडाच्या योगाप्रमाणे (खोबणीत) आंतरखांब स्थापावेत. प्रत्येक कंपद्वाराला कवाड वगैरेंची झरोक्यासह योजना करावी. (८)

कवाडात दोन किंवा तीन झरोके ( झडपा ) असाव्यात. हत्तीनेदेखील हलणार नाही असे भरभक्कम दार बांधावे. ( ९ )

[ व्योमग्रास–आकाशाचा लहानसा तुकडा असा अर्थ करून त्या अर्थी झरोका हा शब्द वापरला आहे. ]

कंपद्वार सांगितले, त्यानंतर प्रस्तर ऐक. ( १० )

**काश्यपशिल्पातील कंपद्वाराचे ( खिडकीचे ) लक्षण हे अठरावे पटल संपले.**

# एकोणिसावे पटल

## [ प्रस्तरलक्षण ]

आता विशेषतः प्रस्तराचे लक्षण सांगतो. खांबाच्या निम्म्याने किवा खांबाच्या उंचीच्या निम्म्याने मंचकाचे (प्रस्तराचे उंचीचे ) माप असते. (१)

(हस्तलिखितांत चूक असल्याने द्विरुक्ती झाली आहे.)

प्रस्तराच्या उंचीचे २१ भाग करून त्यांत तीन भाग उत्तर असतो. वाजन एक भागाने, भूत-माला तीन भाग असते. (२)

भूतमालेच्यावर वाजन एक भागाने, कपोताची उंची सात अंश, आलिंग एक भागाने (असतो.) (३)




आकृती १९·१ : प्रस्तर (१)

अंतरित एक अंशाने करावे, प्रतीची उंची तीन अंश, वाजन एक भागाने करावे आणि दुसऱ्या प्रकाराने-(४)

उंचीचे १९ भाग करून उत्तर तीन भाग, एक भागाने वाजन करावे, तीन अंशांची वलभी (वेलबुट्टी काढलेली पट्टी ) असावी. (५)

वाजन एक भागाने (व) कपोताची उंची सहा अंश असावी. आलिंग एक अंश व एक अंशाने अंतरित असावे. (६)

प्रतीची उंची दोन भाग व वाजन एक भागाने असते. अशी ( निरनिराळ्या थरविभागांची) उंची सांगितली, आता अंगजात (प्रस्तराचे निरनिराळे थर, विभाग व त्यांचे निर्गमन) सांगतो. (७)

खांबापासून पोतिकेचे जेवढे निर्गमन तेवढे बोधिकेपासून उत्तराचे निर्गमन असते. वाजनाचे उत्तरापासून निर्गमन वाजनाच्या उंचीइतके असते. (८)




आकृती १९·१ : प्रस्तर (२)

वाजनाच्या बाहेर वलभीचे निर्गमन वलभीच्या उंचीइतके असते, किंवा उंचीच्या पाऊणपट अथवा तिच्या निम्मे किंवा खालील वाजनाच्या रुंदीइतके निर्गमन असते. (९)

वाजनानंतरच्या कपोताचे निर्गमन होमाच्या निर्गमनाइतके असते, किंवा (कपोताचे निर्गमन अधिष्ठानाच्या) उपानाच्या कडेपर्यंत अथवा जगतीच्या अंतापर्यंत असते. (१०)

[ येथे कपोताची कडा व होम किंवा अधिष्ठानाचे उपान अथवा जगती यांची कडा समसूत्रांत असतात असे सांगितले आहे. ]

वाजनापेक्षा कपोताचे निर्गमन अर्धा दण्ड अथवा एक दण्ड किंवा दीड दण्ड असते. वाजनापासून कपोताचे निर्गमन व आलंबन सारखे असते. (११)

[ आलंबन म्हणजे आधार. कपोतासाठी जो आधार (आधारपट्टी) असतो त्याचे निर्गमन कपोताच्या निर्गमनाइतकेच असते. ]

कपोत गोपानासह किंवा गोपानाशिवाय असतो. बाहेरील खांबाप्रमाणे असून त्यास कुलिंगप्रति (?) म्हणतात (?). (१२)

आलिंग व अंतरित यांचे प्रवेश किंवा अंतर्गमन त्यांच्या उंचीइतके असतात. वाजनाच्या उंचीइतकेच वाजनाचे निर्गमन सांगितले आहे. (१३)

उत्तराच्या अग्राचे निर्गमन एक, पाऊण किंवा अर्धा दण्ड असते. उत्तराला शोभेल असे वाजनाचे अंतर्गमन असते. (१४)

[ हे बहुधा दुसऱ्या प्रकारच्या उत्तराचे व वाजनाचे निर्गमन सांगितले असावे किंवा उत्तर व वाजन यांच्या निर्गमनाचा हा दुसरा प्रकार असावा. कपोताच्या निर्गमनाचेही असेच प्रकार सांगितले आहेत. श्लोक १० व ११ पहा. ]

उत्तरावरील भाग वलभी (वेलबुट्टी काढलेली पट्टी) तसेच वर्तुळाकार (वर्तुळात बसविलेले) हंस इत्यादींनी भूषवावे. निरनिराळ्या पानांनी व लतांनी कपोत आणि कर्णपालिका (अलंकाराव्यात.) (१५)

प्रतीचे अग्र (वरील भाग) मकरीबंध (मगरांचे निरनिराळे आकृतिबंध), प्रतिसिंह वगैरेंनी भूषविलेले असते. हे ब्राह्मणश्रेष्ठा, अशी ज्याला प्रस्तरवर्ग म्हणतात त्याची (माहिती) सांगितली. (१६)

**काश्यपशिल्पातील प्रस्तरलक्षण हे एकोणिसावे पटल संपले.**

# विसावे पटल

## [ गलभूषण ]

आता विशेषतः गलाच्या अलंकारांचे लक्षण सांगतो. वरील भागाची जी उंची ते गलाचे माप असते असे सांगतात. (१)

[ सगळ्यांत वरच्या मजल्याच्या वर वेदिका व तीवर गल (कण्ठ) असतो व त्यावर शिखर असते. ]

किंवा त्या उंचीच्या निम्मे (उंची) गलाचे माप सांगितले जाते. त्याच्या उंचीच्या तिसरा, चवथा किंवा पाचवा भाग किंवा उरलेला सर्व भाग (म्हणजे अर्धा) वेदिकेची उंची असते. उरलेला गलाचा उदय म्हणजे ती (वेदिका) सोडून उरलेली गलाची उंची सांगतात. (२, २½)

वेदिकेच्या रुंदीचे चार, पाच किंवा सहा अंश केले असता गलाची रुंदी अनुक्रमे तीन, चार व पाच भाग असते. ( ३, ३½ )

[ गलाची रुंदी = ¾ किंवा ⅘ किंवा ⅚ वेदिकेची रुंदी. ]

खांबाचा वेदिकेत जेवढा प्रवेश असतो तेवढाच खांबाचा प्रवेश गलामध्ये असतो; किंवा




आकृती २०.१ : गलभूषण

त्याच्या पाऊणपट अथवा निम्मे गलामध्ये खांबांचा प्रवेश असतो. असे निरनिराळ्या पद्धतींनी कर्त्याच्या ( घराच्या मालकाच्या ) इच्छेप्रमाणे (गल) करावा. ( ४, ५ )

नागरपद्धतीत कण्ठ ( गल ) चौकोनी (व ) द्राविड पद्धतीत गल अष्टकोनी असतो व वेसर-पद्धतीत गल वर्तुळाकार असतो. गलाचे माप ( आकार ) त्या त्या पद्धतीप्रमाणे करावे. ( ६ )

प्रत्येक दिशेला भद्रासहित नासिका व नकुलखांब असावा. गलाची उंची २४ अंश असेल तर गलोदय १६ अंश असतो. ( ७ )

उत्तराची उंची ३ अंश व वाजन गलाच्या एक भागाइतके असते किंवा दोन भाग किंवा निरनिराळ्या मापाचा असतो ( किंवा ) वाजनाची उंची एक भाग (फक्त) असते. ( ८ )

[ श्लोक फार अशुद्ध आहे आद्वंश या ठिकाणी द्विय्रंश असा शब्द धरून अर्थ दिला आहे. ]

उत्तराचे गलापासून निर्गमन ( त्याच्या उंचीच्या ) अर्धे असावे. वाजन वगैरेंचे ( निर्गमन ) पूर्वीप्रमाणेच असते. ( ८½ )

[ वाजन वगैरेंची माहिती पटल १९ मध्ये दिली आहे. ]

किंवा, गलाच्या उंचीचे बारा भाग सांगतात. उत्तराची उंची तीन अंश, वाजनाची उंची एक अंश, त्याच्या निम्मे ( अर्धा अंश ) मुष्टिबंध असून मध्यभाग दीड अंश सांगतात. (९, १०)

कमळणीची उंची तीन अंश ( व ) पट्टिका एक अंश असावी. दण्डकेची उंची दीड अंश व वर्णपट्टिका एक अंश असते. ( ११ )

त्याच्यावर गोपान किंवा लुपारोहण कल्पावे. वाजन वगैरेंचे निर्गमन त्यांच्या उंचीइतके असावे. ( १२ )

गलाच्या वरच्या भागापासून शिखरावर असलेल्या पद्मभागापर्यंत जो भाग त्याला गोपान म्हणतात.

याप्रमाणे गलाची उंची व रुंदी अलंकारांसहित सांगितली. ( १३ )

**काश्यपशिल्पातील गलविधान हे विसावे पटल संपले.**

# एकविसावे पटल

## [ शिखराचे लक्षण ]

आता विशेषाने शिखराचे लक्षण सांगतो. वरील मजल्याच्या खांबाच्या उंचीइतकी शिखराची उंची असते. ( १ )

किंवा अर्ध्या (की सव्वापट ? ) उंचीइतकी शिखराची उंची असते. किंवा जर रुंदीइतकीच ( शिखराची उंची असेल ) तर त्याचे निर्गमन, वलभी व वाजन यांच्या निर्गमनाहून एक, दीड, किंवा दोन दण्ड ( जास्त ) असते. आधाराचे निर्गमन तितकेच असते. ( २, ३ )




आकृती २१·१ : शिखर

त्याच्या निर्गमनाइतकीच वलभीपासून कपोताची उंची असते. कपोताच्या वरती शीर्षाची उंची वलभी व वाजन यांच्या (उंची)इतकी असते. (४)

शिखराच्या मध्याची रुंदी कंपाच्या निर्गमनाइतकी असते, किंवा (रुंदी) तेवढीच (कंपा-इतकीच), त्याच्या पाऊणपट किंवा निम्मे अशी चार प्रकारची असते. (५)

तेथे ( शिखराच्या ) रुंदीच्या पाच भागांपैकी फलिकेची रुंदी तीन भाग असते. शिखरावरील वलिकस्थान उंचीच्या पाचवा भाग असते. ( ६ )

( शिखराच्या उंचीचे ) चार भाग संपल्यानंतर फलिका वर्तुळाकृती करावी. तीन, चार किंवा पाच अंगुले ( ५·७ सें. मी., ७·६ सें. मी. किंवा ९·५ सें. मी. ) बलिक (आणि) तसेच मण्डल असते. ( ७ )

त्याच्या रुंदीच्या एकचतुर्थांश आतील वर्तुळाची जाडी असते. दोन किंवा समसंख्यांची शिखराभोवती ही वर्तुळे कल्पावीत. (८)

वलिकेच्या खाली व वर तिच्या उंचीच्या निम्मे उंची असलेले वेत्र असते. वलिकेच्या व्यासाचे पाच भाग केले तर पद्माची रुंदी दोन अंश असते. ( ९ )

शिखराच्या मापाच्या शेवटापर्यंत (शीर्षाच्या टोकापर्यंत) पद्माची उंची सांगितली आहे. पद्माच्या उंचीचे तीन भाग केले असता एक भाग कुंभाच्या खालचा अवलग्नक ( बारीक भाग ) असतो. (१०)

(अ)वलग्नाच्या तीन भागांपैकी एक भाग कुंभाच्या वर कन्धर (गल) असतो. कन्धराच्या तिप्पट कुंभ व त्याच्या एकतृतीयांश कूश्मल असते. (११)

कंधरापेक्षा कुंभाच्या मधल्या भागाची रुंदी खूपच जास्त असते. बलिकाच्या नंतर शीर्षाच्या मध्यापासून रुंदी क्रमाक्रमाने कमी कमी करावी. ( १२)

मध्यापासून वाजनापर्यंत क्रमाक्रमाने रुंदी कमी करावी व ( म्हणजेच ) त्यापासून ( वाजनापासून ) कपोताच्या कडेपर्यंत क्रमाक्रमाने रुंदी खूप वाढवीत जावी. (१३)

शिखराच्या उंचीच्या निम्मे किंवा पद्माच्या उंचीच्या निम्मे स्तूपीची उंची असते. स्तूपीच्या उंचीचे २२ भाग केले तर पद्म दीड भागाने व कंप अर्धा भाग सांगतात. गल अर्धा भाग मापाचा (व) तितकाच (अर्धा भाग) वरचा कंप असतो. पद्म एक अंशाने करावे. (१४, १५)

पाच भाग घटाची उंची, कंप अर्धा अंश मापाचा ( व ) पद्म एक अंशाने करावे. कंप अर्धा अंश मापाचा (असावा.) ( १६ )

कुंभ पाच अंश (व) कंप दोन अंश सांगतात. पद्म एक अंशाने करावे. पालिकेची (लहान कुंभाची) उंची एक भागाने, पद्म अर्ध्या भागाने, पद्म अर्ध्या भागाने व उरलेले ( म्हणजे एक भाग ) कूश्मल असते. शिखराच्या आकाराप्रमाणे कुंभ, फलिका (?) व त्याचप्रमाणे कूश्मल असावे. ( १७, १८ )

नागर ( पद्धतीत ) शीर्ष चौकोनी, द्राविड (पद्धतीत ) अष्टकोनी व वेसर ( पद्धतीत ) गोल असते. याप्रमाणे अनुक्रमाने शिखराचा आकार असतो. ( १९ )

निरनिराळ्या पानांनी, लतांनी शिखर भूषवावे. असे शिखराचे लक्षण (सांगितले), नासिकेचे लक्षण ऐक. ( २० )

**काश्यपशिल्पातील शिखरलक्षण हे एकविसावे पटल संपले.**

# बाविसावे पटल

## [ नासिका लक्षण ]

आता विशेषत: नासिकेचे संपूर्ण लक्षण सांगतो. शिखरावरती (त्याच्या) रुंदीइतकी (रुंदीची) ललाटनासिका सांगतात. ( १ )

शिखराच्या रुंदीच्या तिसऱ्या, चवथ्या व पाचव्या भागाइतकी रुंदी असलेल्या नासिका क्रमाने उत्तम, अधम व ( मध्यम प्रकारच्या असतात. ) ( २ )

[ बहुधा क्रम उत्तम, मध्यम व अधम असावा. ]

प्रसिद्ध महानासी तीन प्रकारची सांगतात. नासीचे निर्गमन शिखराइतके किंवा ( त्याच्या ) पाऊणपट अथवा निम्मे असते. ( ३ )




आकृती २२·१ : महानासी

त्या ( शिखराच्या ) उंचीच्या एकतृतीयांश किंवा एकचतुर्थांश उंची कमी करून उरलेल्या उंचीइतकी (म्हणजेच शिखराच्या उंचीच्या दोनतृतीयांश किंवा तीनचतुर्थांश ) उंची नासीची असते. सांगितलेल्या उंचीच्या निम्मेदेखील ( नासीची उंची ) सांगतात. ( ४ )

नासीच्या उंचीच्या निम्मे तिच्या ( नासीच्या ) वरील शक्तिध्वजाची उंची असते. किंवा तीनचतुर्थांश अथवा तीन भागांपैकी एक भाग त्याची (शक्तिध्वजाची ) उंची असते. ( ५ )

त्या शक्तिध्वजाची उंची तीन भागांत विभागून दोन भाग किंनरीवृत्र ( वक्त्र ? ) असते व त्यातून उरलेले ( एक भाग ) गळाचे माप असते. ( ६ )

( शक्तिध्वजाच्या ) दण्डाची ( ? ) रुंदी गळाच्याइतकी ( एक भागाइतकी ) असते व किंनरी-मुखाची ( रुंदी ) त्याच्या दुप्पट ( दोन भाग ) असते. शक्तिध्वजाच्या वरती पत्र ( खड्ग ) किंवा शूल असतो. ( ७ )

शूलाची उंची किनरीमुखाच्या उंचीइतकी असावी. पत्र (खड्ग) सांगितलेल्या प्रमाणात जसे सुंदर दिसेल तसे असावे. (८)

मुखपट्टीची रुंदी एक दण्ड किंवा नासीच्या (रुंदीच्या) अर्धी असते. (किंवा अर्धा दण्ड असते.) मुखपट्टिका वेली, मण्डल, छत्र वगैरेंनी भूषवावी. (९)

मुखपट्टी सोडून उरलेल्या भागाला गाढ (अवगाढ ?) म्हणतात. त्याच्याखाली दोन पट्ट असतात व तीन नाली (अंतरित) असलेल्या प्रतीने भूषविलेले असते. (१०)

(अवगाढ) शूलाप्रमाणे, स्थलाप्रमाणे (जमिनीप्रमाणे), व्यालासह किंवा नाटकातील दृश्यासहित, लहान माळा, कूटकोष्ठ इत्यादींनी भूषविलेले असावे. किंवा विमानाप्रमाणे (विमान पद्धतीच्या प्रासादाप्रमाणे) दाखवावे. (११)

किंवा पत्र अथवा चित्रतोरण आणि मकरतोरण असावेत. तोरणाच्या मध्ये (हत्तीच्या सोंडेने) पाण्याचा अभिषेक होत असलेली लक्ष्मी दाखवावी. (१२)

निरनिराळ्या प्रकारांनी किंवा इतर पद्धतींनी नासिकेचे अवगाढ सुशोभित करावे. महानासी भद्रासह व सर्वांगयुक्त खांब असलेली करावी. (१३)

[नासिकार्धाच्या ऐवजी नासिगाढं असा शब्द असावा असे समजून त्याप्रमाणे अर्थ केला आहे.

सर्वांग–खांबाचे कुंभ, नक्षीचा भाग (मण्ड), कमळ वगैरे जे अलंकार व अवयव असतात त्यांना सर्वांग म्हणतात.]

उत्तर, वाजन, अब्ज आणि क्षेपण नासिकेत कल्पावेत. विशेषतः नासिकेच्या कण्ठाच्या भागी (ते) तिच्या रुंदीच्या प्रमाणात असावेत. (१४)

नासिकेच्या खांबाची रुंदी वरील मजल्याच्या खांबाच्या रुंदीइतकी किंवा त्याच्या निम्या-इतकी असावी. त्याची (खांबाची) उंची कंठाच्या उंचीइतकी असते. (१५)

[ऊर्ध्वस्तंभ या शब्दाऐवजी ऊर्ध्वभूस्तंभ असा शब्द धरून अर्थ केला आहे.]

खांब अष्टकोनी, गोल, चौकोनी किंवा त्याच्या (ऊर्ध्वभूस्तंभाच्या) आकाराचा असावा. नासिकेची रुंदी दोन किंवा तीन दंड असते. (१६)

नासिकेच्या खांबाची बाहेरची कडा सोडून उरलेली नासिकेची रुंदी असावी. नासिकेच्या खांबाच्या मध्ये तिच्या मूर्तीची स्थापना करावी. (१७)

[येथे नासिकेची रुंदी दोन किंवा तीन दण्ड असते, ती नासिकेच्या खांबांची रुंदी सोडून सांगितलेली आहे.

नासिका ज्या देवाच्या मन्दिराच्या शिखरावर असेल त्यावर नासिकेत बसविलेल्या मूर्तीचा प्रकार अवलंबून असतो. शिवालयाच्या शिखरावर शंकराच्या अनेक प्रकारच्या मूर्तींपैकी एक मूर्ती नासिकेत बसविलेली असते.]

ही महानासी सांगितली, क्षुद्रनासीचा विधी ऐक. क्षुद्रनासीची रुंदी दीड, दोन किंवा तीन दण्ड असते. (१८)

तिच्या (क्षुद्रनासीच्या) रुंदीच्या एकतृतीयांश किंवा एकचतुर्थांश भाग कमी करून उरलेली तिची उंची असते. कपोताच्या आधारापासून क्षुद्रनासीची उंची कल्पावी. (१९)




आकृती २२·२ : क्षुद्रनासिका

[ नागोच्चं याऐवजी नासोच्चं हा शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

प्रतिवाजनाच्या सीमेपर्यंत तिच्या ( क्षुद्रनासीच्या ) शक्तिध्वजाची उंची असते. तिच्या उंचीचे तीन भाग करून एक भाग कंठाचे माप असते. ( २१ )

नासी ताल वगैरेंनी भूषवून ती निरनिराळ्या अलंकारांसह असावी. कपोताच्या प्रत्येक चवथ्या भागावर स्वस्तिकाची आकृती असावी. ( २२ )

[ व्यासं च्याऐवजी नासी हा शब्द घेऊन अर्थ केला आहे. प्रत्येक मजल्याच्या कपोतावर स्वस्तिकाकृती असावी असाही अर्थ होऊ शकेल. ]

कूट, शाला व पंजर ( यांच्यातील अंतराच्या ) मध्यभागी अल्पनासिका ( क्षुद्रनासी ) असावी. ‘ भद्र ’नासिका विशेषतः शिखरावर कल्पावी. ( २३ )

शालेच्या पुढच्या बाजूला ‘ ललाट ’ नावाची नासिका असावी. ( २४ )

नासिकालक्षण सांगितले, त्यानंतर प्रासादाचे माप ( सांगतो. ) ( २५ )

**काश्यपशिल्पातील नासिकालक्षण हे बाविसावे पटल संपले.**

## तेविसावे पटल

### [ प्रासादाची मापे ]

आता विशेषाने प्रासादाचे माप सांगतो. प्रासाद, सदन, सद्म, हर्म्य, धाम, निकेतन, मन्दिर, भवन, वास, गेह, दिव्यविमान, आश्रय, आस्पद आणि तसेच आधार, प्रतिधिष्ण्य हे सर्व प्रासादाचे पर्यायशब्द आहेत. तेव्हा येथे दुसरी काही ( माहिती ) न सांगता ( प्रासादाची ) मापे सांगतो. (१–३)

आठ धरांनी ( यूका ) एक यव होतो व आठ पिपींनी ( ऊ ) एक धर होतो. आठ पिशुनांनी (उवा) (मिळून) वालाग्र संज्ञेचे माप होते. (४)

लहान मुलाच्या डोक्यावर केस असतात त्यांच्या अग्राच्या मापाइतक्या (वालाग्राच्या) एक-अष्टमांश जे माप मिळते ते मूळमाप समजले जाते. (५)

[सायं हा शब्द न घेता तो साष्टं असा घेतला आहे. श्लोक ४ व ५ अशुद्ध आहे. आठ यूका = १ ऊ, ८ उवा = १ वालाग्र, ८ वालाग्र = १ यव अशी मापे सर्वसाधारणतः शिल्पशास्त्रात दिलेली असतात.]

सात संख्येच्या यवांच्या रुंदीला मध्यम अंगुल म्हणतात. सहा संख्येच्या यवांच्या रुंदीला अधम अंगुल म्हणतात. (६)

तांदुळाच्या चार दाण्यांच्या लांबींनी उत्तमसंज्ञक अंगुली होते. तीन तांदुळांनी (लांबींनी) अधम अंगुली होते असे सांगतात. (७)

श्वेतशाली (पांढरा तांदूळ), महाशाली (लांबट तांदूळ), त्याचप्रमाणे रक्तशाली (तांबडा तांदूळ), सौगन्धी (सुगन्ध असलेला तांदुळाचा प्रकार), हेमशाली (सोन्याप्रमाणे पिवळा तांदूळ) असे शालीचे (तांदुळाचे) पाच प्रकार आहेत. (८)

त्यांमधील रक्तशालीची लांबी अर्ध्या अंगुलाइतकी असते. हे ब्राह्मणश्रेष्ठा, असे एकंदर सहा प्रकारांनी अंगुलाचे माप सांगतात. (९)

[ १) ७ यव = १ मध्यम अंगुल २) ६ यव = १ अधम अंगुल
३) ४ शाली = १ उत्तम अंगुल ४) ३ शाली = १ अधम अंगुल
५) २ रक्तशाली = १ अंगुल ६) ८ यव = १ उत्तम अंगुल हा सहावा प्रकार असावा.]

एका अंगुलाला चन्द्र, जीव, शिवांश, व्योम वगैरे म्हणतात. आणि तसेच वृक्ष, पंख, अश्विनौ हे दोन अंगुलींचे संज्ञक (शब्द) आहेत. (१०)

तीन अंगुलांना काल, अनल, रुद्राक्ष, शूल, आलेखन, गुण अशा संज्ञा आहेत. वेद, अब्धि, युग, कोलक या चार अंगुलांच्या संज्ञा होत. बाण, भूत, इन्द्रिय अशा पाच अंगुलांच्या संज्ञा आहेत... (११, १२)

सहा अंगुलांना सार, चारमक, ऋतू, कौशिक म्हणतात. सात अंगुलांचे विधान पाताळ, ऋषी, धाता किंवा......(१३)

[सार नसून सम शब्द पाहिजे. सम म्हणजे सहा ताऱ्यांचे कृत्तिका नक्षत्र.

धातं असा शब्द नसून धातू असा शब्द पाहिजे. सप्तधातू हा सात या आकड्याला पर्याय-शब्द आहे.]

माता, लेक आणि तसेच स्मर हे सात अंगुलांकरिता (पर्यायशब्द) आहेत. आठ अंगुलांच्या संज्ञा हत्ती, पर्वत, वसू, मूर्ती अशा आहेत. नऊ अंगुलांना शक्तिद्वार किंवा गृहद्वार, सूत्र, अनन्तघन, आद्य, द्विज असे म्हणतात. (१४, १५)

[लेक शब्द नसून तो लोक, सप्तलोक हा असावा. स्मर म्हणजे नऊ कामस्थाने.]

दहा अंगुलांना आठासह नाडिका, धर्म अशा संज्ञा आहेत. ११ अंगुलांना कंशात तसेच रुद्र असे म्हणतात. (१६)

( २३. १७–२९ )

[ कंशात हा शब्द अशुद्ध असून त्रिष्टुप्, ११ अक्षरांचा छन्द, हा शब्द पाहिजे. ]

बारा अंगुलांना अब्द, भास्कर, भानू अशी संज्ञा आहे. १३ अंगुलांना चंद्र, आदित्यशिवांश असे म्हणतात. ( १७ )

[ आदित्य + शिवांश = १२ + १ = १३ ]

१५ अंगुलांना पक्ष, तिथी म्हणतात व १६ अंगुलांना कला, मूर्तींद्रिय अशी संज्ञा आहे. (१८)

पंचवीस आणि तीस आणि तसेच चाळीस, पन्नास, साठ, सत्तर, ऐंशी, नव्वद, शंभर. ( १९ )

तिसांना प्रत्यय, पन्नासांना जगति, सुगति आणि तसेच सत्वरि, ( साठांना ) सशक्व, (७० अंगुलांना ) तुष्टी, (८० अंगुलांना ) पुष्टी, ( ९० अंगुलांना ) धृति व ( १०० अंगुलांना ) सुध्रित असे दहा इत्यादींपासून शंभरापर्यंत नावे आहेत. अकरा, शंभर आणि तसेच हजार, अयुत– (२०, २१ )

नियुत, प्रयुत, कोटि, अर्बुद, ब्रूत, खर्वट, निखर्व, शंख, पद्म, समुद्र, मध्यम, अंतर, आद्य, पर ( व ) परार्ध अशा दहांनी वाढणाऱ्या संख्या आहेत. ( २२, २२½ )

उत्तम बारा अंगुलांनी एक स्तम्भ ( ? ) होतो. ( २३ )

२४ अंगुलांचा ( ४५·६ सें. मी. ) एक कृष्णहस्त होतो असे शहाणे सांगतात. श्रेष्ठ व मध्यम अंगुलांनी श्रेष्ठ व मध्यम हस्त मोजावा. ( २४ )

त्या चारांनी ( चार हातांनी ) एक दण्ड होतो. त्याने कापड मोजावे. २५ अंगुलांच्या ( ४७·५ सें. मी. ) हाताला शहाणे प्राजापत्य हात म्हणतात. (२५)

२६ अंगुलांनी ( ४९·४ सें. मी. ) धनुर्मुष्टि होते. २७ अंगुलांनी ( ५१·३ सें. मी. ) धनुर्ग्रह होतो. २८ अंगुलांनी ( ५३·२ सें. मी. ) प्राच्य व २९ अंगुलांनी (५५·१ सें. मी. ) वैदेह ( हात ) होतो. ( २६ )

३० अंगुलांनी ( ५७ सें. मी. ) वैपुल्य होतो. ३१ अंगुलांनी (५८·१ सें मी.) प्रकीर्णक ( हात ) होतो. असे प्रत्येक ( श्रेष्ठ, मध्यम व अधम ) हातांचे, हे ब्राह्मणश्रेष्ठा आठ प्रकार आहेत. ( २७ )

२४ अंगुलांच्या भेदांनी अधम, मध्यम व उत्तम असे पुन्हा या हातांचे प्रकार होतात. ( २७½ )

[ श्लोक २४ मध्ये २४ श्रेष्ठ अंगुलांचा एक श्रेष्ठ हात होतो, २४ मध्यम अंगुलांचा एक मध्यम होतो व २४ अधम अंगुलांचा एक अधम हात होतो म्हणून सांगितले आहे. वर दिलेल्या प्राजापत्य ते प्रकीर्णक या हातांची श्रेष्ठ, मध्यम व अधम प्रकीर्णक ते प्राजापत्य हात असे पुन्हा श्रेष्ठ, मध्यम व अधम प्रकारच्या अंगुलांच्या मापांवरून पुन्हा प्रत्येकी तीन प्रकार होतात. उदा., श्रेष्ठ अंगुलांनी श्रेष्ठ प्रकीर्णक हात होतो, ३१ मध्यम अंगुलांनी मध्यम प्रकीर्णक हात होतो वगैरे. ]

धनुर्ग्रह, प्रकीर्णक यांनी ब्राह्मणाचे घर मोजावे. वैपुल्य व धनुर्मुष्टि यांनी क्षत्रियाच्या घराचे ( मोजमाप ) घ्यावे व तसेच प्राजापत्य हाताने शूद्र ( वगैरे ) जातींची घरे मोजावीत. ( २८, २९ )

वरच्या जातींकरिता सांगितलेला हात हीन जातींकरिता वर्ज्य समजावा. आणि हीन (किंवा) अधिकारी ब्राह्मणांना मोठा हात शुभावह असतो. (३०)

सर्वांकरिता वर सांगितलेले हात घरांकरिता (घरांच्या मोजणीकरता) योग्य आहेत. इतर (प्रकारचे) हात सर्व देवांच्या प्रासादाकरिता योग्य असतात. (३१)

कृष्णहस्त (२४ अंगुलांचा, ४५·६ सें. मी.) सर्व जातींच्या घरास योग्य आहे. वाहनें, शयन (पलंग वगैरे) इत्यादी कृष्णहाताने मोजावीत. (३२)

आरामोद्याने (बाग, पुष्करिणी) वगैरे प्राजापत्य हातांनी मोजावीत. गावे वगैरे धनुर्मुष्टींनी मोजावीत. (३३)

विहिरी, नद्या, उद्यानें वगैरे धनुर्ग्रहाने मोजावीत किंवा कृष्णहाताने सर्व वस्तू मापाव्यात. (३४)

**काश्यपातील (काश्यपशिल्पातील) प्रासादांच्या मापाचे लक्षण हे तेविसावे पटल संपले,**

# चोविसावे पटल

## [मानसूत्र इत्यादी]

आता विशेषतः मानसूत्राचे लक्षण सांगतो. तीन किंवा चार हातांनी सुरुवात करून (१·३७ मी. ते १·८२४ मी.), दोन दोन हातांनी (०·९१२ मी.) वाढ करीत नऊ किंवा दहा हातां-पर्यंत (४·१०४ ते ४·५६ मीटर) असे सम व विषम प्रत्येकी चार चार मिळून आठ प्रकारचे माप (एक मजली घराच्या रुंदीचे) होते. (१, २)

[३, ५, ७ व ९ हात विषम मापांचे व ४, ६, ८ व १० हात सम मापांचे अशी आठ निरनिराळ्या रुंदीची घरे. हस्तेनार्ककरं म्हणजे १२ हातांपर्यंत हा शब्दसमूह येथे लागू होत नाही. संस्कृत श्लोक अशुद्ध आहे. ]

पाच व सहा हातांनी (२·२८ मी. व २·७३६ मी.) आरंभ करून दोन दोन हातांनी (०·९१२ मी.) वाढ करून १५ हात (६·८४ मी.) किंवा १६ हातांपर्यंत (७·२९६ मी.) तीन मजल्यांच्या आभास (हर्म्यांच्या रुंदीचे) माप होते. (३)

[सम व विषम मिळून १२ प्रकार होतात.

५, ७, ९, ११, १३, व १५ तसेच ६, ८, १०, १२, १४ व १६ हात रुंदी ]

सात व आठ हातांनी (३·१९२ व ३·६५८ मी.) सुरुवात करून (दोन दोन हातांनी वाढवीत) १५ व १६ हातांपर्यंत (६·८४ व ७·२९६ मी.) असे सम व विषम मापाचे चार किंवा पाच मजली (आभास हर्म्यांचे) दहा प्रकार होतात. (४)

( २४. ५–१२ )

हे ब्राह्मणोत्तमा, रुंदीचे सात, सहा, पाच भाग करून त्यांत क्रमाने सहा, पाच व चार भाग मिळवावे. ( ५ )

आणि तसेच रुंदीच्या दुप्पट व त्याच्यात $\frac{१}{८}$ अधिक मिळवून ( म्हणजे रुंदीच्या २$\frac{१}{८}$ पट ) असे आभास सदनाच्या उंचीचे, हे ब्राह्मणा, पाच प्रकार होतात. ( ६ )

शान्तिक, पौष्टिक आणि तसेच जयंत, अद्भुत आणि त्याचप्रमाणे सार्वकामिक अशी अनुक्रमाने त्यांची नावे आहेत. (७)

[ समजा प्रासादाची रुंदी ‘क्ष’ आहे तर,

शान्तिक प्रासादाची उंची = क्ष (१+$\frac{६}{७}$) = $\frac{१३}{७}$ क्ष,

पौष्टिक प्रासादाची उची = क्ष (१+$\frac{५}{६}$) = $\frac{११}{६}$ क्ष;

जयंत प्रासादाची उंची = क्ष (१+$\frac{४}{५}$) = $\frac{९}{५}$ क्ष;

अद्भुत प्रासादाची उंची = २ क्ष;

सार्वकामिक प्रासादाची उंची = २$\frac{१}{८}$ क्ष = $\frac{१७}{८}$ क्ष.

आभास हर्म्य चौरस असल्याने लांबी व रुंदी सारखीच असते.]

रुंदीमध्ये ( नेहमी ) दोन दोन हातांनी ( ०·९१२ मीटर ) वाढ करावी. आभासहर्म्य सांगितले. आता विकल्पहर्म्याचे माप ऐक. (८)

नऊ, दहा हातांपासून (४·१०४, ४·५६ मी.) ५५ व ५६ हातांपर्यंत (२५·०८ मी. व २५·५३६ मी.) दोन दोन हातांनी वाढवून (सम व विषम मापाचे मिळून) २४ प्रकार होतात. ( ९ )

पाचव्या मजल्यापासून सुरुवात करून १२ व्या मजल्यापर्यंत अधम, मध्यम व उत्तम असे क्रमाने विकल्पाचे प्रकार होतात. ( १० )

[

| मजली घराची रुंदी | विषम (हात) | | | सम (हात) | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | अधम | मध्यम | उत्तम | अधम | मध्यम | उत्तम |
| ५ | ९ | ११ | १३ | १० | १२ | १४ |
| ६ | १५ | १७ | १९ | १६ | १८ | २० |
| ७ | २१ | २३ | २५ | २२ | २४ | २६ |
| ८ | २७ | २९ | ३१ | २८ | ३० | ३२ |
| ९ | ३३ | ३५ | ३७ | ३४ | ३६ | ३८ |
| १० | ३९ | ४१ | ४३ | ४० | ४२ | ४४ |
| ११ | ४५ | ४७ | ४९ | ४६ | ४८ | ५० |
| १२ | ५१ | ५३ | ५५ | ५२ | ५४ | ५६ ] |

३६ हात ( १६·४१६ मी.) रुंद व ५७ हात (२५·९९२ मी. ) उंच असे तेरा मजली घर करावे. ते मला फार आवडते आहे. ( ११ )

५७ हात (२५·९९२ मी. ) रुंद, नऊ हातांचा (४·१०४ मी. ) मंचक असलेले व १६ मजली शिवमन्दिर शंकराला आवडते असते. ( १२ )

असे विकल्प सांगितले. आता छन्द (हर्म्याचे) माप ऐक. १३, १४ हातांपासून (५·९२८, ६·३८४ मी.) दोन दोन हातांनी वाढवून ६५ व ६६ हातांपर्यंत (२९·६४० व ३०·०९६ मी.) रुंद असे २७ प्रकार होतात. चार मजल्यांपासून १२ मजल्यांपर्यंत छिन्दहर्म्य असते. (१३, १४)

[

| मजले | रुंदी (हात) | | | मजले | रुंदी (हात) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | अधम | मध्यम | उत्तम | | अधम | मध्यम | उत्तम |
| ४ | १३ | १५ | १७ | ९ | ४३ | ४५ | ४७ |
| ५ | १९ | २१ | २३ | १० | ४९ | ५१ | ५३ |
| ६ | २५ | २७ | २९ | ११ | ५५ | ५७ | ५९ |
| ७ | ३१ | ३३ | ३५ | १२ | ६१ | ६३ | ६५ ] |
| ८ | ३७ | ३९ | ४१ | | | | |

अधम, मध्यम व उत्कृष्ट असे चार मजल्यांचे प्रमाण असते. १७ व १८ हातांपासून (७·७५ व ८·२०८ मी.) तीन तीन हातांनी (१·३६८ मी.) वाढ करून ९५ व ९६ हात (४३·३२ व ४३·७७६ मी.) असे उंचीचे पूर्वीइतकेच (२७) प्रकार असतात. उंचीच्या मानाने अधम, मध्यम व उत्कृष्ट असे भेद होतात. (१५, १६)

[

| मजले | उंची (हात) | | | मजले | उंची (हात) | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | अधम | मध्यम | उत्तम | | अधम | मध्यम | उत्तम |
| ४ | १७ | २० | २३ | ९ | ६२ | ६५ | ६८ |
| ५ | २६ | २९ | ३२ | १० | ७१ | ७४ | ७७ |
| ६ | ३५ | ३८ | ४१ | ११ | ८० | ८३ | ८६ |
| ७ | ४४ | ४७ | ५० | १२ | ८९ | ९२ | ९५ |
| ८ | ५३ | ५६ | ५९ | | | | |

सम हातांचा (१८ हातांपासून) उंचीचा हिशोब वरीलप्रमाणे काढता येईल.]

छिन्द (छन्द ?) तल असे सांगितले आता जातिहर्म्याची माहिती ऐक. १७, १८ हातांपासून (७·७५, ८·२०८ मी.) दोन दोन हातांनी वाढवून ६९ व ७० हातांपर्यंत (३१·४६४, ३१·९२ मी.) २७ प्रकार ४ मजल्यांपासून १२ मजल्यांपर्यंत होतात. (१७, १८)

हे सुव्रता, ही रुंदी सांगितली, आता उंची ऐक. २३ व २७ हातांपासून (१०·४८८ व १२·३१२ मी.) तीन तीन हातांनी (१·३६८ मी.) वाढवीत १०० हातांपर्यंत (४५·६ मी.) उंचीचे पूर्वीइतकेच (म्हणजे २७) प्रकार होतात. अधम, मध्यम आणि उत्तम रुंदी व उंची हे क्रमाने घ्यावेत. (१९, २०)

[वर दिलेला रुंदी-उंचीचा हिशोब योग्य तो सुधारून पुढील तक्त्यात त्यांची मापे दिली आहेत.

| मजले | रुंदी (किंवा लांबी) हात | | | उंची हात | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | अधम | मध्यम | उत्तम | अधम | मध्यम | उत्तम |
| ४ | १७ | १९ | २१ | २२ | २५ | २८ |
| ५ | २३ | २५ | २७ | ३१ | ३४ | ३७ |
| ६ | २९ | ३१ | ३३ | ४० | ४३ | ४६ |
| ७ | ३५ | ३७ | ३९ | ४९ | ५२ | ५५ |
| ८ | ४१ | ४३ | ४५ | ५८ | ६१ | ६४ |
| ९ | ४७ | ४९ | ५१ | ६७ | ७० | ७३ |
| १० | ५३ | ५५ | ५७ | ७६ | ७९ | ८२ |
| ११ | ५९ | ६१ | ६३ | ८५ | ८८ | ९१ |
| १२ | ६५ | ६७ | ६९ | ९४ | ९७ | १०० ] |

असे २७ प्रकारचे जातिविमान सांगितले. हे ब्राह्मणश्रेष्ठा, जाति, छन्द, विकल्प आणि आभास या सर्वच हर्म्यांच्या बाबतीत– ( २१ )

[ श्लोक २२ व २३ अशुद्ध आहेत, त्यामुळे अर्थ लागणे दुर्घट झाले आहे. ]

प्रासादाची रुंदी भितीतील खांबांच्या बाहेर किंवा त्या खांबांच्या आत किंवा त्या खांबांच्या मध्यभागातील अंतराने घ्यावी. ( २४ )

उंची उपानापासून स्तूपीच्या टोकापर्यंत किंवा शिखराच्या टोकापर्यंत ( मोजावी ). सभा, मण्डप, शाला यांची रुंदी भितीच्या मध्यापासून ( मोजावी ). (२५)










आकृती २४·१ : प्रासादाची रुंदी व उंचीची मापे घेण्याच्या पद्धती.

भिंतीच्या मध्यभागी, खांबाच्या बाहेर किंवा मध्यभागी किंवा आतमध्ये किंवा भिंतीच्या बाहेर असलेल्या खांबाच्या बाहेर किंवा आतमध्ये किंवा त्या खांबाच्या मध्यभागी, हे ब्राह्मणश्रेष्ठा, मानसूत्र टाकतात. भिंतीच्यामध्ये जर खांब असतील तर खांबांच्या ठिकाणी भिंतीची रुंदी मापासाठी घेतली जाते. ( २६,२७ )

भिंतीच्या बाहेर असलेल्या खांबांच्या बाबतीतही वरीलप्रमाणेच ( मानसूत्राची योजना करावी ) असे सांगतात. प्राकाराच्या भिंतीसाठी मानसूत्र भिंतीच्या मध्यापाशी, भिंतीच्या बाहेर किंवा भिंतीच्या आतमध्ये असते. ( २८ )

वाहने आणि पलंग ( वगैरे शयन ) यांच्या मध्यभागी मानसूत्र असते. असे सर्व प्रकारच्या घरांबद्दल मानसूत्र सांगितले. ( २९ )

कूटशाळेचे निर्गमन मानसूत्राच्या बाहेर कूटाच्या रुंदीइतके, रुंदीच्या तीनचतुर्थांश किंवा रुंदीच्या निम्मे असते, किंवा $\frac{१}{४}$, १$\frac{१}{२}$ अथवा १$\frac{१}{४}$ इतके मानसूत्राच्या बाहेर (कूटाचे) निर्गमन असते. ( ३०,३०$\frac{१}{२}$ )

अथवा कूटाच्या अवयवांचे निर्गमन दंडाच्या प्रमाणात असते. एक दंड, अर्धा दंड, दोन दंड, दीड दंड, तीन दंड इतके मानसूत्राच्या बाहेर ( कूटाचे ) निर्गमन असते. ( ३१,३२ )

मानसूत्राच्या आतमध्ये ( कूटाचा ) प्रवेश कधी नसावा; ( नाही तर ) ते नेहमीच संकटांस कारणीभूत होते. म्हणून सर्व प्रयत्नांनी (कूटाचे निर्गमन) मानसूत्राच्या बाहेरच असावे. (३३)

जे विन्याससूत्र आहे ते समसूत्राप्रमाणे होमाच्या आतील सूत्राप्रमाणे ( अधिष्ठानाच्या खाली जे होम त्याची आतली कडा दाखविणारे सूत्र ) असते. किंवा होमाच्या बाहेरील सूत्राप्रमाणे ( होमाची बाहेरील कडा दाखविणारे सूत्र ) विन्यास सूत्र असते. ( ३४ )

मानसूत्र, विन्याससूत्र व अवसानसूत्र हे तिन्ही थोडक्यात सांगितले. हे ब्राह्मणा, आता आयादिकांचे लक्षण ऐक. ( ३५ )




आकृती २४·२ : निरनिराळी सूत्रे

[ खांबांच्या किंवा भिंतीच्या बाहेरून बाहेरून किंवा आतून आतून किंवा मध्यातून टाकलेले जे सूत्र ते मानसूत्र. अधिष्ठानाच्या बाहेरून बाहेरून म्हणजे होमाच्या आतून आतून टाकलेले ते विन्याससूत्र व होमाच्या बाहेरून बाहेरून टाकलेले ते अवसानसूत्र होय किंवा प्रकृतीच्या बाहेरून बाहेरून टाकलेले ते अवसानसूत्र होय. ]

**काश्यपशिल्पातील मानसूत्रांदींचे लक्षण हे चोविसावे पटल संपले.**

# पंचविसावे पटल

## [ आय इत्यादींची लक्षणे ]

आता विशेषतः आय इत्यादींचे प्रत्यक्ष लक्षण सांगतो. प्रासादाच्या मापाच्या (हातात मोजलेली रुंदी तिच्या ) सहाव्या भागाला तिनाने गुणावे व आठाने भागावे. जो शेष येईल त्याने ब्राह्मणादी योनि समजेल ( १,१½ )

[ ' तमसेधकरं ' हा अशुद्ध शब्द आहे म्हणून त्याचा अर्थ समजत नाही. ]

प्रासादमानाला आठाने गुणून २७ ने भागले म्हणजे जी शेष ( संख्या ) येईल तिने नक्षत्र मिळते. ( २ )

प्रासादाच्या परिमितीला ( लांबी+रुंदी यांचे हाताने मोजमाप घेऊन ) नवाने गुणून साताने भागिले म्हणजे जी शेष ( संख्या ) येईल तिने रविवारादी वार येतात. प्रासादाची रुंदी हाताने मोजून तिला तिनाने गुणून ३० ने भागिले म्हणजे जी शेष ( संख्या ) येईल ती प्रतिपदादी तिथी दाखविते. प्रासादाची उंची हातात मोजून त्याला आठाने गुणून दहाने भागिले असता येणारी शेष ( संख्या ) आय दर्शविते. ( ३–४½ )

प्रासादाच्या उंचीला ( उंची हातांनी मोजून येणाऱ्या मापाला ) नवाने गुणून दहाने भागिले असता जी शेष ( संख्या ) येते तीस व्यय म्हणतात. आय नेहमी मोठा व व्यय ( आयापेक्षा ) लहान असावा. ( ५,५½ )

( आयांमध्ये ) ध्वज, सिंह, बैल व हत्ती हे आय ( तसेच ) गुरू, शुक्र, बुध व सोम हे वार शुभ असतात. ( ६ )

यजमानाचे जन्माचे नक्षत्र व प्रासादाचे नक्षत्र यांत विरोध येता कामा नये. तसेच यजमानाची जन्मतिथी व वास्तूची तिथी यांत विरोध येऊ नये. म्हणजे ते स्वतःला ( प्रासादाच्या मालकाला ) शुभावह असते. ( ७ )

अशा निरनिराळ्या पुष्कळ रीतींनी ( शुभाशुभ पाहून प्रासादाचे ) शुभ माप ( रुंदीचे ) घ्यावे. ( ७½ )

किंवा रुंदी व लांबी हातांत मोजून त्यांचा गुणाकार करून त्याला ( क्षेत्रफळाला ) आठाने गुणून बाराने भागावे, जी शेष ( संख्या ) येईल ती आय दर्शविते. ( ८,८½ )

( प्रासादाच्या क्षेत्रफळाला ) विशेषतः नवाने गुणून १२ ने भागावे, जी शेष ( संख्या ) येईल तिला व्यय म्हणतात. ( ९ )

( प्रासादाच्या क्षेत्रफळाला ) आठाने गुणून २७ ने भागिले असता जी शेष ( संख्या ) येईल ती दिवस ( नक्षत्र ? ) दाखविते. ( प्रासादाच्या क्षेत्रफळाला ) तिनाने गुणून आठाने भागिले असता जी शेष ( संख्या ) येईल त्याने ध्वज इत्यादी योनी मिळतात. ( १० )

[ योनि व आय हे एकाच अर्थी शब्द ग्रंथकाराने वापरले आहेत. ]

प्रासादाची (हाताच्या मापानें लांबी, रुंदी मोजून) परिमिती काढावी. तिला नवानें गुणून सहाने भागावे जी शेष (संख्या) मिळेल ती रविवार इत्यादी वार दर्शविते. त्याला (परिमितीला नवाने गुणून) ३० ने भागिले म्हणजे जी शेष (संख्या) येते तिने तिथी मिळते. (११)

पूर्वी सांगितल्याप्रमाणे शुभाशुभ पहावे व शुभ (आय, तिथी, वार, नक्षत्र इत्यादी) मिळत असतील तर ते प्रासादाचे माप ग्राह्य धरावे. तीन, पाच, दोन, चार, सहा, आठ, व नऊ ही नक्षत्रे नेहमीच इष्ट सिद्धी देणारी सांगितली जातात. इतर (नक्षत्रे अशुभ समजून) पूर्णतया वर्ज्य करावीत. (१२, १२½)

[दोन धननक्षत्र, ४ क्षेत्रनक्षत्र, ६ साधननक्षत्र, ८ मित्रनक्षत्र, ९ हे परममित्रनक्षत्र. तेव्हा ही नक्षत्रे शुभ आहेत. मात्र पाचवे नक्षत्र हे अनोळखी नक्षत्र समजले जाते म्हणून जरी ते ग्रंथकाराने शुभ म्हटले असले तरी अशुभ मानले जाते.]

राजाच्या (किंवा) कर्त्याच्या (प्रासाद बांधणाऱ्या मालकाच्या) जन्मनक्षत्रापासून प्रासादाच्या नक्षत्रापर्यंत (संख्या) मोजावी. हे बुद्धिमान ब्राह्मणा, फक्त शुभावह संख्या (३, ५, २ वगैरे वर दिल्याप्रमाणे) आल्यास तो प्रासाद लाभदायक समजावा. (१३, १३½)

(प्रासादाच्या कर्त्याची) जन्मलग्न किंवा चंद्रलग्न राशीपासून आठवी येणारी रास व प्रासादाची रास एक असल्यास तो दुष्ट योग आहे. त्याने विनाश ओढवतो म्हणून असा (अशा मापाचा) प्रासाद वर्ज्य समजावा. (१४)

शूल इत्यादी योग दोषपूर्ण असतात असे सांगतात (तेव्हा) तेही वर्ज्य करावेत.

आय इत्यादींची (माहिती) अशा रीतीने सांगितली, नागर इत्यादी (प्रासादांचे) विधान ऐक. (१५)

[आयाचे आठ प्रकार आहेत. १) ध्वज, २) धूम्र, ३) सिंह, ४) कुत्रा, ५) बैल, ६) गाढव, ७) हत्ती व ८) कावळा. यांतील विषम स्थानांतले आय शुभ समजतात व सम स्थानातील आय अशुभ समजतात.

वार सात आहेत, राशी बारा व नक्षत्रे २८ (अभिजित धरून) आहेत. ज्योतिषशास्त्राप्रमाणे मित्र व शत्रू रास, शुभाशुभ नक्षत्रे व आयव्ययादींचे शुभाशुभ फळे जाणतात. जसे लग्नाच्या वधुवरांच्या कुंडल्या बघून ती परस्परांस अनुरूप आहेत की नाही हे पाहतात त्याप्रमाणे मालकाची कुंडली व प्रासादाची कुंडली यावरून परस्परांना ते किती अनुरूप आहेत हे वर दिलेल्या आय, व्यय, नक्षत्रादी पाहून ठरविले जाते.]

## नागर इत्यादी विमाने

नागर इत्यादी विमानांची लक्षणे आता सांगतो. हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंतच्या मधील (भागास) देश म्हणतात. (१६)

ज्याप्रमाणे देह धारण करणाऱ्याचे शरीर वात, पित्त व कफ यांचे बनलेले असते किंवा जसे हे जग त्रिगुणात्मक–सात्त्विक, राजस व तामस– असे तीन भागांत मानले जाते त्याप्रमाणे हा देशदेखील त्यात उद्भवणाऱ्या निरनिराळ्या गुणधर्मांप्रमाणे तीन भागांत विभागलेला आहे. (१७, १८)

हिमालयापासून विंध्य पर्वतापर्यंतची जमीन 'सात्त्विक' असून विंध्यापासून कृष्णा, वेण्णा नद्यांपर्यंतची जमीन 'राजस' समजली जाते. ( १९ )

कृष्णा, वेण्णांपासून कन्याकुमारीपर्यंतची जमीन 'तामस' आहे. सात्त्विक प्रदेशात नागर पद्धती, तामस देशात वेसर पद्धती व द्राविड देशात, जेथे कामदेवाची पूजा होते, राजस पद्धती आहे.

सात्त्विक देशातील नागर पद्धतीचे 'हर्म्य', तामस देशातील वेसर पद्धतीचे 'आलय' व राजस देशातील द्राविड पद्धतीचे हर्म्य हे अनुक्रमाने पुल्लिंगी, नपुसकलिंगी व स्त्रीलिंगी असतात. विष्णू, शंकर व ब्रह्मा ह्या अनुक्रमे ( नागर, वेसर व द्राविड पद्धतीच्या ) प्रासादांच्या देवता आहेत. ( २०–२२ )

[ श्लोक २१½त पुण्डशियोषितः हा शब्द आला आहे तो सुधारून पुषण्डयोषितः असा करून अर्थ दिला आहे. ]

नागर पद्धतीचा ( प्रासाद ) ब्राह्मण ( वर्णाचा ) जाणावा, वेसर पद्धतीच्या ( प्रासादाचा ) वैश्य (वर्ण) असतो व द्राविड पद्धतीच्या ( प्रासादास ) नृप ( क्षत्रिय वर्णाचा ) म्हणून जाणतात. हे सुव्रता, त्यांची मापे ऐक. ( २३ )

## नागर विमान

कूटकोष्ठांचे निर्गमन मानसूत्रांतच सुस्थित असतात, कूट उंचावर व कोष्ठ अनुक्रमे खाली असते. पत्रतोरण असून प्रत्येक मजल्यावर एकाच आकाराचे खांब असतात. हे ब्राह्मणा, क्षुद्रकोष्ठांसहित वरती महानासी असते. ( २४, २५ )

वेदिका व जाळी यांच्यासह कूटाचे शीर्ष चौकोनी असते. एक किंवा अनेक मजले असतात. व्हरांडा ( अलिंद ) असतो किंवा नसतो. ( २६ )



आकृती २५·१ : चौकोनी शिखर



आकृती २५·२ : वर्तुळाकार शिखर

शिखर व कण्ठ चोकोनी असतात किंवा त्यांचा आकार शालेसारखा असतो. (असे) हे भवन नागर प्रकारचे सांगतात व त्या त्या देशांत ( नागर देशांत ) बांधावे. ( २७ )

## द्राविड विमान ( पहिला प्रकार )

पूर्वी ( सांगितल्याप्रमाणे मानसूत्राच्या ) बाहेर कूटाचे निर्गमन असते किंवा कोष्ठ कूटाच्याही बाहेर आलेले असते ( किंवा कोष्ठाचे निर्गमन कूटाच्या निर्गमनापेक्षा जास्त असते. ) कूट मानसूत्राच्या बाहेर असून कूटाच्या कडेपाशी कोष्ठ असते. ( २८ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, मध्यभागी असलेले कोष्ठ एका भद्रासह असते. किंवा ( त्याला ) दोन भद्र असतात. पंजर मानसूत्रात असून सर्व कूट ( कोष्ठ ) मानसूत्राच्या बाहेर असतात. ( २९)

[ कूट कोष्ठ मानसूत्राच्या बाहेर असतात हे अगोदर श्लोक २४.३०–३२ मध्ये सांगितलेले आहे. ]

( विमानाची ) वेला ( कडा ) उंचसखल असून योग्य त्या क्रमाने सौष्ठिक असतात. सान्तर-मंच उंच असतो व तेथे प्रस्तर नसावा. ( ३० )

[वेला = मर्यादा. सौष्ठिक = कूट या अर्थी पर्यायी शब्द. सान्तरमंच आकृती पटल १३ त पहा.]

मजल्यामजल्याला अनुक्रमे चौकोनी, अष्टकोनी व गोल कूट असतात. निरनिराळ्या प्रकारांची अधिष्ठान, खांब, वेदिका व तोरणे असतात. ( ३१ )

वृत्ताख्यस्फारित, हत्तीची तोंडे, कुंभ, वेली वगैरे असतात किंवा हारांतरापाशी असलेल्या मंचा-वरती क्षुद्रकोष्ठ असतो. ( ३२ )

तेथेच हत्तीचे तोंड, भद्रनासी किंवा अल्प-नासी आधारासह किंवा आधाराशिवाय एका मजल्या-वर किंवा प्रत्येक मजल्यावर असतात. ( ३३ )

शीर्षाचा आकार, (तसेच) कंठ वर्तुळाकार (गोल) किंवा अष्टकोनी किंवा चौकोनी असतो किंवा अनेक शीर्षे असलेले असे द्राविड ( पद्धतीचे ) विमान असते. ( ३४ )

## द्राविड विमान ( दुसरा प्रकार )

वरीलप्रमाणेच ( परंतु ) खांब आणि अधि-ष्ठान ( निरनिराळ्या प्रकारचे नसून ) एकाच आका-राचे असतात. हारान्तराच्यामध्ये विशेषत: कल्पवृत्त-स्फुट असते. ( ३५ )

[ कल्पवृत्तस्फुटाच्या माहितीसाठी अध्याय १६ पहा. ]



आकृती २५.३ : आयताकार शिखर

सान्तर प्रस्तरासह दोन कूटकोष्ठ समपातळीत असतात किंवा आंतरमंच नसून वरती मंच समसूत्रांत असतो. (३६)

[ सान्तरप्रस्तर, सांतरमंच, आंतरमंच व आंतरप्रस्तर हे समानार्थी शब्द आहेत. सान्तरप्रस्तर असताना प्रस्तर नसतो. पटल ३१ मधील आकृती पहा. तेथेच दुसऱ्या आकृतीत सांतरप्रस्तर नसताना प्रस्तराच्या मोडणीत काही फरक नसून कूटकोष्ठामधील प्रस्तर समपातळीत असतो असे दाखविले आहे. ]

हारान्तरात भद्र किंवा भद्रपञ्जर करावा. किंवा सान्तरप्रस्तरासह कपोतपञ्जर असावा. (३७)

[ पञ्जराची माहिती पटल ३१ त दिली आहे. ]

सर्व कूटकोष्ठ ( प्रस्तरापासून ) शीर्षापर्यंत चौकोनी असतात. वेदिका अष्टकोनी व शीर्ष आणि गल ( कण्ठ ) गोल असतात. ( ३८ )

किंवा शीर्ष व कण्ठ अष्टकोनी किंवा चौकोनी कल्पावेत. होमापासून मिटलेल्या कमळापर्यंत ( त्या आकाराच्या शीर्षापर्यंत ) असे हे द्राविड ( विमान ) सांगतात. ( ३९ )

**द्राविड विमान** ( तिसरा प्रकार )

अष्टकोनी किंवा षटकोनी ( विमान ) असेल तर ते द्राविड ( पद्धतीचे ) सांगतात. असा तीन प्रकारचा द्राविड पद्धतीचा प्रासाद नेहमी सांगतात. ( ४० )

## वेसर विमान

वेसर ( पद्धतीत ) कूटकोष्ठ इत्यादींचे निर्गमन समसूत्रांत असते. कोष्ठ, कूट यांचे शीर्ष गोलाकार कल्पावे. ( ४१ )

गर्भगृहाचा आकार वर्तुळाकार असतो किंवा बाहेरून वर्तुळाकृती असतो. शिखराचे कण्ठ, शीर्ष गोलाकार असतात किंवा पाहिजे त्या आकाराचे असतात. ( ४२ )

वऱ्हांड्यासह किंवा भद्रासहित एक किंवा अनेक मजले असतात. सर्व बाजू सारख्याच लांबीच्या ( चौरस ) किंवा आयताकृती, वर्तुळाकार किंवा वृत्तायताकार असतो. ( ४३ )

अथवा कूटकोष्ठांसह वृत्तायत आकाराचे हर्म्य असून कूट व कोष्ठ अनुक्रमे उंच व खाली असतात. ( ४४ )

किंवा दोन्ही कूट ( व ) कोष्ठ समपातळीत असून ते एक किंवा अनेक मजली (हर्म्य) असते. वेसर ( पद्धतीचे ) विमान सांगितले अथवा निराळ्या प्रकारांनी ( नागर, द्राविड व वेसर विमान सांगतो. ) ( ४५ )

जन्मापासून ( अधिष्ठानाच्या उपानापासून ) स्तूपीपर्यंत चौकोनी असे नागर ( विमान ) असते. किंवा ( फक्त ) शीर्ष व कण्ठ अष्टकोनी असतील तर ते द्राविड ( पद्धतीचे ) भवन असते (४६)

कण्ठ व शीर्ष वर्तुळाकृती असल्यास त्यास वेसर ( पद्धतीचे ) हर्म्य म्हणतात. ( हे प्रासादाचे वर्गीकरण ) मी सांगितले ते कूटकोष्ठ नसलेल्या प्रासादांना लागू होते. ( ४७ )

निरनिराळ्या प्रकारच्या अधिष्ठानांसह गल आणि प्रत्येक खांब वेगळ्या तऱ्हेचा किंवा सव ठिकाणी गोल खांब वेसर ( पद्धतीच्या ) प्रासादास असावेत. ( ४८ )

लिंग व पिण्डिका याप्रमाणे प्रासाद व अधिष्ठान असून अशी वास्तू बांधण्यासाठी राजाने सर्व प्रकारच्या संपत्तीचा (व) समृद्धीचा उपयोग करावा. (४९)

विमान बांधण्यास निरनिराळ्या पद्धती वापरल्यास (म्हणजे एकाच प्रासादात नागर, वेसर व द्राविड पद्धतींची भेसळ केल्यास) ते राजाला व राष्ट्राला भयकारक होते म्हणून सर्व प्रयत्नांनी एकाच जातीचे (पद्धतीचे) हर्म्य बांधावे. (५०)

नागर पद्धतीत सगळे शान्त असते (म्हणजे नक्षीकाम जवळजवळ नसतेच). वेसर पद्धतीत वाहने, सैनिक यांनी ते भूषविलेले असते व द्राविड पद्धतीच्या भवनांत भोग, शौर्य व नृत्य दाखविलेले असते. (५१)

याहून वेगळे केल्यास, तसे करणारा व त्याचा मालक यांच्यावर संकटे येतात. 'नागर' वगैरे पद्धती सांगितल्या. (आता) गर्भन्यासविधी ऐक. (५२)

**काश्यपशिल्पातील नागरादिविधि हे पंचविसावे पटल संपले.**

# सव्विसावे पटल

## [ गर्भन्यासविधी ]

आता विशेषाने संपूर्ण गर्भन्यासाचा विधी सांगतो. प्रासादाला गेह (देह ?) म्हणतात व त्याचा प्रकार म्हणजे वास्तुगर्भ होय. (१)

हे ब्राह्मणा, गुरू नसलेले घर थोडया वेळासाठीदेखील राहण्यास योग्य नसते. मी, इतर (देव) व वेद गर्भन्यास न केलेल्या घरात कधीच राहत नाही. (२)

तेव्हा सर्व प्रयत्नाने गर्भन्यास करावा. (मानव) प्राण्याकरिता (असलेल्या घराकरिता केलेला) गर्भन्यास श्रीप्रद म्हणजे वैभव मिळवून देणारा असतो आणि इतरांना (देव प्रासादासाठी केलेला गर्भन्यास) श्रीकर असतो. (३)

[दुसरा अर्थ असा– माणसाच्या घराचा गर्भन्यास श्रीप्रद नावाचा असतो व इतरांकरिता (म्हणजे देवालयाकरिता) श्रीकर नावाचा गर्भन्यास असतो.]

गर्भन्यासाचा विधी ब्राह्मणांच्या हितासाठी (ब्राह्मणांच्या घरासाठी) अधिष्ठानाच्या प्रतीच्या वर, राजाकरिता कुमुदाच्या वर व वैश्याकरिता जगतीच्या वर करणे चांगले. (४)

शूद्रांच्या अभिवृद्धीसाठी (त्यांच्या घरांबाबत) होमाच्या वर गर्भन्यास करावा. सर्व जातींच्या शेवटी (शूद्राहूनही नीच) असलेल्यांकरिता जमिनीवर किंवा आद्यइष्टकेवर (गर्भन्यास करावा). (५)

प्रासाद, मण्डप आणि त्याचप्रमाणे पुढले दार, गोपुर तसेच परिवारांच्या देवालयासाठी गर्भन्यास करावा. किंबहुना जेथे जेथे प्रथमेष्टका ठेवतात तेथे तेथे ( त्या त्या वास्तूकरिता ) गर्भन्यास करावा. ( ६, ६½ )

हे ब्राह्मणा, गर्भपात्र सोन्याचे, चांदीचे ( व ) तांब्याचे असे क्रमाने उत्तम, मध्यम व अधम ( प्रकारचे असते ) अथवा ( ते ) कांशाचेच असावे. (७, ७½ )

एकापासून १६ मजले असलेल्या घराकरिता अनुक्रमे पाच अंगुलांनी (९.५ सें. मी.) सुरुवात करून एक एक अंगुलाने ( १.९ से. मी. ) वाढ करीत सोळा प्रकारांनी वीस अंगुलांपर्यंत ( ३८ सें. मी. ) गर्भपात्र असावे. ( ८, ९ )

गर्भपात्राची ही लांबी झाली. गर्भपात्राची रुंदी खांबाच्या मुळाहून जास्त असावी व रुंदी-इतकी उंची असावी. ( १० )

गर्भपात्राच्या उंचीचा एक भाग झाकणाची उंची असते. हे ब्राह्मणा, पात्राच्या दोन किंवा तीन भागांपर्यंत झाकणाची कडी असते. ( ११ )

[ विधान शब्द पिधान असा वाचून अर्थ केला आहे. ]

एक यव ( २·४ मिमी. ) रुंदीने आरंभ करून तीन अर्धे यव (दीड यव=३·६ मिमी. ) कोष्ठाची रुंदी असते. फळीची उंची ३/४ भाग असून नंतर कोष्ठाच्या भिंतींचा उदय असतो. ( १२ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, प्रथमच आठ कोष्ठांनी वेष्टिलेल्या मधल्या कोष्ठात इन्द्रनाभासह कूट ठेवावे. ( १३ )




आकृती २६·१ : गर्भपात्र

अनन्तापासून सुरुवात करून शिखंडीच्या अंतापर्यंत मूलमंत्र ठेवावा. त्याच्या बाहेरील सोळा कोष्ठांत अकारापासून विसर्गापर्यंत क्रमाने स्वर म्हणून रत्न, सोने, धान्य, फळे आतमध्ये ठेवावीत. ( १४, १५ )

माती, कन्द, धान्य, पाने गर्भाच्या खड्डयात ठेवावीत. नंतर 'गव्यदस्त्रेति...' मन्त्राने फल-शुद्धी करून कूटाची अक्षरे म्हणत कूटात माणिक टाकावे. अनन्तावर वज्र (हिरा) ठेवावे व सूक्ष्मात मोती ठेवावे. (१६, १७)

शिलोत्तमावर इन्द्रनील ठेवावे. एकनेत्राला स्फटिक, एक रुद्राला शंख (व) त्रिमूर्तीला पुष्पराग ठेवावा. (१८)

श्रीकण्ठाला सूर्यकान्त ठेवावा. शिखंडींना वैडूर्य (ठेवावा.) सोन्याची पृथ्वी करून ती शहाण्या माणसाने अकारावर ठेवावी. (१९)

[विसूरक हा शब्द विडूरक घेऊन अर्थ केला आहे.]

चांदीची कवटी इकरावर ठेवावी. हे श्रेष्ठ ब्राह्मणा, कुंभ तन्त्राने उकारावर ठेवावा. (२०)

त्याच्या दारापाशी पितळ गकारावर (?) ठेवावे व कांशाचीच शंकर (मूर्ती) शहाण्या माणसाने अकारावर ठेवावी. (२१)

शिशाची कुऱ्हाड (परशू) करून एकारावर ठेवावी. कथिलाचे हरीण करून औकारावर ठेवावे. (२२)

लोखंडाचा त्रिशूळ अंकारावर ठेवावा. सोन्याचा नंदी करून कूटाक्षरावर ठेवावा. (२३)

आकारावर शम्या ठेवावी, इकारावर मनःशिला, उकारावर जातिलिंग व ऋकारावर गेरू ठेवावा. (२४)

लृकारावर सौराष्ट्र (सोनबोदड नावाची सौराष्ट्रात सापडणारी पिवळी माती), एकारावर अंजन ठेवावे; तसेच आकारावर गोरोचन व विसर्गावर (अः वर) नीलधारक ठेवावे. (२५)

त्या (त्या) बीजांचे स्मरण करून अनुक्रमाने जवस, नीवार, साळ, प्रियंगु, तीळ, मोहरी व मूग ही सात बीजे गर्भपात्रात पुरावीत. (वरील) विधी करून (गर्भपात्र ठेवावयाची जमीन) विधिवत् सपाट व मजबूत करावी. (२७)

प्रासादाच्या उत्तरेला (डावीकडे) किंवा समोरच्या बाजूला पाच, सहा (किंवा) सात हातांचा (२·२८, २·७३६ किंवा ३·१९२ मी.) १६ खांबांसह अत्यंत सुंदर प्रपा (मंडप) करावा. (२८)

सांगितलेल्या पद्धतीने (प्रपामंडपाचा) वरचा भाग तरंग व खांबांच्या वेष्टनांनी आच्छादून द्वारतोरणासह दर्भाच्या माळांनी (तो प्रपामंडप) भूषवावा. (२९)

मण्डपाच्या तीन भागांपैकी मधल्या भागात वेदी कल्पावी. तिची उंची एक हात (२४ अंगुले=४५·६ सें. मी.) किंवा एक ताल (१२ अंगुले=२२·८ सें. मी.) असावी. (३०)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, या महाशालेत (वेदीच्या) चहूबाजूंनी अग्निकुण्डे असावीत. चौरस, धनुष्याकार, वर्तुळाकार, कमळाप्रमाणे (अशा आकाराची अग्निकुण्डे) पूर्वदिशेपासून क्रमाने असावीत. (३१)

**तीन मेखला,** नाभी व योनी यांच्यासह कुण्ड करावे. कुण्ड व वेदीची जागा आरशाप्रमाणे **(गुळगुळीत व सपाट)** करावी. (३२)

तेथे शिल्पींना आणवावे व ती जागा गायीच्या शेणाने सारवावी. रांगोळीने ( ती जागा ) अलंकारित करून पुण्याहवाचन करून प्रोक्षण करावे. ( ३३ )

[ तच्छिलिपवतमुद्वास्य या ऐवजी तत्सशिल्पिभिः समुत्पाद्य असा शब्दसमूह घेऊन अर्थ केला आहे. ]

चार द्रोण तांदुळांनी वेदीवर दोन स्थण्डिले करावीत. तीळ, तांदूळ, लाह्या, दर्भ, फुले त्यांच्यावर पसरून ठेवावीत. ( ३४ )

( अष्ट ) दिक्पालांची गन्ध, पुष्प इत्यादींनी व त्यांच्या नावाच्या मन्त्रांनी पूजा करावी. फळाला ( नारळाला ) पंचगव्याने अभिषेक करून गन्धजलाने स्नान घालावे. ( ३५ )

दोरीने कौतुक बांधून नवे वस्त्र पांघरून कूटाक्षर म्हणून स्थण्डिलावर तो नारळ ठेवावा. (३६)

त्याच्या भोवती सूत्रासहित विधिवत् कलश ठेवावेत. ते (कलश ) कुश गवताची जुडी, वस्त्र यांनी लपेटलेले व गन्धासह क्रमाने ठेवावेत. ( ३७ )

कुंभात स्थित असलेल्या ( स्थापन केलेल्या ) विश्वेश्वराची त्याच्या मन्त्राने व स्तोत्राने पूजा करावी. कुण्डाचे पंचसंस्कार करून होम करावा. ( ३८ )

अग्निकार्यात सांगितल्याप्रमाणे अग्न्याधानादी सर्व विधिवत् करावे. समिधा, तूप, चरु, लाह्या, तीळ, तांदूळ ( व ) मोहरी हृदयमन्त्रादी म्हणून ईशान्य दिशेपासून क्रमाने होमावेत. होम करून विशेषत: प्रत्येकाच्या १०८ आहुती द्याव्यात. ( ३९, ४० )

या द्रव्यांच्या ( आहुतीं ) नंतर व्याहृतींनी व मूलमंत्रानेही शंभर आहुती द्याव्यात. जयादी, अभ्यातान आणि राष्ट्रभृच्च या मन्त्रांनी होम करावा. ( ४१ )

रात्री जागरण करून सकाळी चांगल्या मुहूर्तावर, चांगल्या नक्षत्रावर, चांगल्या लग्नावर, चांगल्या तिथीवर व शुभवारी – ( ४२ )

पवित्र ब्राह्मणकुळात जन्मलेल्या, पवित्र दीक्षा घेतलेल्या, स्वत:चा ( कर्त्याचा ) आचार्य असलेल्या, दोनदा स्नान केलेल्या, सगळे विग्रह केलेल्या, पांढरी वस्त्रे व उत्तरीय नेसलेल्या, पांढऱ्या रंगाचे उटणे वगैरे लावलेल्या आचार्यांची तेथे कापड, सोन्याच्या अंगठ्या वगैरे ( देऊन ) पूजा करावी. ( ४३, ४४ )

[ सविग्रहाच्या अर्थासाठी ४.२९–३१ वरील टीप पहावी. ]

तेथेच शिल्पींची कापड, दागिने इत्यादी ( देऊन ) पूजा करावी. नंतर कर्ता, आचार्य व शिल्पी यांनी गर्भस्थानी प्रवेश करावा. भिंतीचे आठ भाग करून बाहेरील चार ( भाग ) सोडून द्यावेत आणि आतील तीन भाग सोडून उरलेल्या भागावर ( गर्भ ) पात्र ठेवावे. ( ४५, ४६ )

तलावातील, नदीतील, शेतातील धान्यातील, वारुळाची, नांगराच्या फाळापासची, अंगुली-पाशी असलेली, हत्तीच्या ( दातापाशी असलेली ) व बैलाच्या शिंगांना लागलेली अशी आठ प्रकारची माती आचार्यांनी घेऊन, ‘ नमस्कार असो ’ असे म्हणून, गर्भाच्या खड्डयात ठेवावी. तिच्यावर (माती-वर ) कन्द ठेवावेत. मध्यभागी अंबुजाचा कंद ठेवावा, पूर्वेकडे कुमुदाचा कन्द, दक्षिणेकडे उत्पलाचा

कन्द, पश्चिमेकडे सौगन्धीचा कन्द ठेवावा. उत्तरेकडे उशीरकन्द ठेवावा. बी त्यावर ठेवावे. (४७–४९)

पूर्वेकडे साळ ठेवावी, दक्षिणेकडे तांदूळ ठेवावेत, पश्चिमेकडे कोद्रव असावे व उत्तरेकडे माष ठेवावे. (५०)

[कोद्रव– वरी, नागलीसारखे गरिबांचे धान्य.]

अग्नेयेकडे माष ठेवावे, नैर्ऋत्येकडे तांदूळ, वायव्य दिशेला प्रियंगु व ईशान्येला कुळीथ ठेवावे. (५१)

अशा रीतीने हृदयमन्त्रपूर्वक गर्भपात्र खड्ड्यात ठेवावे. सर्व वाद्यांसहित, नृत्यगायन यांच्यासह, जय (असो) या घोषशब्दासह,, ब्रह्मघोषासह प्रासादबीजाचा उच्चार करून गर्भपात्राची स्थापना करावी. (५२, ५३)

दगड किंवा वीट व चुना वापरून मजबूत बांधणी करावी. गन्ध, फुले इत्यादींनी प्रासादाची पूजा करावी...........गर्भन्यासाचे विधान सांगितले. त्यानंतर एक (मजली) प्रासादाचा विधी ऐक. (५४).

**काश्यपशिल्पातील गर्भन्यासाचा विधी हे सव्विसावे पटल संपले.**

# सत्ताविसावे पटल

## [एकमजली (प्रासाद)]

आता विशेषतः एकमजली प्रासाद ऐक. त्याची रुंदी व उंची प्रासादमानात (पटलात) सांगितलीच आहे. (१)

चौरस, वर्तुळाकार, आयताकार, अष्टकोनी आणि षट्कोनी शिवाय आठकोनी आकार असून शिखरही तसेच (त्याच आकाराचे) असते. (२)

[श्लोक अशुद्ध असल्याने अष्टकोनीची द्विरुक्ती झाली आहे.]

प्रासादाच्या रुंदीच्या निम्मी (रुंदी) असलेला (मुखमण्डप) कनिष्ठ, घराच्या रुंदीइतकीच (रुंदी) असलेला (मुखमण्डप) श्रेष्ठ असतो. त्या दोघांमधील (रुंदीचे) आठ भाग केले असता मुखमण्डपाची लांबी (रुंदी) मी नऊ प्रकारांनी सांगितली आहे. (३, ३$\frac{१}{२}$)

[मुखमण्डपाची रुंदी प्रासादाच्या रुंदीच्या $\frac{१}{२}$, $\frac{९}{१६}$, $\frac{५}{८}$, $\frac{११}{१६}$, $\frac{३}{४}$, $\frac{१३}{१६}$, $\frac{७}{८}$, $\frac{१५}{१६}$ व एकपट अशी नऊ प्रकारांची असते.]

प्रासादाइतकीच लांबी असलेला (त्याच्या निम्मी लांबी असलेला व या अंतराच्या मधील लांबी असलेला असे) मण्डपाचे उत्तम (वगैरे) तीन प्रकार होतात. (४)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, प्रासादांत एक दण्ड प्रवेश असलेला मण्डप श्रेष्ठ, दीड किंवा दोन दंड मानसूत्राच्या आत ( प्रासादात ) प्रवेश असलेले ( अनुक्रमे ) मध्यम व कनिष्ठ मण्डप होत. ( ५ )

सर्व अवयवांसह असलेला अंतराळ असावा. त्याची मोकळी जागा ( भिंतींमधली, आतून घतलेले माप ) दोन, तीन ( किंवा ) चार (दण्ड ) लांबीची असावी. ( ६ )

[ अंतराळ– प्रासाद व मण्डप यांना जोडणारा भाग. ]

अशा ( मण्डपाच्या ) दोन्ही बाजूंना अलंकारिलेले कठडे असलेले व प्रासादाच्या भिंतीच्या रुंदीइतके किंवा निम्म्या अथवा पाऊणपट रुंदी असलेले जिने असावेत. ( ७ )

अंतराळाच्या भिंतींची रुंदी मण्डपाच्या भिंतींच्या रुंदीइतकी असावी. कूटकोष्ठांसह किंवा त्यांच्याशिवाय मुखमण्डप असावा. ( ८ )

किंवा तोरण वगैरेंनी चित्रित केलेला, एक किंवा अनेक मजले असलेला त्रिवर्गासहित असा मुखमण्डप करावा. ( ९ )

[ त्रिवर्ग– अधिष्ठान, खांब व प्रस्तर हे त्रिवर्ग असलेला मंडप ]

प्रासादाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग गाभाऱ्याची रुंदी असावी. (प्रासादाची रुंदी) पाच भाग तर ( गाभाऱ्याची रुंदी ) तीन भाग, सात भागांपैकी चार भाग, नऊ भागांपैकी पाच भाग, १२ भागांपैकी ११ भाग(?), १३ भागांपैकी आठ भाग व (प्रासादाच्या रुंदीच्या ) दहा भागांपैकी आठ भाग (गाभाऱ्याची रुंदी ) असावी. हे ब्राह्मणश्रेष्ठा, रुंदीच्या सवापट किंवा नववा भाग अशी गाभाऱ्याची रुंदी नऊ प्रकारे सांगितली आहे. ( १०–१२ )

[ प्रासादाची रुंदी ३ क्ष असेल तर गाभाऱ्याची रुंदी क्ष व भिंतींची रुंदी प्रत्येकी क्ष असेल. प्रासादाची रुंदी ५ क्ष असेल तर गाभाऱ्याची रुंदी ३ क्ष व भिंतींची रुंदी प्रत्येकी क्ष असेल. हाच हिशोब इतरही प्रकारांना लावावा. ]

उरलेली ( रुंदी ) शहाण्या माणसाने, भोवतालच्या चारी भिंतींची रुंदी ( म्हणून ) कल्पावी. एका भागात एक, दोन, तीन, चार, पाच, पंक्ती ( ? ) असतात. ( १३ )

घराच्या उंचीचे आठ भाग करून अधिष्ठानाची उंची एक भाग, खांबांची उंची दोन भाग, प्रस्तर एक भाग, गलाची उंची एक भाग, शिखराची उंची दोन भाग व स्तूपीची उंची एक भाग कल्पावी, अशी शान्तिक ( प्रासादाची मापे ) आहेत. ( १४, १५ )

एक बाजू सोडून इतर बाजूंवर अथवा पाच पार्श्व देवता असतात. असे शान्तिक सांगितले आता पौष्टिक सांगतो. ( १६ )

[ श्लोक १५½ अशुद्ध असल्याने योग्य अर्थ देता आलेला नाही. ]

घराच्या उंचीचे नऊ भाग केले तर अधिष्ठानाची उंची एक अंश, खांबाची उंची अर्ध्या अंशासह दोन अंश ( अडीच अंश ), तसेच मंचाचे माप एक अंशाचे करावे. गल एक अंश, शिखराची उंची दोन भाग किंवा अडीच भाग असते. स्तूपीची उंची एक अंश असते. हे पौष्टिक सदन होय. ( १७–१८½ )




आकृती २७·१ : एकमजली प्रासाद (शान्तिक)

घराचे दहा भाग करून अधिष्ठानाची उंची एक अंश असावी. खांबाची उंची अडीच अंश, प्रस्तराची उंची एक अंश, गल दीड अंश व शिखराची उंची तीन अंश, स्तूपी एक अंश असते. हे जयंता ( जयद ? ) सांगितले. ( १९–२०½ )

घराच्या उंचीचे ११ भाग करून सवा भाग अधिष्ठान, खांबाची उंची अडीच अंश, प्रस्तराची उंची एक अंश, कंठाची उंची अडीच अंश व शिखराची उंची अडीच अंश असते. उरलेले अंश (सवा ) स्तूपी असते. असे अद्भुत सदन असते. ( २१–२२½ )

( घराच्या ) उंचीचे सात भाग करून अधिष्ठान एक अंश, खांबाची उंची दोन अंश, शिखराची उंची तीन अंश, स्तूपिची उंची एक अंश असे सार्वकामिक असते. ( २३, २४ )

शान्तिक इत्यादी प्रासादांची उंची व रुंदी क्रमाने सांगितली. त्याहून निराळी केली असता संकटांना बोलावल्यासारखे होते, तेव्हा भिंती इत्यादींची रुंदी व उंची सांगितल्याप्रमाणे करावी. ( २५, २५½ )

घराच्या उंचीचे ११ भाग केले तर अधिष्ठानाची उंची एक अंश, खांबाची उंची दोन अंश, प्रस्तर एक अंश, उपग्रीव दीड अंश, प्रस्तराची उंची पाऊण ( अंश ), गलाची उंची सवा अंश, शिखर अडीच अंश, ( व ) स्तूपि एक अंश ( असतात. ) हेदेखील अद्भूताचे प्रमाण आहे. ( २६–२८ )

[ श्लोक २९ व ३० चा अर्थ समजत नाही. ]

हे सुव्रता, वरती मंचाच्या भोवती चारी कोनांपाशी ७२ अंशांपैकी सात अंश रुंदीचे निरनिराळ्या प्रकारचे कर्णकूट ( असतात असे ) सांगतात. ( शिखर ) कर्णकूटांसह किंवा त्यांच्याशिवाय विशेषत्वाने असते. ( ३१, ३२ )

सर्व अंगे आत प्रवेश करतात असा प्रग्रीव कल्पावा. तसेच वर्तुळाकार कंठासहित भरीव शिखर असावे. ( ३३ )

शिखरावर चौकोनी महानासी मुख्य दिशांना असते. ( आठही ) दिशांना आयताकार भद्र किंवा मंचावरती ( एकंदर ) १६ लहान नासिका असतात, किंवा प्रस्तरावरती आठ लहान नासी असतात. याला ‘ जयद्वंद्व ’ म्हणतात. ( ३४, ३४½ )

वरीलप्रमाणेच (परंतु) कर्ण ( कण्ठ ) व कूट सहा व पाच अंश असतात. नागर (पद्धतीत) अत्यंत योग्य असे कण्ठ कूटाच्या आकाराप्रमाणे कल्पावे. कण्ठकूटाप्रमाणे मध्यभागी असलेले जे भद्र त्याला भद्रनासिका म्हणतात. ( ३५, ३६ )

अन्तराल तेव्हढेच (कर्णकूटाएवढ्या रुंदीचे ) व क्षुद्र ( नासिका ?) पाच अंशांसह असते. कूट किंवा भद्रनासिका भद्रासह किंवा भद्राशिवाय असते. ( ३७ )

मोठी भद्रनासी किंवा मध्यभागी मोठे भद्र असावे. किंवा घराच्या ( रुंदीचे ) तीन, चार, पाच, सहा किंवा सात भाग करून एक किंवा दोन अंश रुंदीचे मध्यभागी मोठे भद्र असावे; किंवा भद्र तीन भाग असून शालेच्या मध्यभागी करावे. ( ३८, ३९ )

एक दण्ड, दीड दण्ड किंवा दोन दण्ड भद्राचे ( भद्रनासीचे ) निर्गमन असते. जसे पाहिजे तसे शिखर असावे. याला ‘ कण्ठश्रीभोगान्त ’ असे म्हणतात. ( ४० )

स्वतःच्या रुंदीतील भिंत व खांब यांच्यावर आठ प्रकारचे पट्ट असलेले; किंवा स्वतःच्या रुंदीतील भिंत व खांब निर्गमनाशिवाय असलेले असे सर्व देवांच्यासाठी योग्य असलेले ‘ श्रीभद्र ’ प्रसिद्ध आहे. (४१, ४१½ )

वरीलप्रमाणेच ( परंतु ) घराच्या बाहेरच्या बाजूने मध्यभागी भद्र असलेले, खूप तोरणे, जाळ्या असलेले, ( चारी बाजूंना ) वृक्ष कोरलेले असे ते ‘ श्रीविशाल ’ असते. ( ४२, ४२½ )

वरीलप्रमाणेच ( परंतु ) वेदी, कण्ठ, शिखर, घट इत्यादी आठही अंग असलेले खांब असून, चारी (मुख्य) दिशांकडील बाजूंवर नासिका असलेले ( तसेच ) चारी उपदिशांना लहान

नासिका शिखरावर असलेले, खांबांवरती अल्पनासी असलेले हे 'स्वस्तिबंध' म्हणून ( सदन ) सांगतात. ( ४३–४४½ )

[ वस्वङ्ग याचा अर्थ अष्टांग उपपीठ असलेले, पटल ५.९–१० असादेखील असू शकेल. देविकाकण्ठ हा शब्द वेदिकाकण्ठ असा घेऊन अर्थ केला आहे. ]

वरीलप्रमाणेच ( परंतु ) मध्यभद्र व कर्णकूट यांच्याशिवाय असलेले घर सर्व देवांचे आवडते असून 'सुशोभन' या नावाने प्रसिद्ध आहे. ( ४५, ४५½ )

शिखरावरती नासी असून अष्टकोनी किंवा १६ कोनी प्रस्तर असतो. शिखर, कण्ठ आणि वेदिका चौकोनी असतात. ( त्यास ) 'श्रीकर' ( म्हणतात. ) ( ४६, ४६½ )

त्याचप्रमाणे ( परंतु ) शिखरावरती आठ अल्पनासींसह शीर्षापाशी दुसऱ्या कोष्ठासहित महानासी असते. नासिकेची रुंदी दोन किंवा तीन दण्ड असते. याला 'कोष्ठदीप' म्हणतात. नासिके-इतकी उंची असलेल्या व उपदिशांना असलेल्या भद्रनासींनी शोभणारे असे शिखर कल्पावे. ( ४७–४९ )

शीर्ष व कण्ठ गोलाकार असते ते 'वृत्तकेसर' म्हणून सांगतात. गल व शीर्ष अष्टकोनी असते ते 'राजकेसर' ( नावाचे घर ) असते. ( ५० )

प्रासादाच्या रुंदीचे पाच, सात किंवा आठ भाग असावेत. ( त्यांतील ) तीन भाग किंवा दोन भाग किंवा पूर्वी दिल्याप्रमाणे मध्यभद्र असतो. ( ५१ )

[ पूर्वी दिल्याप्रमाणे म्हणजे श्लोक ३८, ३९ मध्ये दिल्याप्रमाणे. ]

हर्म्याच्या बाहेर, इतर भद्रांच्या मानाने, मध्यभद्राचे निर्गमन एक, दीड, दोन किंवा तीन दण्ड असते. ( ५२ )

ज्याचे शिखर वृत्ताकार असून महानासीसह असते, प्रत्येक खांबावर अल्पनासी असलेले, कण्ठ शीर्षाच्या आकाराप्रमाणे असलेले ते ( घर ) सर्व देवांना योग्य असून 'कल्याणसुंदर' म्हणून प्रसिद्ध आहे. ( ५३, ५३½ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, पूर्वीप्रमाणेच ( परंतु ) पूर्व व पश्चिम दिशांना भद्रनासी, दोन्ही बाजूंना ( असलेल्या ) ललाटनासिकांसह असतात. चौरस किंवा आयताकार असे हे 'कोशल' होते. ( ५४,५५ )

प्रत्येक विमानाच्या मजल्याची उंची आता सांगतो. ( ५५½ )

[ दिशापरत्वे कोणत्या मूर्ती असाव्यात त्याची माहिती खाली दिली आहे. यावरून श्लोकार्धाच्या अशुद्धत्वाची कल्पना येईल. ]

पूर्व दिशेला स्कंद, दक्षिण दिशेला दक्षिणामूर्ती, पश्चिम दिशेला विष्णू किंवा लिंगोद्भवाची मूर्ती असते. हे ब्राह्मणा, उत्तर दिशेला धात्याची ( ब्रह्मदेवाची ) मूर्ती असते. ( या मूर्ती ) भारस्थानापाशी असू नयेत. ( ५६, ५७ )

[ प्रस्तराखाली वरील शिखर हातांवर तोलून धरले आहेत अशा मूर्ती जेथे दाखवितात त्याला भारस्थान म्हणतात. ]

मण्डपाच्या दक्षिणेकडील भद्रात सिद्धिविनायकाची मूर्ती असते. पूर्वेला किंवा पश्चिमेला त्याची नृत्तमूर्ती ( नाचणाऱ्या गणेशाची मूर्ती ) कल्पावी. ( ५८ )

हे ब्राह्मणा, उत्तर दिशेला दुर्गा किंवा क्षेत्रपाल असावा. (अशा रीतीने) स्थानाच्या व घराच्या प्रत्येक दिशेला मूर्ती असाव्यात. ( ५९ )

अशा अधिष्ठानाच्या वर असलेल्या...... पूर्व दिशेच्या बाजूला स्कन्द पांढऱ्या हत्तीवर (ऐरावतावर) बसलेला इन्द्र किंवा कमळासनावर बसलेला ब्रह्मा यांच्यापैकी एकासह असावा. ( ६०, ६०½ )

दक्षिण दिशेला दक्षिणामूर्ती किंवा वीरभद्र, पश्चिम दिशेला नृसिंह किंवा सौम्य मूर्ती (कुबेर) असते. हे द्विजसत्तमा, उत्तर दिशेला कमळावर बसलेल्या ब्रह्मदेवाची मूर्ती असते. ( ६१, ६२ )

एक, दोन व तीन मजली घरांच्या प्रस्तरांवर या मूर्ती असाव्यात. चार किंवा अधिक मजले असलेल्या घरावर योग्य त्या वाहनावरील महेश मूर्ती असावी. ( ६३ )

उमा, स्कंद यांच्यासह महेशाची मूर्ती असावी असे सांगतात. इतर देव आणि गन्धर्व, सिद्ध, दैत्य, मरुद्गण ( यांच्या मूर्ती ) असाव्यात. चार मजल्यांपासून १५ मजल्यांपर्यंत कंठापाशी व प्रस्तरानंतर अरिष्टांचा नाश करण्याकरिता, हे कल्पवित्, इष्टमूर्ती कल्पावी. ( ६४, ६५ )

गळाच्या ठिकाणी असलेल्या मंचाच्या ( प्रस्तराच्या ) वर कोनापाशी वृषभ ( नंदीबैल ) असावा. प्रत्येक कोणावर दोन किंवा एक शयनासन वृषभ असावा. ( ६६ )

[ शयनासन वृषभ– पाय दुमडून बसलेला नंदीबैल. ]

किंवा चारही कोपऱ्यांवर पद्मपीठावर बसलेले, खूप मोठे ( धिप्पाड ) शरीराचे, हृदयापाशी ओंजळ धरलेले ( छातीपाशी हात जुळवून नमस्काराची क्रिया करणारे ) असे दोन भूत असावेत (६७)

आग्नेय दिशेच्या कोपऱ्यात आमोद, नैर्ऋत्य दिशेला प्रमोद, वायव्य दिशेच्या कोपऱ्यात प्रमुख व ईशान्य कोणाला दुर्मुख असावा. ते आग्नेय दिशेपासून अनुक्रमे पांढऱ्या, तांबडया, पिवळ्या व काळ्या रंगाचे असतात. यम ही देवता असलेल्या त्यांचे आवाहन करावे. ( ६८, ६९ )

जाड, बारीक वाळू, ( दगडाची ) भुकटी यांनी ( या मूर्तींचे) कणलेपन करावे. अनेक तऱ्हेच्या अलंकारांनी भूषविलेल्या व निरनिराळ्या लीला ( क्रीडा ) करीत असलेल्या ( देवांच्या ) मूर्ती चुन्याने तसेच धातूंनी जसे योग्य वाटेल त्याप्रमाणे कल्पाव्यात. मूर्ती शूल व त्यावरील लेप अशा असाव्यात. ( ७०, ७१ )

[ कणलेपन– निरनिराळ्या जाडींची ( प्रथम जाड, नंतर बारीक, नंतर दगडाची भुकटी ) वाळू घेऊन त्यांचा मूर्तीच्या शूलाभोवती लेप लावतात. त्याला कणलेपन म्हणतात.

लाकडाचा किंवा धातूंचा मूर्तीचा सांगाडा बनवितात. त्याला शूल म्हणतात. त्यावर चुना, वाळू, माती यांचा लेप लावून मूर्तीचा आकार आणतात. जास्त माहितीसाठी पटल ८० ते ८३ पाहावे. ]

असे हे एकमजली ( घर ) सांगितले, नंतर द्वितल ( दोन मजली घर ) समजून घे. ( ७२ )

**काश्यपशिल्पातील एकमजली विमानाचे लक्षण हे सत्ताविसावे पटल संपले.**

# अट्ठाविसावे पटल

## [ दोनमजली घर ]

आता विशेषतः दोनमजली ( घराचे ) लक्षण सांगतो. त्याची रुंदी, उंची आणि निर्गमन ही प्रासादमानात दिल्याप्रमाणे करावीत. ( १ )

विन्याससूत्राच्या आतील रुंदीचे सात किंवा सहा भाग केले तर कूटाची रुंदी एक अंश व कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) असते. ( २ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, कूटाच्या रुंदीइतकी कोष्ठाची रुंदी असते. उरलेले हारान्तर असते. कोष्ठाच्या दोन्ही बाजूंना पंजर असतो. ( ३ )

हारान्तर सोडून उरलेल्या जागेइतके किंवा त्याच्या पाऊणपट अथवा निम्मे पंजराची रुंदी सांगतात. कूटाच्या बाहेरच्या कडेइतके मानसूत्राच्या आत ( पंजराचा ) अंतर्प्रवेश असतो. पंजर कर्णकूटाप्रमाणे किंवा नासिकेच्या आकाराप्रमाणे असतो. ( ४, ५ )

प्रासादाची उंची २८ भागांत विभागून अधिष्ठानाची उंची तीन अंश, खांबाची उंची सहा अंश, ( व ) प्रस्तराची उंची तीन अंश असते. ( वरच्या मजल्याच्या ) खांबाची उंची पाच अंश, प्रस्तराची उंची दोन भाग, वेदिकेची उंची एक अंश, गलाची उंची दोन भाग, शीर्षाची उंची ४½ अंश, व शिखेचे ( स्तूपीचे ) माप दीड अंश कल्पिले असता ‘ शान्तिक ’ होते. ( ६–८ )

सदनाच्या उंचीचे ३४ भाग करून, अधिष्ठानाची उंची साडेतीन अंश ( व ) खांबाची उंची त्याच्या दुप्पट ( सात अंश ) असावी. प्रस्तराची उंची तीन अंश असावी. ( वरच्या मजल्याचे ) खांब साडेसहा अंश असावेत. मंचाचे माप तीन अंश, वेदिकेची उंची एक अंश ( असते. ) गलाची उंची ३½ अंश, शिखराची उंची पाच अंश ( व ) शिखेचे माप दीड अंश असावे. याला ‘ पौष्टिक ’ सदन म्हणतात. ( ९–११ )

उंचीचे ३३ भाग केले असता गलाचे माप अडीच अंश कल्पावे. उरलेल्या ( अंगांची मापे ) पूर्वीप्रमाणेच असतात. हे सर्व देवांचे आवडते ‘ जयद ’ ( प्रकारचे ) सदन होय. ( १२–१२½ )

घराच्या उंचीचे ३६ भाग करून आठ भाग अधिष्ठान, खांबाचे माप आठ अंश, प्रस्तर साडेतीन अंश, ( वरच्या मजल्याच्या ) खांबाची उंची सात अंश, गलाची उंची तीन अंश, शिखराची उंची पाच अंश, स्तूपीची उंची दीड भाग ( असावी. ) हे कल्पवित्तमा, अद्‌भुत सदन असे कल्पावे. ( १३–१५ )

[ येथे अधिष्ठानाची व खांबाची उंची एकच, आठ अंश, आहे. अधिष्ठानाची उंची खांबाच्या उंचीच्या अर्धी असावी हा नियम पाळलेला नाही. ]

सदनाच्या उंचीचे ४० भाग करून, अधिष्ठानाची उंची चार अंश, स्तंभाची उंची त्याच्या दुप्पट ( आठ अंश ), मंचाचे माप तीन अंश, ( दुसऱ्या मजल्यावरील ) खांबाची उंची ७½ अंश, प्रस्तराची उंची तीन भाग, वेदिकेची उंची दोन भाग, कंठाचे माप तीन भाग, शिखर सात भाग, उरलेले ( अडीच ) भाग शिखेची उंची सांगितली आहे. ( १६–१८ )




आकृती २८·१ : दोनमजली प्रासाद (शान्तिक)

[ शिरोदय असा शब्द न घेता शिखोदय असा घेऊन अर्थ केला आहे. ]

होमापासून स्तूपीपर्यंत हे विमान नेहमी चौकोनी कल्पावे. चार कूट व चार शाला, आठ पंजरांसह असतात. ४८ अल्पनासी असून त्या खांबांवर व प्रतीवरही असतात. वेदिकेवरती निरनिराळ्या तऱ्हेची चित्रे असावीत. सर्व देवांना आवडणारे असे हे 'स्वस्तिक' सांगितले. ( १९-२०½ )

त्याचप्रमाणे परंतु शीर्षाच्या अग्रभागी दोन्ही बाजूंना अल्पनासी असलेले ‘स्वस्तिभद्र’ सांगतात. ते मला (शंकराला) आवडते आहे. (२१, २१½)

त्याचप्रमाणे परंतु खाली कूट व कोष्ठ असून मंचापाशी नासिका (असते). खाली पंजर असतो. शीर्षावरील नासिका (क्रमाने) स्तूपी, घट किंवा गलापर्यंत असते. त्याला ‘श्रीकर’ म्हणतात. (२२, २३)

त्याचप्रमाणे कूटकोष्ठ असून कूट शालेच्या उंचीइतके असते. तेथील पंजर खाली (खालच्या पातळीत) असतात, ते ‘कैलास’ (म्हणून) सांगतात. (२४)

त्याचप्रमाणे परंतु कूट व कोष्ठ खालीवर असे नसून सान्तरप्रस्तरासह खाली (खालच्या पातळीत) समसूत्रांत (समपातळीत व एकाच मध्यरेषेवर असतात.) विशेषत: हारान्तरामध्ये दोन किंवा चार पंजर असतात. चार कूट व चार शाला असून सहा किंवा आठ अल्पनासिका असतात. वेदिका अष्टकोनी (तर) शीर्ष व गल वर्तुळाकृति असतात. शिखरावरती चारी दिशांना भद्रनासी व भद्राशिवाय नासी अशा आठ नासी असतात. वेदिका व तोरणांनी भूषविलेले असते. याला ‘रुद्रकान्त’ म्हणतात. (२५–२७½)

कूटापासून कोष्ठाचे निर्गमन एक किंवा अडीच दण्ड असावे किंवा कूटापासून कोष्ठाचे निर्गमन दोन दण्ड किंवा तीन दण्ड असावे. निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान असलेले, खूप खांब असलेले (व) वरती विमानाकृती असलेले असे कोष्ठ वर सांगितलेल्या सर्व प्रकारच्या घरांना असावे अगर असू नये. (२८–२९½)

त्याचप्रमाणे (परंतु) शिखरावर चार अर्धकोष्ठके असून चार कूटांसह, सहा किंवा आठ नासी असलेले चौकोनी शीर्ष असते, त्याला ‘स्वस्तिबंध’ म्हणतात. (३०, ३१)

त्याचप्रमाणे (परंतु) आंतरप्रस्तरासह दोन कूटकोष्ठ असलेले, हार पंजरांसह सहा किंवा आठ अल्पनासी असलेले, सर्व तऱ्हेच्या अलंकारांनी भूषविलेले असे ‘कल्याणसुंदर’ असते. (३२,३२½)

त्याचप्रमाणे परंतु शिखरावरची अर्धकोष्ठके काढून टाकावीत (व) चार नासिका असलेले शिखर कल्पावे. (असे) निरनिराळे अलंकार असलेले ‘पांचाल’ सांगतात. (३३, ३४)

त्याचप्रमाणे (परंतु) कंठ व शिखर अष्टकोनी व भरीव असतात. शीर्ष आठ महानासींसह असते. त्याला ‘विष्णुकान्त’ असे म्हणतात. (३५)

सान्तरप्रस्तरासह चार चार कूट व कोष्ठ, लांबट आकाराच्या पंजरासह (असतात). कण्ठ व शीर्ष वर्तुळाकृती असतात. एक, दीड, दोन किंवा तीन दण्ड कर्णकूटाचे कोष्ठाबाहेर निर्गमन कल्पावे. हे श्रेष्ठ, शिखराच्या चारी बाजूंना ४८ नासी (असतात). हे ‘विश्वकर’ असून ईश्वराचे (शंकराचे) फार आवडते असते. (३६–३८)

त्याचप्रमाणे (परंतु) शिखराच्या उंचीचे १२ भाग करून वेदी, कंठ व शीर्ष यांची उंची (प्रत्येकाहून) एक भाग जास्त असते. तीन स्तूपी असलेले हे ‘मंगल’ म्हणून सांगतात. (३९, ३९½)

[श्लोक ३९ फार अशुद्ध आहे. शिखराच्या उंचीचे १२ भाग करून वेदी तीन भाग, कंठ चार भाग व शीर्ष पाच भाग (एकेका भागाने जास्ती घेऊन) शिखराच्या उंचीच्या १२ भागांचा हिशोब लागतो.]

त्याचप्रमाणे पण वृत्तायताकृती असेल तर ते ‘ गांधार ’ होते. ( ४० )

तीनचतुर्थांश उंचीपर्यंत आयत किंवा चौरसाकृति व उपान वगैरे द्व्यश्रवृत्त ( दोन कोन व मागे अर्धवर्तुळाकृती ) किंवा वर दिल्याप्रमाणे असतात. त्याचप्रमाणे बाहेरूनदेखील आयत किंवा चौरसाकृती कल्पावे. गर्भगृह गोलाकार असून, कूटकोष्ठासह असावे. कर्णकूटाचे शीर्ष गोलाकार कल्पावे. कूट, कोष्ठ व लहान कोनाडे ( अल्पनीड म्हणजे क्षुद्रनासी ) समसूत्रात ( एकाच मध्यरेषेवर व समपातळीत ) असावेत. सर्व देवांना योग्य असलेले सुंदर असे हे सदन ‘ मनोहर ’ नावाचे असते. ( ४१–४३½ )

( अधिष्ठानाच्या ) उपानापासून स्तूपीपर्यंत बाहेरून गोल असते व इतर सर्व वरीलप्रमाणेच असलेल्या घराला शिवकान्त म्हणतात. ( ४४, ४४½ )

अधिष्ठान चौरस व गर्भगृहदेखील चौरस असते. परंतु बाहेरून अधिष्ठानाच्या वरपासून स्तूपिपर्यंत वर्तुळाकृती असून कूट, कोष्ठ वगैरे सर्व अंगे असलेले गर्भगृह असावे. अधिष्ठान चौरस किंवा आयताकार असावे. योग्य तितक्या कूटकोष्ठासह शिखर व कण्ठ षट्कोनी असतात. त्याला ‘कुबेर-कान्त ’ म्हणतात. ( ४५, ४६ )

अशा रीतीने दोनमजली घरांचे १८ प्रकार असतात. होमापासून स्तूपीपर्यंत विटांनी किंवा दगडांनी बांधलेले घर पुरुषाप्रमाणे मजबूत असते. ( ४७, ४७½ )

[ घरांचे १८ प्रकार न सांगता फक्त १५ प्रकार सांगितले आहेत. नुसत्या विटांनी किंवा फक्त दगडांनी बांधलेले घर पुल्लिंगी असते असाही अर्थ शेवटल्या श्लोकार्धाचा खालील नंतरच्या श्लोकांवरून करता येईल. ]

दगड व विटा मिळून घर बांधले तर त्याला संमिश्र हर्म्य म्हणतात. ( खाली ) दगडाचे ( बांधकाम ) असावे व त्यावरती विटांचे ( बांधकाम ) असावे. विटा व लाकूड यांनी संमिश्र असलेले घर षंढ म्हणून सांगितले आहे. ( ४८,४९ )

त्याचप्रमाणे बांधले (म्हणजे खालचा भरीव भाग दगडांनी व उरलेला वरचा पोकळ भाग, खोल्या वगैरे असलेला, लाकडांनी बांधला) तर ते घर घनाघन म्हणजे भरीव व पोकळ सांगतात. उरलेले सर्व घर लाकडांनी पोकळ रचले म्हणजे ते स्त्रीलिंगी संचित होते. असे पुल्लिंगी, नपुंसकलिंगी व स्त्रीलिंगी घर सांगतात. ( ५०, ५०½ )

[ नुसत्या दगडांनी किंवा नुसत्या विटांनी घर बांधले तर ते पुल्लिंगी घर. दगड व विटा यांनी मिळून घर बांधले तर पाया, उपपीठ, अधिष्ठान वगैरे खालचा भरीव भाग दगडांनी बांधून व वरचा पोकळी असलेला ( खोल्या वगैरे असलेला ) भाग विटांनी बांधल्यास हेही पुल्लिंगी घर मानावे. विटांनी खालचा भरीव भाग व लाकडांनी वरचा पोकळ भाग बांधलेले घर नपुंसकलिंगी असते. खालचा भरीव भाग दगडांनी व वरचा पोकळ भाग लाकडांनी बांधला की ते स्त्रीलिंगी घर होते. ]

मुखमंडपाच्या ( रुंदीचे ) माप गर्भगृहाच्या रुंदीइतके असते. ( ५१ )

चारही भिंतींची रुंदी पूर्वी एक मजल्याला सांगितली आहे तितकी असावी. हे ब्राह्मणा, द्वाराच्या दोन्ही बाजूंना खांबांच्यामध्ये अधिष्ठानापासून उत्तराच्या सिंहापर्यंत द्वारपालाकरिता

गुहा करावी. बिंबाची (द्वारपालाच्या मूर्तीची) उंची दोन ताल असावी व (भिंतीतील) प्रवेश फक्त एक दण्ड असावा. (५२, ५३)

[चारही भिंतींची रुंदी श्लोक २७·१०–१३मध्ये दिली आहे.]

सर्व घरांना (द्वारपालाच्या मूर्तीसाठी गुहा करावी. मात्र ती मूर्ती) अंतर्प्रवेशाशिवायही असते. असे दोनमजली घर सांगितले. नंतर त्रितल (तीन मजली घर) समजून घे. (५४)

**काश्यपशिल्पातील दोनमजली घराचे विधान नावाचे अठ्ठाविसावे पटल संपले.**

# एकोणतिसावे पटल

## [तीनमजली घर]

हे सुव्रता, आता विशेषतः तीन मजली घराची माहिती सांगतो ती ऐक. त्याची रुंदी वगैरे मापे पूर्वीच प्रासादमानात सांगितली आहेत. (१)

विन्याससूत्राच्या आतील भागाचे २८ (आठ ?) भाग करून एक भाग कूट असते व शालेची लांबी त्याच्या दुप्पट (दोन) भाग असते. (२)

एक अंश, पाऊण किंवा अर्धा अंश पंजराची रुंदी असते. उरलेले हारान्तर असते व त्याचे निर्गमन मागे दिल्याप्रमाणेच असते. (३)

वरील मजल्याचे सहा भाग (करून ?) सोडून उरलेली कूटाची रुंदी (एक भाग ?) सांगतात. शालेची लांबी दोन भाग असून उरलेले हारान्तर असावे. (४)

हारान्तराच्या सवापट किंवा पाऊणपट पंजर असतो. वरील मजल्याच्या तीन भागांपैकी एक भाग मध्यभद्र असावा. एक, दीड किंवा दोन दण्ड मध्यभद्राचे निर्गमन असते. ( ५,५½ )

प्रासादाच्या उंचीचे २४ भाग करून, अधिष्ठानाची उंची दोन भाग, खांबाची उंची चार अंश, मंचाचे माप दोन भाग, खांब पावणेचार अंश (व) प्रस्तराची उंची अडीच अंश सांगतात. खांबाची उंची साडेतीन अंश, मंचक सवा अंश, वेदिकेचे माप अर्धा अंश, गलाचे माप एक अंश, शिखर अडीच अंश व स्तूपीची उंची एक भाग असते असे 'शान्तिक' (सदन) कल्पावे. (७–९½)

(प्रासादाच्या) उंचीचे २४ भाग करून, अधिष्ठानाची उंची दोन भाग, खांबाची उंची चार अंश, मंचाचे माप दोन अंश, खांबाची उंची पावणेचार अंश असावी. प्रस्तराची उंची दीड अंश, खांबाची उंची अडीच (अंश) असावी. मंचाची उंची दीड अंश, वेदिकेची उंची दीड अंश, ग्रीवेचे माप एक अंश, शिखराची उंची तीन अंश (व) स्तूपीचे माप सवा अंश असावे. याला पौष्टिक म्हणतात. (१०–१३)



आकृती २८·२ : द्व्यश्रवृत्तप्रासाद



आकृती २८·३ : दोनमजली प्रासाद




आकृती २९·१ : तीनमजली प्रासाद (शान्तिक)

सदनाच्या उंचीचे २७ भाग करून, अधिष्ठानाची उंची दोन भाग, खांबाची उंची चार अंश, मंचाचे माप दोन भाग, खांबाची उंची चार अंश, वरचा मंच पावणेदोन अंश, खांबाची उंची त्याच्या दुप्पट (साडेतीन अंश), प्रस्तराची उंची दीड अंश, वेदिकेची उंची एक अंश, ग्रीवेचे माप दोन भाग, शीर्ष चार भाग, स्तूपीची उंची उरलेल्या भागांइतकी (सवा भाग) असते. याला जयद म्हणतात. (१४–१७½)

घराच्या उंचीचे ४२ भाग करून अधिष्ठान साडेतीन भाग, खांब सात अंश, अधिष्ठाना-इतकीच मंचाची उंची (साडेतीन भाग) असते. खांब साडेसहा अंश, प्रस्तराची उंची तीन अंश, खांब

सहा अंश, मंचाची उंची अडीच अंश, वेदिकेची उंची एक अंश, गलाचे माप दोन भाग असावे. शिखराची उंची पाच अंश, स्तूपीची उंची दोन भाग ( असते. ) याला अद्‌भुत हर्म्य म्हणतात. ( १८–२० )

प्रासादाच्या उंचीचे ४८ भाग केले असता, अधिष्ठान चार अंश, खांबाची उंची आठ अंश, मंचाचे माप चार अंश, खांब साडेसात, वरचा मंच साडेतीन, खांबाची उंची सात अंश, प्रस्तराची उंची तीन अंश, वेदिकेची उंची एक अंश, गलाचे माप दोन भाग, शिखराची उंची सहा अंश, स्तूपीचे माप दोन भाग ( असते. ) याला सार्वदेशिक ( सार्वकामिक ) म्हणतात. ( २१–२३½ )

आठ कूट, आठ शाला, सोळा पंजर असलेले, १८ लहान नासी असून, जन्मापासून (उपानापासून ) वरच्या टोकापर्यंत (स्तूपीपर्यंत) चौकोनी, निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान असलेले व निरनिराळ्या प्रकारच्या खांबांनी अलंकारिलेले, शिखरावरती बारा नासी असून, चार महानासी असतात, मोठे कूटकोष्ठ इत्यादी असलेले, नागर पद्धतीस योग्य असे ' स्वस्तिक ' भवन सांगतात.

त्याचप्रमाणे परंतु शिखर, गल व वेदिका जर गोलाकार असतील तर मला ( शंकराला ) अत्यंत आवडते ( असे ) ' रुद्रकान्त ' नावाचे भवन होते. ( २४–२८½ )

[ गारादाद्युचितं हा शब्द नागराद्युचितं असा सुधारून अर्थ केला आहे. ]

त्याचप्रमाणे परंतु शिखराच्या कोपरांपाशी दोन अल्पनासी असल्यास ते शंकराला अत्यंत आवडते ' शिवकान्त ' सदन होते. (२९, २९½)

त्याचप्रमाणे परंतु जर वेदिका, कण्ठ, शीर्ष तसेच घट अष्टकोनी असतील तर त्याला ' विष्णुकान्त ' म्हणतात. ( ३०, ३०½ )

विन्याससूत्राच्या आतल्या भागाचे नऊ भाग केले असता कूटाची रुंदी एक भाग, कोष्ठाची लांबी दोन भाग, प्रत्येक कोष्ठास एक द्विकोष्ठ असतो व नंतर पंजर अर्धा भाग असतो. उरलेला भाग हारान्तर असतो. हे कल्पवित्तमा, याप्रमाणे कल्पना करावी. (३१–३१½ )

चार कूट, आठ शाला व १२ पंजरांसह तेथेच अल्पनासी असून, शीर्ष व गल अष्टकोनी असते. शिखरावर आठ नासी असतात. हे ब्राह्मणश्रेष्ठा, त्याला ' शुद्धाभिधान ' असे नाव आहे; ते धर्माविषयी प्रेम वाढविणारे आहे ( ३३, ३४½ )

त्याचप्रमाणे परंतु वेदी अष्टकोनी व शिखर आणि गल वर्तुळाकृती असते. सर्व देवांकरिता योग्य अशा याला ' विमानाकृती ' असे नाव आहे. ( ३५–३५½ )

त्याचप्रमाणे परंतु शिखर ( व ) कण्ठ चौकोनी असतील तर त्याला ' ब्रह्मकान्त ' म्हणतात. (३६)

त्याचप्रमाणे परंतु पुढील भाग आयताकृती (म्हणजे लांबी रुंदीच्या) सवापट किंवा १⅓ पट असते. रुंदी आठ भागांत व लांबी १० भागांत विभागून कूटाची रुंदी एक अंश, शालेची लांबी दोन अंश (व) उरलेला भाग हारान्तर असे पूर्वीप्रमाणेच कल्पावे. ( ३७, ३८ )

वरील मजल्यावर सहा व आठ विभाग अनुक्रमे रुंदी व लांबीचे करून, कूटाची रुंदी एक अंश, कोष्ठाची लांबी तीन अंश, पंजराची रुंदी अर्धा अंश व उरलेले हारान्तर असते. वरील (तिसऱ्या) मजल्याच्या रुंदीचे तीन भाग करून एक भाग कण्ठभद्र असतो. (३९, ४०)

वेदी, कण्ठ व त्याचप्रमाणे शीर्ष ध्वश्रवृत्त असून, चार कूट, आठ शाला व १२ पंजर असतात. (४१)

पहिल्या मजल्यावर २४ हारान्तर असतात. चार कूट, चार शाला व आठ पंजर असतात. (४२)

हारान्तर १६ असून अल्पनासी १०० असतात. ललाटनासिका असून दोन्ही बाजूंना भद्रनासिका असतात. प्रत्येक नासिकेच्या पाठीमागच्या बाजूला शिखर असावे. ( ४३, ४३½ )

[ पुढे मध्यभागी ललाटनासिका व तिच्या दोन्ही बाजूंना भद्रनासिका असतात, किंवा समोरच्या बाजूला ललाटनासिका असून उजव्या व डाव्या बाजूंना मध्यभागी भद्रनासिका असतात असाही अर्थ होऊ शकेल. शिचोपमाचरेत् ऐवजी शीर्षकमाचरेत् असा शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

निरनिराळ्या प्रकारच्या अधिष्ठानांनी युक्त, निरनिराळ्या प्रकारच्या खांबांसह व सर्व अलंकार असलेले हे 'हस्तिपृष्ठ' (नावाचे) घर आहे. (४४, ४४½)

[ हस्तिपृष्ठाच्या पंजरासाठी श्लोक ३१-२३ पहा. ]

मानसूत्रांच्या मधील रुंदी नऊ भागांत विभागून गर्भगृह तीन अंश, भिंतीची रुंदी एक अंश, भोवतालचा ( चारही बाजूंना असलेला ) व्हरांडा एक अंश ( व ) हाराची रुंदी एक अंश असते. (४५, ४६)

अशी कल्पना करून तेथे कण्ठकूट एक अंश, मध्य भागातील कोष्ठ तीन अंश व त्यानंतर पंजर एक अंश असतो. ( ४७ )

हारान्तर त्याच्या (पंजराच्या) निम्मे (अर्धा अंश) असे (विभाग) पहिल्या मजल्यावर कल्पावेत. किंवा पंजर अर्धा भाग असावा. उरलेला भाग हारान्तर सांगतात. ते चहूबाजूंनी असावे. कोष्ठाच्या मध्यभागापासून महानासीचे निर्गमन तीन दण्ड असते. (४८, ४९)

वरील मजल्याच्या रुंदीचे सहा भाग करून कूटकोष्ठाची लांबी दोन भाग असते. अर्धा भाग पंजराची रुंदी असते व उरलेले हारान्तर असते. (५०)

वरील मजल्याच्या रुंदीच्या बाहेर अर्धा दण्ड निर्गमन असलेले अधिष्ठान चौरस असून, शीर्ष व गल अष्टकोनी असतात. (५१)

पहिल्या मजल्याच्या चारी कोपऱ्यांवरील कूटाचे शीर्ष चौकोनी असावे व वरच्या मजल्यां-वरील कूटाचे शीर्ष अष्टकोनी असावे. (५२)

आठ कूट, आठ कोष्ठ, १६ पंजरांसह १०० अल्पनासी असलेले (व) श्रेष्ठ शिखर असलेल्या (प्रासादाला) 'भद्रकोष्ठ' नाव आहे व तो (प्रासाद) सर्व देवांना अत्यंत योग्य आहे. (५३, ५३½)

त्याचप्रमाणे परंतु कर्णकूटाचे शीर्ष वर्तुळाकृती व प्रासादाचे शीर्ष (व) कण्ठ गोलाकार कल्पावेत. शिखरावरती चारी दिशांना भद्रनासी असाव्यात व (उप) दिशांना अल्पनासी असाव्यात हे 'वृत्तकूट' सदन होय. (५४–५५½)

त्याचप्रमाणे परंतु शिखरावर कोपऱ्यांपाशी आठ क्षुद्रनासी (असून), कर्णकूटाचे शीर्ष चौकोनी कल्पावे व इतर वरीलप्रमाणेच ठेवावे, त्याला 'श्रीकण्ठ' म्हणतात. ( ५६, ५७ )

त्याचप्रमाणे परंतु रुंदीच्या $\frac{1}{8}$ जास्त लांबी असलेला चौकोनी आकार असून मध्यभागी भद्राशिवाय महानासी कल्पावी. (५८)

[शेवटल्या मजल्यावर मध्यभागी जे भद्र असते ते नसून तेथे महानासी असावी.]

शीर्ष व कण्ठ शालेप्रमाणे (लांबट) किंवा वृत्तायत असून तीन स्तूपींसह 'सुमंगल' नावाचे सदन होते. (५९)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, मानसूत्राच्या मधील रुंदीचे दहा भाग करून गर्भगृह चार भाग व भोवती भित एक अंश, चहूबाजूंना असलेला व्हरांडा एक अंश व हार एक भागाने कल्पावा. तेथे कूटाची रुंदी एक अंश, मध्यभागी कोष्ठाची लांबी दोन भाग, त्यांच्यामध्ये (कूट व कोष्ठ यांच्यामध्ये) एक भाग पंजराची रुंदी असते. पंजराच्या दोन्ही बाजूंना एक अंशाचे हारान्तर असते. (६०–६२)

वरील मजल्याचे आठ भाग करून, कूटाची रुंदी एक अंश करावी. शालेची लांबी दोन भाग व त्यांच्यामध्ये पंजर एक अंशाने करावा व उरलेले हारान्तर असते. (६३, ६३$\frac{1}{2}$)

वरील तिसऱ्या मजल्याचे चार भाग करून दोन भाग मध्यभागी भद्र असतो. त्याचे निर्गमन एक, दोन किंवा तीन दण्ड असते. त्याचे अधिष्ठान चौरसाकृती असून त्याचप्रमाणे (म्हणजे चौरस) कंठ व शीर्ष असतात. (६४, ६५)

आठ शाला, आठ कूट, सोळा पंजर, निरनिराळ्या प्रकारच्या अधिष्ठानांसह, निरनिराळ्या खांबांनी अलंकारिलेल्या, उंच कूटकोष्ठ व आन्तरप्रस्तर असलेल्या त्या (भवनाला) 'गान्धार' म्हणतात.

किंवा कण्ठ व शीर्ष अष्टकोनी असतील तर ते 'श्रीविशाल' म्हणून प्रसिद्ध आहे. वेदिका, गल ही गोल व शीर्ष तसेच (वर्तुळाकार) केलेले असून उरलेले सर्व वरीलप्रमाणेच असले म्हणजे ते सर्व देवांना योग्य असे श्रीभागाढ्य (श्रीभोगाढ्य ?) होते. (६६–६८$\frac{1}{2}$)

वर्तुळाकृती, वृत्तायत, द्व्यश्रवृत्ताकृती किंवा षट्कोनी असून कूट, कोष्ठ इत्यादी सर्व अवयव पूर्वीप्रमाणेच असावेत. वर्षस्थल व मण्डल असून शीर्ष व कर्ण नसावेत. (६९, ७०)

[शीर्ष व कण्ठ नसलेल्या प्रासादाचे छप्पर शालेप्रमाणे असते व त्यावर तीन स्तूपी असतात. श्लोक २८·३९–४० तसेच २९·५९ पहावेत.]

वर्षस्थलाशिवाय (परंतु) कंठ आणि शीर्षासह असलेले, नागर पद्धतीस योग्य (म्हणजे चौकोनी शीर्ष असलेले) असे कूटकोष्ठ इत्यादी सर्व अवयव असलेले– (७१)

निरनिराळ्या अलंकारांसह नाना तऱ्हेच्या चित्रांनी भूषविलेले मोठे गर्भगृह, भिंती आणि मुखमण्डप ही एक मजल्याच्या घराकरिता जशी सांगितली तशीच असतात. त्यातल्या त्यात जेथे निराळा उल्लेख नाही त्या प्रासादांच्या बाबतीत तरी (तशीच असतात.) तीन मजली घर असे सांगितले. आता चारमजली घर सांगतो. (७२, ७३)

**काश्यपशिल्पातील तीनमजली घराची माहिती या नावाचे एकोणतिसावे पटल संपले.**

# तिसावे पटल

## [ चारमजली घर ]

आता चार मजली घराचे लक्षण सांगतो. रुंदी व उंची प्रासादमानात सांगितली आहेत. ( १ )

मानसूत्राचे १२ भाग करून गर्भगृह एक अंश, भिंती, व्हरांडा, हार हे प्रत्येकी एक भाग असतात. (२)

[ भिंती, व्हरांडा व हार प्रत्येक एक भाग धरल्यास, गर्भगृहाची रुंदी सहा भाग येते. ]

विन्याससूत्राच्या मधील अंतराचे आठ भाग करून कर्णकूट एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ), पंजराची रुंदी एक अंश व उरलेले हारान्तर असावे. ( ३, ३$\frac{1}{2}$ )

वरील मजल्याचे पुन्हा आठ भाग करून कर्णकूट, कोष्ठ आणि पंजर पूर्वीप्रमाणेच असतात. ( ४, ४$\frac{1}{2}$ )

त्याच्या वरील मजल्याचे सहा भाग करून एक अंश कूटाची रुंदी असते, कोष्ठाची लांबी एक अंश, अर्धा अंश पंजराची (रुंदी) असते व उरलेले हारान्तर असते. ( दिलेल्या मापापेक्षा ) लहान-मोठे प्रमाण करू नये. (५, ६)

वरील ( शेवटच्या ) मजल्याचे तीन भाग करून एका भागाने मध्यभागी भद्र करावे. त्याचे निर्गमन एक, दीड किंवा दोन दण्ड असते. ( ७ )

प्रासादाच्या उंचीचे एकंदर ३० भाग ( ५०$\frac{3}{4}$ भाग ? ) केले असता अधिष्ठान साडेआठ अंश, खांबाची उंची पाच अंश, अधिष्ठानाइतकेच ( साडेआठ अंश ) मंच असतो. खांब पावणेपाच अंश व हे द्विजसत्तमा, कर्ममंचाची उंची दोन अंश कल्पावी. ( ८, ९ )

खांब साडेचार अंश, प्रस्तराची उंची दोन अंश, खांबाची उंची सवाचार भाग असावी. ( १० )

मंचाची उंची पावणेदोन, वेदिकेची उंची एक भाग असते. कण्ठाची उंची दोन भाग असावी, शीर्ष साडेचार भाग– ( ११ )

स्तूपीची उंची दोन भाग असावी, म्हणजे शान्तिक भवन होते. ( ११$\frac{1}{2}$ )

[ खांबाच्या उंचीच्या निम्मे उंचीचे अधिष्ठान असते. तेव्हा अधिष्ठानाची उंची अडीच भाग तसेच पहिल्या मंचाची उंची अडीच भाग असावी. या हिशोबाने प्रासादाच्या उंचीचे ३८$\frac{3}{4}$ भाग होतात. ]

घराच्या उंचीचे ४२ भाग केले असता अधिष्ठान तीन अंश, खांबाची उंची सहा अंश, प्रस्तर तीन भागांनी, खांबाची उंची पाच अंश– ( १२, १३ )

प्रस्तराची उंची तीन भाग, खांबाची उंची ५$\frac{3}{4}$ अंश, मंचाची उंची २$\frac{1}{4}$ भाग, खांबाची उंची साडेचार, ( १४ )




आकृती ३०·१ : चारमजली प्रासाद (पौष्टिक)

मंचाचे माप दोन भाग, वेदिकेची उंची एक अंश, गलाची उंची दीड अंश, शिखराची उंची तीन अंश, स्तूपी दोन भाग ( असे ) हे पौष्टिक सांगितले. ( १५, १५½ )

स्तूपीपर्यंतची हर्म्याची उंची ५० भागांत विभागून अधिष्ठान साडेतीन अंश, खांबाची उंची सात अंश, प्रस्तराची उंची साडेतीन अंश, खांबांची उंची सहा अंश, ( १६,१७ )

मंचाचे माप तीन अंश, वरील खांबाचे माप त्याच्या दुप्पट ( सहा भाग ), प्रस्तराची उंची तीन भाग, खांबाची उंची साडेपाच ( भाग ), ( १८ )

प्रस्तराची उंची तीन भाग, वेदिकेची उंची एक अंश, गलाचे माप दोन भाग, शिखराची उंची पाच अंश, स्तूपीचे माप दीड अंश ( असा प्रासाद ) जयद ( प्रकारचा ) म्हणतात.(१९,१९½ )

शहाण्या माणसाने उपानापासून स्तूपीपर्यंत ( ची उंची ) ५० भागांत विभागावी. अधिष्ठानाची उंची साडेतीन अंश असावी. खांबाची उंची सात अंश, अधिष्ठानाच्या उंचीइतका मंच ( साडेतीन अंश ) असावा. खांब साडेसहा ( भाग ), ( २०, २१ )

मंचाचे माप पावणेचार भाग सांगितले आहे. खांबाची उंची सहा भागांनी, प्रस्तराची उंची तीन अंश, ( २२ )

खांबाची उंची साडेपाच अंश, मंच अडीच भाग, वेदिकेचे माप एक अंश, गलाची उंची दोन भाग असावी. ( २३ )

शिखराची उंची पाच अंश, स्तूपी सवादोन अंश ( असावी. ) हे कल्पवित्तमा, असे अद्भूतसदन कल्पावे. ( २४ )

[ एकंदर विभाग ५० न होता ५१ होतात. ]

विशेषतः प्रासादाच्या उंचीचे ५० भाग करून अधिष्ठान दीड अंश, खांब सात अंश, ( २५ )

प्रस्तराची उंची तीन भाग ( व ) खांब साडेसहा भाग असावेत. मंच सवातीन अंश असावा. खांब साडेसहा ( भाग ), ( २६ )

प्रस्तराची उंची तीन भाग, खांबाची उंची साडेपाच, मंचाची उंची पावणेतीन अंश, वेदिकेची उंची एक अंश, ( २७ )

गलाचे माप दोन भाग, शिखराची उंची पाच अंश, स्तूपी एक अंश, ( असे हे ) सार्वदेशिक ( सार्वकामिक ) विमान असते. ( २८ )

[ एकंदर विभाग ५० न होता ४८ होतात. ]

होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी कल्पावे. १२ कूट व तितकेच कोष्ठ (तसेच) २४ पंजर ( असतात. ) ( २९ )

शिखरावरती चारी दिशांना चार भद्रनासी, प्रत्येक खांबावरती अल्पनासी व शिखरावरती आठ अल्पनासी ( असाव्यात. ) ( ३० )

कूटकोष्ठ वगैरे सर्व अवयव नागरपद्धतीस योग्य असे करावेत. ( प्रत्येक ) मजल्याचे खांब एकाच आकाराचे असावेत (म्हणजे) 'सुभद्र' होते. ( ३१ )

त्याचप्रमाणे परंतु शिखर आठ अल्पनासींशिवाय असले म्हणजे सर्व देवांना आवडते असे सुप्रसिद्ध ब्राह्म होते. ( ३२ )

त्याचप्रमाणे परंतु शिखराचा कण्ठ वर्तुळाकृती असल्यास त्याला 'श्रीकण्ठ' म्हणतात. शीर्ष व कण्ठ अष्टकोनी असल्यास 'श्रीमण्डन' म्हणतात. ( ३३ )

त्याचप्रमाणे परंतु शिखरावर आठ महानासी असल्या तर 'श्रीभवन्त' होते, किंवा (ते) शाला व भद्रासह असते. ( ३४ )

किंवा (वरील) सर्व प्रासाद भद्रविरहित असले तर ते 'श्रीकान्त' होते; व पुन्हा आठ अल्पनासी असल्या तर ते 'श्रीविशाल' होते. ( ३५ )

निरनिराळ्या खांबांनी व अधिष्ठानांसह असलेले (प्रासाद) त्या त्या नावांनी सांगितले.

........ भास्कर मात्र शीर्षाशिवाय असते. ( ३६ )

[ श्लोकार्ध अशुद्ध व अपुरा दिला असल्याने योग्य अर्थ लावता येत नाही. ]

मानसूत्राच्या आतील रुंदीचे विशेषत: नऊ भाग करून गर्भगृह तीन भाग, भिंत एक भाग, व्हरांडा एक अंश व हार एक भाग असावा. ( ३७,३८ )

नंतर ( वरच्या मजल्यावर ) विन्याससूत्राची रुंदी नऊ भागांत विभागली असता एक अंश कूटाची रुंदी, कोष्ठाची लांबी तीन अंश, ( ३९ )

पंजराची रुंदी एक अंश आणि हारान्तर अर्धा अंश ( असते ). शालेच्या मध्यभागापासून महानासीचे निर्गमन अर्धा भाग असते. ( ४० )

वरील मजल्याच्या रुंदीचे नऊ भाग करून कूट एक अंश असावा. शालेची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ), पंजर एक अंश असावा, ( ४१ )

व उरलेले हारान्तर असावे. वरील मजल्याच्या रुंदीचे सहा भाग करून कूट एक भागाने करावा. कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन भाग ) असावी, (४२)

पंजराची रुंदी दीड अंश व उरलेला भाग हारान्तर असावे. वरील मजला त्याच्या निम्मे असून मध्यभागाचे निर्गमन एक दण्डाने असावे. ( ४३ )

चौरस, अष्टकोनी व वर्तुळाकार असे क्रमाने निरनिराळ्या मजल्यांवर ( खालून वर ) कूटांचे शीर्ष करावे. कर्करीदण्डाप्रमाणे कोष्ठ असावे व घराचे शिखर अष्टकोनी असावे. ( ४४ )

[ कर्करी दण्ड– ?
स्वश्र हा शब्द सुधारून वस्वश्र असा करून त्याप्रमाणे अर्थ दिला आहे. ]

आठ महानासी असलेले शीर्ष कल्पावे, १२ कोष्ठ व १२ कूट आणि २४ पंजर असावेत. ( ४५ )

पूर्वीप्रमाणेच उंचीचे माप घेऊन नंतर हे कोष्ठ ( घर ) करावे. घराच्या रुंदीचे दहा भाग करून गर्भगृह चार भाग ( ? ) असावे. ( ४६ )

[ वर्मांशं हा शब्द सुधारून धर्मांशं असा केला आहे व त्याप्रमाणे अर्थ दिला आहे. भिंत, व्हरांडा व हार यांची रुंदी प्रत्येकी श्लोक ४७ त दिल्याप्रमाणे एक घेतली म्हणजे गर्भगृहाचे माप चार भाग येते व तसे ते वर उल्लेखिलेले आहे. ]

भिंतीचे माप एक अंश, व्हरांडा एक भाग व चहूबाजूंनी असलेल्या हाराची रुंदी एक अंश असावी. ( ४७ )

विन्याससूत्राच्या मधील अंतराचे दहा भाग केले असता, कर्णकूट त्यांतील एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) असते. ( ४८ )



आकृती ३०·२ : चारमजली प्रासाद

अर्धा अंश पंजराची रुंदी व उरलेले हारान्तर असते. चार कूट, आठ कोष्ठ आणि तितक्याच संख्येचे ( आठ ) पंजर असावेत. ( ४९ )

[ पञ्चारम्भं तु संख्यया हा शब्दसमूह पञ्जरं तु समसंख्यया असा बदलून तसा अर्थ दिला आहे. ]

पहिल्या मजल्यावरती २४ हारान्तर असावेत, प्रस्तर भरीव असून व्हरांडा जलपाद ( एक भाग ? ) असावा. ( ५० )

वरील मजल्याचे नऊ भाग करून कूटाची रुंदी एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) व पंजराचे तेच माप ( दोन अंश ? ) असते. उरलेले क्षुद्रपंजरांसह हारान्तर असावे. ( ५१, ५१½ )

[ शममानतः च्या ऐवजी सममानतः असे पाहिजे.]

वरील ( शेवटल्या ) मजल्याचे तीन भाग करून मधल्या भागाचे ( भद्राचे ) एक दण्डाने निर्गमन असते. ( ५२ )

अधिष्ठान चौकोनी, शीर्ष व गल अष्टकोनी, शिखरावरती आठ महानासी असतात. प्रत्येक खांबावरती अल्पनासिका असते. ( ५३ )

कर्णकूट एक भाग असतो. कोष्ठ सोळा ( ? ) असतात. अंतरप्रस्तरासह खाली कूट व उंच जागी कोष्ठ असते. ( ५४ )

लहान कोनाडे ( क्षुद्रनीड ) २८ असावेत. नासीचे तोंड डुकराच्या तोंडासारखे (वर्तुळाकार) असावे. निरनिराळ्या चित्रांनी अलंकारिलेले व पूर्वी सांगितल्याप्रमाणे उंची असलेले असे हे सर्व देवांना योग्य असे ‘ जयावह ’ नावाचे सदन असते. ( ५५, ५५½ )

त्याचप्रमाणे परंतु कंठापासून शिखरापर्यंतचा ( भाग ) वर्तुळाकृती असतो. (५६)

[ हे नवीन प्रासादाचे वर्णन आहे पण त्याचे नाव दिलेले नाही. ]

त्याचप्रमाणे आंतरमंच, कूटकोष्ठ आणि पंजर असावेत. तळमजल्यावरील कूटाचे शीर्ष, स्तूपी, कुंभ आणि कंठ वर्तुळाकृती असतात. मधल्या मजल्यावर ( कूटांचे हे भाग ) अष्टकोनी असावेत व मधल्या मजल्यावरील ( तिसऱ्या ) कर्णकूट चौकोनी असावेत. सर्व देवांना अत्यंत योग्य असे ‘ सुखावह ’ नावाचे ( सदन ) होते. ( ५७–५८½ )

त्याचप्रमाणे परंतु कूटकोष्ठ आन्तरप्रस्तराशिवाय असून रुंदी व उंची समसूत्रात असली म्हणजे ( ते ) ‘ जयगृह ’ होते. (५९–५९½ )

त्याचप्रमाणे पण शिखर व कण्ठ चौकोनी असेल तर त्याला ‘ धारकान्त ’ म्हणतात. ( ६० )

**काश्यपशिल्पातील चारमजली घराचा विधी या नावाचे तिसावे पटल संपले.**

# एकतिसावे पटल

## [ कूट, कोष्ठ व पञ्जर ]

मी आता कूट, कोष्ठ व पञ्जराची लक्षणे सांगतो. दोन तसेच एकमजली प्रासादांना ते एकाच प्रकारचे असतात. ( १ )

कर्णकूटाची उंची प्रत्येक ( मजल्याच्या ) प्रस्तराच्या उंचीइतकी असते. रुंदी (उंची) इतकीच असा समकोनांचा कर्णकूट असतो. आयताकृती असून भिंतीलाच चार खांब असलेले कोष्ठ असते. ( २ )

[ अंशुमत् काश्यपाप्रमाणे 'आयताश्रं तु कोष्ठं स्याच्चतुष्पादैकभित्तितः ।' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. पुढे उल्लेखिलेल्या दुरुस्ती अंशुमत् काश्यपावरून केल्या आहेत. ]

कूटकोष्ठांना विशेषतः खाली खांब, त्यावर प्रस्तर ( नंतर ) कंठ व शिखर असून (त्यावर) एक किंवा अनेक स्तूपी असतात. ( ३ )

याप्रमाणे पहिल्या मजल्यावर करावे. ज्याच्यावरती आणखी मजला नाही ( म्हणजे फक्त तळमजला असलेल्या ) प्रासादाला करावे. कूट, शाला व त्याचप्रमाणे पंजर असावेत. ( ४ )

[ श्लोकार्ध ३$\frac{१}{२}$ अशुद्ध आहे. ]

विशेषतः वरील खांबाचे सात भाग करून वेदिकेची उंची एक अंश, गळाची उंची दीड अंश, शीर्ष तीन अंशांचे व उरलेला भाग ( दीड अंश ) स्तूपीची उंची असावी. अशा रीतीने दोन कूट-कोष्ठ प्रत्येक मजल्याला असावेत. ( ५, ६ )

आता मी कूटकोष्ठाची उंची सांगतो. उत्तराच्या वरच्या सीमेपर्यंत ( म्हणजे ) हंसमाला किंवा ऊर्ध्वसिंहापर्यंत किंवा कपोताच्या सीमेपर्यंत ( कूट व कोष्ठाची उंची असते ) त्यांचे ( अंग ) विभाग पूर्वीप्रमाणेच असावेत. कूट, कोष्ठ सान्तरप्रस्तर असतील तर ( त्यांची उंची ) प्रस्तराच्या वरच्या मर्यादेपर्यंत असते. ( ७, ८ )

[ 'ऊर्ध्वसोमकम्' च्या ऐवजी 'ऊर्ध्वसीमकम्' अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. उत्तराच्या अंगविभागांची माहिती श्लोक १९·१५–१६ त दिली आहे. ]

किंवा वरच्या वेदिकेइतकी सान्तरप्रस्तरासह कूटकोष्ठाची उंची असते. ही उंची ११ भागांत विभागून एक भाग वेदिकेची उंची असते. खांबाची उंची तीन अंश, मंचक १$\frac{३}{४}$ अंश, स्तूपीची उंची १$\frac{१}{४}$ अंश असे क्रमाने कल्पावे. ( ९, १० )

शिल्पशास्त्र जाणणाऱ्याने याप्रमाणे दोन कूट, कोष्ठ कल्पावेत. या कूटाचे तीन भाग केले तर त्याच्या नासीची रुंदी एक भाग असावी. (११)

रुंदीच्या $\frac{१}{३}$, $\frac{१}{४}$, $\frac{१}{५}$ ( किंवा ) $\frac{१}{७}$ भागाने निर्गमन असते. कर्णकूटात कपोतापर्यंत नासीचे निर्गमन असावे. ( १२ )

कूटांच्या चारी दिशांना चार नासी ( प्रत्येकी ) एका स्तूपीसह कल्पाव्यात; व त्यांचे ( नासींच्या अंगांचे ) निर्गमन व प्रवेश विमानाप्रमाणे असावेत. ( १३ )



आकृती ३१·१ : कर्णकूट, कोष्ठादी



आकृती ३१·२ : सान्तरप्रस्तर कोष्ठ

विमानाइतकेच कोन असलेले किंवा आठकोनी किंवा वर्तुळाकार (कूटांचे) गल व शीर्ष असलेले असे नागर विमानास योग्य असे कर्णकूट असावे. ( १४ )

शालेच्या दोन्ही बाजूंना, हे ब्राह्मणा, ललाट नावाची नासिका असते. ती शालेच्या रुंदी-इतकी रुंद व मुखपट्टीपर्यंत इतकी उंच असते. ( १५ )

स्वतःच्या स्तूपीच्या अग्राइतकी शालेच्या नासीची सीमा ( उंची ) असते. ( १६ )

कूटाच्या ( की कोष्ठाच्या ? ) नासीचे निर्गमन महानासीप्रमाणे असते व हे ब्राह्मणा, नागर, प्रासादात ती ( नासी ) तीन स्तूपींसह असते. ( १७ )

द्राविड पद्धतीच्या शालेला दोन किंवा तीन स्तूपी असतात व वेसर पद्धतीच्या शालेला स्तूपी एक किंवा चार असतात. ( १८ )

कूट, कोष्ठांच्या गलाच्या ठिकाणी देवता वगैरे असाव्यात. अशा रीतीने कूट, कोष्ठ सांगितले आता पञ्जर सांगतो. ( १९ )

उपानापासून उत्तरापर्यंत नऊ भाग केले असता उपपीठ एक अंशाने, अधिष्ठान दोन अंशांचे, खांबाची उंची चार अंश, मंच दीड भागाने, वेदिकेचे माप अर्धा अंश असावे. कपोताच्या सीमेपर्यंत गलोदय असतो. ( २०, २१ )

( किंवा ) प्रतिवाजनाच्या सीमेपर्यंत पंजराची उंची सांगतात. प्रासादाच्या बाहेर कपोताचे निर्गमन जसे शोभेल तसे असावे. ( २२ )

पंजर नासिकेच्या आकाराचे किंवा कूट, कोष्ठाच्या आकाराचे असते; किंवा हस्तिपृष्ठ विमानाप्रमाणेदेखील त्याचा आकार असतो. ( २३ )

[ श्लोकार्ध २३ हस्तिपृष्ठविमानस्य शिखराभमथापि वा । असा दुरुस्त करून अर्थ दिला आहे. ]

अशा रीतीने अनेक प्रकारांनी पंजराचा आकार सांगतात. अनेकमजली विमानाला जेथे जे इष्ट असेल तेथे त्या आकाराचे ( पंजर ) करावे. ( २४ )

[ श्लोकार्थ २४ त ‘ हर्म्यकोष्ठेषु हर्म्यकम् ’ या ऐवजी ‘ हर्म्येष्वनेकभूमिषु ’ अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. ]

एकमजली प्रासादांच्या बाबतीत ... ... अशा रीतीने पहिला मजला आंतरप्रस्तरासह करावा. ( २५ )

पंजर मानसूत्राच्या बाहेर येईल असे ( त्याचे निर्गमन ) ठेवावे. प्रस्तराच्या वर विशेषत. पंजर निर्गमनाशिवाय असतो. ( २६ )

कर्णकूटाइतकी, त्याच्या दीडपट किंवा त्याच्या पाऊणपट इतकी पंजराची रुंदी असावी: त्याच्या रुंदीइतकीच त्याची उंची युक्तीने ठेवावी. ( २७ )

[ हा श्लोक दुरुस्त केला—

कर्णकूटसमं सार्धं त्रिपादं वाथ विस्तृतम् ।
तद्व्यास सदृशं तुङ्गं युक्त्या पञ्जरमाचरेत् ॥



आकृती ३१·३ : कोष्ठपंजर



आकृती ३१·४ : कुंभपंजर

पञ्जराची रुंदी कर्णकूटाच्या निम्मे असते. दीडपट कोठेही दिलेली नाही. तेव्हा या दुरुस्त श्लोकातही ‘ सार्ध ’ च्या ऐवजी ‘ अर्ध ’ हा शब्द पाहिजे. ]

मजल्यावर पूर्वीप्रमाणेच प्रतीच्यावर खांबाचे नऊ भाग करून तीन अंश भरीव भित असावी. तिचे छत्र शिखराप्रमाणे असावे. ( २८ )

[ हाही एक पंजराचा प्रकार. ]

खांबाच्या उंचीचे चार भाग करून प्रस्तर अडीच भाग, वेदिकेचे माप अर्धा अंश व ( उत्तराच्या ) कपोतापर्यंत गलाची उंची असते. ( २९ )

प्रतिवाजनाच्या सीमेपर्यंत पंजराची उंची सांगतात. उरलेले ( अंगविभाग ) पूर्वीप्रमाणेच करावेत. ही निर्गमन असलेल्या पंजराची माहिती. ( ३० )

प्रस्तराच्यावर कूट, कोष्ठात किंवा खांबावर किंवा खांबाच्यामध्ये पंजर असेल तर तो निर्गमनाशिवाय असावा. ( ३१ )

गोपानाला आधार म्हणून महापराक्रमी, हात व पाय दोन्ही असलेले, डोळे वटारलेले व जटा फिस्कारलेले, रागीट चेहरा असलेले, नृत्याची मुद्रा घेतलेले व काजळाप्रमाणे काळे, तुळईला प्रयत्नाने हातांनी किंवा पायांनी आधार देत आहेत असे हत्ती, हंस, सिंह किंवा वाघ दाखवितात. किंवा तुळईला डोक्याने आधार दिलेला असतो आणि हातपाय जेथल्या तेथे असतात असे दाखवावे. ( ३२–३४ )

[ मंचाचा जो कपोत हा थरविभाग आहे त्याला गोपान म्हणतात. तसेच कपोतावर जी विशिष्ट नक्षी काढतात त्यालाही गोपान म्हणतात. आपटे यांच्या संस्कृत–इंग्लिश कोशाप्रमाणे गोपान म्हणजे तुळई. ]

कूट वगैरेंची लक्षणे सांगितली, आता नंतर पाचमजली प्रासादाची ( लक्षणे सांगतो. ) (३५)

**काश्यपशिल्पातील कूट इत्यादींचे लक्षण हे एकतिसावे पटल संपले.**

## बत्तिसावे पटल

### [ पाचमजली घर ]

आता विशेषतः पाचमजली घराचे लक्षण सांगतो. त्याची रुंदी व उंची प्रासादमानात सांगितली आहे. ( १ )

रुंदीचे ११ भाग करून तीन भाग गर्भगृह असते, दोन भाग भिंत असते व व्हरांडा एक भाग असतो. ( २ )

[ हार एक भाग असतो. ]

हाराच्या मापाच्या प्रमाणात व्हरांडा व पायाची भिंत असावी. प्रस्तराच्या वर सम-पातळीत वर्षस्थल कल्पावे. ( ३ )

तळमजल्यावर किंवा मंचावरती दुसऱ्या किंवा तिसऱ्या मजल्यावर देवतेची स्थापना करावी, व तोपर्यंत सर्व मजले भरीव करावेत. (४)

विन्याससूत्राच्या मधल्या ( आतील आतील ) भागाचे ११ भाग करून एक भाग कर्णकूट असावा व मध्यभागील कोष्ठ तीन अंश असावे. ( ५ )

हे कल्पवित्तमा, त्याच्या ( कर्णकूट व कोष्ठ यांच्या ) मध्यभागी एक पंजर असावे व हारान्तर एक अंशाचे असावे. (६)

त्याच्या वरच्या मजल्याच्या रुंदीचे नऊ भाग करून एक भाग सौष्ठिक ( कर्णकूट ) असते. मधील कोष्ठ तीन भाग असून पंजर एक भाग मापाचा असावा. ( ७ )

दुसऱ्या मजल्यावर हारान्तर अर्धा अंश कल्पावे. त्याच्या वरच्या ( तिसऱ्या ) मजल्यावर आठ अंशांपैकी एक अंश कर्णकूट असते. ( ८ )

[ तिसऱ्या मजल्याच्या रुंदीचे आठ भाग करावेत. ]

कोष्ठ दोन भाग करावे, तसेच पंजर एक भाग असावे. सर्वलक्षणसंपन्न हारान्तर अर्धा अंश असते. ( ९ )

त्याच्या वरच्या ( चवथ्या ) मजल्याचे सहा भाग करून कूटाची रुंदी एक अंश असते. शालेची लांबी एक भाग असते व पंजर अर्धा अंश असतो. ( १० )

उरलेला भाग हारान्तर असते, किंवा तेथे बलकुंजर (मस्तीत आलेला हत्ती) असतो. त्याच्या वरच्या ( पाचव्या ) मजल्याच्या मध्यभागाचे एक दण्डाने निर्गमन असते. ( ११ )

[ वरच्या मजल्याच्या रुंदीचे तीन भाग करून मधला एक भाग एक दंडाने निर्गमन असलेला असावा. ]

घराच्या उंचीचे ४८ भाग करून अधिष्ठान पाऊण अंश, खांबाची उंची साडेपाच अंश, मंचक अडीच अंश, ( १२ )

( व ) खांबाची उंची सवापाच भाग सांगितली आहे. मंचाची उंची अडीच अंश, खांबाची उंची पाच अंश, ( १३ )

( व ) मंच सवादोन भाग असावा. खांब साडेपाच अंश, प्रस्तराची उंची दोन भाग, खांबाची उंची साडेचार अंश, ( १४ )

[ येथे खांबाची उंची ५½ अंश दिली आहे. ती खालच्या मजल्याच्या खांबाच्या उंचीहून ( पाच भाग ) जास्त आहे. वरच्या मजल्याच्या खांबाची उंची खालच्या मजल्याच्या खांबाच्या उंचीइतकी किंवा त्याहून कमी उंची असते. तेव्हा येथे दिलेली ५½ भाग ही खांबाची उंची नसून ती पाच भाग असावयास हवी. ]

मंच पावणेदोन अंश, वेदिकेची उंची एक अंश, त्याचा कण्ठ दोन अंश, शीर्ष ४½ भाग, (१५)

स्तूपी दोन भाग असे शान्तिक भवन होते. ( १५½ )

[ एकंदर उंचीचे एकंदर ४७ विभाग दिले आहेत, सांगितल्याप्रमाणे ४८ नाहीत. जर अधिष्ठानाची उंची ( पाऊण भाग ) ही उरलेला एक भाग + खांबाचा जास्त असलेला अर्धा भाग ( श्लोक १४ ची टीप पहा ) यात मिळविली तर ती ( $\frac{3}{4}+1+\frac{1}{2}=2\frac{1}{4}$ ) सवादोन भाग येते. ही अधिष्ठानाची उंची योग्य वाटते. ( खांबाच्या उंचीच्या निम्मी अधिष्ठानाची उंची धरल्यास ती २¾ अंश यावयास हवी. ) श्लोक १२ मध्ये अधिष्ठानाची उंची 'पादोनांशं' अशी दिली आहे तेथे ती द्यावयास हवी 'पादोनद्व्यंशं' अशी. ]

घराच्या उंचीचे ४४ भाग केले असता अधिष्ठानाची उंची तीन अंश, खांबाची उंची पाच अंश, प्रस्तर तीन भाग (व) खांब साडेचार भाग असतो. ( १६, १७ )

मंच सवादोन भाग असतो, खांब सवाचार भाग असतो, प्रस्तराची उंची दोन भागाने, खांबाची ( उंची ) चार भाग, ( १८ )

मंचाची उंची दोन भाग, खांबाची उंची साडेतीन भाग, मंचांची उंची दीड भाग, वेदिकेची उंची एक भाग, (१९)

गलाचे माप दोन भाग, शीर्ष साडेचार अंश, स्तूपी दीड भाग. असे हे पौष्टिक सदन होते. (२०)




आकृती ३२·१ : पाचमजली प्रासाद (पौष्टिक)

( ३२. २१–३७ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, घराच्या उंचीचे ३६ भाग करून, अधिष्ठान दोन भागाने, खांबाची उंची चार भाग, ( २१ )

मंचाची उंची पावणेदोन अंश कल्पावी. खांबांची उंची साडेतीन अंश, मंचाचे माप त्याच्या निम्मे ( पावणेदोन अंश ) असते. ( २२ )

खांब सवातीन भाग असतो, मंच दीड भाग, खांब तीन अंश, प्रस्तर सवा अंश, (२३)

वेदिकेचे माप एक अंश, गल पावणेदोन अंश, शीर्ष सवातीन ( भाग ) व उरलेली स्तूपीची उंची असते. ( २४ )

[ चवथ्या मजल्याचे माप दिलेले नाही. ते बहुधा खांब सवातीन भाग, प्रस्तर दीड भाग असे असावे. या हिशोबाने स्तूपीची उंची सवातीन भाग येते. ]

हे कल्पवित्तमा, असे हे जयद भवन असावे. ( २४½ )

विमानाची उंची ३३ भागांत विभागली तर अधिष्ठानाचे ( रमणी ) माप दोन भाग, खांबाची उंची चार भाग, प्रस्तराची उंची दोन भागाने, खांबाची उंची साडेतीन भाग, (२५, २६)

प्रस्तर पावणेदोन भाग असावा. खांबाची उंची तीन भाग, मंचाची उंची त्याच्या निम्मे ( दीड भाग ) असावी. ( २७ )

खांबाची उंची अडीच भाग, मंच सवा अंशाने, खांब सवादोन अंश, मंचाचे माप सवा अंश, ( २८ )

वेदिकेची उंची एक भाग, ( गलाचे ) माप दीड भाग, शिखर साडेतीन भाग, स्तूपीचे माप दोन भाग असते. ( २९ )

[ श्लोक २८½ त अत्यर्धाङ्गुलमानकम् असा अशुद्ध शब्द आहे. तो अत्यर्धं गलमानकम् असा सुधारून अर्थ केला आहे. ]

देवतेकरिता योग्य असे हे अद्‌भुत ( सदन ) होते. ( २९½ )

सदनाच्या उंचीचे २४ भाग केले असता अधिष्ठानाची उंची दीड अंश, खांबाचे माप तीन अंश, त्याच्या निम्मे ( दीड अंश ) मंचाचे माप असावे. खांबाची उंची तीन अंश, ( ३०, ३१ )

त्याच्या निम्मे ( दीड अंश ) प्रस्तराची उंची, खांबाची उंची अडीच ( भाग ) असावी. प्रस्तर सवा अंश, खांब सवादोन अंश, ( ३२ )

मंचाचे माप त्याच्या निम्मे ( १⅛ अंश ), खांब २⅛ अंश, प्रस्तराची उंची एक अंश, वेदिकेची उंची अर्धा अंश, ( ३३ )

गलाची उंची पाऊण ( अंश ), शीर्ष पावणेदोन अंश, स्तूपीची उंची ७/८ भाग घ्यावी. हे सार्वकामिक सदन असे करावे. ( ३४, ३४½ )

होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी असावे. १६ शाला, १६ सौष्ठिक (व) ४८ पंजर, प्रत्येक खांबावर अल्पनासी व हाराच्या शेवटाशी दोन नासिका असतात. ( ३५, ३६ )

शिखरावर चार भद्रनासी असाव्यात. कोपऱ्यापाशी दोन क्षुद्रनासी असाव्यात, त्याला ( प्रासादाला ) ‘ ब्रह्मकान्त ’ म्हणतात. ( ३७ )

पुष्कळ ( ? ) कूट असले तर त्याला ' प्राजापत्य ' म्हणतात. तेथेच जर कूट उंच असून, मंचकासह अनन्त ( न मोजता येण्याइतके ) कोष्ठ असतील तर सर्व देवांना योग्य असे ' स्वायंभुव ' गृह होते. ( ३८, ३८½ )

[ कूट उंच असून कोष्ठ खाली असतील असा अर्थ येथे योग्य वाटतो. ]

त्याचप्रमाणे परंतु वेदिका, कोष्ठ व शीर्ष जर अष्टकोनी असतील, शालेच्या मध्यभागी एक अंशाने कोष्ठाचे अंतर्गमन असेल तर त्याला ' भद्रकान्त ' म्हणतात. सभोवती मंचासह किंवा मंचाशिवाय कूटकोष्ठ असतील तर त्याला ' जनार्दन ' म्हणतात. ( ३९–४०½ )

त्याचप्रमाणे परंतु कोष्ठात भद्राशिवाय किंवा मध्यभागी भद्र असलेले गल व शीर्ष वर्तुळाकार असतील तर सर्व देवांना योग्य असे ' अतिभद्र ' होते. ( ४१, ४२ )

त्याचप्रमाणे परंतु कूटकोष्ठ, पंजर, कंठ ( हे ) मंचासह असतील तर धर्माची आवड निर्माण करणारे ' सर्वतोभद्र ' होते. ( ४३ )

सुंदर कूटकोष्ठ आणि अधिष्ठानासह पंजर निरनिराळ्या तऱ्हेच्या अधिष्ठानांनी युक्त, निरनिराळ्या प्रकारच्या खांबांनी अलंकृत केलेले, नाना अलंकारांसह, दोन पंजर, शिखरावरती आठ अल्पनासी व चार महानासी असलेले असे सर्व देवांना आवडते ' वीरभद्र ' होते. ( ४४–४५½ )

तेथेच तळमजल्यावर दोन भागांचे आठ सौष्ठिक, १२ पंजरांसह असून इतर सर्व पूर्वीप्रमाणेच असेल तर पूर्वी दिलेल्या नावाचेच ( ' वीरभद्र ' ) भवन होते. त्यातील जे इष्ट वाटेल ते कल्पावे. ( ४६, ४७ )

[ अष्टकशाड्यादिम् या ऐवजी अष्टक सौष्ठीकम् असा शब्द घेऊन अर्थ दिला आहे. ]

पाचमजली घर सांगितले, सहामजली घराचा विधी ऐक. ( ४८ )

[ युग या शब्दाऐवजी विधि हा शब्द पाहिजे. ]

**काश्यपशिल्पातील पाचमजली घराची माहिती या नावाचे बत्तिसावे पटल संपले.**

# तेहतिसावे पटल

## [ सहामजली घर ]

आता विशेषतः सहामजली घराचा संपूर्ण विधी सांगतो. त्याची रुंदी व उंची प्रासादमानात दिल्याप्रमाणे असावी. ( १ )

रुंदीचे ११ भाग करून गर्भगृह तीन भाग असते. भित दोन भाग व व्हरांडा एक भागाने असतो. ( २ )

हार एक अंश मापाचा अथवा व्हरांडा किंवा ( वर्ष–? ) स्थल असावे. दुसऱ्या किंवा तिसऱ्या मजल्यावर देवतेची स्थापना करावी व तोपर्यंत ( तितके मजले ) भरीव करावेत. हे मजले आतमध्ये भरीव व बाहेरून ( नेहमीप्रमाणे ) अलंकारिलेले असतात. ( ३, ४ )

विन्यासमूत्रामधील अंतराचे बारा भाग करून सौष्ठिकाची रुंदी एक भाग (व) कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन भाग ) असते. ( ५ )

[ भारं या ऐवजी भागं असा शब्द वापरून अर्थ केला आहे. ]

पंजराची रुंदी एक भाग व उरलेले हारान्तर असते. चार कूट, आठ कोष्ठ व १२ पंजर यांच्यासह तळमजल्यावर २४ हारान्तर असतात. प्रासादाच्या मध्यभागी पंजर व कण्ठापाशी सौष्ठिक असावे. ( ६, ७ )

[ पञ्चारंच्या ठिकाणी पञ्जरं असा शब्द घेतला आहे. ( श्लोक ७ ) तसेच श्लोक ६½ त कल्पयेदतिभूतले या ऐवजी कल्पयेदाद्यभूतले अशी सुधारणा करून अर्थ केला आहे. ]

कर्णकूटाच्या दोन्ही बाजूंना पंजर कल्पावे, विशेषतः ( पंजर ) कोष्ठ व पंजर यांच्यामध्ये कल्पावेत. ( ८ )

त्याच्या वरच्या मजल्याचे दहा भाग करून कर्णकूट एक भाग ( असावा ). मध्यभागी एक भाग पंजर असून त्याचा आकार कण्ठकूटासारखा असतो. ( ९ )

कोष्ठाची लांबी दोन भाग, पंजराची अर्धा भाग व उरलेले हारान्तर सांगितले आहे. त्यांची संख्या तळमजल्याला सांगितली इतकीच असते. ( १० )

त्याच्या वरील मजल्याचे ( तिसरा ) नऊ भाग करून कण्ठकूट एक अंश, मध्यशाला तीन भाग, ( ११ )

पंजराची रुंदी एक भाग ( व ) अर्धा भाग हारान्तर असते. त्याच्या वरच्या मजल्याचे ( चवथा ) आठ भाग करून एक भाग कूटाची रुंदी असते. ( १२ )

मध्यभागील कोष्ठ दोन भाग, नंतर पंजर एक भाग व हारान्तर अर्धा भाग, हे कल्पवित्तमा कल्पावे. ( १३ )

त्याच्या वरील मजल्याच्या ( पाचवा ) रुंदीचे सहा सारखे भाग करून कूट एक अंश मापाचा ( व ) कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन भाग ) असते. ( १४ )

पंजराची रुंदी अर्धा अंश व उरलेले ( भाग ) हारान्तर असते. त्याच्या वरील मजल्याच्या ( सहावा ) रुंदीचा निम्मा भाग मध्यभागील भद्र असतो. एक, दीड किंवा दोन दण्ड भद्राचे निर्गमन असते. ( १५, १५½ )

हे ब्राह्मणा, ( प्रासादाच्या ) उंचीचे ५७ अंश करून अधिष्ठानाची उंची १५ अंश (२½ भाग ?), खांबाची उंची सहा भाग ( व ) मंचाचे माप पावणेतीन भाग सांगितले आहे. ( १६, १७ )

खांबाची उंची साडेपाच अंश, मंच दीड भागांनी ( पावणेतीन ? ) ( व ) खांबाची उंची सवापाच अंश असावी. ( १८ )

मंचाची उंची अडीच भाग, खांबाची उंची पाच अंश, खांबाच्या उंचीच्या निम्मे ( अडीच अंश ) प्रस्तराची उंची सांगितली आहे. ( १९ )

खांबाची उंची पावणेपाच अंश असावी, प्रस्तराची उंची दोन भाग सांगितली आहे. खांबाची उंची साडेचार अंश सांगितली आहे. मंच पावणेदोन अंश, वेदिका एक भाग, गल पावणेदोन अंश, ( २०, २१ )

शीर्ष साडेचार अंश कल्पावे. विमान ( स्तूपी ) दोन अंश असावी. असे सहामजली घर असते. ( २२ )

[ तळमजल्याच्या अधिष्ठानाची उंची १५ अंश सांगितली आहे ती फार वाटते; तसेच दुसऱ्या मजल्यावरील मंचाची उंची दीड भाग सांगितली आहे ती फार कमी वाटते. तेव्हा त्या त्या श्लोकांच्या अनुवादांत योग्य ती दुरुस्ती केली आहे. या दुरुस्तीने विभागांचा हिशोबही बरोबर येतो. ]

२८ प्रकारची अधिष्ठाने, २० कूट, ४८ पंजरांसह ( असतात. ) प्रत्येक खांबावरती अल्पनासिका असावी. ( २३ )

होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी असते. शिखरावरती चारी बाजूंना महानासी असाव्यात. हे सर्व देवांना आवडते असे 'अंबुजासन' सांगितले. ( २४, २४½ )

त्याचप्रमाणे परंतु शिखर व कण्ठ अष्टकोनी असतात व सौष्ठिकापर्यंत शीर्षाचा उरलेला भाग चौकोनी असतो. वर व खाली असे भद्रकोष्ठ किंवा भद्राशिवाय कोष्ठ, उंच अशा दोन आंतर-प्रस्तरांसह किंवा त्यांच्याशिवाय असते. असे हे ( सदन ) 'सुशांकर' म्हणून प्रसिद्ध आहे. तसेच परंतु सौष्ठिक व शीर्ष गोल करावेत म्हणजे 'भद्रलीनक' नावाचे ( सदन ) होते. ( २५-२७½ )

त्याचप्रमाणे परंतु शिखरावर आठ अल्पनासी असल्या तर ते शंकराला फार आवडणारे असे 'शिवभद्र' होते असे सांगतात. ( २८, २८½ )

त्याचप्रमाणे परंतु ध्वश्रवृत्ताप्रमाणे ( मागे अर्धवर्तुळाकार व पुढे दोन कोन असलेले ) गला-सहित शीर्ष असेल ( व ) पुढच्या बाजूला ललाटनासी असेल तर त्याला 'नागेन्द्र' अशी संज्ञा आहे. ( २९, २९½ )

सहामजली घर सांगितले. आता याच्यापुढे सातमजली घर. ( ३० )

**काश्यपशिल्पातील सहामजली घराची माहिती हे तेहतिसावे पटल संपले.**

## चौतिसावे पटल

### [ सातमजली घर ]

आता विशेषतः सातमजली घराचे लक्षण सांगतो. उंची व रुंदी प्रासादमानात सांगितल्या-प्रमाणे करावी. ( १ )

प्रासादाच्या रुंदीचे १२ भाग करून चार अंश गर्भगृह, भिंतीची रुंदी दोन अंश ( व ) व्हरांडा एक भाग असावा. ( २ )

शहाण्या माणसाने चहूबाजूंना असलेले हारान्तर एक अंशाचे कल्पावे. विन्याससूत्राच्या आतील अंतराचे १२ समभाग करावेत. ( ३ )

( ३४. ४–२०½ )

कूटाची रुंदी एक अंश, कोष्ठाची त्याच्या दुप्पट ( दोन भाग ), पंजराची रुंदी एक अंश व उरलेले हारान्तर असते. ( ४ )

चार कूट, आठ शाला आणि पंजरांची संख्या १२ असते. त्याच्या वरच्या मजल्याच्या ( दुसऱ्या ) रुंदीचे दहा भाग केले असता– ( ५ )

कर्णकूट व कोष्ठ पूर्वीप्रमाणेच कल्पावे. पंजराची रुंदी अर्धा अंश ( व ) उरलेले हारान्तर असावे. ( ६ )

त्याच्या वरील मजल्याचे ( तिसऱ्या ) दहा भाग केले असता पंजर व कूटकोष्ठ पूर्वीप्रमाणेच कल्पावेत. ( ७ )

वरील मजल्याचे ( चवथ्या ) नऊ भाग केले तर शाला तीन भाग असते, कर्णकूट एक भाग व त्यानंतर पंजर एक अंश असावा. ( ८ )

हारान्तर अर्धा भाग असते. त्याच्या वरील मजल्याचे ( पाचव्या ) आठ भाग केले तर मधल्या भागातील शाला दोन भागाने व उरलेले ( अवयव ) पूर्वीप्रमाणेच करावे. ( ९ )

त्याच्या वरील मजल्याच्या ( सहाव्या ) रुंदीचे सहा भाग केले असता कूट एक अंश सांगतात. शालेची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) असते. ( १० )

पंजराची रुंदी अर्धा अंश व उरलेले हारान्तर असावे. त्याच्या वरील ( सातव्या ) मजल्याच्या रुंदीच्या तीन भागांपैकी मधील एक भाग ( भद्र असतो ) व त्याचे निर्गमन एक दण्ड ( असावे. ) ( ११ )

सदनाच्या उंचीचे ६७ भाग करून अधिष्ठान सवातीन ( व ) खांबाची उंची साडेसहा ( भाग ) असते. ( १२ )

त्याच्या निम्मे (सवातीन भाग) मंचाची उंची, खांबाची उंची सहा भाग, मंचाचे माप पावणेतीन भाग, सांगितले आहे. ( १३ )

खांबाची उंची साडेपाच अंश, प्रस्तर अडीच अंश, खांबाचे माप सवापाच भाग सांगतात. ( १४ )

प्रस्तर अडीच, खांबाची उंची पाच भाग, मंच सवादोन भाग असावा. खांबाची उंची पावणेपाच ( भाग ) सांगितली आहे. प्रस्तराची उंची दोन भागांनी, खांबाची उंची साडेचार अंश, मंचक पावणेदोन अंश, ( १५,१६ )

वेदिकेची उंची एक भाग, गल पावणेदोन अंश, शिखराची उंची साडेचार अंश असावी. स्तूपीची उंची दोन भाग, असे सातमजली घर असते. ( १७,१७½ )

पंजर व कूटकोष्ठ समसूत्रांत असतात. ह्योमाच्या वरपासून ते वरील टोकापर्यंत चौकोनी असते. शिखरावरती चार नासिका असून २४ लहान कूट ३६ शालांसह ( असतात. ) ( १८,१९ )

६० पंजरांसह प्रत्येक खांबावर अल्पनासिका असलेल्या, निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान किंवा एकाच प्रकारचे अधिष्ठान असलेल्या व एकाच आकाराचे खांब असलेल्या अशा ( या प्रासादाला ) ‘समुज्ज्वल’ म्हणतात. ( २०, २०½ )

त्याचप्रमाणे परंतु सान्तरप्रस्तरासह आन्तरकूट असलेले ( सदन ) सर्व देवांना योग्य असे

'श्रीछन्द' म्हणून प्रसिद्ध आहे. (२१, २१½)

तेथेच मंचासह खाली कूट व वरती कोष्ठ असतील तर सर्व देवांना आवडते 'श्रीविशाल' म्हणून प्रसिद्ध (सदन) होते. (२२, २२½)

[कोष्ठानान्ताः च्या ऐवजी कोष्ठोन्नताः असा सुधारित शब्द घेऊन अर्थ केला आहे.]

तसेच परंतु शीर्ष, कंठ आणि वेदिका अष्टकोनी असतात ते 'श्रीकान्त' म्हणून प्रसिद्ध आहे. (वरीलप्रमाणेच परंतु) कूटकोष्ठ समपातळीत असतात किंवा कूट (कोष्ठाच्या मानाने) खाली असतात (तेव्हा) त्याला 'श्रीप्रिय' म्हणतात. (२३,२४)

त्याचप्रमाणे परंतु शिखर, स्तूपी तसेच गल गोल असतील तर रुद्राला अतिशय आवडणारे 'रुद्रकान्त' होते. (२५)

तसेच परंतु कर्णकूट तळमजल्यापासून वरच्या मजल्यांवर क्रमाक्रमाने चौकोनी, अष्टकोनी व वर्तुळाकार कल्पिले तर ते 'वृत्तभद्र' होते. (२६)

तसेच पण कूट वर व शाला खाली असलेले, कूटाचे शीर्ष गोल असले तर त्याला 'सुवृत्त' म्हणतात. (२७)

उंच कूटकोष्ठ आणि पंजर व उंच मंच, शिखराचा आकार जसा इष्ट वाटेल तसा असतो; तसेच कंठ, स्तूपी, घटदेखील (पाहिजे त्या आकाराचे) असून– (२८)

चौकोनी शीर्ष असलेले कण्ठकूट कल्पावेत. शंकराला अत्यंत आवडते असे हे प्रसिद्ध 'शिवभद्र' होते. (२९)

वरीलप्रमाणेच कूटकोष्ठ असलेले परंतु एक, दीड (किंवा) दोन दण्ड निर्गमन असलेले भद्र किंवा भद्रपंजर असतो. (३०)

निरनिराळ्या प्रकारच्या अधिष्ठानांनी युक्त, निरनिराळ्या प्रकारच्या खांबांनी अलंकृत केलेल्या (व) निरनिराळ्या प्रकारची चित्रे असलेल्या त्या (सदनाला) 'शिवसौख्य' म्हणतात. (३१)

तसेच परंतु गर्भगृह (आतून) गोल किंवा चौकोनी असते, बाहेरून मात्र वर्तुळाकारच असते, सौष्ठिकदेखील वर्तुळाकार असतो. (३२)

इतर (अवयव) पूर्वी सांगितल्याप्रमाणे असून निरनिराळ्या सर्व प्रकारच्या अवयवांनी भूषविलेले, पंजर व कूटकोष्ठ अंतरप्रस्तराशिवाय असलेले, (३३)

शिखराचा आकार जसा इष्ट वाटेल तसा असलेले हे 'शिवप्रीतिक' असते. असे सात-मजली घर सांगितले, आता याच्यापुढे आठमजली घर. (३४)

**काश्यपशिल्पातील सातमजली घराची माहिती हे चौतिसावे पटल संपले.**

# पस्तिसावे पटल

## [ आठमजली घर ]

आता विशेषत: आठमजली घराची संपूर्ण माहिती सांगतो. उंची व रुंदी प्रासादमानात दिल्याप्रमाणे असावी. ( १ )

प्रासादाच्या रुंदीचे १३ भाग केले असता गर्भगृह पाच अंश, भिंती दोन भाग, ( २ )

व्हरांडा एक भागाने ( व ) हार एक भागाने असावा. किंवा गर्भगृह तीन भाग असावे. ( ३ )

एक भाग भित, व्हरांडा एक भागाने, भित एक भाग असावी. व्हरांडा एक भाग (?), (४)

त्याच्या निम्म्याने पंजराची रुंदी असावी. भद्राशिवाय किंवा ( भद्रा ) सह, १२ कोष्ठ, चार कूट व १५ ( १६ ? ) पंजर असलेले, ( ५ )

३२ हारान्तर असे तळमजल्यावर कल्पावेत. वर्षस्थल ( व ) व्हरांडा असावेत. प्रस्तरापर्यंत भरीव बांधावे. ( ६ )

त्याच्या वरील मजल्याची ( दुसऱ्या ) रुंदी तेरा भागांनी विभागली असता कूटकोष्ठ आणि इतर सर्व अवयव तळमजल्यासारखेच असतात. ( ७ )

त्याच्या वरील मजल्याच्या ( तिसऱ्या ) रुंदीचे १२ भाग केले असता कर्णकूट एक अंश, शाला दोन भागांनी -- ( ८ )

अर्धा अंश पंजराची रुंदी व उरलेले हारान्तर असावे, पंजर, कूटकोष्ठ यांची संख्या तळमजल्याकरिता सांगितली तितकीच असावी. ( ९ )

लांब पंजरासह हारान्तर अर्धा अंश. त्याच्या वरील मजल्याच्या ( चवथ्या ) रुंदीचे आठ भाग केले असता-- ( १० )

कर्णकूट त्यांतील एक भाग, मध्यभागी दोन भागांनी शाला, पंजराची रुंदी एक अंश, हार अर्धा अंश-- ( ११ )

चार कूट, चार शाला, आठ पंजर, हारान्तर असा सहावा मजला असतो. ( १२ )

त्याच्या वरील मजल्याचे ( सातवा ) सहा सम भाग करून कूटाची रुंदी एक भाग, मध्यभागातील कोष्ठ दोन भागांनी, ( १३ )

अर्धा अंश पंजराची रुंदी, उरलेले हारान्तर असते. त्याच्या निम्मे पंजराची रुंदी असते. तो भद्रासह किंवा भद्राशिवाय असतो. ( १४ )

बारा कोष्ठ, चार कूट, १६ पंजरांसह तळमजल्यावर ३२ हारान्तर कल्पावे. ( १५ )

वर्षस्थल, व्हरांडा, प्रस्तरापर्यंत भरीव असावेत. त्याच्या वरील ( दुसऱ्या ) मजल्याचे तेरा भाग केले असता-- ( १६ )

कूटकोष्ठ वगैरे सर्व अवयव तळमजल्यासारखेच असतात. त्याच्या वरील मजल्याचे (तिसरा) १२ भाग केले असता-- ( १७ )

कूटकोष्ठ इत्यादी सर्व अवयवांचे प्रमाण व संख्या पूर्वीप्रमाणेच (असावी.) त्याच्या वरील मजल्याचे ( चवथ्या ) दहा भाग करून कूटकोष्ठ पूर्वीप्रमाणेच असतात. ( १८ )

लांब पंजरासह हारान्तर अर्धा अंश असावे. त्याच्या वरील मजल्याची ( पाचवा ) रुंदी आठ भागांत विभागली असता– ( १९ )

कर्णकूट एक अंश, मध्यभागी शाला दोन भागांनी, पंजराची रुंदी एक अंश, हारान्तर अर्धा अंश, ( २० )

आठ पंजरांसह चार कूट, चार शाला, तसेच हारान्तर पूर्वीप्रमाणेच असा सहावा मजला असतो. ( २१ )

त्याच्या वरील मजल्याचे ( सातवा ) सहा सम भाग करून कूट एक भाग सांगतात, मध्यभागी कोष्ठ दोन भागांनी ( असते ). ( २२ )

[ श्लोक ६ ते १४ यांची श्लोक १५ ते २२ मध्ये पुनरु ती झाली आहे. मात्र श्लोक १५ ते २२ अधिक शुद्ध आहेत. ]

पंजराची रुंदी अर्धा अंश, उरलेले हारान्तर असते. त्याच्या वरील मजल्याच्या ( आठवा ) मध्यभागाच्या रुंदीचे निर्गमन एक दण्ड असावे. ( २३ )

कोष्ठापासून कूटाचे बाहेर निर्गमन असते किंवा मध्यशाला निर्गमनाशिवाय असते, किंवा कूट ( व ) कोष्ठ समसूत्रांत असतात. ( २४ )

होमापासून स्तूपीचे ७७ भाग करून अधिष्ठान साडेतीन अंश, खांबाची उंची सात अंश, ( २५ )

प्रस्तर सवातीन ( भाग ), खांबाची उंची साडेसहा ( भाग ), मंचाची उंची अडीच भाग विशेषाने कल्पावी. ( २६ )

खांबाची उंची सवापाच भाग सांगितली आहे, प्रस्तर अडीच अंश, खांबाची उंची पाच अंश, ( २७ )

मंच सवादोन भाग, खांब पावणेपाच ( भाग ), मंचाचे माप दोन भाग, खांब साडेचार अंश, ( २८ )

मंचाची उंची पाऊण (अंश ), वेदिकेची उंची एक अंश, कण्ठ सवादोन अंश, शीर्ष साडेचार अंश, ( २९ )

स्तूपीची उंची कंठाइतकीच येथे असते असे सांगतात ( सवादोन अंश ) ( २९$\frac{1}{2}$ )

[ एकंदर ६० भाग होतात व वर्णन फक्त सहा मजल्यांचे आहे. श्लोक २६ त दुसऱ्या मजल्याच्या खांबाची उंची ६$\frac{1}{2}$ भाग दिली आहे व श्लोक २७ त खांबाची उंची ५$\frac{1}{4}$ भाग दिली आहे. त्या अर्थी तिसऱ्या व चवथ्या मजल्यांच्या खांबांची व मंचांची उंची दिलेली नाही. ती खाली दिल्याप्रमाणे घेतली म्हणजे ७७ विभागांचा हिशोब पूर्ण होतो.

तिसऱ्या मजल्याच्या खांबाची उंची ६ भाग व मंचाची उंची २$\frac{1}{2}$ भाग; चवथ्या मजल्याच्या खांबाची उंची ५$\frac{1}{2}$ भाग व मंचाची उंची २$\frac{1}{2}$ भाग. ]

त्याच्या उपानापासून स्तूपीपर्यंत ( आकार ) चौकोनी कल्पावा. स्तंभ अष्टकोनी किंवा चौकोनी असून प्रत्येकांत अल्पनासी असावी. शिखरावरती चार नासी असाव्यात. ( ३०, ३१ )

प्रत्येक मजल्यावरील सर्व खांबांचा आकार एकच असतो, त्याला ‘ शिवच्छन्द ’ म्हणतात. ( ३१½ )

तेथेच खाली कोष्ठ ( व ) मंचक असावेत, उंच सौष्ठिक असावे ( म्हणजे ) सर्व देवांना आवडते असे प्रसिद्ध ‘ वागीश ’ होते. ( ३२, ३२½ )

सौष्ठिक पुनःपुन्हा चौकोनी, अष्टकोनी व गोल ( कल्पावे ). ( या क्रमाने निरनिराळ्या मजल्यांवर ते पुनःपुन्हा यावेत. ) विमानाचे शिखर व कण्ठ अष्टकोनी कल्पावे. ते अत्यंत धर्मप्रीतिकर असे प्रसिद्ध ‘ अष्टभाग ’ होते. ( ३३, ३४ )

तसेच परंतु कूटकोष्ठ मंचासह किंवा मंचाशिवाय असून समपातळीत असतात. निरनिराळ्या प्रकारांनी अलंकारिलेले खांब असतात. निरनिराळ्या प्रकारची चित्रे असतात. त्याला ‘पर्वत’ म्हणतात. ( ३५, ३५½ ).

त्याचप्रमाणे पण शिखर, कण्ठ वर्तुळाकार कल्पावेत. ( म्हणजे ) मला आवडते ‘ कैलास ’ नावाचे सदन होते. ( ३६, ३६½ )

असे आठमजली घर सांगितले. आता नंतर नऊमजली घर. ( ३७ )

**काश्यपशिल्पातील आठमजली घराची माहिती हे पस्तिसावे पटल संपले,**

# छत्तिसावे पटल

## [ नऊमजली घर ]

आता विशेषतः नऊमजली घराची संपूर्ण माहिती सांगतो. घराची उंची व रुंदी प्रासादमानाप्रमाणे करावी. ( १ )

रुंदीचे १५ भाग करून गर्भगृह तीन भाग, गृहपिण्डी दोन भाग असावी, व्हरांडा एक भागाने, ( २ )

भिंतीची रुंदी एक अंश, व्हरांडा तितकाच ( एक अंश ) असतो. हे कल्पवित्तमा, हाराची रुंदी एक अंश कल्पावी. ( ३ )

किंवा प्रासादाचे १६ सारखे भाग करावेत. गर्भगृह चार अंश, गृहपिण्डी दोन भाग, ( ४ )

व्हरांडा एक अंशाने, भिंतीची रुंदी एक अंश, व्हरांडा एक भागाने व हाराची रुंदी त्याच्या इतकीच ( एक भाग ) असते. ( ५ )

विन्याससूत्राच्या आतील अंतराचे १५ सारखे भाग करावेत, सौष्ठिकाची रुंदी एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) असावी. ( ६ )

पंजराची रुंदी एक अंश, कूटाचे माप एक अंश, तळमजल्यावर ३२ हारान्तर असावेत. ( ७ )

याप्रमाणेच दुसऱ्या मजल्याची कल्पना करावी. तिसऱ्या मजल्याच्या लांबीचे १४ भाग केले असता– ( ८ )

पंजराची रुंदी अर्धा अंश व इतर ( अवयव ) पूर्वीप्रमाणेच असतात. हे ब्राह्मणश्रेष्ठा, याचप्रमाणे चवथा मजला असतो. ( ९ )

पाचव्या मजल्याची ( रुंदी ) १२ भागांत विभागून कूटाची रुंदी एक अंश, शालेची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन भाग ), ( १० )

अर्धा भाग पंजराची रुंदी, त्याच्या निम्मे भाग ( $\frac{1}{4}$ भाग ) हाराची रुंदी ( असते. ) १२ शाला व कूटाप्रमाणे १६ पंजर असतात. ( ११ )

त्याच्या वरच्या ( सहाव्या ) मजल्याच्या रुंदीचे आठ भाग करून, सौष्ठिकाची रुंदी एक अंश, मध्यभागी असलेली शाला दोन भागांची, पंजराची रुंदी एक अंश व अर्धा अंश हारान्तर असते. ( १२, १२$\frac{1}{2}$ )

त्याच्या वरच्या ( सातव्या ) मजल्याचे सहा भाग करून एक अंश कूटाची रुंदी, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट (दोन भाग), पंजराची रुंदी अर्धा अंश व उरलेले हारान्तर असावे. (१३, १४)

त्याच्या वरच्या ( नवव्या ) मजल्याचे तीन भाग केले असता मधल्या भागाचे निर्गमन एका दण्डाने कल्पावे. (१५)

[ आठव्या मजल्याचे विभाग दिलेले नाहीत. ]

शहाण्या माणसाने घराच्या उंचीचे २८ ( ८७$\frac{1}{2}$ ? ) भाग करून, अधिष्ठान पावणेचार अंश समजावे, ( १६ ).

[ साष्टविंशतिभागं हा शब्द बदलून सार्धाष्टाशीतिभागं अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

खांबाची उंची साडेसात अंश, प्रस्तर साडेतीन अंश, खांबाची उंची सात अंश, मंचक सवातीन अंश, ( १७ )

खांबाची उंची साडेसहा ( भाग ), मंच तीन अंश, खांबाचे माप सहा भाग, मंच पावणेतीन अंश, ( १८ )

खांबाची उंची साडेपाच अंश, मंच अडीच अंश ( व ) खांबाची उंची सवापाच भाग सांगतात. ( १९ )

प्रस्तर अडीच अंश, खांबाची उंची पाच भाग, प्रस्तराची उंची सवादोन भाग असावी. ( २० )

खांब पावणेपाच ( भाग ), प्रस्तराची उंची दोन भागांची, खांब साडेचार अंश, मंच पावणेदोन अंश. ( २१ )

वेदिकेची उंची एक भाग, कण्ठ अर्ध्या भागाने, शीर्ष साडेचार अंश, स्तूपी पावणेदोन भाग असते. ( २२ )

[ एकूण विभाग ८७$\frac{1}{2}$ होतात. ]

प्रत्येक खांबावर अल्पनासी, शिखरावर चार नासी, समतल किंवा ( कोष्ठाच्या मानाने ) खाली चौकोनी कूट असते. ( २३ )

होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी ( असून ) मध्यशालेपासून बाजूंच्या कोष्ठांचे निर्गमन एक किंवा दीड दण्ड असते ( असा ) 'ललितभद्रक' नावाचा ( प्रासाद आहे. ) ( २४, २४½ )

तसेच परंतु कोष्ठ उंच व समपातळीत ( किंवा ) खाली लहान भद्र असतो, ते सर्व देवांना आवडते ब्रह्मकान्त नावाचे ( हर्म्य ) असते. ( २५, २५½ )

त्याचप्रमाणे परंतु मंचासह किंवा मंचाशिवाय दोन कूटकोष्ठ असतात ( तेव्हा ) सर्व देवांना आवडते प्रसिद्ध 'प्रादेश' होते. ( २६, २६½ )

तसेच पण शिखर व कण्ठ अष्टकोनी ( असून ) आठ नासिका व पुनःपुन्हा चौकोनी, अष्टकोनी व गोल ( आकाराचे ) सौष्ठिक असते. इतर भाग चौकोनी असतात. याला 'श्रीवर्धन' म्हणतात ( २७, २८ )

मंचासह किंवा मंचाशिवाय समपातळीत असलेले दोन कूटकोष्ठ असतात. शिखर वर्तुळाकार व चारी दिशांना भद्रनासिका असतात. ( २९ )

उपदिशांना दोन दोन नासी असतात किंवा त्या ( नासी ) दोन पंजरांसह दोन किंवा एकच असतात; असे 'सुपद्म' होते. ( ३० )

तसेच पण सौष्ठिकाचे शिखर वर्तुळाकार असेल तर त्याला 'कृतवर्धन' म्हणतात. त्याचप्रमाणे परंतु गर्भगृह जर वर्तुळाकार असेल तर 'वृत्तगेह' होते. ( ३१ )

असे नऊमजली घर सांगितले. आता याच्यापुढे दहामजली घर. ( ३२ )

**काश्यपशिल्पातील नऊमजली घराची माहिती हे छत्तिसावे पटल संपले.**

# सदतिसावे पटल

## [ दहामजली घराचे लक्षण ]

आता विशेषतः दहामजली घराचे लक्षण सांगतो. त्याची उंची व लांबी प्रासादमानात सांगितल्याप्रमाणे असते. ( १ )

त्याच्या रुंदीचे १४ भाग केले असता गर्भगृह चार अंश, भिंत दोन अंशांची, ( २ )

व्हरांडा एक भाग, हारान्तर एक भाग. विन्याससूत्राच्या मधील अंतर १४ भागांत विभागले असता, ( ३ )

त्यात कूटाची रुंदी एक अंश, शालेची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ), पंजराची रुंदी एक अंश, हारान्तर पाव अंश असावे. ( ४ )

चार कूट, चार शाला व १६ पंजरांसह ३२ हारान्तर तळमजल्यावर असतात. ( ५ )

त्याच्या वरील मजल्याच्या ( दुसरा ) रुंदीचे १३ भाग करून कण्ठकूट एक अंश व शाला त्याच्या दुप्पट लांबीची ( दोन अंश ), ( ६ )

पंजराची रुंदी एक अंश व उरलेले हारान्तर असावे. वरील मजल्याच्या ( तिसरा ) रुंदीचे १२ भाग करून एक अंश सौष्ठिक, ( ७ )

कोष्ठाची लांबी दुप्पट ( दोन अंश ) व नंतर अर्धा अंश पंजर असतो. पाव अंश हारान्तर व त्यांची संख्या तळमजल्यावर दिली आहे तितकीच असावी. ( ८ )

त्याच्या वरच्या मजल्याच्या ( चवथा ) रुंदीचे ११ भाग करून पाव अंश पंजर व इतर ( अवयव ) पूर्वीप्रमाणेच असावेत. ( ९ )

त्याच्या वरील मजल्याचे ( पाचवा ) दहा भाग करून कूटाची रुंदी एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ) व उरलेले हारान्तर असावे. ( १० )

हारान्तराचे तीन भाग करून एक भाग पंजराची रुंदी असावी. त्याच्या वरील मजल्याचे ( सहावा ) नऊ भाग केले तर सौष्ठिक एक अंश असावे. ( ११ )

हारान्तर दोन भाग असून त्यापैकी पंजराची रुंदी एक भाग सांगतात. त्याच्या वरील मजल्याचे ( सहावा ) नऊ भाग केले तर सौष्ठिक एक अंश असावे. ( १२ )

कोष्ठ दीड अंश व उरलेले हारान्तर असावे. हारान्तर दोन भाग असून त्यापैकी पंजराची रुंदी एक भाग सांगतात. ( १३ )

११ संख्येसह पूर्वीइतकीच संख्या मजल्यांची असावी ( ? ). सातव्या मजल्याची रुंदी आठ भागांत विभागावी. ( १४ )

[ श्लोकार्ध १३½ येथे संदर्भरहित आला आहे. ]

कूट एक अंश, मध्यभागी असलेली शाला दोन भागांची, पंजराची रुंदी एक अंश व हारान्तर त्याच्या निम्मे असते. ( १५ )

आठ पंजरांसह चार कूट, चार शाला व १५ ( १६ ? ) हारान्तर असतात. असा हा सातवा मजला कल्पावा. ( १६ )

आठव्या मजल्याच्या रुंदीचे सात भाग करून वरीलप्रमाणेच कूट, कोष्ठ व उरलेले हारान्तर असते. ( १७ )

... ... ... ... ... तीन भागांपैकी एक भाग रुंदी असते. नवव्या मजल्याची रुंदी सारख्या सहा भागांत विभागावी. ( १८ )

[ जो भाग दिला नाही ' तो ' हारे तु पंजरव्यासमग्निभागैक विस्तृतम् । असा घेतला असता हारामधील पंजराची रुंदी तीन भागांपैकी एक भाग असावी असा होईल. ]

वरीलप्रमाणेच कूट, कोष्ठ व पंजर असावे. त्याच्या वरील मजल्याच्या ( दहावा ) रुंदीचे तीन भाग केले असता मध्यभागी असलेले भद्र एक अंश व त्याचे निर्गमन एक दण्ड असते. ( १९, १९½ )

प्रासादाच्या उंचीचे १०० भाग केले असता अधिष्ठान चार अंश, खांबाची उंची आठ अंश, मंचाचे माप पावणेचार भाग सांगतात. ( २०, २१ )

खांबाची उंची साडेसात अंश, प्रस्तर साडेतीन, खांबाची उंची सात भाग, मंच सवातीन अंश, ( २२ )

खांबाची उंची साडेसहा ( भाग ), प्रस्तर तीन भागांनी, खांबाची उंची सहा भाग, मंचक पावणेतीन अंश, ( २३ )

खांबाची उंची साडेपाच अंश, मंचक अडीच अंश, खांबाची उंची सवापाच अंश सांगतात. ( २४ )

मंचाची उंची अडीच भाग, खांबाची उंची पाच अंश, मंचाची उंची सवादोन ( भाग ) सांगतात. ( २५ )

खांबाची उंची पावणेपाच-अंश सांगतात. प्रस्तराची उंची दोन भाग, खांबाची उंची साडे-चार अंश, ( २६ )

मंच पावणेतीन अंश असावा, वेदिका एक भाग व कूट वगैरेंची तेवढीच उंची असते. याला ' नरकान्त ' म्हणतात. ( २७ )

[ या श्लोकाची दुसरी ओळ संदर्भरहित आहे. ]

कण्ठ दीड भाग, शिखर साडेचार ( भाग ), स्तूपीची उंची पावणेदोन भाग सांगतात. (२८)

शिखर चौकोनी असून त्यावर चार नासिका ( असतात. ) प्रत्येक खांबावर अल्पनासी ( व ) तळमजल्यावर निरनिराळ्या प्रकारचे खांब असतात; सर्व देवांना आवडते असे ' अत्यन्तकान्त ' होते. ( २९, २९½ )

त्याचप्रमाणे परंतु कोष्ठ वर व सौष्ठिक वर किंवा खाली असलेले, ( ३० )

[ कोष्ठ व सौष्ठिक समपातळीत किंवा अनुक्रमे वर व खाली असतात. ]

मध्यभागी दोन शाला असून त्यांचे निर्गमन एक दण्डाने असते. शिखर व कण्ठ अष्टकोनी ( असून ) शिखरावर आठ नासिका ( असतात. ) निरनिराळ्या प्रकारांनी भूषविलेले ( असे हे ) ' चतुष्कूट ' होते. ( ३१, ३१½ )

तसेच पण कूटकोष्ठ व सान्तरप्रस्तर असते किंवा कूटकोष्ठ वगैरे सर्व अवयव समसूत्रांत असतात. हे ' मन्त्रपूत ' म्हणून सार्वकामिक जातीचे विमान प्रसिद्ध आहे. ( ३२, ३३ )

त्याचप्रमाणे पण शिखर व कण्ठ गोलाकार कल्पावेत ( तेव्हा ) सर्व देवांना योग्य असे ' कान्त ' नावाचे प्रसिद्ध घर होते. ( ३४ )

तसेच पण शिखर, कर्णकण्ठ ( कर्णकूट) त्याचप्रमाणे गल वर्तुळाकार केले तर 'ईश्वरकान्त' होते. ( ३५ )

दहामजली घर सांगितलेनंतर ११ मजली घर. ( ३६ )

**काश्यपशिल्पातील दहामजली घराची माहिती हे सदतिसावे पटल संपले.**

# अडतिसावे पटल

## [ ११ मजली घर ]

आता विशेषतः ११ मजली घराची माहिती सांगतो. प्रासादमानाप्रमाणे त्याची उंची असावी. ( १ )

रुंदीचे १५ भाग करून गर्भगृह तीन अंश, भित दोन अंश व व्हरांडा एक भागाने असावा. ( २ )

भिंतीची रुंदी एक भाग, व्हरांडा एक भाग, हारान्तर एक अंशाने, असे क्रमाने असावे ( ३ )

व्हरांडा व भित भरीव असावी किंवा प्रस्तरापर्यंत भरीव करावे किंवा त्याच्यावरील (मजल्याच्या) व्हरांड्यापर्यंत ( प्रासाद ) भरीव बांधावा. ( ४ )

विन्याससूत्राच्या आतील रुंदीचे १५ भाग केले असता कर्णकूट एक अंश असावा, पक्षशाला ( बाजूंच्या दोन शाला ) दोन भागांनी, ( ५ )

मध्यशाला तीन भाग असावी. पंजर अर्धा अंश असावा. हारान्तर तितकेच ( अर्धा अंश ), असा तळमजला असावा. ( ६ )

त्याच्यावरील मजल्याच्या ( दुसरा ) रुंदीचे १४ भाग करून कूटाची रुंदी एक अंश, कोष्ठाची लांबी त्याच्या दुप्पट ( दोन अंश ), ( ७ )

उरलेले हारान्तर असते. ( हारान्तराच्या ) तीन भागांपैकी एक भाग पंजर असतो. पंजर, कूट, कोष्ठ यांची संख्या पूर्वीइतकीच असते. ( ८ )

[ पंजर, कूट कोष्ठ यांची संख्या सांगितलेली नाही. दहामजली घराला जी त्यांची संख्या दिली आहे, त्याला उद्देशून ही पूर्वीइतकीच संख्या असे म्हटले असावे. ]

त्याच्यावरील मजल्याच्या ( तिसरा ) रुंदीचे ११ भाग करून पंजर आणि कूटकोष्ठ पूर्वीइतकेच असावेत. ( ९ )

त्याच्यावरील मजल्याची ( चवथा ) रुंदी दहा भागांत विभागून कूट तसेच कोष्ठ यांची संख्या पूर्वीप्रमाणेच असावी. ( १० )

त्याच्यावरील मजल्याच्या ( पाचवा ) रुंदीचे नऊ भाग करून कूटाची रुंदी एक भाग, कोष्ठ दीड भाग व उरलेले हारान्तर असावे. ( ११ )

हारान्तराच्या तीन भागांपैकी एक भाग पंजराची रुंदी सांगतात. हे कल्पवित्तमा, पूर्वीप्रमाणेच कूट वगैरेंची संख्या असावी. ( १२ )

आठव्या मजल्याच्या रुंदीचे आठ भाग करून कूटाची रुंदी एक भाग, मध्यभागी असलेली शाला दोन भागांची, ( १३ )

पंजराची रुंदी एक अंश व हारान्तर त्याच्याहून निम्मे ( अर्धा भाग ) असावे. आठ पंजरां-सह चार कूट ( व ) चार शाला असाव्यात. ( १४ )

आठव्या मजल्यावर हारान्तराची संख्या १५ सांगतात. नवव्या मजल्याच्या रुंदीचे सात सारखे भाग करून कूटाची रुंदी एक अंशाने, कोष्ठाची लांबी दोन भाग, उरलेले हारान्तर व त्याच्या तिसऱ्या भागाने पंजर असावे. ( १५,१६ )

दहाव्या मजल्याची रुंदी सहा भागांत विभागून वरीलप्रमाणेच कूट, कोष्ठ व पंजर असा-वेत. ( १७ )

पहिल्या मजल्यापासून पाचव्या मजल्यापर्यंत भद्रपंजर असावा. मजल्याच्या चहूबाजूंनी पंजर किंवा भद्र किंवा भद्रपंजर असावा. ( १८ )

वरील मजल्याच्या ( ११ व्या ) ( रुंदीचे ) तीन भाग करून मध्यभागी एक अंश भद्र असावे. त्याचे निर्गमन एक दण्डाने असावे. ( १९ )

प्रासादाच्या उंचीचे ११३ भाग केले असता अधिष्ठानाची उंची साडेचार अंश सांगतात. ( २० )

खांबाची उंची साडेआठ अंश, मंचाचे माप चार अंश, खांबाची उंची आठ अंश, ( मंच ) पावणेचार अंश, ( २१ )

खांब साडेसात अंश, प्रस्तर साडेतीन, खांबाची उंची सात अंश, मंचक सवातीन, ( २२ )

खांबाची उंची साडेसहा अंश, मंचक तीन, खांबाची उंची सहा अंश, मंचक पावणेतीन अंश, ( २३ )

खांबाची उंची पावणेसहा अंश सांगतात, प्रस्तराची उंची अडीच भाग असावी. ( २४ )

खांबाची उंची सवापाच भाग सांगतात. मंचाची उंची अडीच अंश, खांबाची उंची पाच अंश, ( २५ )

मंचाचे माप सवादोन भाग सांगतात; खांबाची उंची पावणेपाच भाग सांगतात. ( २६ )

मंचाची उंची दोन भाग, खांब साडेचार, प्रस्तराची उंची पावणेदोन अंश, ( २७ )

वेदिका आठ अंश, कण्ठाची उंची दीडभागाने, शिखराची उंची साडेचार अंश असावी. स्तूपीची उंची पावणेदोन भाग असावी. ( २८, २८½ )

[ एकंदर विभाग १२०¼ होतात. श्लोक २८ मध्ये जी वेदिकेची उंची दिली आहे (आठ अंश) ती फार जास्त वाटते. ती उंची ¾ भाग घेतली तर ११३ भागांचा हिशोब बरोबर लागतो. ]

होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी ( आकार ) कल्पावा. शिखरावरती चारी दिशांना महानासी असाव्यात. प्रत्येक खांबावर अल्पनासी असावी. त्याला ‘ ब्रह्मकान्त ’ म्हणतात. ( २९, ३० )

सौष्ठिक ( व ) आंतरमंच ही असली तर त्याला ‘ विजय ’ म्हणतात. ( ३०½ )

तसेच परंतु कूट खाली व मंचासह कोष्ठ वर असेल तर सर्व देवांना योग्य असे ‘ सर्वार्हक ’ होते, ( ३१, ३१½ )

त्याचप्रमाणे पण शिखर, कण्ठ वर्तुळाकार व वेदिका अष्टकोनी असेल तर सर्व देवांना योग्य असे ‘ इन्द्रकान्त ’ होते. ( ३२, ३२½ )

तसेच परंतु मध्यभद्र असून तेथे समपातळीत असलेले कूटकोष्ठ, मंचासह किंवा ( मंचा- ) शिवाय कूटशाला आणि पंजर असलेले (असे) ब्रह्मा, विष्णू व शंकर यांना योग्य असे ‘गणिकाशालक’ होते. ( ३३, ३४ )

[ गणिकाशालक हे नाव ब्रह्मा, विष्णू व शंकर यांच्या देवालयासाठी योग्य वाटत नाही. ]

वरीलप्रमाणेच पण शिखर व कण्ठ वर्तुळाकार व वेदिका अष्टकोनी असेल तर सर्व देवीं-करिता ( योग्य ) असलेल्या या विमानाला ‘ इन्द्रकान्त ’ म्हणतात. ( ३५ )

[ इन्द्रकान्त प्रासादाचे वर्णन श्लोक ३२, ३२½ यातही आले आहे. श्लोक ३५ ही पुनरुक्ती आहे. ]

तसेच परंतु कर्णकूट किंवा भद्रासह कर्णकूट असून तेथील सौष्ठिकाचे शिखर वर्तुळाकार असते ( तेव्हा ) सर्व देवांना आवडते असे ‘ कर्णविशाल ’ होते. ( ३६, ३६½ )

असे ११ मजली घराचे लक्षण सांगितले. ( ३७ )

**काश्यपशिल्पातील ११ मजली घराची माहिती हे अडतिसावे पटल संपले.**

# एकोणचाळिसावे पटल

## [ १२ मजली घर ]

आता विशेषत: १२ मजली घराचे संपूर्ण लक्षण सांगतो. घराची उंची व रुंदी प्रासादमानात सांगितली आहे. ( १ )

प्रासादाच्या रुंदीचे १७ भाग करून तेथील सौष्ठिकांचे शिखर कुण्डलाकृती असते. ( २ )

[ नंतरचा श्लोकार्ध येथे संदर्भविरहित आला आहे. ]

गर्भगृह पाच भाग, गृहपिंडी दोन अंश, व्हरांडा एक अंश, भित अर्धा अंश मापाची, ( ३ )

व्हरांडा एक अंश असावा किंवा ( प्रासादाच्या रुंदीचे ) नऊ भाग कल्पून गर्भगृह तीन भागाने करावे. ( ४ )

गर्भगृहाच्या रुंदीइतकीच रुंदी गृहपिंडीची असावी, उरलेले व्हरांडा, भित, हार पूर्वीप्रमाणेच करावेत. ( ५ )

विन्याससूत्राच्या आतील अंतर १७ भागांत बिभागून मध्यशाला तीन अंश असावी, कर्णकूट एक अंश, ( ६ )

त्यांच्या ( कर्णकूटांच्या ) मध्ये सुंदर शाला दोन अंश सांगितली आहे. कूटकोष्ठांच्या मधल्या अंतरात आणि कोष्ठांच्या मधल्या अंतरातदेखील कर्णकूटाप्रमाणे आकार असलेल्या पंजराची रुंदी एक भाग असून, त्याहून जास्त उरलेले भाग क्षुद्रपंजर असलेले हारान्तर असावे. ( ७, ८ )

याप्रमाणे तळमजल्यावर करावे व वरील मजले ११ मजली घराप्रमाणे असावेत. हे ब्राह्मणा, घराच्या उंचीचे १२७ भाग करून अधिष्ठानाची उंची पाच अंश, खांबाची उंची नऊ अंश व मंचाची उंची साडेचार अंश (असून) उरलेल्या ( मजल्यांचे माप ) ११ मजली घराला सांगितल्याप्रमाणे असावे. ( ९, १० )

असे बारामजली घर सांगितले, १३ मजली घर ऐक. ( ११ )

**काश्यपशिल्पातील १२ मजली घराची माहिती हे एकोणचाळिसावे पटल संपले**

# चाळिसावे पटल

## [ १३ मजली घर ]

आता विशेषतः १३ मजली घर संपूर्ण सांगतो. त्याची रुंदी वगैरे मापे प्रासादमानाप्रमाणे असावीत. ( १ )

घराच्या रुंदीचे १९ भाग करावेत. गर्भगृह तीन अंश, गृहपिण्डि दोन अंश, ( २ )

व्हराण्डा एक अंश असावा. भिंतीची रुंदी तितकीच असावी. व्हराण्डा एक भाग व भिंतीची रुंदी एक अंश, ( ३ )

व्हरांडा एक भाग व भिंतीची रुंदी तितकीच एक भाग असते. ( ३½ )

[ हा श्लोकार्ध, श्लोकार्ध तीनची पुनरुक्ती आहे. ]

विन्याससूत्राच्या आतील अंतराचे १९ भाग केले असता, कर्णकूट एक अंश, मध्यभागी असलेली शाला तीन भाग, ( मध्यशालेच्या ) दोन्ही बाजूंना असलेल्या शाला तितक्याच रुंदीच्या ( तीन भाग ) व पंजर एक अंश असतो. ( ४, ५ )

क्षुद्रपंजर असलेले हारान्तर अर्धा अंश, पंजराचा आकार कर्णकूटाप्रमाणे व तसेच क्षुद्रपंजर असावे. ( ६ )

असा तळमजला सांगितला. वरील मजले १२ मजली घराप्रमाणे असावेत. सदनाच्या उंचीचे १४२ भाग केले असता अधिष्ठान पाच अंश, खांबाची उंची दहा अंश, मंचाचे माप पाच अंश व उरलेले ( मजले ) १२ मजली घराप्रमाणे असतात. ( ७, ८ )

१३ मजली घर सांगितले. आता याच्यानंतर १६ मजली घर. ( ९ )

**काश्यपशिल्पातील १३ मजली घराची माहिती हे चाळिसावे पटल संपले.**

# एकेचाळिसावे पटल

## [ १६ मजली घर ]

हे ब्राह्मणश्रेष्ठा, आता सोळा मजली घर सांगतो. असे क्रमाक्रमाने कल्पना करून पाच व्हरांड्यांसह, सारखे माप असलेल्या पाच हारांसह गृहपिण्डि असावी. गर्भगृह पाच अंश व गृहपिण्डि चार अंश (असून) हे ब्राह्मणश्रेष्ठा, उरलेले पूर्वीप्रमाणेच व्हरांडा वगैरे असतात. (१-१½)

[ श्लोक २-२½ संदर्भरहित आहेत. ]

सोळा मजले असलेल्या घरांत तळमजल्यावर किंवा पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या, चवथ्या किंवा पाचव्या मजल्यावर देवतेची स्थापना करावी. (३, ३½)

ज्या मजल्यावर देवतेची प्रतिष्ठापना केलेली असते त्या मजल्यापर्यंत खालचे मजले भरीव असावेत. (४)

बाहेरच्या बाजूस भूषविलेल्या व्हरांड्यापर्यंत भरीव (बांधकाम) करावे. किंवा व्हरांड्यातील खांबांपर्यंत किंवा खांबांच्यावरील तुळयांपर्यंत किंवा प्रस्तरापर्यंत भरीव (बांधकाम) करावे. (५, ५½)

[ ज्या मजल्यापर्यंत देवालय भरीव बांधावयाचे त्या मजल्याच्या कुठल्या भागापर्यंत भरीव बांधकाम करावयाचे ते येथे स्पष्ट केले आहे.]

रुंदीचे ३४ भाग केले असता कर्णकूट एक अंश, घराच्या मध्यभागी असलेल्या शालेची लांबी चार अंश सांगितली आहे. त्यांच्यामध्ये (असलेल्या शालांची लांबी ? ) दोन भाग असावी. ( ६, ७ )

[ श्लोकार्ध ६½ अशुद्ध असल्याने त्याचा अर्थ अंदाजाने केला आहे. ]

त्यांच्यामध्ये कर्णकूटाप्रमाणे असलेले पंजर एक अंश, त्यांच्यामध्ये अर्ध्या अंशाचेच हारान्तर असावे. ( ८ )

याप्रमाणे तळमजल्यावर २८ शाला, ४ कर्णकूट ( व ) ३२ पंजर असावेत. ( ९ )

हे ब्राह्मणा, हारान्तराची संख्या ६४ असावी. याप्रमाणे तळमजला सांगितला. ( दुसऱ्या मजल्याच्या रुंदीचे ) ३२ भाग केले असता- ( १० )

मध्यशाला दोन भाग असावी व उरलेले (अवयव) पूर्वीप्रमाणेच असावेत. दुसऱ्या (मजल्याचे) हे वर्णन झाले. आता तिसऱ्याचे सांगतो. ( ११ )

तिसऱ्या मजल्याच्या रुंदीचे ३२ भाग करून कर्णकूटाच्या बाजूला असलेले पंजर साडेतीन भागाने; ( १२ )

हारान्तर त्याच्या निम्मे (१¾ भाग) असावे, व उरलेले अवयव तिसऱ्या ( दुसऱ्या ? ) मजल्याप्रमाणे असावेत. चवथ्या मजल्याच्या रुंदीचे २८ भाग करून-( १३ )

कर्णकूटाजवळच्या दोन शालांच्या दोन्ही बाजूंना एक अंश रुंदीचे पंजर असून उरलेले (अवयव) पूर्वीप्रमाणेच कल्पावे. ( १४ )

पाचव्या मजल्याच्या रुंदीचे २६ अंशात भाग करून मध्यशाला चार अंश, कर्णकूट एक अंश, ( १५ )

त्यांच्या (दोन कर्णकूटांच्या) मध्यभागी शाला व त्यांच्यामध्ये ( शाला व कर्णकूट यांच्या-मध्ये प्रत्येकी एक ) लहान कोष्ठ असून हे कल्पवित्तमा, ते प्रत्येकी दोन भाग कल्पावेत. ( १६ )

कोष्ठांच्यामध्ये अर्ध्या भागाने पंजर व कर्णकूट असते. त्याच्या निम्मे (पाव भाग) हारा-न्तर असते. त्यांची संख्या तळमजल्याच्या हारान्तरांच्या संख्येइतकी ( ६४ ) असते. ( १७ )

सहाव्या मजल्याच्या रुंदीचे २४ भाग केले तर मध्यभागी असलेले कोष्ठ दोन भाग व उरलेले (अवयव) पूर्वीप्रमाणेच असावेत. ( १८ )

सातव्या मजल्याच्या रुंदीचे २२ भाग करावेत. कर्णकूट एक अंश व मध्यशाला दोन भागांची, ( १९ )

त्यांच्यामध्ये एक अंश क्षुद्रकोष्ठ असावे. त्यांच्यामध्ये कोष्ठाची लांबी दोन भाग सांगतात. (२०)

पंजराची रुंदी अर्धा अंश व हाराची रुंदी त्याच्या निम्मे ( पाव अंश असून ) पंजर (व) कूटकोष्ठ यांची संख्या पूर्वीप्रमाणेच असावी. ( २१ )

आठव्या मजल्याच्या रुंदीचे २० अंशांत विभाग केले तर कर्णकूट एक अंश, मध्यभागी असलेले कोष्ठ दोन भाग असावे. ( २२ )

त्यांच्यामध्ये कोष्ठाची लांबी दोन भाग सांगितली आहे. पंजराची रुंदी अर्धा अंश, हाराची रुंदी त्याच्या निम्मे ( पाव अंश असून ) पंजर कूटकोष्ठ यांची संख्या पूर्वीप्रमाणेच असते. ( २३, २३½)

[ श्लोक २४–२६ श्लोक २२–२३½ प्रमाणेच आहेत. पुनरुक्ती आहे. ]

नवव्या मजल्याच्या रुंदीचे १८ अंशांत विभाग केले असता, कर्णकूट एक अंश असावे, मध्यशाला दोन भाग, ( २७ )

त्यांच्यामध्ये अर्धा भाग पंजर असावे. त्यांच्या दोन्ही बाजूंना त्याच्या निम्मे (पाव भाग) हारान्तर असावे. (२८)

त्यांच्या दोन्ही बाजूंना दोन भाग विशेषतः कोष्ठ करावे. हे सुव्रता, बुद्धिमान माणसाने, कूटकोष्ठांच्यामध्ये व कोष्ठांच्यामध्येदेखील अर्धा अंश पंजर कल्पावे. हे कल्पवित्तमा, हारान्तर त्याच्या निम्मे असावे. ( २९, ३० )

२० कोष्ठ, चार कूट, २४ पंजर नवव्या मजल्यावर असावेत. आता दहावा मजला सांगतो. ( ३१ )

दहाव्या मजल्याच्या रुंदीचे १६ अंशांत विभाग केले असता कर्णकूट एक भाग व पंजराची रुंदी तितकीच ( एक भाग ) असावी. (३२)

शालेची रुंदी दोन भाग असावी. अर्धा भाग हाराची रुंदी असावी. १२ शाला, ४ कूट व १६ पंजरांसह ३२ हारान्तर दहाव्या मजल्यावर असावीत. (३३, ३३½)

११ व्या मजल्याची रुंदी १४ भागांत विभागून कर्णकूट एक भाग, मध्यभागी असलेली शाला दोन भागांनी व त्यांच्या ( कर्णकूट व मध्यशाला यांच्या ) मध्ये असलेल्या शाला तीन अंश असाव्यात. ( ३४, ३५ )

अर्धा भाग पंजराची रुंदी व त्याच्या निम्मे (पाव भाग) हाराची रुंदी असते. चार कूट, १२ शाला, १६ पंजरांसह, ३२ हारान्तर ११ व्या मजल्यावर असावे. (३६, ३६½)

१२ व्या मजल्याच्या (रुंदीचे) १२ भाग केले असता पंजर, कूट, कोष्ठ यांची संख्या ११ व्या मजल्याइतकीच असते. सर्व कोष्ठांची रुंदी दोन भाग ठेवावी. (३७, ३८)

तेराव्या मजल्याच्या रुंदीचे १० भाग करून कर्णकूट एक अंश (व) मध्यशाला दोन भागांनी असावी. (३९)

त्यांच्यामध्ये अर्ध्या भागाने कर्णकूटाप्रमाणे पंजर (असून) हारान्तर त्याच्या निम्मे (पाव भाग) असावे. त्यांची संख्या १२ व्या मजल्याप्रमाणे असते. (४०)

१४ व्या मजल्याच्या रुंदीचे आठ भाग केले असता कर्णकूट एक अंश (व) मध्यशाला दोन भागांनी असावी. (४१)

पंजराची रुंदी अर्धा अंश, त्याच्या निम्मे हारान्तर (असते.) चार कूट, चार शाला (व) १६ पंजरांसह अत्यंत सुंदर असे २४ हारान्तर असावेत. १५ व्या मजल्याची रुंदी सहा सारख्या भागांत विभागावी. (४२, ४३)

कर्णकूट एक भाग, मध्यशाला दोन भागांनी, दोन पंजर असलेले हारान्तर एक भाग. (४४)

उरलेल्या (१६ व्या) मजल्याची रुंदी चार भागांत विभागून मधील दोन भागांइतक्या रुंदीचा व निर्गमन एक दण्ड मापाचे असलेला (मध्यभद्र असावा.) (४५)

प्रासादाच्या उंचीचे २०२ भाग करून अधिष्ठान सात अंश आणि खांब १३ अंश, (४६)

मंचाची उंची साडेपाच अंश, खांबाची उंची १२ अंश, प्रस्तराची उंची सहा भाग, खांबाची उंची ११ अंश, (४७)

मंच साडेपाच अंश असतो. खांबाची उंची दहा अंश, मंचाचे माप पाच अंश, खांबाची उंची नऊ अंश, (४८)

हे कल्पवित्तमा, मंचाची उंची साडेचार अंश कल्पावी. खांबाची उंची साडेआठ अंश, मंचाचे माप चार अंश, (४९)

खांबाची उंची आठ अंश, मंचाचे माप चार अंश सांगितले आहे. खांब साडेसात अंश, प्रस्तर साडेतीन अंश, (५०)

खांबाची उंची सात अंश, मंच सवातीन, खांबाची उंची साडेसहा, मंचक तीन असावा. (५१)

खांबाचे माप सहा अंश, मंचक पावणेतीन अंश, खांबाची उंची साडेपाच अंश सांगितली आहे. (५२)

प्रस्तराची उंची अडीच भाग असावी, खांबाची उंची सवापाच सांगितली आहे. (५३)

मंचाची उंची अडीच अंश, खांबाची उंची पाच अंश, मंचाचे माप सवादोन भाग सांगतात. (५४)

खांबाची उंची पावणेपाच भाग सांगतात. मंचाचे माप दोन भाग असावे. खांब साडेचार भाग, (५५)

मंचाचे माप पावणेदोन अंश, वेदिकेचे माप एक अंश, कंठ त्याच्या दोन भागांनी, (५६)

शिखराची उंची साडेचार भाग सांगितली आहे. स्तूपीचे माप सवा अंश क्रमाने कल्पावेत. (५७)

[ १९९ भाग होतात, २०२ नव्हेत. ]

( प्रासाद ) होमापासून स्तूपीपर्यंत चौकोनी असावा. शिखरावरती चारी दिशांना महानासी असाव्यात. प्रत्येक खांबावर अल्पनासी असावी, याला ' ब्रह्मकान्त ' म्हणतात. ( ५८, ५८½ )

तसेच पण उंच मंच, सौष्ठिक व कोष्ठ असलेले असे शंकराला आवडते ' सारस्वत ' गृह सांगतात. ( ५९, ५९½ )

वरीलप्रमाणेच पण कूट खाली व मंचासहित कोष्ठ वर असलेले, सर्व प्रकारच्या भरभराटीस कारणीभूत होणारे, असे प्रसिद्ध ' प्रादेश ' होते. ( ६०, ६०½ )

तसेच पण शिखर व कण्ठ अष्टकोनी असून शिखरावरती आठ महानासी असतील तर ते ' श्रीकर ' होते. ( ६१, ६१½ )

तेथेच मध्यभागी भद्र असलेले, दोन सारखेच उंच असलेले ( समपातळीत असलेले ) कूटकोष्ठ असावेत. (तसेच) हे ब्राह्मणा, मंचासह किंवा मंचाशिवाय कूटशाला असतील तर मला आवडणारे प्रसिद्ध असे ' पर्वतीक ' होते. ( ६२, ६३ )

तसेच पण शिखर व कण्ठ वर्तुळाकार व वेदिका अष्टकोनी किंवा वेदिकादेखील वर्तुळाकार किंवा घटाप्रमाणे गोल असते. तेव्हा शंकराला आवडते असे ' सुशांभव ' होते. ( ६४, ६४½ )

पंजर, कूटकोष्ठ आणि शिखर व तसेच इतर सर्व ( अवयव ) नागरपद्धतीला योग्य अशी करावीत. याप्रमाणे एक किंवा अनेक मजले असलेले ( सदन ) करावे. ( ६५, ६६ )

प्रत्येक मजल्याला प्रयत्नांनी जसे जमेल तसे मंचक असावे. त्या त्या मजल्याला योग्य अशा रुंदी व उंचीच्या भिंती आणि गर्भगृह असावे. ( ६७ )

( अशा रीतीने ) विधिपूर्वक ( शास्त्रात सांगितल्याप्रमाणे बांधलेले ) घंटा वगैरे अलंकारांसह व व्हराण्ड्यासह घर असावे. तसेच वर जाण्याकरिता जिना असावा. ( ६८ )

जेथे तेथे योग्य अशा शाला ? ? कराव्यात. त्याच्या ( प्रासादाच्या ) पुढच्यात एक किंवा अनेक मजल्यांचा मंडप करावा. ( ६९ )

[ श्लोकार्ध ६८½ फार अशुद्ध आहे. ]

पूर्वी सांगितलेल्या विधीप्रमाणे सर्व अलंकारांसह, कराल, मुद्‌गी, गुलमास कल्क ( व ) चिक्कण यांनी चित्ताकर्षक कामे करावीत व शास्त्रात सांगितल्याप्रमाणे निरनिराळी मनोहर चित्रे काढावीत. ( ७० )

[ करालमुद्‌गिगुलमासकल्कचिक्कणकर्मकृत् असा श्लोकार्ध ७० सुधारून त्याप्रमाणे अर्थ दिला आहे. ]

[ कराल, मुद्‌गी, गुलमास व कल्क हे सर्व चुन्याचे प्रकार आहेत. त्यात वापरलेल्या वाळूच्या आकारावरून ते ठरविले आहेत. कराल प्रकारच्या चुन्यात जाड वाळू ( चिंचोक्याएवढी ) असते तर मुगाच्या डाळीइतकी जाड वाळू वापरलेल्या चुन्याला मुद्‌गी म्हणतात. बारीक वाळू व शंखशिंपल्यांपासून बनविलेल्या चुन्याला गुलमास म्हणतात. कल्कविधान, पटल ८४ त ही माहिती दिली आहे. अधिक माहितीसाठी शिल्परत्न अध्याय १४ पाहावा. ]

वर सांगितल्याप्रमाणे यथाशक्ती जो देवालय बांधेल तो या लोकीच धनवान, श्रीमान, मुले, नातू, स्त्रिया, दासी, दास व इतरांसह इच्छिल ती संतती मिळवून आनंदाने नांदेल; त्याच्या अनेक पिढ्या पापापासून मुक्त होतील. ( ७१-७३ )

**काश्यपातील ( काश्यपशिल्पातील ) सोळामजली घराची माहिती हे एकेचाळिसावे पटल संपले.**

# बेचाळिसावे पटल

## [ मूर्धा इष्टकेबद्दलची माहिती ]

शिखराच्या निम्म्या उंचीवर जेथे महानासी संपते तेथील मूर्धेष्टकेच्या ( स्थापनेचा ) संपूर्ण विधी आता विशेषतः सांगतो. ( १ )

किंवा शक्तिध्वजाच्या नंतरही मूर्धेष्टका ठेवावी. हे ब्राह्मणा, तेथून शिखराच्या समाप्ती-पर्यंत मूर्धेष्टका असतात. ( २ )

एक किंवा विशेषत: अनेकमजली घराकरिता विटांची (विटा किंवा त्या आकाराचे दगड यांची ) लांबी, रुंदी, जाडी ही प्रथमेष्टकेप्रमाणेच असतात. ( ३ )

प्रासादाच्या पुढच्या बाजूला, उत्तर व वायव्य दिशांना व गोपुरापाशी नऊ, आठ, सात, सहा किंवा पाच हातांचा मण्डप (बांधावा.) (४)

त्याची लांबी व रुंदी सारखी ठेवून चौरस (आकाराचा) सोळा खांबी मण्डप अथवा प्रपा करावी. (५)

चार दारे ( व ) चार तोरणे असून सहा, आठ किंवा नऊ वितानध्वजांसह (प्रपामंडप) करावा. (६)

मोत्यांचे हार, दर्भाच्या माळा यांनी (तो मण्डप) विशेषेकरून अलंकारावा. मण्डपाच्या तीन भागांपैकी मधल्या एका भागाइतकी वेदिका करून, ( ७ )

तिच्या पृष्ठभागावर चार अंगुले उंचीच्या तीन उपवेदी असाव्यात. उरलेली रुंदी वेदीची असून तिची उंची १२ अंगुले ( २२·८ सें. मी. ) असावी. (८)

बारा अंगुले उंचीच्या (व) आरशाप्रमाणे समपातळीत असलेल्या वेदीवर चौरस अग्नि-स्थण्डिले रचावीत. ( ९ )

किंवा जाड वाळूने ········ , आठ द्रोण साळींनी, त्याच्या निम्मे (चार द्रोण) तांदुळांनी व त्याच्या निम्मे ( दोन द्रोण ) तिळांनी आणि त्याचप्रमाणे लाह्यांनी, त्या पसरून पांढरे कमळ रेखावे. ( १०, ११ )

चाणाक्ष माणसाने निरनिराळी फुले, कुश, दर्भ ही पसरून कमळाची मणिकर्णिका (मध्य-भागील भाग) व पाकळ्या जमेल त्याप्रमाणे काढावीत. (१२)

गन्ध, फुले इत्यादींनी व विशेषतः धान्यांची आहुती द्यावी. लोखंडी किंवा लाकडी स्तूपिदण्ड करावा. ( १३ )

(स्तूपिदण्ड) असाणा, खैर किंवा मजबूत तितिणीचा करावा. किंवा मयूर अथवा पद्मकण्डूर या उत्तम लाकडांचा (दण्ड) करावा. (१४)

[ तिन्तिणीसारम् याचा अर्थ मजबूत तितिणी केला आहे. त्याऐवजी तितिणीच्या लाकडाच्या आतील भागाचा असाही करता येईल. ]

सोने, लोखंड व तांबे यांचा किंवा या तिघांच्या मिश्रणाने वरील मजल्याच्या तीनपट उंचीचा स्तूपिदंड करावा. ( १५ )

किंवा शीर्षावरील दगडाच्या ( मूर्ध्नेष्टकेच्या ) वरपासून स्तूपीपर्यंत ( स्तूपिदण्डाची ) लांबी असावी. वरील मजल्याच्या रुंदीइतकी ( दण्डाच्या ) मुळाची रुंदी असावी. ( १६ )

त्याच्या अग्राची रुंदी (व्यास) एक अंगुल ( १.९ सें.मी. ) असावी. ( मुळापासून अग्रापर्यंतची स्तूपिदण्डाच्या ) उंचीची रुंदी लाकडाप्रमाणे क्रमाक्रमाने कमी केलेली असावी. मुळापाशी ( स्तूपिदण्ड ) चौकोनी करावा. (१७)

उंचीच्या मध्यभागाचा (मधील ⅓ उंचीचा ) भाग अष्टकोनी व अग्रापाशी वर्तुळाकार असावा. किंवा चौकोनी भागाच्या वरील सर्व भाग ( ⅔ उंची ) गोल असावा. ( १८ )

[ मुळाचा ⅓ लांबीचा भाग चौकोनी, मधला ⅓ भाग अष्टकोनी व अग्राचा ⅓ भाग गोल असावा किंवा मुळाचा ⅓ लांबीचा भाग चौकोनी व उरलेल्या ⅔ लांबीचा भाग गोल असावा. ]

त्याच्या ( स्तूपिदण्डाच्या ) मुळापाशी शिखा (आडवा दांडा) योजावा. त्याच्या मुळाची रुंदी एक दण्ड व अग्रापाशीही ती एक दण्ड असावी. ( १९ )

··· ··· ··· शहाण्या माणसाने ( आडवा दांडा ) लोखंडाचा करावा. ( स्तूपि )दण्ड तसेच मूर्ध्नेष्टकादेखील पंचगव्याने प्रक्षालून, ( २० )

कर्णिकेपाशी ( वेदीवरील कमळाचा मध्यभाग ) दण्ड ठेवावा व क्रमाने चारी मुख्य दिशांना चार इष्टका ठेवाव्यात. ( २१ )

दण्डावरती वर्तुळाकार पृथ्वी इत्यादी शहाण्या माणसाने रेखावी. पूर्व दिशेपासून आठही दिशांना क्रमाने गन्ध, फुले यांनी याग करावा. ( २२ )

हे ब्राह्मणा, सोने, चांदी किंवा तांबे (यांच्या) किंवा कापसाच्या दोरीने स्वतःच्या बीज ( मन्त्रा )चे स्मरण करून कौतुक बांधावे. ( २३ )

ब्रह्मा, विष्णू, रुद्र, शंकर ( ईश्वर ) व सदाशिव या अधिदैवतांना क्रमाने इष्टकांवरती व दण्डाच्या शेवटाशी ठेवावे. ( २४ )

त्यांना नैवेद्य आणि विडा अर्पण करावा. प्रत्येकाला कुश गवताच्या जुडीसह नव्या कापडांनी आच्छादन घालावे. ( २५ )

कुश गवताच्या जुडींनी झाकलेले, सुगन्धित पाण्याने भरलेले, कापड, सोने व फुले तसेच फळे, पाने यांच्यासह असलेल्या (आठ कलशरूप) आठ विद्येश्वरांच्या अधिपांची (प्रमुखांची) प्रतिष्ठापना करून त्यांच्या त्यांच्या मंत्रांनी नैवेद्यविधीपर्यंत त्यांची पूजा करावी. (२६, २७)

नंतर होम करावा, अग्न्याधानादी (क्रिया) करावी. शहाण्या माणसाने, समिधा, तूप, चरु, लाह्या, यव इत्यादींच्या प्रत्येकी शंभर किंवा त्याच्या निम्मे (५०) आहुती क्रमाने द्याव्यात. (२८, २८½)

बुद्धिमान माणसाने परब्रह्म, षडंग, क्षुरिका (?) यांना मुख्य बीजे (तीळ, तांदूळ, मोहरी वगैरे) व तूप या प्रत्येकाच्या २५ आहुती द्याव्यात. जयादि, अभ्यातान व राष्ट्रभृच्च या मंत्रांनी होम करावा. (२९, ३०)

ब्रह्मा इत्यादी बीजमन्त्रांनी तूप वगैरेंनी आहुती द्यावी. असे रात्री जागरण करून चांगल्या शुभप्रभाती, (३१)

आचार्यांनी मूर्तीसह (?) विधिपूर्वक स्नान करून नवीन कपडे, पागोटे, भस्म, रुद्राक्ष धारण करावीत. असेच यज्ञोपवीत घातलेल्या, पांढरे उटणे ल्यालेल्या, सोन्याची अंगठी, कटक (वलये), कुण्डल असे अलंकार धारण केलेल्या शिल्पीला यज्ञसूत्रासह दागिन्यांनी भूषवावे. (३२–३३½)

आचार्याने मण्डपात जाऊन ?? दण्डाची गंध, फुले यांनी पूजा करून, जयादि वगैरे मन्त्रांनी होम करून ‘स्विष्टमग्नि …’ पर्यंत मन्त्र म्हणून पूर्णाहुती द्यावी. (३४, ३५)

स्थिर किंवा उभय राशींच्या उदयाच्या वेळेस किंवा मीन रास व शुक्र दिसत असताना, (३६)

आचार्य आणि शिल्पी यांनी अनुग्रहाच्या शेवटी पुण्याहवाचन करून मूर्ध्नेष्टकेची स्थापना करावी. (३७)

इष्टका आणि स्तूपिदण्ड यांना तसेच सर्व प्रासादाला प्रदक्षिणा घालून निरनिराळे अलंकार घातलेल्या (आचार्यांनी व शिल्पींनी) त्या प्रासादाची आराधना करावी. (३८)

[लेप् धातूचा अर्थ आपटे यांच्या शब्दकोशात आराधना करणे असा दिला आहे.]

आचार्याने उत्तराभिमुख होऊन अनन्य भावाने ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर व सदाशिव यांना त्यांच्या त्यांच्या मन्त्रांनी स्मरून चारही इष्टका ठेवाव्यात. (३९, ३९½)

पृथ्वीरूप इष्टका क्रमाने ईशान्य दिशेपासून (ही शंकराची दिशा) उत्तरेकडे अग्र येईल अशी (ठेवावी.) सपाट जागी अग्नेयेकडून पूर्वेकडे अग्र येईल अशी जलात्मक (इष्टका ठेवावी.) सपाट जागी नैर्ऋत्य दिशेकडून उत्तरेकडे अग्र असणारी जलात्मक (इष्टका ठेवावी.) सपाट जागी वायव्येकडून पूर्वेकडे अग्र असलेली वायुरूप (मारुतात्मक इष्टका ठेवावी.) अशा क्रमाने (त्यांच्यात) एवढेही छिद्र राहणार नाही याप्रमाणे ठेवाव्यात. (४०–४२)

माणिक, मरकत तसेच वैडूर्य, इंद्रनील, मोती, स्फटिक त्याचप्रमाणे पद्मराग आणि प्रवाळ, (४३)

हिरा मध्यभागी ठेवून इतर रत्ने (निरनिराळ्या) दिशांना शक्तिबीजाचे स्मरण करून ठेवावीत. त्यांच्यावरती ईशान मन्त्राने स्तूपिदण्डाची स्थापना करावी. (४४)

कलशातील पाण्याने दण्ड व पाच मोठे दगड यांना प्रोक्षण करून त्यांच्या त्यांच्या मूर्तींची ( ब्रह्मा, विष्णू वगैरे ) गन्ध, फुले, धूप यांनी पूजा करून, ( ४५ )

ते ( दण्ड व दगड ) गुळाच्या पाण्याने मुळीच हलणार नाहीत असे मजबूत बांधावेत. त्यानंतर उरलेल्या शिखराचा भाग सांगितल्याप्रमाणे बांधावा. ( ४६ )

शिखराच्या वरती वर सांगितलेल्या रीतीने कराल इत्यादी ( प्रकारच्या ) चुन्याने मजबूत व मुळीच हालणार नाही अशी स्तूपी बांधावी. ( ४७ )

सोने, चांदी किंवा तांबे यांनी घर आच्छादावे. घर बांधल्यावर आचार्याला गाय दान करावी ( गोप्रदान करावे. ) ( ४८ )

त्यास सोन्याचे दहा निष्क दक्षिणा द्यावी. यज्ञाचे सर्व साहित्य आचार्यांस दान करावे. ( ४९ )

नंतर शिल्पीची गाय, जमीन, सोने इत्यादी देऊन पूजा करावी. असे जो मनुष्य करतो त्यास शुभ फल मिळते. ( ५० )

**काश्यपशिल्पातील मूर्धेष्टकेची माहिती हे बेचाळिसावे पटल संपले.**

# त्रेचाळिसावे पटल

## [ प्राकार ]

आता विशेषतः प्राकाराचे लक्षण सांगतो. प्राकार हा शालेच्या आणि प्रासादाच्या रक्षणाकरिता किंवा शोभेकरिता असतो. ( १ )

अंतर्मण्डलाची रुंदी प्रासादाच्या रुंदीच्या निम्मे, तीन भागांच्या एक भागाइतकी ( $\frac{1}{3}$ ) किंवा चार भागांपैकी एक भाग ( $\frac{1}{4}$ ) असते. ( २ )

[ अंतर्मण्डल म्हणजे सगळ्यात आतला मार्ग. प्रासाद व पहिली भिंत यांमधील मोकळा भाग. ]

त्याच्या बाहेर अंतर्हाराची रुंदी तिच्या ( अंतर्मण्डलाच्या ) दुप्पट असते, व मध्यहाराची रुंदी ( अंतर्मण्डलाच्या तिप्पट असते ) असे बाहेरपर्यंत तीन प्राकार असताना ( त्यांच्यामधली रुंदी असते. ) ( ३ )

त्याच्या ( मध्यहाराच्या ) बाहेर मर्यादा ( तिसऱ्या व चवथ्या प्राकारांतील भाग ) असून तिची रुंदी (अंतर्मण्डलाच्या) चौपट असते. पाच प्राकारांत महामर्यादेची (चवथ्या व पाचव्या प्राकारातील अंतर अंतर्मण्डलाच्या) पाचपट असते. ( ४ )

प्रासादाच्या पादुकेपासून किंवा होमापासून पहिल्या प्राकाराचे अंतर असते. पहिल्या ( प्राकारापासून ) दुसऱ्या ( प्राकारापर्यंत ) अंतर, दुसऱ्यापासून तिसऱ्यापर्यंत, तिसऱ्यापासून चवथ्यापर्यंत व तेथून पाचव्यापर्यंत अंतर मोजावे. वरील अंतर भिंतींच्या आतून आतून, मध्यापासून किंवा बाहेरून बाहेरून असे घ्यावे, किंवा प्रत्येकाच्या पादुकांमधील अंतर मोजावे. ( ५–७ )

(दुसऱ्या रीतीने) पहिल्या मण्डलाची रुंदी (प्रासादाच्या) प्रकृतीइतकी (प्रकृतीच्या रुंदीइतकी) असून दुसऱ्या ते पाचव्या (मंडलांची रुंदी) तीन तीन अंगुलांनी (५.७ सें. मी.) क्रमाने कमी होत जाते. (८)

असे सदनाच्या मापाने प्राकाराचे माप सांगितले. आता हातांनी माप सांगतो. तीन, पाच किंवा सात हात (१·३६८, २·२८ किंवा ३·१९२ मी.) अशी पहिल्या (मंडलाची = अंतर्मण्डलाची) रुंदी तीन प्रकारांनी असते. (९)

नऊ, ११ आणि १३ हात (४·१०४, ५·०१६ व ५·९२८ मी.) दुसऱ्याची (अंतर्हाराची रुंदी) असते. १५, १७ तसेच १९ हात (६·७९, ७·७०२ व ८·६१४ मी.) (रुंदीचा) मध्यहार तीन प्रकारचा सांगतात. त्यानंतर मर्यादा ऐक. ती २१,२३ (व) २५ हात (९·५७६, १०·४८८ व ११·४ मीटर) असावी. (१०,११)

२७, २९ किंवा ३१ हात (१२·३१२, १३·२२४ किंवा १४.१३६ मीटर) अशी तीन प्रकारची महामर्यादेची रुंदी सांगतात. (१२)

असे प्राकार आभास हर्म्यासाठी आणि विकल्प (हर्म्या–) साठी कल्पावेत. सात हातांनी (३·१९२ मी.) सुरुवात करून ३५ हातांपर्यंत (१५·९६ मी.) प्रत्येक पहिल्या भिंतीपासून भिंतींच्यामधील रुंदीचे (मंडलांच्या रुंदीचे) तीन तीन प्रकार (दोन दोन हातांनी वाढवून) तीन किंवा पाच प्राकारांमुळे घराचे १५ प्रकार होतात. (१३, १४)

[अंतर्मण्डलाची रुंदी ७, ९, ११ हात;
अंतर्हाराची रुंदी १३, १५, १७ हात;
बाह्यहाराची रुंदी १९, २१, २३ हात;
मर्यादेची रुंदी २५, २७, २९ हात;
महामर्यादेची रुंदी ३१, ३३, ३५ हात; असे १५ प्रकार]

जाति नावाच्या घराच्या बाबतीत ९ हातांपासून (४·१०४ मी.) ३० (३७?) हातांपर्यंत (१३·६०८ मी.) वरीलप्रमाणेच भिंती असतात. (१५)

[येथे 'हस्तत्रिंशावसानकम्' या शब्दांऐवजी 'सप्तत्रिंशावसानकम्' असा शब्द घेतला तर रुंदी दोन दोन हातांनी वाढवून वर दिल्याप्रमाणे हिशोब जमतो.]

घराच्या मापाने भिंतींमधील अंतर जसे पूर्वी घ्यावयास सांगितले तसेच (वर हातांनी दिलेले भिंतींमधील अंतर मोजावे.) (१५½)

[वर श्लोक ५–७ पहा.]

पाच प्राकार असतानाची ही (माहिती) सांगितली. आता तीन प्राकार असताना (त्यांची माहिती) सांगतो. (१६)

दुसऱ्या, तिसऱ्या भिंतीवर आणि चवथ्या (भिंतीवर) किंवा जी भिंत योग्य वाटेल तिच्यावर हर्म्यवृत्त योजावे. (१७)

त्याच्या तोंडाशी (वर्तुळापाशी), हे कल्पवित्तमा, तोंडाची (वर्तुळाची) रुंदी कल्पावी. बीजापासून पादबीज हे (त्याच्या) निम्मे, पाऊणपट किंवा त्याच्याइतकेच असावे. (१८)

[ श्लोक १६ ते १९ यांचा सरळ अर्थ असा की प्राकारांची संख्या तीन असताना अंतर्मण्डल ते मध्यहार यांची रुंदी मूळ प्रासादाच्या रुंदीच्या कमीत कमी अनुक्रमे $\frac{1}{2}$, $\frac{3}{4}$ व १ व जास्तीत जास्त २, ३, ४ पट असावी. ]

हे ब्राह्मणश्रेष्ठा, बीजाच्या वर तोंडाची ( वर्तुळाची ) रुंदी दुप्पट, तिप्पट, चौपट किंवा पाचपट असावी. (१९)

अंतर्मण्डलाच्या भिंतीची रुंदी एक हात (०·४५६ मी.) असते. त्याहून तिप्पट (१·३६८ मी.) किंवा सहापट (२·७३६ मी.) तिची रुंदी वाढवावी. (२०)

महामध्यमेपर्यंत (तिसरा प्राकार की महामर्यादेपर्यंत, पाचव्या प्राकारापर्यंत ?) तिची (भिंतीची) जाडी दीड किंवा दोन हात (०·६८४ किंवा ०·९१२ मी.) असते. (तिच्या तिप्पट किंवा सहापटही असू शकते.) हे सुव्रता, भिंतीची रुंदी सांगितली, तिची उंची सांगतो. (२१)

भिंतीच्या रुंदीच्या तिप्पट, चारपट, किंवा पाचपट तिची उंची असते, किंवा ही उंची (मूळ प्रासादाच्या) उत्तराच्या सीमेपर्यंत (उत्तर धरून) किंवा (त्याच्या) निर्गमनापर्यंत किंवा वाजनावर-पर्यंत असते. (२२)

किंवा प्रस्तरापासून गलापर्यंत भिंतीची उंची सांगतात. भिंतीची बाहेरची बाजू सरळ असून आतील बाजू तिरपी असते. (२३)

भिंतीच्या मुळाच्या रुंदीपेक्षा टोकाची रुंदी $\frac{1}{2}$ अंशाने कमी असते. हे ब्राह्मणश्रेष्ठा, मुळापासून टोकापर्यंत भिंतीची रुंदी एक अष्टमांशाने क्रमाक्रमाने कमी करावी. (२४)

किंवा हाताच्या मापाने भिंतीची उंची मी सांगतो. पहिल्या (भिंतीची उंची) कलशापर्यंत, दुसरी भिंत फलकेच्या वरपर्यंत, (२५)

तिसरी बोधिकेपर्यंत (बोधिका धरून) असावी. चवथी मंचकाच्या वरपर्यंत (व) पाचवी कपोताच्या वरपर्यंत अशी पाच भिंतींची उंची अनुक्रमे असावी. (२६)

[ श्लोक २५ त जरी म्हटले आहे तरी उंची हातांत दिलेली नाही. ]

ही अशी पाच प्राकारांची माहिती सांगितली. भिंतीच्या वरच्या भागाचा आकार मालिके-प्रमाणे किंवा सभेप्रमाणे असावा. (२७)

मण्डपाप्रमाणे आकार किंवा सरळ (काहीही नक्षी नसलेला भिंतींचा) मध्यभाग असावा. पाच, चार, तीन, दोन (व) एकमजली भिंत आता सांगतो. (२८)

भिंतीवर भिंत (रचावी) व खांबांवर खांब ठेवावेत. प्रत्येक मजल्याच्या खांबावर अल्प-नासी असावी. (२९)

आता मी खांबांचे व पंक्तीचे (त्यांच्या रांगांचे) प्रमाण सांगतो. मूळ हर्म्याची होमापासून उत्तरापर्यंत जी उंची, (३०)

ती उंची सातदा विभागून, २ अंश अधिष्ठान व खांबाची उंची पाच अंश असावी. खांब सर्व अवयवांसह असावा. (३१)

अधिष्ठान तसे सांगितले किंवा अधिक उंच (?) कल्पावे. मूळ हर्म्याची होमापासून उत्तरापर्यंत (ची उंची) नऊ अंश करून (३२)

[ श्लोकार्ध ३१½ अशुद्ध आहे त्यामुळे अर्थ लावता आलेला नाही. ]

अधिष्ठान दोन भाग असावे (व) खांबाची उंची सात भाग असावी. होमापासून उत्तरापर्यंत ११ विभाग केले असता, ( ३३ )

अधिष्ठान तीन अंश व उरलेले (आठ भाग) खांबाची उंची असते. किंवा मूळ प्रासादाइतके खांब व अधिष्ठान असतात. ( ३४ )

खांब जर लाकडाचा किंवा दगडाचा असेल तर खांबाच्या उंचीचे सहा, सात किंवा आठ भाग करून एक अंश खांबाची रुंदी असते. (३५)

भिंतीतील खांबाची रुंदी सगळीकडे त्याच्या (खांबाच्या उंचीच्या ⅙, ⅐ किंवा ⅛ भागाच्या) पाऊणपट किंवा निम्मे असावी. (३६)

तीन, चार किंवा पाच हात (१.३६८, १.८२४ किंवा २.२८० मी.) सभोवती हाराची आकृती असावी. दोन हातांनी (०.९१२ मी.) सुरूवात करून पाच हातांपर्यंत (२.२८० मी.), तीन अंगुलांनी (५.७ सें. मी.) वाढ करून हे ब्राह्मणा, खांबांच्या रांगांचे २५ प्रकार सांगितले आहेत. सगळीकडे रांगा समसंख्येत असाव्यात. (३७, ३८)

सम किंवा विषम (संख्येच्या खांबांच्या) रांगा सगळीकडे असाव्यात. मूळ भागाच्या रुंदीचे दहा, नऊ, आठ भाग करून मुळापासून एक अंशाने अग्र क्रमाक्रमाने कमी करावे. खांबाच्या अग्राच्या रुंदीला दण्ड असे म्हणतात. ( ३९, ४० )

उत्तराची उंची एक दण्ड, पाऊण दण्ड किंवा अर्धा दण्ड असल्यास क्रमाने उत्तम, मध्यम व अधम उंचीचे उत्तर सांगतात. रुंदी खांबाच्या मुळाइतकी असते, ( ४१ )

किंवा खांबाच्या मध्याच्या रुंदीइतकी अथवा खांबाच्या अग्राच्या (रुंदी) इतकी असली तर अनुक्रमे उत्तम, मध्यम व अधम रुंदी होते. ( ४२ )

उत्तराच्या उंचीच्या तीन भागांपैकी एक भाग वाजनाची उंची व निर्गमन असते. उत्तराच्या उंचीइतके तुळईचे निर्गमन सांगतात. ( ४३ )

त्याच्या ( उत्तराच्या उंचीच्या निम्मे किंवा पाऊणपट किंवा त्याच्या रुंदीइतके तुळईचे निर्गमन असते. तुळई वाजन किंवा गुलमक यांच्यावरती ठेवतात. ( ४४ )

तुळईच्या निर्गमनाच्या निम्मी रुंदी तुळईच्यावरील जयन्ताची असते. जयन्ताच्या निम्मे रुंदी व उंची अनुमार्गाची ( मनुमार्गाची ? ) सांगितली आहे. (४५)

[ जयन्त– तुळईला लंबरूप. अनुमार्ग– जयन्तला लंबरूप असे परस्परांवर ठेवून कडीपाटाचे छप्पर करतात. ]

तुळयांमधील अंतर तुळईच्या उंचीइतके व नंतर जयन्तांमधील अंतर जयन्ताच्या उंचीइतके असते. मनुमार्गातील अंतर असे असावे की इष्टकांमधील ( विटा किंवा दगड ) अंतर एक दण्ड येईल. ( ४६ )

[ येथे दण्डाचे माप खांबाच्या अग्राच्या रुंदीने ठरते. ]

कपोत वगैरेचे निर्गमन वर सांगितलेल्या प्रस्तराप्रमाणे असते. किंवा तुळईच्यावर विटांचा थर करावा. ( ४७ )

चुना व गुळाचे पाणी यांनी विटांचा थर रचावा. नंतर कराल, मुद्ग, गुल्म आणि कल्का-सह चिक्कण ( अशा क्रमाने चुन्याचे थर खालून वर ) टाकावेत व वरती अगदी गुळगुळीत करावे. (४८)

असा विटांचा थर देतात. दगड असतील तर (दगडांचा थर द्यावयाचा असेल तर) विशेषतः पहिल्या मजल्यावर फलकाप्रमाणे असलेल्या दगडांनी ( शहाबाद फरशी ) आच्छादावे. (४९)

किंवा वाजनाच्या वर सुधाकर्म ( चुन्याचा थर देण्याचे ) करावे. असा तळमजला सांगितला. वरील मजल्यांची माहिती मी सांगतो. ( ५० )

मुळापासून अग्रापर्यंतच्या खांबाच्या उंचीचे आठ भाग करून वरच्या वरच्या मजल्यांच्या खांबांची उंची एक एक अंशाने कमी कमी करावी. ( ५१ )

एक किंवा अनेक मजल्यांच्या (बाबतीत ) प्रस्तर ( त्याची उंची खांबाच्या उंचीच्या) निम्मा असावा. प्रस्तराच्या वर भिंतीची उंची असावी. ( ५२ )

( भिंतीचे ) शीर्ष छत्राकार किंवा सदाकाराप्रमाणे ( सभाकाराप्रमाणे ? ) गोपान किंवा वाज(ना) प्रमाणे भिंतीच्या वरील भागाचा आकार असावा. ( ५३ )

मातीच्या गोळ्यांनी किंवा तसेच मजबूत लाकडांनी गोपान व छादन करावे व त्याच्या-वरती लुपा ( छप्पराच्या कैच्या ) असाव्यात. ( ५४ )

याला सभाकार ( छप्पर ) म्हणतात. ( छप्पर ) जसे योग्य वाटेल तसे करावे. ( ५५ )

जाति ( प्रकारचा प्राकार ) पाचमजली व छन्द ( प्रकारचा प्राकार ) चारमजली असावा. ( ५६ )

जितक्या मजल्यांचे आभास हर्म्य असते तितक्याच मजल्यांचे विकल्प हर्म्य असते. जाति इत्यादी ( अनेकमजली ) घराच्या भिंतींचा ( प्राकारांचा ) पाया योग्य ( मजबूत ) करावा. (५७)

मर्यादा प्राकारांत अग्निपदाच्या ठिकाणी स्वयंपाकघर असावे. नैर्ऋत्यकोनात शस्त्रागार व वायव्यकोनात झोपावयाची खोली ( शयनस्थान ) असते. ( ५८ )

शांकरस्थानात ( ईशान्य कोपऱ्यात ) योगशाला असावी किंवा भृशभागांत पुन्हा योगशाला असावी. आग्नेय व दक्षिण या दिशांमध्ये बाळंतिणीची खोली असावी. ( ५९ )

[ पदांच्या स्थानांसाठी पटल दोन पाहा. ]

इन्द्र व ईशान यांच्यामध्ये स्नानघर असावे. धान्याचे कोठार त्याच्या बाजूला किंवा भृंगराजपदावर असावे. ( ६० )

नैर्ऋत्य आणि पश्चिम या दिशांमध्ये ग्रंथालय असावे. त्याच्या दोन्ही बाजूंना उत्तम व्यंज-नालय असावे. ( ६१ )

[ व्यंजनालय– देवाची पालखी व इतर असेच वाहन, अलंकार ठेवावयाची जागा. ]

सोम व वायव्य यांच्यामध्ये वस्त्रागार असावे. सोम व ईशान यांच्यामध्ये देवीचे ( गौरी ) देऊळ असावे. ( ६२ )

त्याच्या शेजारी पलंगासहित शयनस्थान असावे. पुष्पदन्त किंवा महेन्द्रपदावर पुष्पमण्डप असावा. ( ६३ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, गृहक्षतपदावर धान्याचे कोठार असावे. मण्डलाच्या चारी बाजूंना अशी अशी ( रचना ) असावी. (६४)




आकृती ४३·१ : प्राकार, परिवारदेवता व गावाची रचना

मालिकेनंतर (मंडलानंतर) सोमापाशी विहीर असावी असे सांगतात किंवा दुसऱ्या प्रकारची व्यवस्था सांगतो. (६५)

इंद्र व शंकरस्थान (ईशान) यांच्यामध्ये विद्यास्थान (पाठशाला) सांगतात. शंकर व श्री (?) यांच्यामध्ये धनस्थान (तिजोरी) असावे. (६६)

दक्षिण (यम) व आग्नेयदिशा (अग्निपद) यांच्यामध्ये पुष्पमण्डप सांगतात. दक्षिण व नैर्ऋत्य यांच्यामध्ये स्नानाकरिता पाणी साठविण्याची खोली असावी. (६७)

निर्ऋति आणि वारुणि ( पद ) यांमध्ये पुराण ऐकावयाचा मण्डप असावा. वायव्य व वारुणि (पश्चिम) यांमध्ये शस्त्रागार असावे. ( ६८ )

वायव्य व उत्तर यांच्यामध्ये शयनस्थान असावे. ईशान्य व उत्तर यांच्यामध्ये यज्ञमण्डप असावा. ( ६९ )

जयन्तपदावर न्हाणीघर, आग्नेयपदावर भोजनगृह असावे. मालिकेच्या चहूबाजूंस असलेल्या शंकराच्या ( वेगवेगळ्या ) मूर्तींच्या जागा सांगतो. ( ७० )

ईशानपदावर नृत्यमूर्ती ( शंकराची ), आग्नेयेला वृषवाहन (शंकर), नैर्ऋत्येला पार्वती व स्कंद यांच्यासह शंकर (अशी मूर्ती) असावी. ( ७१ )

वायव्य दिशेला कंकाल व जयन्तपदावर भिक्षाटनी शिव असावा. सत्यपदावर सुखासन ( शिव ) व वितथपदावर त्रिपुरान्तक (शंकरमूर्ती) असावा. (७२)

सुग्रीवपदावर हरि अर्धहर व गन्धर्वपदावर चंद्रशेखर ( मूर्ती ) असावा. शोषावर कामदहन व मुख्यपदावर कालारि-मूर्ती असावी. ( ७३ )

[ हरिऋद्ध हा अशुद्ध शब्द असून हर्यर्धहर हा शुद्ध शब्द आहे. ]

उदिति (अदिति) पदावर अर्धनारीश्वर मूर्ती व महेन्द्रपदावर कल्याणसुंदराची मूर्ती, पर्जन्यस्थानावर क्षेत्रपाल व दक्षिणेला ( दिशेला ) दक्षिणेश्वराची मूर्ति असावी. ( ७४ )

वरुणस्थानावर लिंग (अद्भुत लिंग) व उत्तरदिशेला गजहारि ( शिवमूर्ती ) असावा. या ईश्वराच्या मूर्ती प्रासादाच्या अंतराळात कल्पाव्यात. ( ७५ )

मूलप्रासाद अशा रीतीने पाहून तेथे सकलस्थापना ( शंकराच्या मूर्तींची स्थापना ) करावी. प्राकाराच्या चारी दिशांना द्वारशोभा वगैरे ( गोपुरे ) करावीत. ( ७६ )

[ द्वारशोभा व इतर प्रकारच्या गोपुरांच्या माहितीसाठी पटल ४५ पहा. ]

प्राकाराच्या रांगांमध्ये लांबीच्या मध्यभागी किंवा मूलप्रासादाच्या मध्यसूत्रावर दारे असावीत. ( ७७ )

मुख्य दारे एक किंवा दोन असावीत व इतर ( दारांच्या ) ठिकाणी जाळ्या असाव्यात. असे प्राकाराचे वर्णन केले. आता ( प्राकारा ) बाहेरील व्यवस्था सांगतो. ( ७८ )

एक, दोन, तीन, चार (किंवा) पाच दण्ड ( १.८२४, ३.६४८, ५.४७२, ७.२९६ किंवा ९.१२० मी. ) रुंद रस्ते असावेत व त्यांच्या बाहेर तीन रांगा ( गल्ल्या ) अशाच असाव्यात. ( ७९ )

पूर्वेकडील आवारात शैव ( शंकराचे भक्त ) व त्यांचे परिवार असतात. पूर्वेला किंवा उत्तर दिशेला ( ब्राह्मण ) पुजारी यांची राहावयाची जागा असते. ( ८० )

दक्षिण दिशेला दैवज्ञ, अंबष्ठ, वैद्य यांची राहण्याची ठिकाणे असतात. देवपूजेला लागणारे साहित्य विकून जगणारे ( लोक ) पश्चिम दिशेला राहतात. ( ८१ )

सर्व प्रकारच्या भक्तांची राहण्याची जागा उत्तरेच्या बाजूला असते. आग्नेय दिशेला महाव्रतस्थान व दक्षिणेला पाशुपताचे देवालय असते. ( ८२ )

नैर्ऋत्य दिशेला कलामुख ( नृत्यशालादी ) व पश्चिम दिशेला ऊर्ध्वालय ( ? ) असते. वायव्य दिशेला जैनांकरिता जागा व उत्तर दिशेला ब्राह्मणांचे स्थान ( ब्राह्मण आळी ) असते. ( ८३ )

पाठशालेच्या मागे वैश्यांची घरे असतात. त्याच्या बाहेर ईशान्य दिशेला मोठा तलाव करावा. (८४)

[श्लोक ६६ त विद्यास्थान इंद्र व ईशानपद यांच्यामध्ये सांगितले आहे. तेव्हा प्राकाराच्या बाहेर या पाठशालेच्या मागे वैश्यांची घरे असतात.]

दक्षिण व आग्नेय दिशा यांमध्ये गोशाळा असाव्यात. पश्चिम व नैर्ऋत्य दिशा यांमध्ये सूतिकागृह असावे. (८५)

[श्लोक ५९ त हीच माहिती दिली आहे.]

पश्चिम व वायव्य या दिशांमध्ये रोगपीडितांची राहण्याची व्यवस्था असते. उत्तर व वायव्य यांच्यामध्ये लहान मुलांना शिकविण्याकरिता मण्डप असतो. (८६)

सोम व शंकर (पद) यांच्यामध्ये धान्याचे कोठार असावे. हे ब्राह्मणा, त्याच्या बाहेरील वर्तुळात दासी व गणिका यांची राहण्याची जागा असते. (८७)

नृत्य, गायन यांचा अभ्यास करणारे, बाजार करणारे वाणी, तसेच सुतार, कुंभार, माळी यांची घरे, (८८)

मासे, मांस (विकून) त्यांच्यावर उपजीविका करणारे, नाचणाऱ्या गणिका, पिताश्म (?), शूद्र व गुराखी आणि शिल्पींना मदत करणारे मजूर, (८९)

संकराने जन्मलेल्या वगैरेंच्या घरांच्या रांगा पूर्व दिशेपासून सुरू होऊन ईशान्य दिशेपर्यंत क्रमाने योजाव्यात. (९०)

[श्लोक ८७ त दिल्याप्रमाणे दासी, गणिका पूर्वेकडे राहतात व नंतर क्रमाने सुतार, माळी यांची घरे प्रादक्षिण्य क्रमाने वर्तुळाकार असून संकरित लोकांची घरे ईशान्येकडे येतात.]

त्याच्या बाहेर ईशान्य भागी स्मशान असावे किंवा दक्षिण अथवा उत्तर दिशेकडे असावे. (९१)

त्याच्या बाहेर धोब्यांची घरे असावीत व त्याच्या बाहेर एक कोसावर चाण्डाळांची वस्ती असावी. (९२)

हे द्विजसत्तमा, अशी प्राकारांची लक्षणे सांगतात. (९३)

**काश्यपशिल्पातील प्राकारलक्षण हे त्रेचाळिसावे पटल संपले.**

# चव्वेचाळिसावे पटल

## [ मण्डप ]

आता विशेषतः मण्डपाचे लक्षण सांगतो. प्रासादाला एकमजली मण्डप असेल तर त्याला मुखमण्डप म्हणतात. ( १ )

जाति, छन्द, विकल्प इत्यादी प्रासादांच्या बाबतीतही तसेच आहे. ( म्हणजे त्यांच्या एकमजली मण्डपाला मुखमण्डप म्हणतात. ) प्रासादाच्या समोर व मुख्य किंवा उपदिशांना, गावाच्या मध्यभागी किंवा (गावात) मुख्य अथवा उपदिशांना, उद्यानात, नदीच्या काठी किंवा पुन्हा तलावाच्या काठी मण्डप असतो. ( २, ३ )

देवाकरिता ( देवप्रासादाकरीता ) आठही दिशांना मुखमण्डप असतो. प्रासादाच्या पुढचात चार मण्डप करावेत. ( ४ )

[ देवाकरिता जो मण्डप तो आठ दिशांना तोंडे असलेला असा मुखमण्डप असावा असाही अर्थ श्लोकार्ध ३½ चा करता येईल. ]

पहिल्यांदा मुखमण्डप, नंतर प्रतिमामण्डप, स्नानाकरिता तिसरा ( स्नानमण्डप ) व नृत्याकरिता ( नृत्यमण्डप ) चौथा ( मण्डप असतो. ) ( ५ )

यांतील पहिला मण्डप ( मुखमण्डप ) पूर्वी सांगितल्याप्रमाणे व दुसरा इत्यादी मंडप तसेच असतात. हे मण्डप अंतर्हार, मध्यहार इत्यादी ठिकाणीही करावेत. ( ६ )

मण्डपाला जोडून मण्डप असावा. किंवा प्रत्येक मण्डपाच्या मध्ये शाला असावी. तिला अंतराल म्हणतात. प्रथम तिचे लक्षण सांगतो. ( ७ )

एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात, आठ, नऊ, दहा किंवा ११ हातदेखील असे अंतरालाचे रुंदीनुसार ११ प्रकार होतात. जेथे जो मण्डप करावयाचा त्याच्या विशेषतः ( खांबांच्या ) रांगांच्या, ( ८, ९ )

एक, दोन, तीन, चार, किंवा पाच भागांनी आतील अंतराल म्हणजे अंतरालाचा आतला आतला (मोकळा) (सावकाशान्तराल) म्हणजेच भितीमधील अंतराल होतो. ( १० )

भितींमधील अंतराल असेल तर त्याच्या दोन्ही बाजूंना प्रवेश असतात. एक, दोन, तीन दण्ड ( खांबाच्या अग्राची रुंदी ) किंवा एक भाग हा प्रवेश असतो. ( ११ )

दोघां( प्रवेशां ) च्यामध्ये दार किंवा जाळी असावी. उत्तर दिशेला स्नानासाठी जलधारा असावी. ( १२ )

हे द्विजोत्तमा, अभ्यन्तराल ( मण्डपाच्या ) सम किंवा विषम विभागांइतके असावे. अभ्यन्तराला मण्डपाप्रमाणेच अधिष्ठान वगैरे सर्व अंगे असावीत. ( १३ )

अंतराल सांगितले आता मण्डप लक्षण ऐक. तीन हातांनी ( १·३९८ मी. ) सुरुवात करून दोन दोन हातांनी ( ०·९१२ मी.) १९ हातांपर्यंत ( ८·६६४ मी. ) आभासमण्डप नऊ प्रकारे होतो. आभास प्रासादांना आभासमण्डप असावा. ( १४, १५ )

२१ हातांपासून (९·५७६ मी.) सुरुवात करून दोन दोन हातांनी वाढ करून ३७ हातांपर्यंत ( १६·८७२ मी. ) विकल्पमण्डपाचे नऊ प्रकार होतात. ( १६ )

आभास सदनाकरिता ( सांगितलेला मण्डप ) त्यांना ( विकल्प सदनाला ) योग्य असतो व स्वतःला ( आभास सदनाकरिता ) देखील योग्य असतो. ३९ हातांनी ( १७·७८४ मी. ) सुरुवात करून दोन दोन हातांनी ( ०·९१२ मी. ) वाढवून ५५ हातांपर्यंत ( २५·०८० मी. ) छन्दमण्डप होतो. ( तो छन्द प्रकारच्या प्रासादाचा मंडप असतो. ) ( १७, १७½ )

५७ हातांनी ( २५·९९२ मी. ) आरंभ करून दोन दोन हात वाढवून ७३ हातांपर्यंत ( ३३·२८८ मी. ) जातिमण्डप असतो. त्याच्या रुंदीइतकीच लांबी असलेला व समकोन असलेला मण्डप असावा. ( १८, १९ )

[ वरील मण्डप चौरस असावेत. ]

दीड हातांनी (०·६७८ मी.) सुरुवात करून सहा सहा अंगुलांनी ( ११·४ सें. मी. ) वाढ करून पाच हातांपर्यंत ( २·२८ मीटर ) खांबांच्या रांगांतील अंतर कल्पावे. ( २१ )

अडीच हातांनी ( १·१४ मी. ) आरंभ करून सहा अंगुलांनी (११·४ सें.मी.) वाढ करावी. खांबाची उंची अशी असून ( मण्डपाच्या ) खांबाची रुंदी आता सांगतो. (२२)

८ अंगुलांनी ( १६·२ सें.मी. ) सुरुवात करून अर्ध्या अंगुलाने ( ०·९५ सें.मी. ) वाढ करून १९ अंगुलांपर्यंत ( ३६·१ सें.मी. ) २३ प्रकारांनी ( मण्डपाच्या ) खांबाची रुंदी असते. ( २३ )

खांबाच्या उंचीचे १२, ११, १० किंवा आठ भाग करून मुळाची रुंदी त्याचा एक भाग व त्याच्या $\frac{1}{32}$ भाग कमी अग्राची रुंदी असावी. ( २४ )

सामान्यतः सर्व मण्डपांकरिता अधिष्ठानाची उंची खांबाच्या उंचीच्या निम्मे असते (किंवा) खांबाच्या उंचीचे पाच भाग करून दोन भाग अधिष्ठानाची उंची असते. ( २५ )

किंवा खांबाच्या उंचीच्या $\frac{1}{3}$ किंवा $\frac{1}{4}$ उंची अधिष्ठानाची असते. ही उंची केवळ अधिष्ठानाची किंवा उपपीठ व अधिष्ठान अशी दोघांची मिळून असते. ( २६ )

उपपीठाची उंची अधिष्ठानाच्या उंचीइतकी, त्याच्या दुप्पट किंवा तिप्पट सांगतात. किंवा उपपीठाची उंची अधिष्ठानाच्या उंचीच्या निम्मे असते. ( २७ )

उपपीठ, अधिष्ठान, खांब, प्रस्तर ( यांचे ) प्रवेश, निर्गमन, अलंकार हे पूर्वी सांगितल्याप्रमाणे असतात. ( २८ )

[ यांची माहिती अनुक्रमे पटल क्रमांक ५, ६, ८ व १९ मध्ये दिली आहे. ]

खांबांच्या तीन रांगा असलेला, १६ खांब, १६ अल्पनासी व मध्यभागी कूट असलेला किंवा नसलेला, अथवा सगळीकडे अलंकारिलेला, चार दारे असलेला किंवा आठही दिशांना आठ दारे असलेला, प्रत्येक दिशेला एक किंवा दोन जालकोष्ठ ( जाळीची खिडकी ? ) असलेला, बाहेरच्या बाजूस जिना असलेला, तोरणांनी वगैरे चित्रित केलेला किंवा तोरणाशिवाय हा प्रथम मण्डप असतो. ( २९–३१ )

रुंदीचे चार भाग केल्यानंतर, पूर्व व पश्चिमेकडे दोन भाग केले असता एक भाग रुंद निर्गमन असते. इष्ट दिशेला दार असलेला, मध्यभागी असलेला खांब टाकून देऊन वर दोन भागांचे कूट ज्याला असते ( व ) आठ पंजर असलेला ( असा ) दुसरा मण्डप असतो. ( ३२, ३३ )



आकृती ४४·१ : १६ खांबी मंडप



आकृती ४४·२ : २४ खांबी मंडप



आकृती ४४·३ : ३२ खांबी मंडप

चौरस असून रुंदीचे पाच भाग करून मध्यभागी दोन भागांचे कूट असावे; मंडपाच्या सभोवती एक भागाने ३२ खांब असतात. २४ नासी, आठ पंजरांसह असतात. इष्ट दिशेला दार असते व तेथेच भित असते. दाराच्या ठिकाणी सर्व अलंकारांनी युक्त असा जिना असतो. कुम्भलता वगैरेंनी व भिंती भूषविलेल्या आहेत असा तिसरा मण्डप असतो. ( ३४–३६ )

[श्लोक ३३½ त विभाश्रं हा शब्द आहे तो युगाश्रं असा घेतला. श्लोक ३४½ भानुद्विगुण-संराष्ट्रं असा शब्द आहे तो भानुद्विगुणनासाढयं असा घेतला. श्लोक ३५ त द्वारन्य(म)त्रैक कुडचकम् याऐवजी द्वारमत्रैवकुडचकम् असा शब्द घेऊन वर अर्थ दिला आहे.]

चौकोनी (चौरस) असून सहा भाग केले असता मध्यभागी कूट एक भागाने (असते.) ते कूट आठ खांबांसह असून मध्यभागी रंग असावा. (३७)

चार दारे किंवा इष्ट दिशेला एकच दार असते. (ते दार) दोन भाग रुंद असून त्याचे निर्गमन एका भागाने असते. (३८)

[श्लोकार्ध ३८ 'द्विभक्त्याऽपि हृतंचैव भक्त्यादिप्रथमायुतम्' हा 'द्विभक्ति विस्तृतं चैव भक्त्यानीव्रं समायुतम्' असा सुधारून अर्थ दिला आहे.]



आकृती ४४·४ : ४८ खांबी मंडप

इष्ट दिशेला किंवा चार दिशांना भद्र असून ४८ खांब, २४ अल्पनासी व कुंभलता इत्यादीं-सह (भूषविलेल्या) भिंती असलेला, आठ तोरणे असलेला हा तिसरा (चवथा ?) मण्डप असतो. (३९, ४०)

[श्लोकार्ध ३८½ त 'अष्टदिग्भद्रसंयुक्तं' च्या ऐवजी 'इष्टदिग्भद्रसंयुक्तं' असा बदल करून अर्थ दिला आहे. श्लोकार्ध ३९ त 'चाष्ट्रांघ्रियुक्तं' च्या ऐवजी 'चाष्टांघ्रियुक्तं' असा बदल केला. तसेच 'वा तत्र योदितम्' च्या ऐवजी 'वा तत्र योजयेत्' अशी सुधारणा करून अर्थ दिला आहे.]

चौरस असून सात भागांचा, ६० खांब असलेला, त्याच्या मध्ये नऊ भाग (?) कूट किंवा अलंकारिलेले अंगण असते. (४१)



आकृती ४४.५ : ६० खांबी मंडप

[ नऊ भाग कूट यासाठी श्लोक ४७ पहा ]

३२ अल्पनासी ( व ) चार दिशांना भद्र असून मुखभद्राचे निर्गमन रुंदीच्या ⅓ असते. ( ४२ )

मध्यभागी रंगासह व इष्ट दिशेला ( ज्या दिशेला दार आहे त्या दिशेला ) भिंत असलेला, सर्व अलंकारांनी युक्त असा पाचवा मंडप सांगतात. ( ४३ )

[ श्लोकार्थ ४२½ मध्यरंगसमोपेतं इष्टदिक् कुड्यसंयुतम् । असा दुरुस्त करून अर्थ दिला आहे. )

चौकोनी व आठ भागांत विभागलेला, ८० खांब असून, त्यांच्यामध्ये चार भागांनी ऊर्ध्वकूट कल्पावे. ( ४४ )

[ या श्लोकानंतर अंशुमत्काश्यपात दोन श्लोक जास्त दिले आहेत. त्यांत सहाव्या मंडपाचे पूर्ण व सातव्या मंडपाचे थोडेसे वर्णन येते. ते श्लोक असे–

चतुर्दिग्द्वारसंयुक्तं मध्यैकांशेन कूटकम् ।<br>
सर्वालङ्कारसंयुक्तं षष्ठमं मण्डपं भवेत् ॥<br>
नवभक्त्या युगाश्रं तु शतपादसमन्वितम् ।<br>
गुणांशकांशविंशाशं तु नीव्रभद्रं चतुश्चतुः ॥



आकृती ४४·६ : ८० खांबी मंडप

चार दारे असलेला, मध्यभागी एक अंशाने कूट असलेला, सर्व अलंकारांसह असा सहावा मण्डप असावा.

चौरस व नऊ भागांत विभागलेला, १०० खांबांचा (चारी दिशांना) चार $\frac{1}{20}$ निर्गमन असलेले भद्र असलेला– ]

चारी दिशांना किंवा इष्ट दिशेला दार असून तीन भाग रुंदीचा किंवा तितकेच (मण्डपाच्या बाहेर) निर्गमन असलेला मुखसोपान (पुढच्या बाजूच्या पायऱ्या) असावा. (४५)

[ 'वासनीव्रसमन्वितम्' च्या ऐवजी 'व्यासदीर्घसमन्वितम्' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

चौकोनी व दहा भागांत विभागलेला असून ११२ खांब असतात. मध्यभागी एक कूट व दिशांना आठ असे नऊ कूट असतात. (४७)

[ 'भान्वाधिकशताङ्घ्रिकम्' अशी दुरुस्ती केली आहे. ]



आकृती ४४·७ : ११२ खांबी मंडप

कूटाच्या वरती एक अंश निर्गमनाचे अंतराल असावे (?). मुखाच्या बाजूंना (उजवी, डावीकडे) पायऱ्या व प्रत्येक दिशेला भद्रासह सर्व अलंकारांनी भूषविलेला असा आठवा मंडप असावा. (४८, ४८½)

चौरस असून ११ भाग केलेला, मध्यभागी कूट दोन भाग, मुखापाशी पायऱ्या, इष्ट दिशांना भद्रासह व तेथेच भिंतीत पाहिजे तितक्या भागांचे दार असून सर्व अलंकारांसह असा नववा मंडप असावा. (४९, ५०½)

चौरस असून १२ भाग केलेला, मध्यभागी कूट दोन अंशाचे, मण्डपाच्या बाहेर एक भाग व्हरांडा असावा. व्हरांड्याच्या रुंदीच्या $\frac{1}{10}$ भाग चारी दिशांना निर्गमन असते. (५१, ५२)

[ श्लोकार्ध ५२ तील स्याच्चतुर्दशी हा शब्द स्याच्चतुर्दिशी असा घेऊन अर्थ केला आहे. ]

६८ ( ? ) खांब अधिष्ठानावर असून सर्वालंकारांनी युक्त दहावा मंडप असावा. ( ५३ )

[ अंशुमत्काश्यपशिल्पात 'आद्यङ्गे'च्या ऐवजी 'मध्यरङ्गे' शब्द आला आहे व ६८ च्या ऐवजी १६८ खांबांचा मंडप असतो असे म्हटले आहे. तेव्हा दोन्हीही पाठांप्रमाणे सुसंगत अर्थ लागत नाही. ]

– – – – – – – मंडपाच्या लांबीचे योग्य तितके भाग करावेत किंवा मण्डप गोलाकार करावा. ( ५४ )

रुंदी तीन भाग व लांबी पाच भाग असावी. एका बाजूला किंवा पुढच्या बाजूला एक अंशाने दार असावे. ( ५५ )

[ येथे चौरस मण्डपाची माहिती अपुरी ठेवून मध्येच आयताकार मंडपाची माहिती सुरू झाली आहे. चौरस मण्डपाची माहिती पुन्हा श्लोक ६७ पासून सुरू झाली आहे. ]

बाजूंना तीस खांबांसह दोन रांगा असाव्यात. वरीलप्रमाणेच खांब एक विभाग सोडून ( सर्व मण्डपाच्या ) चारी बाजूंना आतमध्ये असतात. ( ५६ )

[ 'मण्डपाभ्यन्तरेरस:'च्या ऐवजी 'मण्डपाभ्यन्तरस्य च' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे.]

२८ खांबांवर लुपा असतात. पुढच्या बाजूला २८ खांब एका रांगेत असावेत. ( ५७ )

[ लुपारोहणकं अशी दुरुस्ती केली आहे.]

किंवा २४ खांब असून ते एका रांगेत नसतात. प्रत्येक खांबावर अल्पनासी असावी. वेदी, जालक, तोरण ही (ही) असावीत. निरनिराळ्या कुंभलता वगैरेंनी युक्त असा प्रथम मण्डप असावा. ( ५८, ५८½ )

[ श्लोक ५६ ते ५८½ अंदाजाने गोळाबेरीज अर्थ लावला आहे. ]

चार भाग रुंदी व सहा भाग लांबी असलेल्या मंडपाला एका विभागाने सर्व बाजूंनी कूट असते. मध्यभागी कूट नसते. (रुंदीच्या) दोन भागांपैकी एक भाग मुखभद्र असतो. ( ५९, ६० )

३२ खांब असलेला हा दुसरा मंडप. पाच भाग रुंद व सात भाग लांब असून मध्यभागी तीन व पाच भागांची सभा असते. खांबांच्या पलीकडे सभोवार एक भाग मोकळा असतो. इष्ट दिशेला भद्र असते. ( ६२ )

सर्व अलंकारांसह ४० खांब असलेला तसेच वेदिका वगैरे असलेला असा तिसरा मंडप असतो. ( ६३ )

सहा भाग रुंद व आठ भाग लांब मंडप असून दोन भाग रुंद व चार भाग लांब असा मध्यभागी महोदय ( सभा ) असतो. ( ६४ )

[ महोदयाच्या ऐवजी सभोदय असा शब्द अंशुमत्काश्यपात आहे. ]

मण्डपाच्या भोवती दोन भाग मोकळा असून इष्ट दिशेला मुखभद्र असावा. ६० खांब असलेला हा चवथा मण्डप. ( ६५ )

[ श्लोकार्ध ६४½ त 'अष्टांशमिष्टदीर्घभद्रकम्' या ऐवजी 'अक्षांशमिष्टदिग् मुखभद्रकम्' अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. ]



आकृती ४४.८ : ३२ खांबी आयताकार मंडप

रुंदी सात भाग व लांबी नऊ भाग अशा मण्डपात तीन भाग रुंद व पाच भाग लांब सभांगण असते. ( ६६ )

[ 'भक्त्यायमसमं करम्' या ऐवजी 'भक्त्यायामं सभाङ्कणाम्' असा शब्दसमूह घेऊन अर्थ केला आहे. येथून आयताकार मंडपाची माहिती अपुरीच सोडून परत चौरस मंडपाची माहिती द्यावयास सुरुवात केली आहे. ]

( चौरस ) मण्डपाचे १३ विभाग असतात व एक भागाने कूट असते. इष्ट दिशेला भिंत व चारी दिशांना भद्र असावा. पुढचा भद्र ( मुखभद्र १३ भागांपैकी ) नऊ भाग रुंदीचा असावा. १९२ खांबांचा सर्वालंकारांनी युक्त असा १२ वा मंडप असावा. ( ६७–६८$\frac{1}{2}$ )

चौरस मंडपाचे १५ विभाग असून वरच्या बाजूला व मध्यभागी कूट तीन विभागांचे असतात. मुखभद्र तीन विभागांचा असतो. ( ६९,७० )

इष्ट दिशेला भिंत असून इतर दिशांना खांब असतात. २२४ खांबांचा व सर्व अलंकारांसह असलेला तेरावा मण्डप असतो. ( ७१, ७१$\frac{1}{2}$ )

[ श्लोकार्धं ७१ पञ्चाशद्द्वयं चाधिक्यं द्विशतं चरणान्वितम् असा घेऊन अर्थ केला आहे. ]

चौरस असून १६ विभाग केले असता मध्यभागी कूट दोन विभागांचा असतो. खांब २५२ असतात. मुखभद्र समसंख्येच्या विभागांइतका ( रुंद ) असून इतर दिशांकडील भद्र त्याच्या निम्मे ( विभाग ) रुंदीचे असतात. ( ७२,७३ )



आकृती ४४·९ : ४४ खांबी आयताकार मंडप

सर्व अलंकारांनी युक्त असा हा १४ वा मण्डप होय. अशा रीतीने चौरस मण्डपांचे १४ प्रकार सांगितले. ( ७४ )

सर्व अलंकारांनी युक्त असा चौरस मण्डप मोठ्यांत मोठा ३४ विभागांचा असतो. भिंत किंवा खांब यांनी वेढलेला असा जशी मालकाची इच्छा असेल तसा करावा. सारख्या ( लांबीच्या ) बाजू असलेले ( चौरस ) मण्डप सांगितले. आता असमान लांबीच्या बाजू असलेले ( आयताकार ) मण्डप सांगतो. ( ७५, ७६ )

मंडपाच्या रुंदीहून लांबी एक विभागाने जास्त असावी. रुंदीचे जेवढे भाग होतात त्यात तीन तीन अंगुले मिळवून २७ अंगुलांपर्यंत (रुंदीपेक्षा लांबी जास्त) असे (आयताकार मण्डपाचे) नऊ प्रकार होतात. याहून ( लांबी व रुंदीच्या परस्पर मापांच्याहून ) कमी अथवा जास्त असा मण्डप करू नये असे सांगतात. (७७, ७८)

[ श्लोक ७९ चा अर्थ लागत नाही. ]



आकृती ४४·१० : ६० खांबी आयताकार मंडप

पाहिजे तितक्या विभागांनी मण्डप (भिंतींनी किंवा खांबांनी) वेष्टिलेला असून इष्ट दिशेला भद्र असावे. रुंदीचे तीन भाग करून एक भाग त्या (मण्डपाचा) मुखभद्र असावा. (८०)

७२ खांब असून सर्व अलंकारांसह पाचवा मण्डप असतो. (८१)

[एक ते चार मण्डपांची माहिती श्लोक ५८ ते ६५ पर्यंत आली आहे. 'सप्ताधिक्यद्वयाधिक्यं' च्याऐवजी सप्ततिः स्याद् द्वयाधिक्यं अशी दुरुस्ती केली आहे.]

रुंदी आठ भाग व लांबी दहा भाग (असलेल्या मण्डपाच्या) मध्यभागी दोन व चार भाग (अनुक्रमे रुंद व लांब) उंचवटा (महोदय) असतो. (८२)

एक अंशाने मण्डप ( भिंतींनी किंवा खांबांनी ) वेष्टिलेला असून मध्यभागी खांब नसावा. हे सुव्रता, इष्ट दिशेला चार विभागांपैकी दोन भाग ( रुंदीचे ) मुखभद्र असावे. ( ८३ )

[ इष्टदिग्मुखभद्रांशं असा शब्दसमूह घेऊन अर्थ केला आहे. ]

९६ खांब असलेला व सर्व अलंकारांनी युक्त असा हा सहावा मण्डप शंकरास (शिवालयास) योग्य असतो असे सांगतात. ( ८४ )

नऊ भाग रुंदी व ११ भाग लांबी ( असलेल्या मण्डपाच्या ) मध्यभागी एक भाग रुंद व तीन भाग लांब अशी सभा असावी. ( ८५ )

[ श्लोकार्ध ८४½त नवभक्त्याविशालं तु रुद्रभक्त्यायतान्वितम् अशी दुरुस्ती केली आहे. ]

चार भागांनी वेष्टिलेला असा मण्डप कल्पावा. चार भागांपैकी तीन भाग रुंद मुखभद्र असावा. सर्व अलंकारांनी युक्त आठवा ( सातवा ? ) मण्डप असावा. ( ८६, ८६½ )

पाहिजे त्या दिशेला सुंदर अंगण असावे. ( मण्डप पाहिजे असल्यास भिंतींनी ) वेष्टिलेला असावा. ( ८७ )

[ रङ्कु हा शब्द अङ्कणं असा बदलून अर्थ केला आहे. ]

असे हे आयताकृती मण्डपाचे १४ प्रकार जाणावेत. ( ८७½ )

[ सातच प्रकार दिले आहेत. अंशुमत्काश्यपाप्रमाणे खालीलप्रमाणे १४ प्रकार होतात.

| क्रमांक | विभाग (रुंदी × लांबी) | मधल्या सभेचे विभाग | खांबांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | ३×५ | — | २४ |
| २ | ४×६ | — | ३२ |
| ३ | ५×७ | ३×५ | ४० |
| ४ | ६×८ | २×४ | ६० |
| ५ | ७×९ | ३×५ | ७२ |
| ६ | ८×१० | २×४ | ९६ |
| ७ | ९×११ | १×३ | — |
| ८ | १०×१२ | २×४ | — |
| ९ | ११×१३ | ३×५ | — |
| १० | १२×१४ | ४×६ | — |
| ११ | १३×१५ | ३×५ | — |
| १२ | १४×१६ | २×४ | — |
| १३ | १५×१७ | ३×५ | — |
| १४ | १६×१८ | ४×६ | — ] |

सर्व प्रकारच्या भिंतींची रुंदी अंगणाच्या तीन, चार, पाच, सहा किंवा सात ( भाग ? ) अशी पाच प्रकारची असते. किंवा ती खांबाच्या लांबीइतकी ( रुंदीइतकी ? ) किंवा लाकडी खांबाइतकी असावी. ( ८८, ८९ )

सर्व ( मंडपाचे ) मुखभद्र मण्डपाच्या आकाराचे असावे. त्यांच्या बाजूंना हत्तीच्या सोंडेनी भूषविलेल्या पायऱ्या असाव्यात. ( पायऱ्यांची ) रुंदी पाच, सहा, सात, आठ किंवा नऊ दण्ड असावी. हत्तीच्या सोंडेची ( कठड्यांची ) उंची सवा किंवा दीड दण्ड असावी. ( ९१ )

[ श्लोक ९२ फार अशुद्ध असल्याने अर्थ केला नाही. ]

मुळापासून अग्रापर्यंत रुंदी ½ भागाने क्रमाक्रमाने कमी करावी. हे विप्रा, हत्तीच्या सोंडांमधील अंतर सम किंवा विषम मापाने आठ प्रकारचे असते. ( ९३ )

( हत्तीच्या सोंडेची ) रुंदी एक दण्ड, सवा दण्ड किंवा दीड दण्ड किंवा दोन अथवा तीन दण्ड असते. (९४)

[ श्लोक ९५ अशुद्ध असल्याने अर्थ लागत नाही. ]

प्रथम ( दोन्ही पाय ) एकाच पातळीवर आहेत असे उभे राहून पहिल्यांदा डावा पाय पुढे करून पायऱ्या चढाव्यात असा मानवांच्या बाबतीत विधी आहे. ( ९६ )

असा मण्डप सांगितला, हे सुव्रता, गोपुर ऐक. ( ९७ )

**काश्यपशिल्पातील मण्डपलक्षण हे चव्वेचाळिसावे पटल संपले.**

## पंचेचाळिसावे पटल

### [ गोपुरांचे लक्षण ]

आता विशेषतः गोपुरांचे लक्षण सांगतो. अंतर्मण्डल, शाला इत्यादींची माहिती अनुक्रमे सांगतो. ( १ )

द्वारशोभा, द्वारशाला, द्वारप्रासाद, द्वारहर्म्य ( व ) द्वारगोपुर अशी क्रमानें त्यांची नावे आहेत. ( २ )

[ अंतर्मण्डलापाशी, सर्वांत आतली भिंत (प्राकार) द्वारशोभा नावाचे गोपुर बांधतात व तसेच अनुक्रमाने अंतर्हारापाशी द्वारशाला, मध्यहारापाशी द्वारप्रासाद, मर्यादेपाशी द्वारहर्म्य व महा-मर्यादेपाशी असलेल्या गोपुराला द्वारगोपुर म्हणतात. ]

द्वारशोभा एक, दोन किंवा तीनमजली कल्पावी. दुसऱ्या प्राकारातील द्वारशाला दोन, तीन किंवा चारमजली असावी. तीन, चार किंवा पाच मजल्यांचा द्वारप्रासाद बांधावा. ( ३,४ )

चार, पाचमजली किंवा सहामजली द्वारहर्म्यक असावे. पाच, सहा किंवा सातमजली द्वारगोपुर असावे. ( ५ )

किंवा सर्व प्राकारांना एक, दोन किंवा तीनमजली गोपुर असावे. गोपुरांना उपपीठासह किंवा उपपीठाशिवाय अधिष्ठान असावे. ( ६ )

त्या गोपुरांचे एकंदर ४५ प्रकार आहेत. ते मी तुला सांगतो.

मूळ प्रासादाच्या रुंदीचे सात, आठ, नऊ, दहा (आणि) ११ भाग केले असता त्यातील एक अंश कमी इतकी अनुक्रमे द्वारशोभा इत्यादी गोपुरांची रुंदी सांगतात. ( ७,८ )



आकृती ४५·१ : गोपुर

(मूळ देवालयाची रुंदी 'क्ष' असल्यास, देवालयाच्या जवळच्या प्राकारातील द्वारशोभा प्रकारच्या गोपुराची रुंदी ६/७ क्ष असते. त्याचप्रमाणे द्वारशाला, द्वारप्रासाद, द्वारहर्म्य व द्वारगोपुर यांची रुंदी अनुक्रमे ७/८ क्ष, ८/९ क्ष, ९/१० क्ष व १०/११ क्ष असते.)

विकल्प व आभास (प्रकारच्या मूळ) प्रासादांच्या गोपुरांचे हे (माप) सांगितले. (८ १/२)

मूळ प्रासादाच्या रुंदीचे चार, पाच, सहा, सात (व) आठ (भाग करून) एक अंशाने कमी इतकी छन्दहर्म्याच्या द्वारशोभा (इत्यादींची अनुक्रमे) रुंदी असावी. (९½, १०½)

मूळ प्रासादाच्या (रुंदीच्या) तीन भागांपैकी एक भाग, एक भागापैकी अर्धा अंश, तीन भागांपैकी दोन भाग, चार अंशांपैकी तीन अंश आणि त्याचप्रमाणे पाच भागांपैकी चार अंश (रुंदी द्वारशोभा इत्यादींची अनुक्रमे) जातिहर्म्याच्या बाबतीत असते. ( १०–११½ )

अशा रीतीने मूळ प्रासादाच्या मापाने (द्वारशोभा ते द्वारगोपुर यांचे माप) कल्पावे; आता त्यांचे माप (हातांच्या मापाने) सांगतो. ( १२ )

दोन हातांपासून १६ हातांपर्यंत, एक हाताने वाढवून (द्वार) शोभेपासून गोपुरापर्यंत प्रत्येकाची तीन तीन मापे होतात. ( १३ )

विकल्प व आभासांसाठी ( या प्रकारच्या प्रासादांसाठी ) हे माप आहे. छन्दहर्म्यासाठी तीन हातांनी सुरुवात करून एक हातानी वाढवीत १७ हातांपर्यंत शोभादी (गोपुरांचे) तीन तीन मापे होतात. ( १४, १४½ )

जातिहर्म्यासाठी चार हातांपासून सुरुवात करून ( एक हाताने वाढवीत ) १८ हातांपर्यंत शोभादींची अनुक्रमे रुंदी असावी. ( १५, १५½ )

[

| मूळ प्रासादाचा प्रकार | विकल्प व आभास | | | छन्द | | | जाति | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रकार | १ | २ | ३ | १ | २ | ३ | १ | २ | ३ |
| | गोपुराची रुंदी (हात) | | | | | | | | |
| द्वारशोभा | २ | ३ | ४ | ३ | ४ | ५ | ४ | ५ | ६ |
| द्वारशाला | ५ | ६ | ७ | ६ | ७ | ८ | ७ | ८ | ९ |
| द्वारप्रासाद | ८ | ९ | १० | ९ | १० | ११ | १० | ११ | १२ |
| द्वारहर्म्य | ११ | १२ | १३ | १२ | १३ | १४ | १३ | १४ | १५ |
| द्वारगोपुर | १४ | १५ | १६ | १५ | १६ | १७ | १६ | १७ | १८ |

]

प्रत्येकी तीन तीन प्रकार पाच तऱ्हेच्या गोपुरांचे असे ४५ प्रकार असतात. ( १६ )

लहान हर्म्याच्या (द्वारशोभेपासून द्वारगोपुरापर्यंत) क्रमाने हातांच्या (मापाने) रुंदी (सांगितली). त्या त्या प्रकारच्या ( विकल्प ते जातिप्रकारच्या मूळ प्रासादाच्या द्वारशोभा ते द्वार-गोपुर यांचे माप) सांगितल्याप्रमाणे घ्यावे, त्याहून निराळे घेतल्यास ते विपत्तिकारक होते. ( १७ )

किंवा तीन, चार (व) पाच; सहा, सात व (आठ, ); नऊ हात, १० (व) ११ हात असे कनिष्ठ प्रकारचे तीन तीन प्रकार होतात. ( १८ )

सर्व हर्म्यांसाठी (प्रासादांसाठी) त्याचप्रमाणे प्राकारांसाठी जशी इच्छा असेल तशी (गोपुरांची) रुंदी कल्पावी. श्रेष्ठ प्रासादाला श्रेष्ठ प्रकारची व मध्यम प्रासादाला (श्रेष्ठ व कनिष्ठ) यांमधील प्रकारची गोपुरे असावीत. ( १९ )

क्षुद्र व लहान प्रासादांसाठी जे कनिष्ठ तीन प्रकार सांगितले आहेत ते सर्व ( प्रकारच्या ) प्राकारांसाठी असावेत किंवा जशी तेथली प्रथा असेल तसे करावेत. ( २० )

किंवा दुसऱ्या प्रकारची द्वारशोभादींची रुंदी सांगतो. पाच हातांनी सुरुवात करून दोन दोन हातांनी वाढ केली असता तेरा हातांपर्यंत (द्वार) शोभेची रुंदी कल्पावी. ( २१, २१½ )

२५ हातांपासून सुरुवात करून ( दोन दोन हातांनी वाढ करून ) ३३ हातांपर्यंत द्वारप्रासादाच्या रुंदीचे पाच प्रकार सांगितले आहेत. ( २२, २२½ )

३५ हातांपासून सुरुवात करून ( दोन हातांनी वाढ करून ) ४३ हातांपर्यंत द्वारहर्म्याच्या रुंदीचे पाच प्रकार सांगितले आहेत. ( २३, २३½ )

४५ हातांपासून, दोन हातांनी वाढ करून, ५३ हातांपर्यंत शेवटच्या गोपुराचे पाच प्रकार होतात. ( २४, २४½ )

[ द्वारशालेचे माप दिलेले नाही. ते बहुधा १५ हातांनी सुरुवात करून दोन हातांनी वाढ करून, २३ हातांपर्यंत असावे. ]

दाराची रुंदी सांगितली. नंतर ( त्याची ) लांबी ऐक. ( रुंदीच्या ) सवा, दीड, पावणेदोन, दोन किंवा १⅓ किंवा १⅔ ( इतकी ) लांबी असावी. ( २५, २६ )

द्वारशोभेपासून द्वारगोपुरापर्यंत ( वर दिल्यापैकी ) योग्य त्या ( प्रमाणात ) लांबी ठेवावी. त्यामध्ये जे विशेष आहे त्याचे नवे वैशिष्टय ऐक. ( २७ )

विशेषतः दोन हात मापाची रुंदी धरून, लांबी पूर्वी सांगितली आहे त्या प्रमाणात घेऊन योग्य ती लांबी मिळवावी. ( २८ )

[ श्लोक १५½ खालील तक्ता पाहा. त्यात क्षुद्रहर्म्याच्या द्वारशोभादींचे रुंदीचे जे माप दिले आहे त्यापासून श्लोक २६ त दिल्याप्रमाणे पाहिजे त्या मापाने लांबी मिळवावी. ]

वर दिलेल्या हाताच्या किंवा छन्द इत्यादी ( प्रकारच्या ) मूळ प्रासादाच्या रुंदीच्या मापाच्या प्रमाणाने ( द्वार ) शोभा इत्यादींची लांबी ठरवावी. ( २९ )

रुंदी व लांबी सांगितली ( आता ) त्यांची उंची सांगतो. ( ३० )

रुंदी सात भागांत विभागून ( द्वार ) शोभेची उंची ११ भाग ( असावी. ) रुंदीच्या दीडपट द्वारशालेची उंची असावी. ( ३१ )

( रुंदी ) सात भाग ( असताना ) ११ अंश किंवा १२ अंश तिसऱ्याची ( द्वारप्रासादाची ) उंची असावी. रुंदीचे नऊ भाग करून १४ भाग चवथ्याची ( द्वारहर्म्याची ) उंची असावी. ( ३२ )

महागोपुराची उंची रुंदीच्या दुप्पट सांगतात. उंचीचे माप होमापासून स्तूपीपर्यंत धरतात. ( ३३ )

( गोपुराची ) रुंदी व लांबी यांचे माप दाखविणाऱ्या सूत्रास 'प्राग्बाह्य' म्हणतात. त्या-(सूत्रा) च्या बाहेर कूट, कोष्ठ वगैरेंचे निर्गमन प्रासादाप्रमाणे असावे. ( ३४ )

रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग किंवा चार भागांपैकी एक भाग किंवा पाच भागांपैकी तीन भाग प्राग्बाह्याच्या बाहेर ( कूटकोष्ठांचे ) निर्गमन असावे. ( ३५ )

१½ हातांपासून सुरुवात करून सहा सहा अंगुलांनी वाढवीत, पाच हातांपर्यंत क्षुद्र ( हर्म्याच्या द्वारशोभादींच्या ) दाराची रुंदी असते. ( ३६ )



आकृती ४४·११ : मंडपातील रंगस्थानातील वितान

( ४५. ३७–४९ )

लहान (प्रासादांसाठी दाराचे) असे (माप) सांगितले. नंतर मानवांसाठी (माप सांगतो ते) ऐक. तीन हातांनी सुरुवात करून, सहा अंगुलांनी वाढवीत सात हातांपर्यंत दाराची रुंदी सांगितली आहे. (३७, ३७½)

चार हातांनी सुरुवात करून, सहा अंगुलांनी वाढवीत, १५ हातांपर्यंत मोठ्या दाराची रुंदी असावी. (३८, ३८½)

(दाराची) रुंदी सात अंश (१७ अंश ?) असेल तर (दाराची उंची) २० अंश किंवा (रुंदी) सात अंश तर उंची १० अंश किंवा (दाराची उंची त्याच्या रुंदीच्या) दीडपट, पावणेदोन-पट, दुप्पट, १½ पट किंवा सवापट असे दाराच्या उंचीचे (त्याच्या रुंदीच्या मानाने) सात प्रकार आहेत. (३९,४०)

लिंगाचे मधले मध्यम उंचीचे दार सांगतो. १३ आणि पाच यामध्ये विशेषतः नऊ अंश असते. (४१)

लिंगमध्याच्या डाव्या बाजूला (वर दिलेल्या प्रमाणात) दाराचा मध्य ठेवावा. द्वारशोभे-पासून गोपुरापर्यंत दाराच्या मध्याचे (स्थान) अनुक्रमाने सांगितले. (४२)

[लिंगमध्याच्या डावीकडे द्वारशोभेच्या दाराचा मध्य पाच भाग, द्वारशालेचा सात भाग, द्वारप्रासादाचा, मधल्या दाराचा, मध्य ९ भाग व हर्म्य आणि गोपुर यांच्या दाराचा मध्यभाग अनुक्रमे ११ व १३ असावा. श्लोक ४४ मूळ विभागांसाठी पहावा.]

गोपुराच्या लांबीच्या मध्यापासून दोन्ही बाजूंना सारखे खांब असावेत. दाराची जोडणी व कवाडे, दाराची जी लक्षणे सांगितली आहेत त्याप्रमाणे करावीत. (४३)

[दाराची माहिती पटल १७ मध्ये दिली आहे.]

१५ पासून सुरुवात करून १९ पर्यंत इतके विभाग रुंदीचे करावेत. अशा ३ विभाग पाडलेल्या रुंदीची अशी अशी रचना कल्पावी. (४४)

[द्वारशोभेच्या रुंदीचे १५ भाग करून त्यांतील पाच भाग, म्हणजेच दहा व पाच भाग यांचा मध्य, लिंगमध्याच्या डाव्या बाजूला येईल असा द्वारशोभेचा मध्य योजावा. याचप्रमाणे अनु-क्रमाने द्वारगोपुराच्या दाराचा मध्य ठरवावा.]

............................ (गोपुराच्या) रुंदीच्या पाच भागांपैकी तीन अंश गर्भगृह असते. (४५)

[श्लोकार्ध ४४½ अशुद्ध असल्याने त्याचा अर्थ लागत नाही.]

हे श्रेष्ठ ब्राह्मणा, एकमजली (द्वारशोभेच्या) भिंतींची रुंदी उरलेल्या अंशाइतकी (एक अंश) असावी. भिंतीची (ही) रुंदी या मापाने चहूबाजूंना असावी. (४६)

असे एकमजली (गोपुर) सांगितले, तसेच दोनमजली (गोपुर) सांगतो. रुंदीचे पाच भाग करावेत व लांबीचेही तेवढेच भाग करावेत. (४७)

दोन अंश गर्भगृह व दीड अंश भिंतीची रुंदी असावी. कर्णकूट एक अंश व शालेची रुंदी व लांबी व हारान्तराची रुंदी (प्रत्येकी) एक अंश असावी. पाच विभाग केलेल्या लांबीत शालेची लांबी एक अंश असावी. (४८, ४९)

[गोपुर आयताकृती असल्याने लांबी व रुंदीचे प्रत्येकी पाच विभाग केल्यावर लांबीच्या व रुंदीच्या विभागांचे माप वेगळे असेल म्हणून शालेची रुंदी रुंदीच्या पाच विभागांपैकी एक भाग व लांबी लांबीच्या पाच भागांपैकी एक भाग असे स्पष्ट केले आहे.]

हारान्तर व कूट (प्रत्येकी) एक अंशाचे असावे. कूटाच्या लांबीइतकीच हारान्तराची लांबी असते. (५०)

[वरील श्लोक ४८, ४९ वरील टीका पाहा.]

हारान्तराच्या निम्म्या प्रमाणात भद्र किंवा भद्रपंजर असावा. असे दोनमजली (गोपुर) सांगितले. आता तीनमजली गोपुर सांगतो. (५१)

तळमजल्याच्या रुंदीचे व लांबीचे नऊ भाग असावेत. गर्भगृह तीन अंशांनी असावे व भिंत एक अंशाची असावी. (५२)

अलिन्द्र एक भागाने व हाराची रुंदी एक अंश, कर्णकूट एक अंशाने, शालेची रुंदी तीन अंश (असावी.) (५३)

पंजर एक अंश सांगतात. हारान्तर अर्धा अंश असा पहिला मजला कल्पावा व दुसरा मजला पूर्वीप्रमाणेच असावा. (५४)

किंवा, हे सुव्रता, निराळ्या प्रकाराने तीनमजली (गोपुर) ऐक. रुंदीचे नऊ भाग व लांबीचे ११ अंश करावेत. (५५)

गर्भगृह तीन अंश व भिंत एक अंश सांगतात. तिसऱ्या मजल्याची ही माहिती. हार एका भागाने कल्पावा. (५६)

गर्भगृहाभोवती अलिन्द्र किंवा भिंत एक अंशाची (असावी.) लांबीच्या $\frac{1}{4}$ कोष्ठाची लांबी असावी. (५७)

उरलेले पूर्वीप्रमाणेच असावे. दुसरा (मजला) दुसरा मजला सांगितला त्याप्रमाणे (असावा.) तीनमजली गोपुर असे सांगितले, चारमजली (गोपुर) आता सांगतो. (५८)

रुंदीचे १० भाग केले असता व लांबीचे तेवढेच विभाग केले असता, गर्भगृह तीन भाग व भिंतीची रुंदी दीड अंश असावी. (५९)

अलिन्द्र एक भागाने आणि हाराची रुंदी तितकीच (एक भाग असावी.) पंजर व कर्णकूट एकेका अंशाने कल्पावेत. (६०)

कूटाची रुंदीइतकीच लांबी असते. उरलेली लांबी हारान्तर असते. शालेची लांबी चार अंश व अर्धा अंश हारान्तर (असावे.) (६१)

तळमजला असा सांगितला, वरील मजले (दुसरा व तिसरा) पूर्वीप्रमाणेच (असावेत.) (चौथ्या मजल्याच्या) रुंदीचे १० भाग व लांबीचे १२ भाग करावेत. पूर्व-पश्चिम बाजूंना शाला पाच भागांनी कल्पावी. उरलेले पूर्वी सांगितल्याप्रमाणे असावे. हा चवथा मजला (सांगितला.) (६२, ६३)

रुंदीचे ११ भाग करावेत व लांबीचेही तेवढेच विभाग पाडावेत. पूर्वेकडे, पश्चिमेकडे व दोन्ही बाजूंना पाच अंश लांबीची शाला (असावी.) (६४)

पंजराची रुंदी एक अंश, कूटाची रुंदी एक अंश, त्याचप्रमाणे हारान्तर अर्धा अंश अशा रीतीने पहिला मजला कल्पावा. ( ६५ )

त्याच्या वरील सर्व मजले पूर्वीप्रमाणेच करावेत. रुंदीचे ११ भाग व लांबीचे १३ भाग करून- ( ६६ )

गर्भगृह तीन अंश आणि ( त्याची ) रुंदी दोन भाग असावी. अलिन्द्र एक भाग कल्पून हार एक भागाचा असावा. ( ६७ )

दोन्ही बाजूंना चार अंश शाला व पुढे व मागच्या बाजूंना सहा अंश ( शाला असाव्यात. ) हारान्तर एक अंश, व्योमपंजर, कूट ही ( एक अंश असावीत. ) उरलेले पूर्वी सांगितल्याप्रमाणे करावे. असे हे सहामजली गोपुर असते. ( ६८, ६८½ )

रुंदी १३ भागांत व लांबी तितक्याच भागांत विभागून, गर्भगृह पाच अंश, भिंत दोन भागाने, अलिन्द्र एक अंशाने, खण्डहर्म्य एक अंश ( असावा. ) ( ६९, ७० )

कोष्ठाची लांबी तीन अंश, पंजर सहा अंश ( व ) कूट एक अंशाने करावा. हारान्तर तितकेच ( एक अंश ) असावे. ( ७१ )

किंवा रुंदी १० भाग व लांबी १५ अंशांत विभगावी. प्रत्येक मुखापाशी सात अंशांची महाशाला योजावी. ( ७२ )

दोन्ही बाजूंना असलेल्या दोन कोष्ठांची लांबी पाच भागांची असते. उरलेले पूर्वी सांगितल्याप्रमाणे सर्व अलंकारांसह करावे. ( ७३ )

सात मजल्यांचे ( गोपुर ) सांगितले. हे महागोपुर असावे. अलिन्द्रासह किंवा अलिन्द्राशिवाय, हे कल्पवित्तमा, गोपुर असावे. (७४)

जर अलिन्द्राशिवाय गोपुर असेल तर गर्मगृहामोवती जी भिंत असते तीत हे ब्राह्मणश्रेष्ठा, अलिन्द्राचा भाग सामावून घ्यावा. ( ७५ )

तळमजला असा सांगितला. वरील ( मजले ) सहामजली ( गोपुरा– ) प्रमाणे असावेत सातमजली ( गोपुर ) सांगितले. आता त्यांची मोजदाद ( त्यांचे अवयवांचे विभाग ) सांगतो. ( ७६ )

मूळ प्रासादाच्या मुळापाशी ( तळमजल्याचा ) खांब व अधिष्ठान यांची जी उंची तिचे चार, पाच, सहा अंश किंवा सात, आठ, नऊ किंवा १० अथवा ११ भागांपैकी एक अंश ( उंचीचे ) उपपीठ करावे. ( ७७, ७७½ )

किंवा हाताच्या मापाने जे दाराचे योग्य माप सांगितले आहे त्याच्या उंचीचे चार, पाच, सहा, सात, आठ किंवा नऊ किंवा ११ भाग करून, विशेषतः एका भागाने ( उपपीठाची उंची असावी). ( ७८, ७९ )

उपपीठाची उंची सांगितली. त्यातून उरलेल्या उंचीचे तीन भाग करून त्याच्या एक अंशाने अधिष्ठानाची व दोन भागांनी खांबांची उंची असते. ( ८० )

होमापासून उत्तरेच्या सीमेपर्यंत दाराचे माप असते. द्वारशोभा इत्यादींसाठी पादबन्ध ( प्रकारचे ) अधिष्ठान करावे. ( ८१ )

उत्तराच्या वरपासून स्तूपीपर्यंतची ( उंची ) सहा भागांत विभागून प्रस्तराची उंची सवा अंश, गलाचे माप एक अंश, ( ८२ )

२$\frac{३}{४}$ भाग शीर्ष व उरलेले ( एक अंश ) स्तूपीची उंची असावी. असे एकमजली ( गोपुराचे माप ) सांगितले. हे सुव्रता, दोनमजली ( गोपुर ) ऐक. ( ८३ )

उत्तरापासून स्तूपीपर्यंत ( उंची ) नऊ भागांत विभागून प्रस्तर सवा अंश, खांबाची उंची दोन भाग, ( ८४ )

मंचाचे माप एक अंश, कंधराची उंची तितकीच असावी. शिखर ५$\frac{१}{२}$ अंश व स्तूपीची उंची १$\frac{१}{४}$ अंश असावी. ( ८५ )

[ एकंदर १२ विभाग होतात. शिखराची उंची २$\frac{१}{२}$ अंश घेतली तर नऊ भागांचा हिशोब बरोबर लागतो. ]

दोनमजली ( गोपुर ) असे सांगितले. आता तीनमजली ( गोपुर ) ऐक. उत्तर ते स्तूपी-पर्यंत ( उंची ) १२ भागांत विभागली असता, ( ८६ )

प्रस्तराची उंची सवा (अंश ), खांबाची उंची २$\frac{१}{२}$ अंश, प्रस्तर एक भागाने, खांबाची उंची दोन भाग, ( ८७ )

मंचाचे माप एक अंश असावे. एक अंश ग्रीवेची ( कंठाची ) उंची असावी. शिखर दोन अंश जाणावे. स्तूपीचे माप एक अंश ( असावे ). ( ८८ )

[ एकंदर विभाग ११$\frac{३}{४}$ होतात. शिखराची उंची २$\frac{१}{४}$ भाग घेतल्यास बारा विभाग होतात. ]

तीन मजली ( गोपुर ) असे सांगितले. चार मजली ( गोपुर ) आता सांगतो. उत्तरापासून स्तूपीपर्यंत १८ अंशांत विभाग केले असता, ( ८९ )

मंचाची उंची १$\frac{३}{४}$ अंश, खांबाची उंची तीन अंश, त्याच्या निम्मे प्रस्तराची उंची (१$\frac{१}{२}$ अंश), खांबाची उंची २$\frac{१}{२}$ अंश, ( ९० )

त्याच्या निम्मे प्रस्तराची उंची ( १$\frac{१}{४}$ अंश ), खांबाची उंची दोन अंश, त्याच्या निम्मे ( एक अंश ) मंचाचे माप असावे. गलाचे माप दीड अंश, ( ९१ )

शिखराची उंची २$\frac{१}{२}$ अंश, स्तूपीचे माप एक अंश ( असावे. ) चारमजली ( गोपुर ) सांगि-तले, आता पाचमजली ( गोपुर ) ऐक. ( ९२ )

स्तूपीच्या अग्रापासून उत्तरापर्यंत २३ भाग केले असता प्रस्तराची उंची दोन भाग, खांबाची उंची २$\frac{१}{२}$ अंश, त्याच्या निम्मे मंचाचे माप ( १$\frac{१}{४}$ अंश ) असावे. खांबाची उंची तीन अंश, त्याच्या निम्मे ( १$\frac{१}{२}$ अंश ) प्रस्तराची उंची. खांबाची उंची २$\frac{१}{२}$ भाग, ( ९३, ९४ )

त्याच्या निम्मे ( १$\frac{१}{४}$ अंश ) मंचाचे माप, खांबाची उंची दोन भाग, प्रस्तराची उंची एक अंशाची व कंधराची उंची तेवढीच ( एक भाग ) असावी. ( ९५ )

शिखराची उंची २$\frac{१}{२}$ ( तीन ? ) अंश, स्तूपीचे माप एक अंश ( असावे ). पाचमजली गोपुर सांगितले. आता सहामजली ( गोपुर ) ऐक. ( ९६ )

[ २१$\frac{१}{२}$ विभाग होतात. श्लोक ९३ मधील खांबांची उंची ३$\frac{१}{२}$ व मंचाची उंची १$\frac{३}{४}$ भाग घेतली तर २३ भागांचा हिशोब पुरा होतो. ]

उत्तरापासून स्तूपीपर्यंत २९ अंश केले असता दोन भाग प्रस्तराची उंची, खांबाची उंची चार अंश ( ९७ )

मंच १$\frac{३}{४}$ भाग, (उरलेल्या) मजल्यांचे माप सामान्यतः एकच (वर दिल्याप्रमाणे असते.) खांबाची उंची साडेतीन अंश व त्याच्या निम्मे प्रस्तराची उंची असते. ( ९८ )

स्तूपीचे माप एक अंश असावे. सहामजली ( गोपुर ) सांगितले. आता सातमजली ( गोपुर ) ऐक. उत्तरापासून स्तूपीचे ३६ अंश केले असता ( ९९ )

मंचाची उंची २$\frac{१}{२}$ भाग, खांब ४$\frac{१}{२}$ अंश, दोन भाग प्रस्तराची उंची, खांबाची उंची चार अंश, ( १०० )

मंच १$\frac{३}{४}$ अंश असावा. खांबाचे माप ३$\frac{१}{२}$ अंश, मंचाची उंची १$\frac{३}{४}$ अंश, खांबाचे माप तीन अंश, ( १०१ )

त्याच्या निम्मे प्रस्तराची उंची ( १$\frac{१}{२}$ अंश ), खांबाची उंची २$\frac{१}{२}$ ( भाग ), त्याच्या निम्मे ( १$\frac{१}{४}$ भाग) मंचाचे माप, खांबाची उंची दोन भाग, ( १०२ )

प्रस्तर एक भागाने, गलाचे माप एक अंश, शिखर २$\frac{३}{४}$ भाग व उरलेले भाग (एक अंश) स्तूपीची उंची असते. ( १०३ )

सातमजली ( गोपुर ) सांगितले. आता अलंकार सांगतो. मण्डपाप्रमाणे हे ब्राह्मणश्रेष्ठा, द्वारशोभा करावी. ( १०४ )

दण्डाप्रमाणे द्वारशाला असावी. द्वारप्रासाद सदनाच्या आकाराप्रमाणे असावा. हे ब्राह्मण-श्रेष्ठा, द्वारहर्म्य मालिकाकार करावे. ( १०५ )

द्वारगोपुर शालेच्या आकाराप्रमाणे करावे. किंवा हे कल्पवित्तमा, (द्वारशालेपासून) द्वार-गोपुरापर्यंत ( सर्व गोपुरे ) शालेच्या आकाराप्रमाणे कल्पावीत. ( १०६ )

त्यांच्यामध्ये प्रथम, ब्राह्मणश्रेष्ठा, मी द्वारशोभा सांगतो. (द्वारशोभा) एक, दोन किंवा तीनमजली व सर्व अलंकारांसह असते. (१०७)

प्रत्येक मुखापाशी महानासी असून दोन्ही बाजूंना वंशनासीका असतात. स्वस्तिकाकृती लहान नासिका वर सांगितलेल्या रीतीप्रमाणे, हे ब्राह्मणा, खूप असाव्यात. ( १०८ )

दोन स्तूपींसह किंवा लुपाकार ( छप्पराप्रमाणे) शिखर असावे. किंवा मण्डपाप्रमाणे (शिखर असावे.) त्या (गोपुराला) 'श्रीकान्त' म्हणतात. ( १०९ )

शीर्ष शालेच्या आकाराप्रमाणे असून तेथे पुढे मुखापाशी व मागील बाजूस सहा नासी असाव्यात. दोन्ही बाजूंना पुष्कळ वंशनासी असून दोन स्तूपी असाव्यात. ( ११० )

आतमध्ये खांब व उत्तर असलेल्या त्याला ( द्वारशोभा गोपुराला ) 'अतिक्रान्त' म्हणतात. (११०$\frac{१}{२}$)

प्रत्येक मुखापाशी सहा नासी व दोन्ही बाजूंना पार्श्वनासिका असतात. शिखर सभाकार असते. त्याला 'स्कन्दकान्त' किंवा 'विजय' म्हणतात. ( १११, १११$\frac{१}{२}$ )

अशी नेहमी तीन प्रकारांनी द्वारशोभेची कल्पना करावी. ( ११२ )

प्रत्येक मुखापाशी चौरस व अर्धकोटि आकाराच्या महानासी असतात. त्याचप्रमाणे दोन्ही बाजूंनादेखील (महानासी असतात.) तिच्या (महानासीच्या) आकाराचा पंजर असावा. (११३)

[कोटि म्हणजे धनुष्य, अर्धकोटि म्हणजे अर्ध्या धनुष्याप्रमाणे वक्र आकार.]

शीर्ष शालाकार असून विषम (तीन) संख्यांच्या स्तूपींसह विशाल असलेल्या या द्वारशालेला 'विशालालय' म्हणतात. (११४)

अर्धकोटि व हजार अंगे असलेल्या भद्रनासिका दोन्ही बाजूंना (असाव्यात.) दोन्ही बाजूंना वंशनासी असून विषम (तीन) स्तूपींसह असावे. अल्पनासी प्रत्येक खांबावर असते. सर्व अवयवांनी युक्त अशा (या द्वारशालेला) विशेषतः 'विप्रतीकान्तालंकार' म्हणतात. (११५, ११६)

पूर्वीप्रमाणे (परंतु) मजल्यांवर चारी दिशांना भद्र असावेत. चार महानासी असलेले, शीर्षापाशी भद्रासह, आतमध्ये खांब व उत्तर यांच्यासह असलेले व विषम (तीन) स्तूपिकांसह असा द्वारशालेचा हा तिसरा प्रकार सांगितला. द्वारप्रासाद सांगतो. (११७, ११८)

आतमध्ये खांब व उत्तर असलेले, मंडप इत्यादींनी अलंकारलेले असून दाराच्या ठिकाणी दाराच्या सर्व अंगांसहित भद्रासह दार असते. (११९)

शालेच्या पूर्वेकडे व पश्चिमेकडे भद्रासह भद्रनासिका (असावी). निरनिराळ्या प्रकारांचे अधिष्ठान, खांब, वेदिका, जालतोरण (असावीत.) (१२०)

आतमध्ये खांब व उत्तर असून मध्यभागी तोरण असते. दोन्ही बाजूंना दण्डाप्रमाणे मुख असून क्षुद्रनासींनी अलंकारिलेला असतो. (१२१)

शिखर शालाकार असून जाळी वगैरेंनी भूषविलेला असा हा 'केशाविशालालंकार' होतो. मजल्यांवर वर दिल्याप्रमाणे, दोन्ही बाजूंना (तसेच) पुढच्या व मागच्या मुखांपाशी चार महानासी असतात. विषम (तीन) स्तूपींसह द्वारप्रासाद असतो. (१२२, १२३)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, मी द्वारहर्म्याचे लक्षण सांगतो. मजल्यांवरती पूर्वी सांगितल्याप्रमाणे (अलंकार) करावेत. (१२४)

सभेप्रमाणे शीर्ष असून स्वस्तिकाच्या आकृतीप्रमाणे नासिका असतात. खांब व उत्तर यांच्यासह सम (किंवा विषम) स्तूपी असतात. (१२५)

कूटाचे शिखर नासीसह असून त्या नासीला विषम संख्येच्या स्तूपी असतात. कूट वगैरे मजल्यांचे (अलंकार) पूर्वीप्रमाणेच कल्पावेत. (१२६)

पुढे व मागे नासी असून रुंदीच्या दोन अंश त्यांचे निर्गमन असावे. शिखर शालाकार असून स्तूपिका अष्टकोनी असावी. (१२७)

शालेच्या निर्गमनासह, निरनिराळ्या अलंकारांसहित, निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान, खांब तसेच उपपीठ असावेत. (१२८)

द्वारहर्म्याचे तीन प्रकार सांगितले. (आता द्वार-) गोपुराचे लक्षण ऐक. चारी दिशांना भद्र असलेले, आतमध्ये खांब व उत्तर यांच्यासह- (१२९)

शालेच्या आकाराप्रमाणे शिखर असलेले, प्रत्येक मुखापाशी महानासी असलेले, दोन्ही बाजूंना महानासी असून प्रत्येक खांबाला अल्पनासी असलेले- (१३०)

(द्वारगोपुर) 'मात्रादण्ड' म्हणून प्रसिद्ध आहे. आता 'श्रीविशाल' ऐक. पूर्वीप्रमाणेच मजल्यांचे विभाग असून तळापासून वरपर्यंत कमी कमी होत गेलेले ( ? ) – ( १३१ )

सभेच्या आकाराप्रमाणे किंवा शालेच्या आकाराप्रमाणे शिखर असलेले, निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान, खांब, वेदिका इत्यादींनी अलंकारिलेले– ( १३२ )

चारी दिशांना महानासी असून उपदिशांना क्षुद्रनासिका असलेले (असे 'श्रीविशाल' असते.) ( १३२½ )

त्यानंतर 'चतुर्भुज' सांगतो. मजल्यांचे विभाग पूर्वीप्रमाणेच असून मध्यभागी हत्ती असलेल्या एका भद्रासह, निरनिराळ्या प्रकारचे अधिष्ठान, खांब, वेदिका इत्यादींनी अलंकारिलेले– ( १३३, १३४ )

सभेच्या आकाराप्रमाणे किंवा शालेच्या आकाराप्रमाणे शिखर असलेले, प्रत्येक मुखापाशी महानासी असून दोन्ही बाजूंना दोन दोन नासिका असलेले, ( १३५ )

आतमध्ये खांब व उत्तर यांसह, प्रत्येक मजल्याला प्रस्तर असून, आतमध्ये जिना असतो व त्याच्यामध्ये हत्तीची मूर्ती असलेले ( असे हे 'चतुर्मुख' असते. ) ( १३६ )

असे द्वारगोपुराचे तीन प्रकार असतात. अलिन्द्र आणि भिंत ही तळमजल्यावर सारख्याच भागांची असतात. योग्य प्रस्तर आणि सर्व अवयवांसह अलिन्द्र यांच्यासहित शालेच्या आकाराप्रमाणे ( किंवा ) सभा अथवा मालिकेच्या आकाराप्रमाणे ज्या ज्या दारापाशी (गोपुरापाशी) जो जो (आकार) योग्य असेल तो तो ( आकार ) तेथे योजावा. ( १३७–१३८½ )

[ श्लोक १०५ पहा ]

बाहेरील बाहेरील खांब किंवा भिंतीतील खांब तसेच गर्भगृह, भिंती या पूर्वीप्रमाणेच योजाव्यात. अलिन्द्र, हारान्तर किंवा भिंतीत नसलेले स्तम्भ व प्रस्तर यांच्यावर पाहिजे तितक्या मजल्यांपर्यंत गोपान इत्यादी नक्षी करावी. कूटकोष्ठादींचे अलंकारदेखील (पाहिजे तितक्या) वरच्या मजल्यापर्यंत करावेत ( १३९–१४१ )

मजल्यांचे अलंकार गळापर्यंत असावेत. शिखर दण्डाप्रमाणे व शालेच्या आकाराप्रमाणे असेल तर त्या ( शिखराला ) शालाकार म्हणतात. ( १४२ )

लुपा वापरून आयताकार शिखर केले तर त्यास सभाकार ( शिखर ) म्हणतात. त्रिविष्टिने (?) मण्डपाने प्रस्तर झाकलेले असतील तर त्या मण्डपाला व ( शिखराला ) मालिकाकृति म्हणतात. असे गोपुर सांगितले, परिवाराचा विधी ऐक. ( १४३–१४४ )

**काश्यपशिल्पातील गोपुरलक्षण हे पंचेचाळिसावे पटल संपले.**

# शेहेचाळिसावे पटल

## [ परिवार ]

आता विशेषतः संपूर्ण परिवारविधी, आठ, १६ आणि ३२ ( परिवार देवतांचा ) अनुक्रमाने सांगतो. ( १ )

अंतर्मण्डलात सर्व परिवार योजू नये. हे ब्राह्मणा, अंतर्हारात आठ परिवार ( देवता ) असाव्यात. ( २ )

१६ परिवार ( देवता ) असतील तर मध्यहारापर्यंत त्यांची योजना करावी. ३२ परिवार ( देवता ) असतील तर चवथ्या प्राकारापर्यंत ( त्या देवतांची योजना ) असावी. ( ३ )

त्या त्या प्राकाराच्या मध्ये किंवा प्राकाराच्या भिंतीच्या आश्रयाने (या देवता असतात.) मूल प्रासादासह सर्व जमिनीचे लांबी व रुंदीने आयत करून त्याचे नऊ भाग करावेत व त्यातील मध्यभागी मूलप्रासाद असतो. असे केल्यावर ( मूल प्रासादाच्या देवतेच्या ) अर्ध्या दृष्टीच्या भागापासून पूर्वेकडे क्रमाने (परिवार देवता) असाव्यात. ( ४, ५ )

पूर्वेला नंदीची स्थापना करावी. आग्नेय दिशेला अग्नि असावा. दक्षिण दिशेला अग्निदुग्ध ( ? ) किंवा दक्षिणेला सात माता असतात. ( ६ )

दक्षिण दिशेला वीरभद्र किंवा गणपती असावा. एकच मूर्ती असेल तर दक्षिण किंवा नैर्ऋत्य दिशेला विघ्न विनायक ( गणपती ) असतो. (७)

कुमार ( कार्तिकेय ) पश्चिम दिशेला व वायव्य दिशेला ज्येष्ठा ( गौरीची मूर्ती स्थापावी. ) उत्तरेला केशवाचे स्थान असते किंवा तेथे कात्यायनी असावी. ( ८ )

ईशान्य दिशेला सूर्याची ( मूर्ती ) असावी किंवा त्याची प्रतिमा अथवा पीठ असावे. प्रतिमा घरासह करावी व पीठ असल्यास ते घराशिवाय असावे. ( ९ )

पश्चिम (इंद्राची दिशा), आग्नेय व ईशान्य या दिशांना असलेल्या मूर्ती पश्चिमाभिमुख असतात. दक्षिण, पूर्व व वायव्य या दिशांना असलेल्या मूर्ती पूर्वाभिमुख असतात. (१०)

विष्णूचे मुख पूर्व दिशेला असून उत्तरेकडे दुर्गा असल्यास तिचे तोंड दक्षिणेकडे असते. सौम्यमुद्रा असलेल्या सप्तमाता जर उपदिशांना असतील तर त्यांचे तोंड पश्चिमेकडे असावे. ( ११ )

सप्तमातृकांच्या डाव्या बाजूला स्थापिलेल्या विघ्नहर्त्याचे ( गणपतीचे ) तोंड पूर्वेकडे असावे असे सांगतात. पहिल्या किंवा दुसऱ्या किंवा तिसऱ्या ( प्राकाराच्या ) भिंतीत चण्डेश्वराचे देवालय असते. ( १२ )

[ शिल्परत्न ४२-२७ त चण्डेश्वराचे मुख दक्षिण किंवा पश्चिम दिशेकडे असते अशी अधिक माहिती दिली आहे. ]

बलिपीठाच्या पुढचात तीन दण्ड अंतरावर नंदीचे स्थान असते. किंवा ३½ दंड ( अंतरावर) असते. या दोघांमधील ( ३ व ३½ दण्डांमधील ) अंतराचे आठ भाग केले असता ( नंदीचे ) स्थान ( बलिपीठाच्या ) पुढच्या बाजूला नऊ प्रकारचे असते. ( १३, १४ )

[ येथे दण्ड याचा अर्थ मूल प्रासादाची रुंदी असा आहे. कारणागमात दण्डाची व्याख्या दिली आहे, ' मूलप्रासाद विस्तारं यत्तद्दण्डमिहोच्यते । ' वृत्तपीठ हा शब्द बलिपीठ असा घेऊन अर्थ केला आहे. ]

असे हे आठ परिवार ( देवतांचे वर्णन ) झाले. आता १६ ( परिवारदेवतांचे वर्णन ) ऐक. क्षेत्राचे २५ भाग करून इंद्रभागाकडून ( पूर्वदिशेकडून ) अनुक्रमाने इन्द्र, अश्विनौ, अग्नि, पितर आणि त्याचप्रमाणे यम, रोहिणी आणि निर्ऋति तसेच आप्सरागण, ( १५, १६ )

वरुण, ऋषि, वायू आणि त्याचप्रमाणे रुद्र, चंद्र, क्षेत्रपाल आणि शंकर व सूर्य मूलप्रासादाकडे पाहत आहेत अशा रीतीने प्रदक्षिणक्रमाने स्थापावेत. कोनाकडे ( उपदिशांना ) असलेल्या देवांची तोंडे पूर्वेकडे आणि पश्चिमेकडे असावीत. ( १७, १८ )

पश्चिमेकडील ( देव ) पूर्वाभिमुख व दक्षिणेकडील ( देव ) उत्तराभिमुख हे कल्पवित्तमा, योजावेत. १६ ( परिवारदेवता ) अशा सांगितल्या. आता ३२ ( परिवारदेवता ) सांगतो. ( १९ )

चवथ्या प्राकारापर्यंत क्षेत्राचे ८१ विभाग करून बाहेरील ६४ भागांत पूर्वेकडून अनुक्रमाने, ( २० )

अनन्त, अभय, भय आणि त्याचप्रमाणे मोटिसूक्ष्म, गौरी, विष्णू , ब्रह्मा, शंकर आणि तसेच भृगु, ( २१ )

शंकर, कौशिक, एकाक्ष तसेच गणेश, सरस्वती त्याचप्रमाणे लक्ष्मी आणि तसेच एकरुद्र, ( २२ )

पशुपति, (अष्ट–) वसू, महादेव व त्रिमूर्ती, कुबेर, रुद्र, कालाग्नि, श्रीकण्ठ, नागदेवता, (२३)

भीम, पृथ्वी तसेच शिखण्डी आणि मरुत् , अत्रि व शनैश्चर असे ३२ परिवार ( देव ) असतात. ( २४ )

किंवा पृथ्वीच्या जागी गौरीची स्थापना करावी व गौरीच्या जागी पृथ्वी ठेवावी, उरलेले ( देवांची स्थाने ) पूर्वीप्रमाणेच असावेत. ( २५ )

सर्व देवांची तोंडे विशेषतः आतमध्ये ( मूल प्रासादाकडे ) वळलेली असावीत. गौरीसाठी मालिका किंवा विमानाची कल्पना करावी. ( २६ )

इतर देवांसाठीदेखील विमान किंवा मंडप असावा. मूल प्रासादाच्या पाऊणपट किंवा निम्मे किंवा पावपट, ( २७ )

गर्भगृहाइतके, गर्भगृहाच्या निम्मे किंवा पाऊणपट मापाचे किंवा तीन, चार अथवा पाच हात परिवार ( देवतेचे ) देवालय असावे. ( २८ )

आभास ( प्रकारच्या ) प्रासादात या मापानेच ( परिवारदेवालय ) बांधावे. शान्तिक इत्यादी ( प्रकारांत ) मूल प्रासादाप्रमाणे ( परिवार ) देवालयासाठी सुंदर असे सदन करावे, याहून वेगळे केल्यास ते ( सदन ) विपत्तिकारक होते. ( २९, २९½ )

[ शिल्परत्न ४२·६३ त शान्तिकादी प्रकारच्या मूल प्रासादांच्या बाबतीत आभास सदनाकरिता दिलेला परिवारदेवालयासंबंधीचा नियम त्यांनाही लागू होतो असें दिले आहे. ]

तीनमजली मण्डपाच्या आकाराचे, चार दारे असलेले नंदीचे घर करावे. उरलेल्या ( परिवारदेवतांना ) त्यांना योग्य असे घर करावे. परिवार ( देवतांसाठी ) घराची माहिती सांगितली. ( आता ) प्रतिमेची लक्षणे ऐक. ( ३०,३१ )

सकलमूर्तीसाठी ( मूल प्रासादातील मूर्तीसाठी ) जे दार व गर्भगृह यांचे माप घेतले त्याच मापाने परिवार ( देवतांच्या ) देवालयांकरिता माप घ्यावे. ( ३२ )

सर्व ( परिवारदेवता ) उभ्या किंवा बसलेल्या असतात. जाति (प्रकारच्या) प्रासादात ३२ परिवारदेवतांची योजना करावी. (३३)

छन्द (प्रकारच्या प्रासादात ) १६ ( परिवारदेवता असाव्यात ) व उरलेल्या (आभास वगैरेंच्या प्रासादात ) आठ (परिवारदेवता असाव्यात.) किंवा सर्व प्रकारच्या देवालयांत सर्व प्रकारच्या (आठ, १६ किंवा ३२ परिवारदेवतांची ) कल्पना करावी. ( ३४ )

जाती वगैरे प्रकारच्या प्रासादांतील परिवारदेवतांची मापे प्रतिमालक्षणात सांगितल्याप्रमाणे असावीत. परिवार ( देवतांमध्ये ) पहिल्यांदा नंदीचे लक्षण सांगतो. (३५)

उंचीचे १५ विभाग केले असता एक अंशाचे अंगुल होते. (अशा) ४० अंगुलांनी मुखापासून पाठीमागील भागापर्यंत (नंदीची) लांबी होते. (३६)

[ नंदीची उंची १५ अंगुले व लांबी ४० अंगुले आहे. शिल्परत्न २१·१ मध्ये गल शब्दाऐवजी मुख शब्द आहे व तो बरोबर समजून भाषांतर केले आहे कारण त्याने नंदीचे लांबी, उंचीचे माप मिळते. ]

कपाळापासून मानेपर्यंत सात अंगुले ( अंतर ) सांगतात. तेथून मानेची उंची आठ अंश असून छातीच्या शेवटापर्यंतचे अंतर १६ अंगुले होते. (३७)

[ शिल्परत्न २३·२ मध्ये पूर्वोक्तच्या ऐवजी उरोन्तं हा शब्द आहे व तो योग्य वाटतो. ]

चारी पायांच्या मांडीची लांबी सहा अंगुले सांगितली आहे. गुडघ्याचे माप दोन अंगुले व जांघेचे माप सहा अंगुले असावे. ( ३८ )

खुराचे माप दोन अंगुले व त्याची उंची तेवढीच ( दोन अंगुले ) असावी. शिंगांमधील अंतर आठ अंश व शिंगांची उंची चार अंश असावी. ( ३९ )

शिंगांच्या मुळाची रुंदी चार अंगुले सांगतात. ( शिंगांची ) रुंदी मुळापासून क्रमाक्रमाने कमी करीत अग्रापाशी पाव अंगुल असावी. ( ४० )

शहाण्या माणसाने शिंगांचा मध्यभाग थोडासा वक्र ठेवावा. कपाळाची रुंदी नऊ अंश व तोंडाची रुंदी पाच अंगुले असावी. ( ४१ )

(तोंडाची ) जाडी तेव्हढीच ( पाच अंगुले ) सांगतात. डोळा एक अंगुलाचा असावा. दोन डोळ्यांमधली कपाळाची उंची चार अंश सांगितली आहे. ( ४२ )

डोळ्यांपासून कानांच्या सीमेपर्यंत म्हणजे कानांची लांबी पाच अंश असावी. कानांच्या मुळाची रुंदी दोन अंगुले असावी. ( ४३ )

( कानाच्या ) मधल्या भागाची रुंदी चार अंगुले व अग्राची रुंदी एक अंगुल असावी. ( कानाची ) जाडी अर्धा अंगुल सांगतात. नाकाची लांबी दीड अंगुले ( व ) रुंदी एक अंगुल सांगतात. खोली तितकीच (एक अंगुल ) सांगतात. नाकाची उंची एक अंगुल असावी. ( ४५ )

तोंडाची लांबी पाच अंगुले, खालचा ओठ दोन अंगुले, वरील ओठ तीन अंगुले असे युक्तीने अनुक्रमाने माप घ्यावे. ( ४६ )

जिभेची लांबी, रुंदी व जाडी ( अनुक्रमे ) तीन, दोन व एक अंगुले सांगतात. मानेची ( खालच्या भागाची ) रुंदी दहा अंश असावी. तिच्या मुळाची ( रुंदी ) १२ अंगुले असावी. ( ४७ )

मानेच्या ( वरच्या भागाच्या ) मुळाच्या मागील (भागाची ) रुंदी आठ अंगुले असावी. मानेच्या पुढील भागाची रुंदी सहा अंगुले सांगितली आहे. ( ४८ )

वशिंडाची उंची चार अंगुले व रुंदी सहा अंगुले, मानेच्या अग्राची जाडी २½ अंगुले सांगतात. ( ४९ )

शरीराच्या मध्यभागाची रुंदी २४ अंगुले असावी. पाठीमागील रुंद्री १२ अंश, जसे जमेल तसे युक्तीने करावे. ( ५० )

पूर्वेकडच्या (म्हणजे पुढच्या ) पायाच्या मांडीच्या मुळाची रुंदी पाच अंगुले असावी. त्याच्या पुढच्या अग्राचा भाग चार अंगुले व जांघेचे मूळदेखील तेवढेच ( चार अंगुले ) असावे. ( ५१ )

जंघेच्या अग्राची (रुंदी) तीन अंगुले असावी, खुराची रुंदी ३½ अंश, पश्चिमेकडील ( म्हणजे मागच्या पायाच्या ) मांडीची मुळापासून रुंदी चार अंगुलांपासून क्रमाने बारीक करावी. ( ५२ )

अग्राची रुंदी आठ अंगुले, मुळाची रुंदी सहा अंगुले, जांघेच्या अग्राची रुंदी चार अंगुले ( व ) खुराची रुंदी चार अंश असावी. ( ५३ )

मांडीची लांबी पाच अंगुले व गुडघ्याची लांबी दोन अंगुले असते. जंघा पाच अंगुले लांब व खुराची लांबी तीन अंगुले असते. ( ५४ )

[ श्लोक ३८ त जंघा सहा अंगुले लांब दिली आहे. ]

शेपटीची मुळापासची रुंदी तीन अंगुले व अग्रापाशी ( रुंदी ) १½ अंगुले असते. शेपटीची लांबी जांघेच्या पुढच्या बाजूच्या सीमेपर्यंत असून विशेष म्हणजे ( शेवटी ) केसांचा गोंडा असावा. ( ५५ )

शेपटीच्या टोकापाशी केसांसह रुंदी चार अंगुले असावी. केसाच्या भागाची मूळ व अग्र यांची रुंदी एक अंश असून केसांची लांबी चार अंगुले असावी. ( ५६ )

वृषाण्डाची लांबी व रुंदी सर्व बाजूंनी तीन अंगुले असावी, व त्याची जाडी दोन अंगुले, उरलेल्या भागाची लांबी चार अंगुले असावी. ( ५७ )

उंचीत एक अंगुलाइतके जाड असते असे सांगतात. पद्म किंवा भद्रपीठावर बसलेला (उभा ? ) किंवा निजलेला (बसलेला ? ) दाखवितात. ( ५८ )

... ... ... ... ... ... ... ... ... ....... ( ? ) सोन्याचा, तांब्याचा किंवा लोखंडाचा नंदी करावा. ( ५९ )

[ श्लोक ५८½ अशुद्ध आहे. ]

लांबी, रुंदी, जाडी, खोली वगैरेत थोडादेखील कमी असू नये–म्हणून कर्त्याने लक्षणयुक्त ( नंदी ) करावा. ( ६० )

याउलट केले तर वाईट फले मिळतात. नंदीचे लक्षण सांगितले, अग्नीचे लक्षण ऐक. ( ६१ )

**अनलेश्वराचे ( अग्नीचे ) लक्षण**

अनलेश्वर उत्तम दशताल (उंचीचा) करावा. दोन तोंडे, एक छाती, दोन नाक आणि सहा पोट ( पोकळचा ) असतात. ( ६२ )

तीन साखळचा, तीन पाय आणि सात जिभा असतात. उजव्या तोंडात चार जिभा व डाव्या तोंडात तीन जिभा असतात. ( ६३ )

मेंढरावरती बसलेला, चार शिंगे असलेला ( व ) जटामुकुट यांनी अलंकारिलेला असतो. उजव्या बाजूला चार हात व डाव्या बाजूला तीन हात असतात. ( ६४ )

उषा (?), शक्ति, अग्नि त्याचप्रमाणे स्रुक् व स्रुव उजव्या हातांत (खालून वर) असतात. ( शक्ति, अन्न, स्रुक् व स्रुव उजवीकडील चार हातांत धारण केलेली असतात. ) डाव्या हातांत विशेषतः तोमर, पंखा व तुपाचे भांडे असते. ( ६५ )

शरीर सोन्यासारखे ( लखलखते ) सांगतात व डोळे पिंगट रंगाचे असतात. ( डोक्याच्या पाठीमागे ) प्रभामण्डल असून पद्मपीठावर उभा असतो. रेशमी वस्त्र घातलेले असते. अशी अनलेश्वराची कल्पना करावी. ( ६६, ६६½ )

**सप्तमातृकांचे लक्षण**

ब्राह्मी, माहेश्वरी आणि तसेच कौमारी व वैष्णवी, वाराही आणि त्याचप्रमाणे इन्द्राणी व चामुण्डा या सात माता आहेत. (६७, ६७½ )

( त्यांच्या ) उजव्या व डाव्या बाजूंना ( अनुक्रमे ) वीरभद्र व विनायक असावेत. ( ६८ )

( वीरभद्र व गणपती यांना ) चार हात, तीन डोळे असून ते जटामुकुटाने सुशोभित असतात. सर्व दागिने घातलेले असून पांढऱ्या रंगाचा बैल काढलेला ध्वज असतो. ( ६९ )

शूल ( धारण केलेला ) व अभय ( मुद्रेत असलेला ) असे उजवीकडील दोन हात असतात. गदा ( धारण केलेला ) व वरद ( मुद्रा असलेला ) असे डावीकडील दोन हात असतात. ( ७० )

वडाच्या झाडाखाली पांढऱ्या कमळावर बसलेले, चार तोंडे व चार हात असून ( त्यांचा रंग ) सोन्यासारखा असतो. ( ७१ )

[श्लोक ६९–७१ यांत वीरभद्र व विनायक यांचे वर्णन दिले आहे. ]

उजवीकडील ( हातात ) शूल ( धरलेली ) व अभय ( मुद्रेत ) असलेली, ( डावीकडील हात ) वरद ( मुद्रेत ) असलेली व अक्षमालिका ( धारण केलेली ), शंभर पाकळ्यांच्या कमळाच्या आसनावर बसलेली, हंस वाहनामुळे सुशोभित दिसणारी, ( ७२ )

जटामुकुट असलेली, पिवळे रेशमी वस्त्र नेसलेली, सुंदर व ब्रह्मवृक्षापाशी असलेली, **ब्रह्माणी** याप्रमाणे सांगतात. ( ७३ )

चार हात, तीन डोळे आणि खूपच गडद तांबडा रंग असलेली, उजव्या हातांत शूल व अभय ( मुद्रा ) असलेली व डावे हात वरद ( मुद्रेत ) आणि जपमाळ ( धारण केलेले ) असतात. जटामुकुट असलेली, शंकराप्रमाणे दिसणाऱ्या हीस **ईश्वरी** असे म्हणतात. ( ७४,७५ )

चार हात, तीन डोळे व तांबडी वस्त्रे नेसलेली, सर्व दागिने घातलेली, रत्नांनी सुशोभित केलेली, ( ७६ )

शक्ति व कोंबडा हातात धारण केलेली व वरद व अभयमुद्रेत ( असलेल्या ) हातांची, मोर काढलेला ध्वज घेतलेली व औदुंबर वृक्षाखाली असलेली ( ही **कौमारी** असते. ) ( ७७ )

शंख, चक्र धारण केलेली, वरद व अभय मुद्रेत ( असलेल्या ) हातांची, सुस्तनी, सुंदर चेहऱ्याची, सावळचा रंगाची, सुंदर डोळे असलेली, ( ७८ )

पिवळे रेशमी वस्त्र नेसलेली, किरीटमुकुट धारण केलेली, राजवृक्षाच्या आश्रयाखाली व गरुड काढलेला ध्वज असलेली, विष्णूच्या अलंकारांनी अलंकृत केलेली अशी **वैष्णवी** देवी करावी. ( ७९,७९½ )

करंजवृक्षापाशी, रेडा काढलेला ध्वज असलेली, चार हात, तीन डोळे आणि सर्व दागिन्यांनी सुशोभित असलेली, किरीटमुकुट धारण केलेली, पोवळचाप्रमाणे ( तांबडे ) मुख असलेली, उजवीकडील ( एका ) हातात अंकुश व ( दुसरा हात ) अभयमुद्रेत असतो. डावीकडील हात वरदमुद्रेत असून, शक्ति ( दुसऱ्या हातात धारण केलेली ) असते. ( अशी ही **वाराही** असते. ) ( ८०–८१½ )

कल्पवृक्षाखाली असून, हत्ती काढलेला ध्वज असतो, व मेंढचावर ( हत्तीवर ? ) बसलेली ( अशी **इंद्राणी** असते. ) ( ८२ )

[ इंद्राणीचे वर्णन अपुरे आहे.

येथे प्रत्येक मूर्तीपाशी निरनिराळे प्राणी असलेले वेगळेवेगळे ध्वज सांगितले आहेत. येथे ध्वज याचा अर्थ झेंडा असा नसून ओळखचिन्ह असा आहे. मूर्तीच्या आसनापाशी हे प्राणी दाखवितात व त्यांच्यावरून ती माता ओळखता येते. ]

चार हात, तीन डोळे व तांबडचा रंगाची, वर नेलेले केस असलेली, कपाल व शूल धारण केलेली, वरद व अभय ( मुद्रेत ) हात असलेली, ( ८३ )

(नर) मुण्डांची माला धारण करून पद्मपीठावर बसलेली, वाघाचे कातडे वस्त्र म्हणून नेसलेली, स्तनभाग नागेन्द्राने आच्छादिलेली, ( ८४ )

मोठचा व बाहेर दाढा आलेली, भयंकर चेहऱ्याची, वडाच्या झाडासमीप असलेली अशी **चामुंडेची** लक्षणे आहेत. एकटी मूर्ती असताना याच लक्षणांची ( चामुण्डा ) करावी. ( ८५ )

सर्व ( माता ) उजवा पाय मुडपलेला व डावा पाय ( खाली ) लांबविलेला अशा ( बसलेल्या ) असतात. असे हे सात मातांचे लक्षण मी सांगितले. ( ८६ )

**काश्यपशिल्पातील सात मातांचे लक्षण हे शेहेचाळिसावे पटल संपले.**

# सत्तेचाळिसावे पटल

## [ विनायकाचे लक्षण ]

आता विशेषाने विनायकाचे लक्षण सांगतो. पायापासून पगडीपर्यंत ( पगडी धरून ) ६४ अंश ( उंची ) असावी. ( १ )

कपाळ व मस्तकाची सीमा यांतील अंतर दोन अंगुले सांगतात. किंवा तेथून (मस्तकापासून) ( अक्षि– ) सूत्राच्या अंतापर्यंत चार अंगुले ( अंतर ) असते. ( २ )

मांडी ६½ अंश असावी. गुडघ्याची लांबी तीन अंगुले असावी. जंघा मांडीइतकीच (६½ अंश) लांब असून, पायाच्या तळव्याची उंची तीन अंश असते. ( ३ )

आंगठ्याच्या टोकापर्यंत ( पायाच्या तळव्याची ) लांबी सात अंगुले असावी. आंगठ्याची लांबी दोन अंश व करंगळी १½ अंश असावी. तर्जनीपासून करंगळीपर्यंत प्रत्येक ( बोट ) उंच करीत जावे. ( ४, ४½ )

[ पाय आडवा ठेवल्याने पाऊल उभे येते त्यामुळे करंगळी सर्वांत खाली व तर्जनी सर्वांत वर येते असे म्हणता येईल. पण मग आंगठा सर्वांत वर येतो व तसा उल्लेख पाहिजे, तेव्हा या श्लोकार्धाचा अर्थ तर्जनीपासून करंगळीपर्यंत बोटांची लांबी कमी कमी करीत जावी असा करावयास हवा. ]

हाताची लांबी १३ अंगुले, प्रकोष्ठाची ( कोपर ते मनगट ) लांबी नऊ अंगुले, हाताच्या तळव्याची लांबी चार अंगुले, मधल्या बोटाची लांबी तीन अंश, तर्जनी व अनामिका दोघांची लांबी ( प्रत्येकी ) २१ यव असावी. करंगळी व आंगठा यांची लांबी १७ यव असावी. ( ५–६½ )

आंगठ्यापासून करंगळीपर्यंत त्यांची रुंदी बारा, आठ, नऊ, आठ व सात यव सांगतात. त्यांच्या त्यांच्या रुंदीच्या पाऊणपट नखांची रुंदी सांगितली आहे. ( ७,८ )

( नखाग्र ) नखाच्या रुंदीच्या पाऊणपट व्यासाच्या दीर्घ वृत्तायताप्रमाणे असतात. ( ८½ )

[ श्लोकार्ध ९ फार अशुद्ध असल्याने अर्थ लागत नाही. ]

प्रकोष्ठाची रुंदी चार अंगुले, हाताची रुंदी ६½ अंगुले. हाताच्या मुळाची रुंदी हस्तकोष्ठाच्या ( बगलेच्या ) खाली एक अंगुल अंतरावर आठ अंश असावी. ( १० )

त्याच्या खाली हाताची ( रुंदी ) सात अंगुले व दण्डाच्या मध्यभागी ( रुंदी ) दहा अंगुले असावी. हाताच्या मूळाची ( कोपरापाशी रुंदी ) सहा अंगुले असून त्याची लांबी २२ अंश असावी. ( ११ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, हाताची ( रुंदी ) त्याच्या अग्रापर्यंत क्रमाक्रमाने दीड अंगुलाने कमी करीत जावी ( म्हणजे मनगटाची रुंदी ४½ अंगुले येईल. ) हातांच्या मध्ये दोन छिद्रे असावीत. ( १२ )

[ बहुधा हात आणि कूस याच्या मधले अंतर दाखविण्यासाठी प्रत्येकी एक छिद्र असावे असा अर्थ असावा. ]

डाव्या दाताची लांबी चार अंगुले असते असे सांगतात. उजवीकडे दाताचे केवळ मूळ असते व डाव्या दाताचे मूळ दाखवीत नाहीत. ( १३ )

खालचा ओठ दोन अंगुले लांबीने बाहेर आलेला असावा. डोळ्यांची लांबी व रुंदी सहा यव सांगितली आहे. ( १४ )

मानेची रुंदी पाच अंगुले व तिची उंची तेवढीच असावी. कानाची ( लांबी ) मुळापाशी दोन अंगुले असते व त्याची ( मुळापाशी ) जाडी अर्धा अंगुले असते. ( १५ )

हत्तीच्या तोंडासारखे दिसेल तसे, हे ब्राह्मणा, ( गणपतीचे ) मुख असावे. दोन हातांमधील अंतर ३२ अंगुले असावे. ( १६ )

कुशींमधले अंतर १९ अंगुले असते. स्तनांमधील अंतर १० अंगुले असून हिक्कांमधील (बगलांमधील) अंतर त्याच्या दुप्पट ( २० अंगुले ) असते. ( १७ )

स्तनाचा मध्यभाग दोन यव रुंदीचा व स्तनाच्या वर्तुळाचा व्यास दोन अंगुले असावा. स्तनाच्या खालच्या भागाची रुंदी १५ अंगुले सांगतात. ( १८ )

उदरमध्याची रुंदी २२ अंगुले माहिती आहे. बेंबीची खोली व रुंदी २½ अंगुले सांगतात. (१९)

लिंगाची लांबी तीन अंगुले व त्याच्या निम्मे ( १½ अंगुले ) त्याची रुंदी असावी. अण्डाची लांबी व रुंदी तीन अंगुले सांगितली आहे. (२०)

मांडीची रुंदी १२ अंश, गुडघ्याची रुंदी नऊ अंश, (व) जंघेच्या मुळाची रुंदी सात अंगुले सांगतात. (२१)

आणि जंघेच्या ( अग्राची ) रुंदी २½ अंगुले सांगतात. तिची (जंघेची) अग्रापर्यंत लांबी ६½ अंगुले असावी. (२२)

गुडघ्याची लांबी व रुंदी तीन अंगुले सांगितली आहे. आंगठ्यापासून करंगळीपर्यंत बोटांची लांबी अनुक्रमे १२½, सहा, आठ, पाच आणि सहा यव असते; व त्यांची रुंदी पाव अंगुले (दोन यव) असावी. (२३, २३½)

नखाची रुंदी ( बोटाच्या रुंदीच्या ) पाऊणपट असून त्याच्या निम्मे व्यासाची वृत्तायत आकाराची नखाग्रे असावीत. ( २४ )

दोन्ही पायांवर उभा किंवा विशेषतः पद्मपीठावर बसलेला, उजव्या हातात स्वतःचा दात, डाव्या हातात कपिण्डक (पाश ?), सोंडेने मोदक धरलेला व उजवीकडील हातात अंकुश असतो. डाव्या हातात पाश, नाग किंवा लहान अक्षमाला असावी. ( २५, २६ )

तीन डोळे असतात, सोन्यासारखा रंग असतो व रेशमी वस्त्र नेसलेला असतो. उभा गणपती असेल तर तो अभंग (आभंग ?) किंवा समभंग कल्पावा. (२७)

आसनावर बसलेला असेल तर डावा पाय मुडपलेला असून उजवा पाय ( खाली ) लांबविलेला असतो. ( २७½ )

[ श्लोकार्ध २८ वा फार अशुद्ध आहे त्यामुळे अर्थ लागत नाही. ]

विशेषतः शरीर डाव्या बाजूला किंचित वाकलेले ( झुकलेले ) करावे. नागाचे ( किंवा व्यालाग्र नावाच्या गवताचे ? ) जानवे असावे. किरीटमुकुट घातलेला असतो. ( २९ )

किंवा करंडमुकुट अथवा जटामुकुट धारण केलेला, सर्व दागिने घातलेला, भव्य शरीराचा व मोठ्या पोटाचा असावा. ( ३० )

असा विनायक सांगितला, षण्मुखाचे लक्षण ऐक. ( ३१ )

**काश्यप (शिल्पा)तील विनायकाचे लक्षण हे सत्तेचाळिसावे पटल संपले.**

# अठ्ठेचाळिसावे पटल

## [ परिवारदेवतांचे लक्षण ]

### षण्मुख लक्षण

लक्षणसंपन्न (अशी) स्कन्दाची (मूर्ती) पाच तालाच्या मापाने करावी. स्कन्दाचे लक्षण यात त्याच्या मापाची तसेच खोली, जाडी वगैरेंची सर्व माहिती दिली आहे. ( १ )

[ वस्तुतः अजूनपर्यंत पाच तालाच्या प्रतिमेच्या अंगोपांगांच्या मापाची माहिती दिलेली नाही व ती पुढेही दिलेली नाही. ]

दोन हात, चार हात, सहा हात किंवा १२ हात असावेत. उजवीकडील हातांत शक्ति, बाण, खड्ग, चक्र आणि प्रास व डावीकडील हातांत पीस, खड्ग, काकूटक (खेटक ?) त्याचप्रमाणे धनुष्य, दण्ड आणि नांगर (हे) बारा हात असलेल्या (स्कन्द) मूर्तीने धारण केलेले असावेत. (२, ३)

सहा हात असलेल्या मूर्तीत उजव्या बाजूकडील दोन हातांत खड्ग व शक्ति आणि डाव्या (तीन) हातांत (अनुक्रमे खालून वर) खेटक, अक्षमाला आणि कोंबडा असावेत. (४)

[ उजवा एक हात अभयमुद्रेत असावा. ]

चार हात असलेल्या स्कन्दमूर्तीत उजवीकडील दोन हातांपैकी (एक हात) अभयमुद्रेत (व दुसऱ्या हातात) शक्ति धरलेली असावी व डाव्या हातांत कोंबडा व अक्षमाला धरलेली असावीत. (५)

दोन हात असलेल्या मूर्तीत डाव्या हातात कोंबडा व उजव्या हातात शक्ति धारण केलेली असते. जी माहिती (येथे) सांगितली नाही ती उमा व स्कंद यांच्यासह असलेल्या शंकराच्या मूर्तीच्या (वर्णनात) दिलेली आहे त्याप्रमाणे असावी. (६)

स्कन्द (मूर्ती) चे लक्षण सांगितले आता ज्येष्ठा (देवीचा) संपूर्ण विधी सांगतो. (६½)

### जेष्ठादेवीचे लक्षण

दोन हात असून अग्नीप्रमाणे वर्ण असावा. ओठ लांब, नाक मोठे व उंच असते. (७)

स्तनभाग लांबट असून कंबरेचे वस्त्र निळ्या किंवा तांबड्या रंगाचे असते. उजव्या हातात कमळ (उत्पल) व डावा हात कटक (मुद्रेत) असावा. (८)

भद्रपीठावर सुखासीन बसलेली (अशी) व दोन्ही पाय खाली लांब सोडलेले असतात. सर्व प्रकारचे दागिने घातलेली व रत्नांनी सुशोभित केलेली असावी. (९)

कावळा काढलेला ध्वज (चिन्ह) व अनुचरांसह असून (कपाळावर) टिळा असावा. तिच्या उजव्या बाजूला नंदी किंवा वृषवाहन (शंकरमूर्ती) असावा. (१०)

दोन हात असलेल्या मूर्तीत उजव्या हातात दण्ड व डावा हात सूचि (मुद्रेत) असावा. उजवा पाय लांबविलेला व डावा पाय आसनावर मुडपलेला असतो. (११)

पांढऱ्या रंगाचा, भव्य शरीराचा, सर्व दागिन्यांनी भूषविलेला, करण्डमुकुट घातलेला, रेशमी वस्त्र नेसलेला असा वृषवाहन (शंकर) (देवीच्या) उजव्या बाजूस व अग्नि (तिच्या) डाव्या बाजूस असावेत असे सांगतात, (१२, १२½)

उत्तम स्तन असलेली, युवतीप्रमाणे अंगोपांग असलेली आणि सर्व प्रकारच्या दागिन्यांनी भूषविलेली, काजळाप्रमाणे काळा रंग असलेली, तांबड्या वस्त्राने भूषविलेली अशी ज्येष्ठा सांगितली; (आता) दुर्गेचे लक्षण सांगतो. (१३, १४)

चार हात, दोन डोळे असून सावळ्या रंगाची, सौम्य (दर्शन), पीताम्बर नेसलेली, मोठे स्तन व पार्श्वभाग असलेली, (१५)

करण्डमुकुट घातलेली, सर्व दागिन्यांनी भूषविलेली, उजव्या हाताने अभय (मुद्रा) दर्शविणारी व डाव्या हातात कटक धारण केलेली, (१६)

वरच्या उजव्या हातात चक्र व (वरच्या) डाव्या हातात शंख धारण केलेली, पद्मपीठावर समपादस्थानात (उभी) असलेली, (१७)

[शरीर दण्डाप्रमाणे सरळ ताठ असून दोन्ही पावलांवर समान भार असलेल्या मूर्तीला समपादस्थानातील मूर्ती म्हणतात.]

नागेन्द्राने स्तन बांधलेले असून तांबडी काचोळी नेसलेली अशी दुर्गा सांगितली, (आता) विष्णूचे लक्षण सांगतो. (१८)

### विष्णूचे लक्षण

किरीटमुकुट, कडदोरा इत्यादींनी अलंकारिलेला, पीताम्बर नेसलेला सौम्य (मुद्रेचा) व चार हातांसह (अशी) विष्णु (मूर्ती) असते. (१९)

(दोन हातांची मूर्ती असेल तर) उजवा हात अभय (मुद्रा दर्शवितो), डाव्या हातात कटक असते. (चार हातांची मूर्ती असेल तर) डाव्या हातांत (खालून वर) गदा व पद्म व उजव्या हातांत शंख व चक्र असतात. (२०)

पद्मपीठावर स्थापिलेली असून धान्याप्रमाणे श्यामवर्णाची असते. बसलेली किंवा उभी (विष्णुमूर्ती) असून उजव्या, डाव्या बाजूंना श्रीसह किंवा केवळ (एकटी) अशी विष्णुमूर्ती सांगतात. (२१, २१½)

एक मुख, दोन हात, जातिलिंगाप्रमाणे वर्ण असतो. किंचित उमललेली दोन कमळे वर उचललेल्या हातांत धरलेली असतात. करण्डमुकुट घातलेला व सर्व दागिन्यांनी भूषविलेला असतो. (२२, २३)

उजव्या हातात शक्ति व डाव्या हातात अंकुश असतो. पोट व मान मोठे असतात. डाव्या बाजूला चंद्र असावा. ( २४ )

दोन डोळे असून सौम्य मुद्रा असलेला, सिंहासनावर बसलेला किंवा हत्तीवर बसलेला असतो. ( २५ )

असा इन्द्र सांगितला. आता अश्विनौंची ( माहिती ) सांगतो. ( २५½ )

[ श्लोक २२ ते २५½ इन्द्रमूर्तीची लक्षणे दिली आहेत. ]

भद्रसिंहासनावर बसलेले, विश्वात सुंदर रूपांचे दोन अश्विनौ असतात. ( २६ )

दोघेही डाळिंबाच्या फुलाप्रमाणे ( तांबडाभडक ) वर्ण असलेले व उपपीठावर बसलेले, पूर्ण उमललेल्या तांबडया कमळाप्रमाणे डोळे असून ( हातांत ) कमंडलू धारण केलेले असतात. ( २७ )

नासत्य व दस्र ही नावे असलेले, जटामुकुट धारण केलेले, प्रत्येकी दोन हात असलेले, मालांच्या दागिन्यांनी भूषविलेले, ( २८ )

उजवा हात अभय ( मुद्रा दर्शविणारा ), डाव्या हातात पुस्तक असून दोघांचे उजवे पाय लांबविलेले असतात. डावे पाय आसनावर मुडपलेले असतात. ( २९ )

हे दोघे विधायक ( शल्य ) चिकित्सक असून देवांचे वैद्य आहेत. हे ब्राह्मणा, त्यांच्या अनुक्रमे डाव्या व उजव्या बाजूंना चामरधारी धृति व संजीवनी उभ्या असतात. पाठीमागच्या बाजूंना पिवळचा व पिंगट वर्णाच्या विशल्यकरणी ( नावाच्या ) दोन स्त्रिया ( उभ्या ) असतात. ( ३०,३१ )

डाव्या बाजूला धन्वंतरी व त्याचप्रमाणे डाव्या बाजूला आत्रेय ( ऋषी ) असावेत. ते ( अनुक्रमे ) पिवळचा व तांबडचा वर्णाचे असून काळे वस्त्र नेसलेले असतात. ( ३२ )

खड्ग व खेटक यांच्यासह सर्व दागिन्यांनी भूषविलेले असे अश्विनौ सांगितले. अग्नि पूर्वी ( सांगितला ) तसाच असावा. ( ३३ )

## पितर

पितर पिवळचा रंगाचे, म्हातारे, केस बांधलेले, यज्ञोपवीत घातलेले, दोन हातांचे व पांढरे वस्त्र नेसलेले असतात. ( ३४ )

नागांच्या अलंकारासहित, चंद्राप्रमाणे फिकट चेहऱ्याचे, मोठचा मनाचे ( पितर ) फळीच्या भद्रपीठावर बसलेले असतात. डावा हात डाव्या गुडघ्यावर असून, उजवा हात सूचि ( मुद्रा दर्शवितो ) असे पितरांचे रूप सांगतात. ( ३५–३६½ )

पितरांचे लक्षण सांगितले. त्यानंतर ववस्वत ( यमाचे ) लक्षण ऐक. ( ३७ )

## वैवस्वत

दोन हातांचा, काळचा रंगाचा, खड्ग व खेटक धारण केलेला असतो. मोठचा दाढा असलेले तोंड असून, तांबडचा रंगाची उटणी ल्यालेला असतो. ( ३८ )

तांबडे वस्त्र नेसलेला उग्र ( मुद्रेचा ) किरीटमुकुट धारण केलेला, फुललेल्या अंगाराप्रमाणे लाल डोळे असलेला, भव्य रेडचावर बसलेला यम असतो. ( ३९ )

वैवस्वताच्या दोन्ही बाजूंना तसेच जवळच दाराच्या दोन्ही बाजूंना उग्र मुद्रेचे चित्रगुप्त व किनर उभे असतात. ( ४० )

ते अनुक्रमाने काळ्या व सावळ्या रंगाचे असून दोघेही तांबडे वस्त्र नेसलेले असतात. उग्रतेज अशा या दोघांच्या पाठीमागच्या बाजूला मृत्यू उभा असतो. (४१)

निळ्या व रक्ताप्रमाणे तांबड्या रंगाच्या दोन चामरधारी स्त्रिया पुढे असून, हे ब्राह्मणा, त्यांची शर्म व धर्म अशी नावे आहेत. (४२)

यम सिंहासनावर बसलेला किंवा रेड्यावर बसलेला (दाखवितात.) यमाचे लक्षण सांगितले, रोहिणीचे लक्षण ऐक. ( ४३ )

**रोहिणीचे लक्षण**

दोन हातांची, करण्डमुकुट घातलेली, लाल वर्णाची, सुंदर, ( व ) सर्व दागिने ल्यालेली, हातात नाग असून शुभ्र वस्त्र नेसलेली, ( ४४ )

बसलेली किंवा उभी अशी सात संख्यांची रोहिणी असावी. अशी रोहिणी सांगितली, नंतर नैर्ऋतीचे लक्षण ( सांगतो. ) ( ४५ )

**निर्ऋतीचे लक्षण**

निर्ऋती निळ्या रंगाचा, दोन हातांचा व महाकाय असतो. उजव्या हातात खड्ग व डाव्या हातात खेटक असते. ( ४६ )

पिवळे वस्त्र नेसलेला, रुद्ररूपी, भयंकर, मुखात लांब दाढा असलेला, सर्व दागिने घातलेला, प्रेतावर बसलेला, जगत्पति, ( ४७ )

तांबड्या रंगाचे केस असलेला, उभा किंवा बसलेला हा निर्ऋती सांगितला. त्यानंतर अप्सरांचे ( लक्षण ) ऐक. ( ४८ )

**अप्सरांचे लक्षण**

रसरशीत कांति असलेल्या, तांबड्या रंगाच्या, लांबसडक व पुढे कुरळे केस असलेल्या, निरनिराळ्या बंधांत ( poses ) असून निरनिराळ्या फुलांनी अलंकृत केलेल्या असतात. ( ४९ )

सर्व ( अप्सरा ) रेशमी वस्त्र नेसलेल्या, मांड्या, स्तन व पार्श्वभाग मोठा असलेल्या, मध्यभागी बारीक ( कृशकटी ), सौम्य व किंचित हसरे मुख असलेल्या, ( ५० )

निरनिराळी उटणी अंगोपांगांवर ल्यालेल्या, भद्रपीठावर उभ्या असलेल्या, समभंगात असलेल्या अशा सात अप्सरांचा समुदाय असतो. ( ५१ )

अप्सरा अशा सांगितल्या. आता वरुण ( लक्षण ) सांगतो. ( ५१½ )

**वरुणाचे लक्षण**

वरुण पांढऱ्या रंगाचा, दोन हातांचा व हातांत पाश असलेला, सर्व दागिन्यांसह करंडमुकुट घातलेला, पिवळे वस्त्र नेसलेला, शान्त मुद्रेचा व अत्यंत बलवान दाखवितात. ( ५३ )

यज्ञोपवीत घातलेला व मगरावर बसलेला असतो. ( ५३½ )

**ऋषींचे लक्षण**

ऋषी पिवळ्या वर्णाचे, निरनिराळ्या रंगांची वस्त्रे नेसलेले, वृद्ध, दोन हातांचे, शांत मुद्रेचे, जटाजूट धारण केलेले असून हृदयाच्या सीमेपाशी हातांची ओंजळ केलेले व यज्ञोपवीतासह असतात. ( ५४, ५५ )

भस्माचा त्रिपुंड असून उभे असतात. उजव्या हातात दण्ड व डाव्या हातात छत्र धरलेले असते. (५६)

किंवा दण्ड व छत्र यांच्याशिवाय असलेले, डावा हात ज्ञानमुद्रा दर्शवीत असलेले (व) डाव्या गुडघ्यावर डावा हात ठेवलेले (असे ऋषींचे लक्षण असते.) (५७)

भृगु, अगस्ति, वसिष्ठ, गौतम तसेच अंगिरस, विश्वामित्र (व) भारद्वाज असे सात ऋषी सांगतात. (५८)

**मरुताचे लक्षण**

दोन हातांचा, महा बलवान, धुरकट डोळयांचा व धुराप्रमाणे (निळसर) रंगाचा, उजव्या हातात ध्वज व डाव्या हातात दण्ड धरलेला, (५९)

वाकलेले हात असलेला, ठिपक्यांच्या वस्त्रांनी भूषविलेला, निरनिराळे दागिने घातलेला असा वायू (असतो.) त्याचे केस पसरलेले (विस्कटलेले ?) असतात. (६०)

लवकरच यात्रेला निघण्यास उत्सुक असा सिंहासनावर बसलेला असतो. असा वायू सांगितला, रुद्राचे लक्षण ऐक. (६१)

**रुद्राचे लक्षण**

चार हात, तीन डोळे आणि जटामुकुटाने भूषविलेले, काळसर वस्त्र नेसलेले व सर्वजण शुभ्र वर्णाचे असतात असे सांगतात. (६२)

पद्मपीठावर, सरळ असलेल्या दोन्ही पायांवर उभे असलेले (समस्थानक), सर्व दागिन्यां-सह सर्व (प्रकारच्या) फुलांनी अलंकारिलेले, (६३)

उजवीकडील (दोन हातांपैकी) एक हात अभय (मुद्रा दर्शविणारा) व दुसरा परशू धारण केलेला व डावीकडील हात वरद (मुद्रेचा) व कृष्णमृग धारण केलेला असतो. (६३½)

महादेव, शिव, रुद्र, शंकर, नीललोहित, ईशान, विजय आणि ईश, देवदेव, भवोद्भव (व) कपालीश असे ११ रुद्र सांगतात. (६५)

**(चंद्र)**

चंद्र सिंहासनावर बसलेला, कुन्दाच्या फुलाप्रमाणे (किंवा) शंखाप्रमाणे पांढरा शुभ्र वर्ण असलेला, (डोक्याच्या मागे) प्रभामंडल असून, दोन हात व सौम्य मुद्रेचा असतो. (६६)

बसलेला किंवा उभा, हातात कुमुद व उत्पल (ही कमळे) धरलेली आहेत, अंगात सोन्याचे यज्ञोपवीत घातलेला (व) सर्व दागिन्यांनी भूषविलेला (असतो.) (६७)

पांढरे वस्त्र नेसलेला, शान्त मुद्रेचा, सर्व प्रकारच्या फुलांनी अलंकारिलेला (असा चंद्र असतो.) (६७½)

**(क्षेत्रपाल)**

क्षेत्रपाल, सात्त्विक, राजस व तामस असे तीन प्रकारचे असतात. (६८)

पांढरा, लाल आणि काळा असे सात्त्विकादी (क्षेत्रपालांचे अनुक्रमे) रंग असतात. दोन किंवा चार हातांचा सात्त्विक, राजस सहा हातांचा आणि तामस आठ हातांचा असून (ते) तीन

डोळ्यांचे व दोन्ही पाय सरळ ( समस्थानक ) असे पद्मपीठावर किंवा भद्रपीठावर उभे असतात. ( ६९, ७० )

उजव्या हातात शूल व दुसऱ्या हातात कवटी असते. दोन हात असे सांगितले. आता चार हात सांगतो. (७१).

उजवीकडील व डावीकडील वरच्या हातांत (अनुक्रमे) खट्वांग व खड्ग असते व खालचे हात ( अनुक्रमे ) अभय व वरद मुद्रेत असतात. ( ७२ )

पूर्वीप्रमाणेच वरील हात असून (खालच्या) डाव्या हातात दोन लहान घंटा असतात. सात्त्विक (क्षेत्रपालाचे लक्षण) असे सांगितले. हे सुव्रता, राजस (क्षेत्रपालाचे लक्षण) ऐक. ( ७३ )

उजवीकडील तीन हातांत शूल, खड्ग व घंटा असतात व उजव्या ( डाव्या ?) हातांत खेटक, कवटी आणि नागपाश असतात. ( ७४ )

तामस (क्षेत्रपालाच्या) उजव्या हातात धनुष्यबाण धरलेले असतात. उरलेल्या ( हातांत ) राजस (क्षेत्रपालाप्रमाणे आयुधे ) असावीत. केस तांबडे असून वर बांधलेले असतात. ( ७५ )

[ येथे उजव्या हातात धनुष्य व डाव्या हातात बाण असे वर्णन पाहिजे. ]

उग्र दृष्टीचे, निरनिराळ्या नागांनी भूषविलेले, तीन डोळ्यांचे (व) अग्नीप्रमाणे रूप असलेले ( असे ) क्षेत्रपाल कल्पावेत. ( ७६ ) -

## ईश

ईश दोन हातांचा, शान्त मुद्रेचा, सर्व दागिन्यांनी भूषविलेला, जटामुकुटासह, पांढरीशुभ्र वस्त्रे नेसलेला व उभा असतो. ( ७७ )

पांढरे यज्ञोपवीत घातलेला, पांढऱ्या कमळावर उभा असून उजव्या हातात शूल व डाव्या हातात कवटी असते. ( ७८ )

ईश (लक्षण) असे सांगितले. त्यानंतर क्रमाने ( येणाऱ्या ) भास्कराचे (लक्षण) सांगतो. ( ७८½ )

## सूर्याचे लक्षण

दोन हात असलेले, (दोन्ही) हातांत कमळ धरलेले, तांबड्या पद्मासनावर उभे असलेले, तांबडे (प्रभा) मण्डल असलेले, करंडमुकुटासह, लाल वस्त्रे नेसलेले, छन्नवीरांसह सर्व दागिन्यांनी भूषविलेले असे १२ सूर्य माहिती आहेत. ( ७९-८०½ )

विकर्तन, विवस्वान्, मार्तण्ड, भास्कर, रवि, लोकपाल, प्रकाश, लोकसाक्षी त्रिविक्रम, आदित्य आणि तसेच सूर्य, अंशुमाली, दिवाकर असे हे बारा आदित्य उत्तर दिशेपासून क्रमाने असतात. ( ८१-८२½ )

असे १६ संख्यांचे (परिवार देव) सांगितले. आता ३२ ( संख्यांचे परिवारदेव ) सांगतो. ( ८३ )

## ( अनन्त )

सौम्य मुद्रेचा, चार हातांचा, सर्व दागिन्यांनी भूषविलेला **अनन्त** असतो. जपाफुलाप्रमाणे लाल रंग असलेला, करण्डमुकुटासह पांढरे वस्त्र नेसलेला, शान्त ( मुद्रेचा ), तीन डोळ्यांचा, कमळावर स्थापिलेला, अभय व वरदमुद्रेत ( दोन हात असून वरच्या दोन हातांत ) कटक व शूल धारण केलेले असतात. असा पवित्र ( अनन्त असतो. ) ( ८४, ८५ )

**सूर्य** चार हातांचा, शान्त ( मुद्रेचा ), सर्व दागिन्यांनी भूषविलेला, सोन्याप्रमाणे वर्ण असलेला, रेशमी वस्त्र नेसलेला असतो. (८६)

अभय (व) वरद मुद्रेत (हात असणारा, वरच्या हातांत ) खड्ग व खेटक धारण करणारा, पत्र (पद्म ? ) पीठावर उभा असा सूर्य कल्पावा. (८७)

**अभय** चार हातांचा, शान्त ( मुद्रेचा ), जटामुकुटाने अलंकारिलेला, गडद तांबडचा रंगाचा (व) सर्व दागिन्यांनी भूषविलेला असतो. (८८)

**भव** सोन्याप्रमाणे रंग असलेला, रेशमी वस्त्र नेसलेला, अभय व वरद ( मुद्रा दर्शविणारा ) व शूल आणि पाश धारण करणारा, दोन्ही हातांवर नाग असलेला, सौम्य मुद्रेचा आणि दोन डोळ्यांचा असतो. (८९, ८९½)

**( गौरी )**

अत्यंत सुंदर, शान्त ( मुद्रेची ), सर्व दागिन्यांनी भूषविलेली, निरनिराळे गन्ध ( उटणी ) ल्यालेली, पिवळ्या फुलांनी शोभायमान दिसणारी करण्डमुकुट घातलेली (व) पद्मपीठावर उभी, (९०, ९१)

कंबरेत किंचित वळलेली, मोठ्या मांड्या, पार्श्वभाग व स्तन असलेली, रेशमी पट्टा अंगावर असून, निरनिराळी वस्त्रे नेसलेली अशी सुंदर, (९२)

धान्याप्रमाणे श्यामलवर्णाची, दोन्ही हातांत तांबडे कमळ धारण केलेली, गुडघ्यापर्यंत लांब हात असलेली व सगळीकडे समभागात ( समभंगात ? ) असलेली, (९३)

फिक्या निळ्या रंगाची, शान्त मुद्रेची, सोनेरी वस्त्र नेसलेली, चार हात, तीन डोळे (व) सर्व दागिन्यांनी भूषविलेली, (९४)

अभय, वरद ( मुद्रेत ) तसेच टंक व शूल धारण केलेली असे सकल ( शंकरमूर्तीच्या ) लक्षणात जसे (सांगितले आहे ) तसे गौरीचे लक्षण सांगितले. (९५)

या केवळ ( एकटचा गौरीच्या ) मूर्तीला शहाण्या माणसाने, या प्रमाणेच, ( वर दिलेली लक्षणे असलेलीच ) स्थापावी. (९५½)

**( शर्व )**

शर्व, चार हात, शान्त ( मुद्रेचा ), सर्व दागिन्यांनी भूषविलेला (व) जटामुकुटांसह (असतो.) शंख ( किंवा ) कुंदाच्या फुलाप्रमाणे ( पांढऱ्या ) रंगाचा, अभय व वरद ( हातांच्या मुद्रा असलेला ), खड्ग, खेटक धारण केलेला, पद्मपीठावर उभा असलेला असा हा शर्व असतो. (९६–९७½)

**( ब्रह्मा )**

चार तोंडे, चार हात, हरितालाप्रमाणे ( हिरवा ) वर्ण असलेला, जटामुकुटांसह असलेला, पिंगट डोळे व सापांची भूषणे असलेला, कृष्णाजिन उत्तरीय ( वस्त्र ) म्हणून नेसलेला ( व ) यज्ञोपवीतासह, (९८, ९९)

पांढरे वस्त्र नेसलेला, शान्त मुद्रेचा, साखळीसह कडदोरा असलेला, पांढऱ्या रंगाचे उटणे ल्यालेला, कुण्डलांनी सुशोभित कान असलेला, (१००)

उजव्या ( हातांत ) अक्षमाला आणि तसेच कूर्च धारण केलेला, डाव्या ( हातांत ) कमण्डलू व कुश त्याचप्रमाणे उजव्या हातांत स्रुक, स्रुव असलेला, ( १०१ )

तुपाची थाळी व व कुश डाव्या हातांत धरलेला किंवा अभय व वरद ( मुद्रेत असलेले ) खालचे हात असलेला, हे ब्राह्मणश्रेष्ठा, बसलेला असताना दोन्ही पायांचे आंगठे परस्परांना चिकटून असतात व मेढ्रमुळाच्यावरती तळवा वर करून डावा हात ठेवलेला असा, ( १०२, १०३ )

उजवा हात त्याच्यावर सारखा ठेवावा. उजव्या हातात अक्षमाला व डाव्या ( हातात ) कमण्डलू असावा. ( १०४ )

[ डाव्या हाताचा तळवा वर केलेला असून त्याच्यावर उजव्या हाताचा तळवा पालथा ठेवलेला असतो. ]

उजव्या बाजूला सरस्वती व डाव्या बाजूला सावित्री असाव्यात. हे ब्राह्मणा, त्या पद्मपीठा-वर बसलेल्या किंवा उभ्या दाखवाव्यात. ( १०५ )

**( शिव )**

शिव, ज्याला तुलना नाही अशा पांढऱ्या रंगाचा व चार हातांचा असून सर्व दागिन्यांनी युक्त, पांढरे वस्त्र व यज्ञोपवीत धारण केलेला असतो. ( १०६ )

दोन डोळे असून करण्डमुकुट घातलेला असतो. अभय व वरद ( मुद्रेत खालचे दोन हात ) असून ( वरच्या दोन हातांत ) शूल व पाश धारण केलेले असतात. पवित्र (दर्शन ) असून पद्मपीठावर दोन्ही पाय सरळ ठेवून उभा असतो. ( १०७, १०७½ )

**(भृगु)**

भृगु, पोपटाच्या रंगाचा, शान्त (मुद्रेचा) त्याचप्रमाणे पांढरे वस्त्र नेसलेला, करण्डमुकुट घातलेला, अभय व वरद ( मुद्रेत असलेल्या ) दोन हातांचा, सर्व दागिन्यांनी भूषविलेला असतो. ( १०८, १०९ )

शुभदायक भृगु पद्मपीठावर उभा किंवा बसलेला असतो. पूर्वीच सांगितल्याप्रमाणे ईश व त्याचप्रमाणे अगस्तीची कल्पना करावी. ( ११० )

मूर्तीविज्ञान जाणणाऱ्यांत श्रेष्ठ (काश्यपा ), अगस्तीप्रमाणेच कौशिकाची मूर्ती करावी. ( ११०½ )

**( एकाक्ष )**

एक डोळा, चार हात, तीन डोळ्यांसह ( ? ), (१११)

सुती वस्त्र धारण केलेला, शान्त मुद्रेचा, बन्धूक ( वेलीच्या ) फुलांप्रमाणे लाल रंगाचा, जटामुकुटासह सर्व दागिन्यांनी भूषविलेला, ( ११२ )

अभय व वरद ( मुद्रेत खालचे दोन हात असून, वरच्या दोन हातांत ) टंक व शूल असतात. विघ्नेश ( गणपती ) पूर्वी ( सांगितल्या ) प्रमाणे करून, हे ब्राह्मणा, त्याची स्थापना करावी. ( ११३ )

[ गणपतीसाठी पटल सत्तेचाळिसावे पहावे. ]

## सरस्वती

सरस्वती चार हातांची असून पांढऱ्या कमळावर बसलेली असते. जटामुकुट धारण केलेली, गोऱ्या रंगाची व पांढरे वस्त्र नेसलेली असते. (११४)

यज्ञोपवीतासह लाल कुण्डलांनी सुशोभित दिसणारी, सर्व दागिने घातलेली, मोत्यांची माळ (गळयात असून) सुंदर डोळयांची असते. (११५)

व्याख्यान (मुद्रा) आणि अक्षसूत्र उजवीकडील दोन हातांत (व) (डाव्या हातांत) पुस्तक व कुण्डिका असतात. तीन डोळे असून मनोहर रूपाची असते. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांनी मुनी जिची सेवा करीत आहेत व सुंदर लक्षणयुक्त अशी वाग्देवी सांगितली आहे. (११६, ११६½)

## लक्ष्मी

लक्ष्मी, पद्मासनावर बसलेली, दोन हात असून सोन्याप्रमाणे कांती असलेली, कानांतील रत्नजडित सोन्याच्या बहुमोल कुण्डलांनी सुशोभित, अत्यंत तरुण, मनोहर अंगोपांग असलेली, वाकडया भुवया असून चंचल नेत्रांची, (११७, ११८)

तांबडे डोळे असून मोठचा चेहऱ्याची, स्तनद्वयांवर काचोळी घातलेली, डोक्याच्या (मागे) प्रभामण्डल असून शंख, चक्र, गदा व कमळ धारण केलेली, (?) (११९)

उजव्या हातात कमळ (व) डाव्या हातात श्रीफळ असावे. सुंदर कटिभाग असून पार्श्वभाग मोठा असतो, शोभेल असे वस्त्र नेसलेली, (१२०)

कडदोरा व साखळी ल्यालेली, सर्व प्रकारच्या दागिन्यांनी भूषविलेली (अशी लक्ष्मी असावी.) (१२०½)

एकरुद्र विशेषतः एकाक्षाप्रमाणे करावा. (१२१)

पूर्वीप्रमाणेच हे ब्राह्मणा, पशुपतीची मूर्ती स्थापावी. (१२१½)

धर, ध्रुव, सोम, आप, अनल त्याचप्रमाणे अनिल, प्रत्युष आणि तसेच प्रभाव असे आठ वसू आहेत. (ते) तांबडचा रंगाचे असून (१२२, १२३)

पीताम्बर नेसलेले, सर्वजण बसलेले किंवा उभे, खड्ग, खेटक हातांत असून ते सर्व दागिन्यांनी भूषविलेले असतात. करण्डमुकुट घातलेले, रागीट (मुद्रेचे) असे त्यांचे वर्णन आहे. (१२४, १२४½)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, महादेव पशुपतीप्रमाणे करावा. (१२५)

त्रिमूर्ती, हे द्विजसत्तमा, एकरुद्राप्रमाणे करावी. (१२५½)

## (कुबेर)

कुबेर सर्व यक्षांचा प्रमुख असून सर्व प्रकारच्या दागिन्यांनी भूषविलेला असतो. (१२६)

तापलेल्या सोन्याप्रमाणे (लखलखीत) वर्ण असलेला, दोन हातांसह, वरद (व) अभय (मुद्रा असलेल्या) दोन हातांसह किंवा डाव्या हातात गदा असावी. (१२७)

पद्मपीठावर मेघ हेच वाहन असलेला, दोन डोळयांचा, तांबडे वस्त्र नेसलेला, सौम्य (मुद्रेचा) शंखनिधी व पद्मनिधी यांच्यासह असतो. (१२८)

हे द्विजोत्तमा, शंखनिधी व पद्मनिधी हे दोघेही भूतांच्या आकाराचे व महाबलवान असून पद्मपीठावर बसलेले व दोन्ही हातांत कमळ धारण केलेले असतात. (१२९)

करण्डमुकुट घातलेले, पांढऱ्या वस्त्राचे उत्तरीय घेतलेले असे (कुबेराच्या) उजवीकडे व डावीकडे शंखनिधी व पद्मनिधी असावेत. ( १३० )

कुबेराच्या डाव्या बाजूला सर्वलक्षणसंपन्न देवी करावी. असा कुबेर सांगितला. पूर्वी-प्रमाणेच इंद्राची कल्पना करावी. ( १३१ )

( कालाग्निरुद्र )

आता कालाग्निरुद्रमूर्तीचे लक्षण सांगतो. चार हात, तीन डोळे आणि ज्वाळेप्रमाणे झळक-णाऱ्या माळेने सुशोभित असतो. ( १३२ )

खड्ग, खेटक यांच्यासह सुंदर अर्धचंद्र (भाळी) धारण केलेला असतो. तांबडे वस्त्र नेसलेला, रागीट ( मुद्रेचा ), सर्व प्रकारच्या दागिन्यांनी भूषविलेला, तांबडे व वर गेलेले केस असून सिंहासनावर बसलेला ( असा कालाग्निरुद्र असतो. ) ( १३३, १३३½ )

( श्रीकण्ठ )

चार हात, तीन डोळे आणि निळ्या कमळाप्रमाणे रंग असतो. करण्डमुकुटासह सर्व दागि-न्यांनी भूषविलेला, अभय ( व ) वरद ( मुद्रेत खालचे हात व वरच्या दोन हातांत ) टंक व शूल धारण केलेले असतात. ( १३४, १३५)

तांबडे वस्त्र नेसलेला, पद्मपीठावर बसलेला असा हा श्रीकंठ सांगितला. नंतर नागदेव सांगतो. (१३६)

(नागदेव)

तीन डोळे, चार हात, सौम्य ( मुद्रेचा ), तांबडा वर्ण व पांढरे वस्त्र नेसलेला, अभय व वरद ( मुद्रेत खालचे हात ) व वरील ( दोन्ही ) हातांत नाग धरलेले असतात. ( १३७ )

नागाला करण्डमुकुटासह पाच फणा असतात. सर्व दागिने घातलेला (व) पद्मपीठावर बसलेला असतो. (१३८)

( भीम )

भीम, चार हात असून रागीट (मुद्रेचा), सर्व दागिन्यांनी भूषविलेला, अभय, वरद (मुद्रा) तसेच शूल व पाश धारण केलेला असावा. ( १३९ )

पांढरे वस्त्र नेसलेला तसेच उग्र डोळ्यांचा आणि मोठ्या दाढा असलेला, धान्याचे अंकुर आलेल्या जमिनीप्रमाणे निळ्या रंगांच्या कुरळ्या केसांसह (भीम असावा. ) ( १४० )

( शिखण्ड )

करण्डमुकुट घातलेला, सर्व दागिन्यांनी भूषविलेला, पीताम्बर नेसलेला, तसेच प्रसन्न मुद्रेचा, ( १४१ )

पद्म किंवा उत्पल दोन्ही हातांत धारण केलेला, पद्मपीठावर बसलेला किंवा उभा, ( १४२ )

(असा) शिखण्ड काजळाप्रमाणे काळ्याकभिन्न वर्णाचा, चार हात असून खड्ग व खेटक धारण केलेला व पद्मपीठावर स्थापित केलेला असतो. ( १४३ )

(मरुद्गण)

मरुद्गण, धुराच्या (निळसर) रंगाचे, मुद्गरांसहित दोन हात असलेले, केसांचा संभार वागवीत असलेले (व) सर्व दागिन्यांनी भूषविलेले असतात. (१४४)

रेशमी वस्त्र नेसलेले, सर्वजण निरनिराळ्या फुलांनी अलंकृत केलेले, टंक व शूल (हातांत) धारण केलेले, मोठ्या मांड्या, पार्श्वभाग व वक्षभाग असलेले, पादपीठावर (उभे असलेले ?) असे हे आठ मरुद्गण असतात. (१४५,१४५½)

(उग्र)

उग्र, चार हातांचा, रागीट मुद्रेचा, तांबडे वस्त्र नेसलेला, करण्डमुकुटासह सर्व दागिन्यांनी भूषविलेला, अभय, वरद (मुद्रां)सह वरील (हातांत) टंक (व) शूल धारण केलेला, (१४६, १४७)

पद्मपीठावर उभा असलेला, पवित्र व पांढरे वस्त्र नेसलेला (?) असतो. (१४७½)

[श्लोक १४६ त तांबडे वस्त्र नेसलेला असे वर्णन आहे.]

(शनैश्चर)

शनैश्चर, काळ्या रंगाचा, दोन हातांचा, पांढरे वस्त्र नेसलेला, करण्डमुकुटासह सर्व दागिन्यांनी भूषविलेला, उजव्या हातात दण्ड व डावा हात वरद (मुद्रेत असलेला) असा सांगतात. (१४८, १४९)

पद्मपीठावर उभा किंवा विशेषतः बसलेला करावा. किंचित आखडून बसलेला व किंचित लहान शरीराचा (शनैश्चर) सांगतात. (१५०)

पहिल्यांदा (मूर्ती) अशा प्रकारे सांगितल्या. (आता) पीठाचे लक्षण ऐक. जी प्रासादाची रुंदी तिला येथे दण्ड म्हटले आहे. (१५१)

२४ अंगुले रुंदी व उंची बारा अंगुले असून त्यांत पद्माची उंची तीन अंगुले असते. (१५२)

[पद्मोत्सिक्तगुणालयम् या ऐवजी पद्मोच्चं तु गुणाङ्गुलम् असा बदल करून अर्थ दिला आहे. प्रासादाची रुंदी म्हणजे एक दण्ड म्हणजे ९६ अंगुलांइतकी. तेव्हा प्रासादाच्या रुंदीला ९६ ने भागितले म्हणजे अंगुलाचे माप येते. अशा १२ अंगुले रुंदी व उंचीचे पीठ असते.]

पद्माची रुंदी (उंची ?) सहा अंगुले असून उरलेला वरचा भाग कंप असून तो पद्माच्या बाहेर आलेला असतो. दगड, विटा किंवा चुना यांनी हे (पद्मपीठ) बांधावे. (१५३)

[अंशुमत्काश्यपाप्रमाणे २४ अंगुले रुंद, १२ अंगुले उंच पद्मपीठ असून त्याला ४ अंगुले रुंदीच्या तीन मेखला असतात. त्यांची उंची तीन अंगुले असून, पद्माची उंची तीन अंगुले असावी. पद्माची रुंदी सहा अंगुले असून त्याच्यावर बाहेर निर्गमन असलेला कंप असतो.]

परिवार (देवतांसाठी) ही बैठक सांगितली आहे. महापीठाचे विधान ऐक. जी प्रासादाची रुंदी तिला येथे दण्ड म्हटले आहे. (१५४)

मूळ हर्म्याच्या आजूबाजूला सहा किंवा आठ दण्ड, दहा, बारा दण्ड किंवा १५ दण्डांपर्यंत, १६ किंवा १८ (दण्डांइतक्या) अंतरावर महापीठ कल्पावे. (१५५, १५५½)

किंवा (महा) पीठाच्या जागेचा दुसरा पर्याय सांगतो. तिसऱ्या, चवथ्या किंवा पाचव्या प्राकाराच्या भिंतीच्या लांबी-रुंदीच्या मध्यभागी महापीठ करावे. त्याचे लक्षण सांगतात. (१५६, १५७)

मूळ प्रासादाच्या ( गर्भागाराच्या ) दाराच्या उंचीइतकी उत्तम पीठाची रुंदी असावी. ( दाराच्या उंचीच्या ) पाऊणपट ( रुंदीचे ) मध्यम ( पीठ ) सांगतात. दाराच्या उंचीच्या निम्मे (रुंदीचे) कनिष्ठ (पीठ) असते. ( १५८ )

दाराच्या मोकळ्या रुंदीइतकी रुंदी असलेले पीठ मध्यम ( कनिष्ठ ? असते असे ) सांगतात. त्याच्या दुप्पट ( रुंदीचे पीठ ) मध्यम सांगतात (व) तिप्पट ( रुंदीचे ) श्रेष्ठ (पीठ) सांगितले जाते. ( १५९ )

किंवा एक हात रुंदीचे पीठ अधम, दोन हातांचे मध्यम व तीन हातांचे (पीठ) श्रेष्ठ समजतात. ( १६० )

[ 'त्रिहस्तं वृत्तमात्मकम्' या ऐवजी 'त्रिहस्तं श्रेष्ठमुच्यते' असे शब्द घेऊन अर्थ दिला आहे. ]

[ पीठाचे थरविभागांचे वर्णन दिलेले नाही. ते अंशुमत्काश्यपशिल्पाप्रमाणे, त्याच्या रुंदीइतकी ( पीठाची ) उंची करावी, व उंचीचे २८ भाग करावेत. उपानाची उंची दोन भाग असावी. जगती सहा अंश असावी. कुमुदाची उंची पाच अंश व कंप एक अंशाचा सांगतात. कण्ठाची उंची चार अंश व वरचा कंप एक अंशाचा असतो. महापट्टी तीन अंशांची किंवा विशेषतः दोन भागांची असते. पद्माची उंची चार अंश व दोन भाग कर्णिकेची उंची असते. किंवा हे ब्राह्मणश्रेष्ठा, कर्णिकेची उंची तीन अंश असावी. पद्माची उंची पाच भाग व महापट्टी दोन भाग असते. ( अथवा ) उपानाची उंची एक अंश असून उरलेले विभाग वरीलप्रमाणेच असतात. किंवा पीठाची उंची अधिष्ठानाइतकी असावी. त्यावरील पद्माची उंची पीठाच्या उंचीच्या एकतृतीयांश असावी. अधिष्ठानात सांगितल्याप्रमाणे अंतर्प्रवेश व निर्गमन करावे. किंवा पद्माची उंची तीन अंश व कर्णिका पाच अंश असावी. पीठाचा आकार चौकोनी, गोल किंवा अष्टकोनी असावा. किंवा १६ कोनी करावे. त्याच्या दुप्पट गोलाकार कमळ करावे ( ? ). लोखंडाचे, दगडाचे किंवा विटांचे पीठ करावे. विटा आत असून वरून चुन्याची निरनिराळी सुंदर चित्रे असावीत. प्राणी, मगर, सर्प, बैल यांनी ते भूषवावे. किंवा निरनिराळ्या रंगांनी सोनेरी, चंदेरी ( इत्यादी ) भूषवावे. महापीठाची रुंदी ( उंची ? ) सहा, सात, आठ किंवा नऊ भागांत विभागून एक भाग उपपीठाची उंची समजून तो भाग उपपीठाप्रमाणे करावा. त्याच्यावरती वरील मापाचे महापीठ करावे किंवा हे द्विजोत्तमा, उपपीठाशिवाय महापीठ करावे. ]

( महापीठाच्या ) उत्तर दिशेकडील भागात दुर्मुख, वायू हे भूत असावेत. कर्णिकेच्या वर अविघ्नाची ( गणपतीची ) मूर्ती असावी. यांना व्योमात्मक म्हणतात. ( १६१ )

आग्नेय दिशेला पद्मावरती तामस ( व ) नैर्ऋत्य दिशेला पानावरती ( कमळ पत्रावरती ) राजस व वायव्य दिशेच्या भागात सात्त्विक ( क्षेत्रपाल ) असावेत. ईशान्य दिशेला विघ्नकर्ता असावा. ( १६२ )

विघ्नकर्ते असे सांगितले, ( आता ) आत्मनत्व सांगतो. पंचभूतात्मक भूमी, अंतरिक्ष व स्वर्ग या सर्वांना, हे ब्राह्मणा, महापीठाचे आत्म असे म्हणतात. ( १६३,१६३½ )

तामस वगैरेंच्या ( क्षेत्रपालांच्या ) शांतीसाठी पूजेच्या शेवटी बळी द्यावा. ( १६४ )

तामस आणि आत्मा यांच्या संतुष्टतेसाठी नित्योत्सवांच्या वेळेला प्रदक्षिणा घालाव्यात. पहिली प्रदक्षिणा भूमिप्रदक्षिणा असून, दुसरी अंतरिक्ष ( प्रदक्षिणा ) त्यानंतर ( तिसरी ) स्वर्गप्रद-

क्षिणा घालावी. त्या त्या लोकांत निवास करणाऱ्यांच्या हितासाठी (व) जगाच्या संकट निवारणार्थ, हे साधकोत्तमा, असे करावे. ( १६५, १६६ )

प्रासादाचे तोंड पश्चिमेकडे असेल तर लहानशी दुरुस्ती मी सांगतो. नंदीच्या ठिकाणी कुमार व कुमाराच्या ठिकाणी नंदी असावा. ( १६७ )

पश्चिमेकडे महापीठ असावे ( व ) इतर सर्व पूर्वीप्रमाणेच करावे. परिवारविधी सांगितला, नंतर लिंगाचे लक्षण सांगतो. ( १६८ )

**काश्यपशिल्पातील परिवारविधी हे अठ्ठेचाळिसावे पटल संपले.**

# एकोणपन्नासावे पटल

## [ लिंगाचे लक्षण ]

आता विशेषतः शिवलिंगाचे लक्षण सांगतो. संसार, विषय, प्राणी व सृष्टी संपूर्णपणे ज्यात लय पावतात व त्यातूनच (पुन्हा) सृष्टी निर्माण होते म्हणून त्यास लिंग म्हणतात. संसारात निष्कल, शान्त, वाचामनानेच दृष्टीस पडणारे, सर्व प्राणिमात्रांस मुक्तिदायक, स्वतःच्या आत्म्याहूनही जे श्रेष्ठ, सर्वांना ज्याने व्यापिले आहे, गूढ, असा सर्व लोकांचा एकच प्रमुख आहे. (१-३)

त्याच्यापासून सृष्टीजन्माच्यावेळी शान्ति तत्त्वाचा उद्भव झाला. त्या शांतीपासून शक्तीचा जन्म झाला ( व ) तिच्यापासून नाद जन्मास आला. ( ४ )

त्याच्यापासून बिंदू उत्पन्न झाला. नादाला सादाख्य म्हणतात व ते बिंदूच्या मापाचे ( असते हे ) प्रसिद्ध आहे. त्या ( बिन्दू ) पासून ईश्वराचा जन्म झाला. (५)

ईश्वरापासून महेश्वर, त्यापासून सृष्टी (व) त्यापासून विष्णू झाला. त्याच्यापासून सद्भाव हा प्रासाद ( प्रादेश ? ) व प्रादेशापासून विशेषाने तीन देवता, तीस ऋषी, तीनशे दानव व सहा ( प्रकारच्या ) तीन हजार योनी निर्माण झाल्या. ( ६, ७ )

हे ब्राह्मणा, सृष्टिजन्म सांगितला. त्याच्या ( सृष्टीच्या ) अगोदर तीन निष्कल (ईश्वर, महेश्वर व नाद ) आहेत. त्या सगळ्यांना व नाद आणि बिंदू यांच्या मिश्रणाला शिव म्हणतात. (८)

लिंगाची आकृती ( म्हणजे ) नाद असे जाणावे. बिंदू पीठाप्रमाणे सांगतात. लिंग शिवमय असून पीठ त्याच्या आत्म्याप्रमाणे आहे. ( ९ )

तेव्हा ( लिंग व पीठ ) शिव व आत्मा यांच्याप्रमाणे अभिन्न आहेत. जगाच्या संकटनिवारणार्थ तसेच सर्व प्राण्यांच्या हितासाठी- ( १० )

देवादींच्या हितासाठी, ध्यान, पूजा यांचे निमित्त ( कारण ) म्हणून लिंग व योनी यांनी सादाख्य या तत्त्वाचा उदय झाला. त्याचप्रमाणे सर्वांच्या उत्पत्तीस कारण झालेल्या लिंगाचे लक्षण सांगतो. ( ११, ११½ )

ते लिंग तीन प्रकारचे प्रसिद्ध आहे. चल आणि तसेच अचल आणि चलाचल म्हणून क्रमाने विशेषतः प्रसिद्ध आहे. ( १२ १२½ )

रत्नाचे किंवा धातूचे योनीसह लिंग करून ( किंवा ) लिंगाच्या द्रव्याहून निराळ्या द्रव्याने सुलक्षणी योनि करून, वर्तनासह शीर्ष करावे व ते लिंग लक्षणोद्धाराशिवाय असावे. ( १३, १४ )

[ शिरोवर्तन म्हणजे वर्तुळाकार, वृत्तायताकार वगैरे लिंगाच्या वरच्या भागाचा आकार. लक्षणोद्धार म्हणजे पाणी जाण्यासाठी जी नाली वगैरे करतात त्याला म्हणतात. ]

लिंगाच्या उंचीचा निम्मा भाग वर्तुळाकार असावा किंवा उंचीचा एकतृतीयांश अथवा एक-चतुर्थांश भाग ( वर्तुळाकार असावा. ) ( १५ )

उरलेला भाग ( निम्मा, ⅔ किंवा ¾ भाग ) पीठात शिरलेला असावा. इष्ट ठिकाणी जे नेणे, आणणे शक्य नाही ( ते अचललिंग ), उचलून नेता येणारे असे जे लिंग ते चल ( व ) लिंगाचा भाग ( पिंडी ) हलविता येण्यासारखी व पीठ न हलविता येण्यासारखे त्याला चलाचल लिंग म्हणतात. दगडाचे, सूत्रासह बाणलिंग ही त्याची उदाहरणे आहेत. ( १६, १७ )

त्यांच्यामध्ये प्रथम अचललिंगाचे लक्षण आता सांगतो. चांगला महिना, तिथी, नक्षत्र, लग्न व वार ( पाहून ) शिला घ्यावी. ( १८ )

आचार्याने शिल्पीसह शिलाग्रहण करावे. स्वर्ग, अंतरिक्ष व पृथ्वीवरील निमित्तांकडे ( शकुनांकडे ) लक्ष द्यावे. ( १९ )

डावीकडून उजवीकडे चाललेला कावळा, त्याचप्रमाणे ससाणा आणि डावीकडे, दक्षिणेकडे मांसासह गिधाड असले, ( २० )

कुमारी ( मुलगी ), गाय यांचे दर्शन, त्याचप्रमाणे गाईला मारलेली हाक (ऐकणे), दह्याने पूर्ण भरलेला कुंभ आणि त्याचप्रमाणे दुधाचा कुंभ, ( २१ )

फुले ( नेणाऱ्या ) किंवा पुत्रासह फुले माळलेल्या तरुण स्त्रिया, अन्न आणि मांस ( नेणारे ), शिवभक्त परायण ( माणूस ), ( २२ )

मशाल आणि दिवा आणि पाण्याने भरलेला माठ, डुक्कर, हत्ती त्याचप्रमाणे वेणी घातलेली व अत्यंत सुंदर स्त्री ( दिसणे ) हे पृथ्वीवरील शुभशकुन आहेत व यांहून उलटे असल्यास अशुभ समजावे. ( २३, २३½ )

उल्कापात, दिशादाह, सोसाटयाचा वारा सुटणे हे अंतरिक्षातील अशुभ शकुन होत. (आता) पृथ्वीवरील अशुभ ( शकुन ) सांगतो. ( २४, २४½ )

केस मोकळे सोडलेला त्याचप्रमाणे विखुरलेला ( अस्ताव्यस्त ) केस असलेला मनुष्य, तेल माखलेला, नंगा आणि भगवे वस्त्र धारण केलेला यांचे दर्शन तसेच मातीचे ( रिकामे ) भांडे, तेलाचे भांडे, ( २५, २६ )

नकटया नाकाची कुमारी, कमी-अधिक अवयव असलेली वंध्या ( स्त्री ) त्याचप्रमाणे विधवा स्त्री, ( २७ )

खूप खाणारी स्त्री ( यांचे दर्शन ) हे पृथ्वीवरील अशुभ ( शकुन आहेत. ) शुभ कृत्यास ते वर्ज्य आहेत. शकुन शुभ असल्यास ( शिलासंग्रहणाकरिता ) जावे व अशुभ ( असल्यास ) जाणे रहित करावे. ( २८ )

अशुभ ( शकुन ) झाल्यास अग्नी पसरून शंकरालाच १०० आहुती द्याव्यात. समिधा, तूप व भात यांनी नाग व नागभूषणे करावीत. शंकराला नमस्कार करून आचार्य व शिल्पी यांनी पर्वत, सागर, तीर्थ, शेत आणि वनात जावे. ( २९, ३० )

क्षीरवृक्षाच्या जवळील, देवप्रासादाच्या जवळ किंवा नदीच्या काठावरील शिला शिल्पीने घ्यावी. दुसऱ्या ठिकाणची ( शिला ) घेऊ नये; घेतल्यास नाश होतो. ( ३१, ३१½ )

पांढरी, तांबडी, पिवळी आणि काळी अशी चार प्रकारची शिला असते. ( ३२ )

गाईचे दूध, शंख, कुंदाचे फूल, चंद्र, मोती ( व ) स्फटिकाप्रमाणे, मल्लिकेच्या फुलाप्रमाणे असे पांढऱ्या रंगाचे सात प्रकार माहिती आहेत. ( ३३ )

जपा, किंशुक यांच्या फुलांच्या रंगाप्रमाणे, इन्द्रगोपाप्रमाणे, जातिलिंगाच्या रंगाप्रमाणे, सशाच्या रक्ताप्रमाणे, डाळिंबाच्या फुलाच्या रंगाप्रमाणे, बन्धूकाच्या फुलाप्रमाणे, कोरण्डीच्या फुलासारखा असे पिवळ्या रंगाच्या दगडाचे सात प्रकार होतात. (३४, ३५)

[ कोरण्डीचे फूल पिवळ्या रंगाचे असते. तेव्हा श्लोक ३४½ नंतर एक संपूर्ण श्लोक पिवळ्या रंगाचे निरनिराळे प्रकार सांगणारा यात आलेला नाही.]

रेडा, डोळा, काजळाप्रमाणे, निळ्या कमळाच्या रंगासारखा, भुंगा, मोराची मान यांच्याप्रमाणे, मषीपत्राप्रमाणे, राजावर्ताच्या रंगाप्रमाणे, काळ्या मुगाच्या रंगासारखा, लहान मुगासारखा असे काळ्या दगडाचे (रंगाचे) दहा प्रकार आहेत. ( ३६, ३७ )

पांढरी, तांबडी, पिवळी ( व काळी शिला ) क्रमाने ब्राह्मणादींना धर्म, अर्थ, काम व मोक्ष नेहमीच देणारी असते. ( ३८ )

श्रेष्ठ वर्णाकरिता श्रेष्ठ रंग योग्य, त्याहून वेगळे करू नये. प्रतिलोम व अनुलोम यांना निरनिराळी शिला असू नये. ( ३९ )

[ ब्राह्मणांनी पांढऱ्या ते काळ्या शिलेचे लिंग वापरावे; क्षत्रियांनी तांबड्या ते काळ्या, वैश्यांनी पिवळ्या व काळ्या व शूद्रांनी फक्त काळ्या दगडाचे लिंग वापरावे. शूद्रांनी पांढऱ्या ते पिवळ्या, वैश्यांनी पांढऱ्या व तांबड्या तसेच क्षत्रियांनी पांढऱ्या शिलेचे लिंग करून वापरू नये.]

पांढरे वस्त्र धारण केलेले, पांढरी उटणी वगैरे ल्यालेले, पाच अंगभूषणे घातलेले अशा आचार्य व शिल्पी या दोघांनी कुऱ्हाड वगैरे ( हत्यारे ) घेऊन शिलासंग्रहणासाठी जावे. (४०, ४०½)

( दगडाचा ) विशेषतः तुकडा तोडून ती ( सर्व ) दोषविरहीत आहे असे पाहून ज्या ठिकाणी शिला पडलेली असेल ( तेथे ) तिला प्रदक्षिणा घालावी. ( ४१, ४१½ )

पाऊस, सूर्याचे ऊन, अग्नी ( इत्यादींनी ) भग्न झालेली, खारट पाण्याने विशीर्ण झालेली, वाईट ठिकाणी व ( अगदी नदी अथवा सागर ) काठाशी असलेली शिला दुसऱ्या कामासाठी वापरावी. ( लिंग करण्याकरिता वापरू नये. ) ( ४२, ४२½ )

[ 'वम्रातपाग्निगन्धां' या ऐवजी 'वर्षातपाग्निभग्नां' असे शब्द घेऊन अर्थ केला आहे.]

खूप वाळू किंवा माती असलेली, जीर्णशीर्ण झालेली, खडबडीत, रेघा, ठिपके, कलंक यांच्यासह असलेली शिला वर्ज्य समजावी. ( ४३, ४३½ )

दोरीप्रमाणे व दोरीच्या आकाराची, सूर्याच्या किरणांप्रमाणे, पावसाच्या धारेप्रमाणे असे ( दगडांवरील ) रेघेचे तीन प्रकार माहिती आहेत. ( ४४, ४४½ )

[ दोरीप्रमाणे पीळ असलेली व निरुंद आणि लांबचलांब, सूर्याच्या किरणांप्रमाणे सरळ व मध्ये बारीक कण असलेली व पावसाच्या धारेप्रमाणे ( सरळ व एकरंगी ) असे दगडांवर ज्या रेषा (Veins) असतात त्यांचे तीन प्रकार दिले आहेत. ]

जांभळाच्या आकाराइतके किंवा द्राक्षाच्या आकाराइतके किंवा इतर ( त्यांच्याहून लहान किंवा मोठ्या आकाराइतके ) वर्तुळाकार असे ठिपक्यांचे तीन प्रकार आहेत. ( ४५, ४५½ )

[ ज्यांना Porphyry म्हणतात त्यांचे हे आकाराप्रमाणे प्रकार केले आहेत. ]

काळ्या लोखंडाप्रमाणे आकार असलेला, काळ्या भुंग्यासारखा, मोराच्या पिसाऱ्यासारखा आकार असे कलंकाचे चार ( तीन ?) प्रकार आहेत. ( ४६, ४६½ )

[ हे Amygdule चे प्रकार असावेत का ? ]

खजुरीच्या पानांप्रमाणे, दुर्वांच्या काड्यांप्रमाणे, बांबूच्या अंकुरांप्रमाणे, कोळ्याच्या पायां-प्रमाणे किंवा इतर प्रकारच्या पांढऱ्या रेषा ( शिलेवर ) असतील तर ती सर्व प्रकारची संपत्ती व समृद्धी देणारी असते. ( ४७, ४८ )

काळ्या दगडात काळी ( किंवा ) पांढऱ्या शिलेत काळी रेघ असल्यास ती विनाशकारक असते म्हणून सर्व प्रयत्नांनी दुसऱ्या शिला घ्याव्यात. ( अशा शिला घेऊ नयेत. )

[ दगडात काळी रेघ असेल तर त्या रेघेत असलेले धातू ठिसूळ असतात व दगड त्या रेघेवर भंगण्याची शक्यता असते म्हणून वरील सूचना. ]

हिरव्या, काळ्या रंगाच्या शिला व विशेषतः पांढऱ्या रंगाच्या शिला ग्राह्य असतात. खजुरीच्या पानांप्रमाणे, दुर्वांच्या काड्यांप्रमाणे आकाराच्या ( रेघा ) असलेली ( काळी ) शिला शुभ असते. इतर प्रकारच्या काळ्या शिला अशुभ सांगितल्या आहेत. त्या ( शिला लिंगाकरिता वापरल्यास) गाई, धान्य व धन यांचा नाश करतात. ( त्या ) सगळे रोग देणाऱ्या आणि राजा व राष्ट्र यांना विनाशकारक अशा जाणाव्यात. ( ५०, ५१ )

( शिलेवर ) ठिपके असतील तर मुलांचा नाश होतो, संपत्तीचा पूर्णतः नाश होऊन दारिद्र्य येते. अशा निरनिराळ्या रीतींनी परीक्षा घेऊन सुलक्षणी ( शिला ) निवडावी. ( ५२ )

बाला, युवती व वृद्धा तसेच पुल्लिंगी, स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी असे स्वर, आकृती वगैरेंनी ( शिलेचे ) प्रकार होतात. ते ओळखण्याचा विधी ऐक. ( ५३ )

लहानशी, बारीक आवाज असलेली शिला 'बाला' असते. लांबट व घंटेप्रमाणे ( खण-खणीत ) आवाज असलेली शिला 'युवति' म्हणून सांगतात. ( ५४ )

बद्द आवाज असलेली जी ( शिला ) ती वृद्धा म्हणून सांगतात. घंटेप्रमाणे ( खणखणीत ) आवाज असलेली ( व ) लांब ती 'पुं' शिला. ( ५५ )

तालवाद्याप्रमाणे ( मंजूळ ) आवाजाची, आकाराने लांब ती 'स्त्री' लिंगी (शिला). (स्पर्शाला) खरखरीत, झर्झरी ( वाद्य )प्रमाणे रुक्ष, हीन ( टिचका ) स्वर असलेली नपुंसक ( शिला ) असते. ( ५६ )

[ झर्झरी हे चामड्याचे चौघड्यासारखे वाद्य असते. ]

असे आवाजाप्रमाणे ( शिलेचे ) प्रकार सांगितले. आता आकाराप्रमाणे त्यांचे प्रकार सांगतो. स्त्रीशिला चौकोनी आणि अष्टकोनी सांगतात. ( ५७ )

आयताकृती, वर्तुळाकार आणि दहा, बारा कोन असलेली ती पुल्लिंगी शिला सांगतात. संपूर्ण वर्तुळाकार ती नपुंसक ( शिला. ) (५८)

दहा, बारा कोपरे असलेली आणि बाला व वृद्धा (या शिला लिंगाकरिता ) वर्ज्य समजाव्या. पुं शिलांनी लिंग करावे व स्त्री शिलांनी पिण्डिका करावी. ( ५९ )

नपुंसक शिला पायाच्या आधारासाठी ( पायाच्या सर्वांत खालच्या थरासाठी ) वापराव्यात. याहून निराळे केल्यास ते नेहमीच कर्त्याचा नाश करते. ( ६० )

पूर्वेकडे व उत्तरेकडे अग्र असलेली ( म्हणजे ) पूर्वेकडे अग्र व पश्चिमेकडे मूळ तसेच उत्तरेकडे अग्र व पश्चिमेकडे ( ? ) मूळ असलेली शिला आचार्याने ग्रहण करावी. ( ६१ )

पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे जो ( शिलेचा अग्रभाग असतो ) तोच लिंगाचाही अग्रभाग असावा असे सांगतात. खालचा भाग मुख सांगतात व बाजूचा भाग वर गेलेला ( ? ) असावा. ( ६२ )

[ 'शङ्क सौम्यगतं' या ऐवजी 'पूर्वसौम्यगतं' असे शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

अशा रीतीने ( शिलेची ) परीक्षा करून ( पंच ) गव्याने धुवून, शहाण्या माणसाने मनात सत्यमन्त्र म्हणत, गन्ध, फुले वगैरे वाहून ( त्या शिलेची ) स्थापना करावी. ( ६३ )

तिच्या (शिलेच्या ) ईशान्य दिशेला शान्तिहोम करावा. अग्निकार्यात सांगितल्याप्रमाणे अग्न्याधानादी सर्व आचरावे ( ६४ )

हृदयमन्त्राने समिधांचा, मूलमन्त्राने तुपाचा, अघोरमन्त्राने चरुचा व पुरुषमन्त्राने तांदुळाचा हवी द्यावा. ( ६५)

ईशान मन्त्राने तीळ व कवचाने मोहरी हवन करावी. वरील (हविद्रव्ये) अनुक्रमाने प्रत्येकी शंभर, पन्नास किंवा त्याच्या निम्मे ( इतक्या ) वेळा हवन करावे. ( ६६ )

'स्विष्टकृतिमग्ने...' या मन्त्रांनी पूर्णाहुती द्यावी. त्यानंतर अग्नि गोळा करून पूजेचे उरलेले द्रव्य टाकून द्यावे. ( ६७ )

शिला तोडण्याच्या शस्त्राची अस्त्रमंत्राने पूजा करावी. अपसर्पणाचा उच्चार करून शिला फोडण्यास लागावे. ( ६८ )

गर्भागाराच्या पाच भागांपैकी तीन भागांचे ( लिंग ) श्रेष्ठ सांगतात. गर्भागाराच्या मापाने, स्तंभाच्या, तालाच्या, हाताच्या आणि अंगुलाच्या मापाने लिंगाचे माप सात प्रकारांनी सांगतात व त्यांचे पुन्हा ( श्रेष्ठ, मध्यम, अधम असे ) प्रकार होतात. ( ६९, ७० )

गर्भागाराचे पाच भाग केले असता तीन अंशांचे लिंग श्रेष्ठ सांगतात, व गर्भाच्या निम्मे मध्यम ( अधम ? ) लिंग सांगतात. यांच्या मधल्या अंतराचे आठ भाग केले असता श्रेष्ठ, मध्यम व अधम लिंगांचे प्रत्येकी तीन प्रकार (एकूण नऊ प्रकार ) होतात. ( ७१, ७१$\frac{१}{२}$ )

[ गर्भागाराच्या $\frac{१}{२}$, $\frac{४१}{८०}$, $\frac{२१}{४०}$ अधम लिंगाचे माप, $\frac{४३}{८०}$, $\frac{११}{२०}$ व $\frac{९}{१६}$ मध्यम लिंगाचे माप व $\frac{२३}{४०}$, $\frac{४७}{८०}$ व $\frac{३}{५}$ श्रेष्ठ लिंगाचे माप.]

( ४९. ७२–८६ )

किंवा गर्भागाराचे नऊ भागांत विभाजन करून, गर्भागाराच्या निम्मे ( लिंग ) श्रेष्ठ व गर्भागाराच्या $\frac{१}{२}$ कनिष्ठ असे उत्तमादी तीन तीन प्रकार होतात. ( ७२, ७२$\frac{१}{२}$ )

शुद्धद्वाराइतके श्रेष्ठ ( व ) त्याच्या $\frac{१}{३}$ कनिष्ठ लिंग असते. त्यांच्यामध्ये आठ भाग पाडले असता, हे ब्राह्मणश्रेष्ठा, नऊ प्रकार होतात. ( ७३, ७३$\frac{१}{२}$ )

खांबाची लांबी नऊ भागांत विभागली असता श्रेष्ठ ते अधम असे हे द्विजसत्तमा, (लिंगाचे ) नऊ प्रकार सांगतात. ( ७४ ७४$\frac{१}{२}$ )

प्रासादाच्या तळमजल्यावरील स्तंभाच्या उंचीइतके असते ते मध्यम ( श्रेष्ठ ? ) लिंग म्हणून प्रसिद्ध आहे. त्याच्या निम्मे ( उंचीचे लिंग ) अधम असते. त्यांच्यामध्ये आठ विभाग केले असता हे ब्राह्मणश्रेष्ठा, नऊ प्रकार होतात. ( ७५, ७६ )

तेथीलच ( तळमजल्यावरील ) खांबाची लांबी नऊ भागांत विभागली असता खांबाच्या मापाने लिंगाचे नऊ प्रकारचे माप येते. ( ७७ )

हे ब्राह्मणा, अधिष्ठानाची उंची खांबाच्या मापाप्रमाणे असावी. ( ७७$\frac{१}{२}$ )

[ हा संदर्भरहित श्लोकार्ध दिसतो. ]

एक हाताने सुरुवात करून स्वतःच्या एकअष्टमांश अंशाने वाढवीत नऊ हातांपर्यंत ६५ संख्यांचे ( लिंगाचे प्रकार होतात. ) दहा हात ( रुंदीच्या ) प्रासादात लिंग हाताच्या मापाने करावे. ( ७८, ७९ )

[ स्वतःचा एकअष्टमांश म्हणजे $\frac{१}{८} \times \frac{१}{८} = \frac{१}{६४}$ तेव्हा एकंदर ६५ प्रकार होतात. ]

पाच हातांपर्यंतच्या प्रासादात लिंग खांबाच्या मापाने करावे. विकल्प व आभास प्रकारच्या ( प्रासादातील ) लिंगाचे माप एक हातापासून तीन हातांपर्यंत असावे. ( ८० )

तीन हातांपासून सहा हातांपर्यंतचे लिंग छंद विमानात असते. सहा हातांपासून नऊ हातांपर्यंतचे ( लिंग ) जाति ( प्रकारच्या ) घरास योग्य असते. ( ८१ )

असे हाताच्या मापाने ( लिंगाचे माप ) सांगितले. आता तालाच्या मानाने ( लिंगाचे माप ) सांगतो. एका तालापासून नऊ तालांपर्यंत, एक एक तालाने वाढवीत, लिंगाचे नऊ प्रकार होतात. जाति ( प्रकारच्या ) घराशिवाय इतर प्रकारच्या घरांत ( तालाच्या मापाचे लिंग ) योग्य असते. ( ८२, ८२$\frac{१}{२}$ )

तेरा अंगुलांनी सुरुवात करून, ( दोन अंगुलांनी वाढ करीत ) १०९ अंगुलांपर्यंत असे लिंगाचे ४९ प्रकार अंगुलांच्या मापाने होतात. ( ८३,८३$\frac{१}{२}$ )

तीन भागांसह असलेले लिंग एक हातापेक्षा लहान करू नये. एक हातापेक्षा लहान असलेले लिंग संपूर्ण वर्तुळाकृती असते. ( तीन भागांसह असलेले लिंग सगळ्यांत खालच्या भागी ) चौरस ( मधल्या भागी ) अष्टकोनी व उरलेले ( वरचा तिसरा भाग ) वर्तुळाकृती शहाण्या माणसाने करावे. ( ८४,८५ )

विकल्प ते आभास प्रासादांच्या बाबतीत वरील तीन भागांचे लिंग असावे व त्यांतील वर्तुळाकार भाग दिसणारा ( योनीच्या वर ) असावा. ( खालचे अष्टकोनी व चौकोनी भाग योनीत व जमिनीत गेलेले असल्यामुळे दिसत नाहीत. ) विकल्पादी लहान घरांत असे शिवलिंग असू नये. ( ८६ )

[ श्लोकार्ध ८४ ते ८६ अत्यंत अशुद्ध असल्याने अंदाजाने अर्थ केला आहे. ]

एक अंगुलापासून सुरुवात करून सात अंगुलांपर्यंत धातूचे किंवा रत्नाचे लिंग असावे, व त्याहून मोठे लिंग दगडाचे असावे असे सांगतात. ( ८७ )

१३ अंगुलांचे लिंग दगडाचे करू नये. अशा रीतीने अनेक प्रकारांनी लिंगाचे माप सांगतात. ( ८८ )

नागर, द्राविड आणि वेसर (प्रकारच्या) लिंगाची माहिती मी सांगतो. लिंगाच्या उंचीचे चार अंश करून एक अंश रुंदीचे लिंग कनिष्ठ असते. ( ८९ )

[ यावरून ८८ श्लोकांपर्यंत दिलेले लिंगाचे माप त्याच्या उंचीचे होते व आता यानंतर लिंगाच्या रुंदीची निरनिराळी मापे देत आहेत. ]

( लिंगाच्या ) उंचीचे तीन अंश करून एक अंश रुंदीचे लिंग श्रेष्ठ समजतात. या दोन मापांच्यामध्ये आठ भाग करून त्यांची रुंदी नऊ प्रकारची सांगतात. ( ९० )

उंचीचे १६ अंश करून पाच अंश ( रुंदीचे लिंग ) शांतिक (प्रकारचे) असते. चार अंश ( रुंदीचे लिंग ) पौष्टिक म्हणून सांगतात. तीन अंश (रुंदीचे लिंग ) जयद असते. ( ९१ )

किंवा लांबीच्या निम्मे ( रुंदी ) असे ( लिंगाचे ) रुंदीने चार प्रकार होतात. अशा रीतीने नागर पद्धतीच्या लिंगाचे रुंदीने १३ प्रकार होतात. (९२)

लिंगाच्या उंचीचे १८ भाग करून सहा, पाच, चार व तीन अंश रुंदीचे ( अनुक्रमे ) शांतिकादी द्राविड लिंगाचे चार प्रकार होतात. ( ९३ )

वेसर लिंगाची उंची २० भागांत विभागून आठ, सात, सहा आणि पाच भाग रुंदी कल्पिली असता अनुक्रमाने शान्तिक, पौष्टिक आणि तसेच जयद ( व अद्‌भुत ) असे वेसर हर्म्याच्या लिंगाचे आणि पिण्डिकेचे चार प्रकार होतात. (९४, ९५)

पायातील आधारशिला एकाच जातीची असावी. त्यात भेसळ (संकर) असू नये. (९६)

येथे जे लिंगाचे माप दिले आहे ते ( सुखसंपत्तीच्या ) वाढीसाठी दिले आहे. परस्परभेसळ केली असता ते राजास दुःख देणारे व भयकारक असते. (९७)

[ वेसर पद्धतीच्या देवळात वेसर पद्धतीच्या मापाचे लिंग असावे. द्राविड किंवा नागर पद्धतीच्या मापाचे लिंग असू नये. तसेच द्राविड व नागर पद्धतींसाठी, या अर्थी भेसळ असू नये असे वर म्हटले आहे. ]

तेव्हा, सर्व प्रयत्नांनी संकर होऊ देऊ नये. लिंगाचे नागर वगैरे प्रकार सांगितले. (आता लिंगाची) आय वगैरेंची (माहिती) ऐक. (९८)

लिंगाच्या उंचीला मानांगुलाने भागावे. अंगुलाचा जो भाग उरेल तो पुरा करावा किंवा काढून टाकावा. (९९)

श्रेष्ठ (ते अधम) यांतील अंतर पूर्ण अंगुलांनी घ्यावे. ( आलेल्या अंगुलांच्या ) उंचीच्या (संख्येला) आठाने गुणून २७ ने भागावे म्हणजे (जो शेष येईल त्याने) हे श्रेष्ठ ब्राह्मणा, अश्विनी इत्यादी नक्षत्रे मिळतात. (१००)

उंचीला नवाने गुणून साताने भागितले असता (जो) एक वगैरे (शेष येईल त्याने) वार मिळतात. (१०१)

(उंचीला) तिनाने गुणून आठाने भागले असता (जो शेष उरतो) त्याला योनी म्हणतात. उंचीत आठ मिळवून ( गुणून ? ) १२ ने भागले असता ( जो शेष उरतो ) त्याला आय म्हणतात. ( १०२ )

(उंचीला) नवाने गुणून २४ ने भागले असता जो शेष येईल तो ऋण असतो. (उंचीला) चाराने गुणून नवाने भागले असता ( जो शेष येईल त्याने ) तस्कर वगैरे अंश मिळतात. ( १०३ )

आय जास्त असून व्यय कमी असेल तर ते नेहमीच संपत्तिकारक असते. ध्वज, सिंह, बैल, हत्ती या शुभ योनी सांगितल्या आहेत. ( १०४ )

राजा व कर्ता ( मंदिर बांधणारा ) यांच्या जन्माचे नक्षत्र, लिंगाच्या जन्माचे नक्षत्र व त्याचप्रमाणे वास्तूच्या जन्माचे नक्षत्र ही मोजून शुभ करावीत. ( शुभ आहेत असे पहावे. ) (१०५)

तीन्ही जन्म ( नक्षत्रे ) आणि ४, ६, ८ व ९ हे शुभ असतात, उरलेले अशुभकारक असतात. ( १०६ )

... ... ... ... .... ... यातील अशुभ ( दर्शक ) गोष्टी प्रयत्नपूर्वक टाळाव्यात. ( १०७ )

रविवार आदी चार (क्रूर) वार, सूर्य ( ? ) इत्यादी चार नक्षत्रे असताना अनुक्रमे शत्रुत्व, मृत्यु, नाश व अमृत यांची प्राप्ती होते. ( १०८ )

तस्कर, चर्मिण, षण्ढ मशक हे ( अंश ) वर्जावेत. उरलेले अंक (अंश ? ) ग्राह्य असतात; शुभमानांचा संग्रह करावा. ( १०९ )

समलिंग, वर्धमान, शैवाधिक व स्वस्तिक, सर्वतोभद्रलिंग आणि सार्वदेशिक, धारालिंग व मुखलिंग असे आठ प्रकारचे लिंग असतात. ( ११०, ११०½ )

समलिंग ब्राह्मणांसाठी, वर्धमानक राजांसाठी, शैवाधिक वैश्यांसाठी ( व ) शूद्रांसाठी स्वस्तिक ( लिंग ) असावे. सर्वांकरिता इतर प्रकारचे लिंग सर्व इच्छांचे फल देणारे असतात. ( १११, ११२ )

महादेव एकच आहे पण मानवाच्या हिताकरिता लिंगाचे प्रकार झालेत. प्रथम योग्य त्या लांबी-रुंदीचा चौरस करून नंतर या ( खाली दिलेल्या ) विधीने त्याचे तीन भाग करावेत. ( सर्वांत ) खालचा भाग चौरस असून त्याला ब्रह्मभाग म्हणतात. ( ११३, ११४ )

मधला भाग अष्टकोनी असावा. त्याला विष्णूचा अंश म्हणतात. (सर्वांत) वरचा भाग वर्तुळाकार असून तो शंकराचा अंश असतो. ( ११५ )

प्रत्येक अंशाला नाव दिले असले तरी सर्व शिवात्मकच असते. ... .... ... ... ( ११६ )

पूजाभागाचे तीन भाग करून वरचा भाग मुख होतो ... ... ... ... ( ११७ )

[ शिवाचा म्हणून सांगितलेला जो वर्तुळाकार भाग तो पूजाभाग. त्यातील वरच्या ⅓ भागास मुख म्हणतात. ]

आठ कान, १२ डोळे व सर्व लक्षणांनी युक्त व आयताकार लिंगाची लांबी पिण्डिकेने वेष्टिलेली असते. ( ११८ )

... ... ... किंवा जास्त, नेत्रसूत्रापासून नाकपुडीपर्यंत व नाकपुडीच्या निम्मे वर्धमानक लिंग असते. ( ११९ )

चार भाग केले असता प्रत्येक भाग एक भागाने जास्त असतो व त्यांनी गुणून चार प्रकारचे गलमान सांगतात. ( १२० )

१९ यव कण्ठाची उंची असावी. उरलेला भाग सुलक्षणी लिंगाकृती असावा. ( १२१ )

[ येथे वर्धमान ते मुखलिंग यांचे प्रकार दिले आहेत. पण हस्तलिखितांतील त्रुटींमुळे समजत नाहीत. मयमताप्रमाणे ( ३३.७२–७९ ) वर्धमान ते स्वस्तिक लिंगांचे माप खाली दिल्याप्रमाणे असते.

वर्धमान लिंगात ब्रह्मा, विष्णू व शिवभाग अनुक्रमे ४, ५, ६; ५, ६, ७; ६, ७, ८ व ७, ८, ९ भाग असतात. हे वर्धमान लिंगाचे चार प्रकार. शिवाधिक लिंगाचे चार प्रकार याच क्रमाने ( ब्रह्मा, विष्णू व शिवभाग ) ७, ७, ८; ५, ५, ६; ४, ४, ५ व ३, ३, ४ भाग असतात. स्वस्तिक लिंगात विष्णुभाग दोन अंश, ब्रह्मा तीन अंश व शिवभाग चार अंश असतो. ]

चारमुखी किंवा एकमुखी, चार हातांचे किंवा दोन हातांचे स्तनसूत्राच्या वरील भाग असलेले सुलक्षणी बिंब असते. ( १२२ )

( स्तन ) सूत्राच्या वरील भाग सोडून उरलेला भाग (खालचा भाग) लिंगाच्या आकाराचा असावा. राजाचीदेखील भरभराट करणारे असे हे मुखलिंग सांगतात. ( १२३ )

रुंदीचे आठ भाग करून मुळापाशी, मध्यभागी व अग्रापाशी एक भागाने कमी केलेले असेल तर त्या (लिंगास) स्थूलमूल म्हणतात. ( १२४ )

( याउलट ) शिवभागापासून (ब्रह्मभागापर्यंत एक एक भाग )कमी केल्यास त्यास शिरःस्थूल ( लिंग ) म्हणतात. या ( लिंगांना ) आर्ष म्हणतात. ते श्रेष्ठ लिंग ऋषींनादेखील पूज्य असते. ( १२५ )

तीन अग्र असलेले, पंचकोनी, सहा, सात, दहा (किंवा) १२ कोनी किंवा कोपरे नसलेले किंवा इतर संख्यांचे कोपरे असलेले, मनोहर, फळी, आरसा यांच्या आकाराप्रमाणे, एक रेघ किंवा रेघ नसलेले, शिरोवर्तनाशिवाय (आकारविहीन शीर्ष असलेले ), कोणत्याही मापाशिवाय असलेले ( असे ) स्वयंभू लिंग सेवा करण्यास योग्य असून देवांनादेखील पूज्य असते. ( १२६–१२७½ )

पूजाभागापाशी बाण असतो त्याला बाणलिंग म्हणतात. ( १२८ )

स्थूल व सूक्ष्म अनुक्रमे शीर्ष व मूळ असते, मधासारखा रंग असून आनन्ददायी असे (लिंग) उत्तममुख म्हणून प्रसिद्ध आहे. (१२९)

पीठातील प्रवेशाचा भाग सर्वदेशिक लिंगाप्रमाणे असतो. धातूंचे तसेच रत्नाचे (लिंग) सार्वदेशिक लिंगाप्रमाणे असावे. ( १३० )

लिंगाचे प्रकार सांगितलेत, त्यांच्या शीर्षांचे आकार ऐक. लिंगाच्या कपाळापासून केसांच्या कडेपर्यंत शिरोवर्तन असावे. ( १३१ )

लिंगाच्या उदयापासून हे ब्राह्मणा, शिरोवर्तन करावे. पहिल्या प्रकारचे शीर्ष छत्राकार असते, दुसरे कोंबडीच्या अंड्याप्रमाणे व तिसऱ्या ( प्रकारचे शिरोवर्तन ) त्रिपुराकार असून डोक्यावर अर्धचंद्र असतो. ( १३२, १३२½ )

शहाण्या माणसाने लिंगाची रुंदी आठ भागांत विभागली असता वरील (गोल भागाची उंची ) २½ अंश असते असा ( छत्राकाराचा ) पहिला प्रकार, रुंदीचे ३२ भाग करून ५½ अंश उंचीचे शीर्ष असा छत्राकाराचा दुसरा प्रकार व सात अंश उंच हा तिसरा प्रकार व नऊ अंश ( उंच ) छत्राकार हा चवथा प्रकार असतो. ( १३३–१३५ )

ब्राह्मण व राजे यांना छत्राकार लिंग सर्व इच्छा पुरविणारे असते. सर्व लिंगांमध्ये छत्रासारखे लिंग प्रशस्त होय. ( १३६ )

रुंदीच्या ३२ भागांपैकी अनुक्रमे १४, १५, १६ व १७ अंश ( रुंदी ) कमी करून ( ती उंची घेतली ) तर कोंबडीच्या अंड्याप्रमाणे आकार असलेल्या लिंगाचे चार प्रकार होतात. ( १३७ )

वर्धमान (प्रकारचे) लिंग क्षत्रियांकरिता प्रशस्त व योग्य असते. शीर्षाच्या रुंदीचे ३२ भाग केले असता १०, ११, १२ व १३ अंश (उंची) असे त्रिपुराकार लिंगाचे चार प्रकार होतात. (१३८, १३८½)

शिवाधिक हे लिंग वैश्यांकरिता योग्य व कल्याणकारक मानले आहे. शीर्षाच्या उंचीचे ३३ भाग केले असता २२, २१, २० व १९ अंशांनी अर्धचंद्राकार केले असता चार प्रकारचे लिंग होते. ( १३९, १४० )

स्वस्तिक नावाचे लिंग शूद्रांना प्रशस्त व ( त्यांची ) भरभराट करणारे आहे. सार्वदेशिक लिंग इतरांना विशेषतः ( प्रशस्त ) असतात. ( १४१ )

छत्रादी शीर्षाशिवाय असलेले लिंग कर्त्याच्या विनाशास कारण होते. दैविक, आर्षज लिंगांना त्यांचे असेल तसे शीर्ष असू द्यावे. ( १४२ )

शिरोवर्तनाच्या उंचीचे तीन भागांत विभाग केले असता ( १४२½ )

[ संदर्भरहित श्लोकार्ध. ]

शुद्ध होऊन व यज्ञोपवीत घालून स्थपतीने पूर्वी सांगितल्याप्रमाणे अग्नीची पूजा करून स्विष्ट पूर्णाहुती द्यावी. हे ब्राह्मणश्रेष्ठा, लिंगपीठाला तेव्हा दोरा बांधावा. ( १४३, १४४ )

[ श्लोक ६३ ते ६७ त पूर्णाहुतीचे वर्णन आहे. ]

सोने, चांदी किंवा कापसाचा दोरा गुंडाळून, सकाळी चांगल्या मुहूर्तावर लक्षणोद्धार करावा. ( १४५ )

( लिंगाच्या ) शीर्षस्थानी तुपासह पायसाचा बळी द्यावा. रक्तशिंगी सोडून इतर गन्ध इत्यादींनी पूजा करावी ( १४६ )

रक्तशिंगीने ( तिच्या गन्धाने ) लिंगाच्या मध्यभागी सूत्र टाकावे. मुखभागाच्या मध्यभागी सुलक्षणी नाली करावी. ( १४७ )

हे बुद्धिमंता, लिंगाच्या मापाने ( नाली ) सूत्राची रुंदी सांगतात. शिरोवर्तनासह लिंगाची उंची ११ भाग समजून त्याचे चार भाग ( नालीची ) रुंदी असते, व एक भाग म्हणजे अंगुलाचे माप असते. अंगुलाचे आठ भाग करून एका अंशाला यव म्हणतात. (१४८, १४९)

उत्तमोत्तम लिंगाचे (नाली) सूत्र पाच अंगुले लांब असते. सर्व प्रकारच्या लिंगांच्या (नालीसूत्राची लांबी ) ½ यवाने कमी करावी. ( १५० )

अधमाधम लिंगाच्या सूत्राची रुंदी एक यव असावी (एक यवाने कमी असावी ?) सूत्राची रुंदी अशा रीतीने घ्यावी; ती त्याचप्रमाणे सांगितली आहे. ( १५१ )

वरील एक अंश व स्तनाच्या वरील एक अंश ( हे ) वर्ज्य करून उरलेल्या भागांत हे ब्राह्मणा, लक्षणोद्धार करावा. (१५२)

शीर्षावर लक्षण असेल तर रोग होतो. कपाळावर (लक्षण असेल) तर मृत्यू होतो. डोळ्यावर केल्यास अपस्मार होतो, तोंडावर (लक्षण) केल्यास धान्याचा नाश होतो. ( १५३ )

हनुवटीवर (लक्षण असेल) तर भावाचा नाश होतो. मानेवर असेल तर स्कन्धाचा (?) नाश होतो. स्तनप्रदेशावर (लक्षण असेल) तर मुलाचा नाश होतो. तेव्हा या ठिकाणी लक्षणोद्धार वर्ज्य समजावा. ( १५४ )

शीर्षाच्या रुंदीचे ११ समभाग करून तीन भाग मुकुलाकार कमळाप्रमाणे लिंगाचा आकार असल्यास ते ब्राह्मणांच्या आत्यंतिक भरभराटीला व राजाच्या विजयाला कारणीभूत होते. दोन एकमेकांस छेदणाऱ्या तलवारी, हत्तीच्या डोळ्यांप्रमाणे आकृती असून शंखाप्रमाणे पांढरे शुभ्र व छत्राकाराच्या प्रकारांपैकी असलेले लिंग राजाचीदेखील भरभराट घडवून आणते. ( १५५–१५६½ )

हाताच्या ओंजळीसारखा आकार असलेले, गोकर्णाच्या आकाराप्रमाणे असलेले ते ( लिंग ) वैश्यांच्या व त्रिकोणी किंवा शूलाप्रमाणे व वृत्तायत असेल तर ते शूद्रांच्या भरभराटीस कारणीभूत होते. आता तीन सूत्रांचे लक्षण ( सांगतो ). ( १५७, १५८ )

लक्षणोद्धाराच्या भागाचे ११ विभाग केले असता, मुकुलाची उंची एक अंश, त्याची रुंदीदेखील तेवढीच ( एक अंश ) असावी. ( १५९ )

[ लक्षणोद्धाराच्या भागासाठी श्लोक १५२ पहावा. ]

त्याच्या मुळाची रुंदी नऊ भाग सांगितली आहे. त्याची नाली एका सूत्राइतकी किंवा दोन अथवा तीन सूत्रांइतकी असावी. (१६०)

एक सूत्र लांबी असेल तर त्या सूत्रांमधील अंतर तीन यव किंवा हे द्विजोत्तमा, देठाची रुंदी दोन यव असावी. ( १६१ )

देठाच्या वरती व ( त्याच्या ) अग्रापाशी सीमासूत्र आखावे. तो कंठ जर एक सूत्राचा असेल तर विशेषतः लिंगमध्यापाशी ( सीमासूत्र आखावे ). ( १६२ )

सूत्रांबद्दल सांगितल्याप्रमाणे देठाची रुंदी, खोली व लांबी कल्पावी. देठाच्याखाली एक अंश व वरती एक अंश काढून टाकावेत. (१६३)

मुकुलाच्या ( कमळकळीच्या ) आतमध्ये जाणाऱ्या दोन मणिरेखा तेथे कराव्यात. मणिरेखेतील भाग हे ब्राह्मणा, कमळाच्या मुळाइतका असावा. किंवा कमळाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग किंवा चार अंशांपैकी तीन अंश किंवा पाच अंशांपैकी तीन अंश किंवा कमळाच्या रुंदीइतका असावा. ( १६४, १६५ )

मुकुलाच्या मुळापाशी हे अंतर असावे. देठाच्या मुळापासचे अंतर ऐक. देठाच्या लांबीइतके किंवा ½ किंवा ⅔ किंवा तीन भाग, पाच भाग किंवा चार भाग किंवा देठाच्या मुळाइतके दोन मणिरेघांमधील अंतर असावे. (१६६, १६७)

मणिरेघांमधील अंतर मुळापासून अग्रापर्यंत क्रमाने कमी करावे. मुकुलाच्या मुळापाशी सारखे अंतर असून नंतर आडवे नेऊन दोन्ही बाजूंना ( मणिरेखा ) मिळवाव्यात. ( १६८ )

मणिरेघेच्या रुंदीच्या तिप्पट लिंगाच्या उंचीचे सूत्र असावे. मणिरेघेचा आधार देठाएवढाच किंवा त्याच्या दीडपट असावा. ( १६९ )

त्यापासून मुळापर्यंत आठ भागांत विभाग केले असता मणिरेघेचे आधाराप्रमाणे नऊ प्रकार सांगतात. ( १७० )

सर्व लक्षणोद्धारात आठ मणिरेघांत हे प्रथम लक्षण सांगितले; दुसरे लक्षण ऐक. ( १७१ )

लक्षणोद्धाराच्या भागाचे दहा विभाग करून मुकुलाची उंची एक अंश व आठ अंश देठाची लांबी असावी. ( १७२ )

देठाच्या खाली एक अंश नेऊन, उरलेले पूर्वीप्रमाणेच करावे. दुसरे लक्षण सांगितले; तिसरे लक्षण ऐक. ( १७३ )

लक्षणोद्धाराच्या भागाचे १० भाग करून मुकुलाची उंची एक अंश व नऊ अंश देठाची लांबी असावी. ( १७४ )

उरलेले पूर्वीप्रमाणेच असावे; चवथे लक्षण ऐक. लक्षणोद्धाराच्या भागाचे नऊ विभाग करून एक अंश मुकुल (कळी ) करावी, देठाची लांबी सात अंश असून उरलेले पूर्वीप्रमाणेच करावे. चवथे लक्षण सांगितले, पाचवे ( लक्षण ) हे सुव्रता, ऐक. ( १७५, १७६ )

लक्षणोद्धाराच्या भागाचे आठ विभाग करून, मुकुलाची उंची एक अंश असावी. देठाची लांबी सहा अंश असून देठाच्या खाली एक अंश असावा. ( १७७ )

तेथेच ( लक्षणोद्धाराचे आठ भाग केले असता ) सात भाग देठाची लांबी असावी. उरलेले पूर्वीप्रमाणेच करावे. ( हे सहावे लक्षण झाले ) सातवे लक्षण ऐक. ( १७८ )

लक्षणोद्धाराच्या भागाच्या ७½ अंशांत मुकुलाची उंची एक अंश ( व ) देठाची लांबी पाच अंश, उरलेले पूर्वीप्रमाणेच करावे. ( १७९ )

( लक्षणोद्धाराच्या ७½ भागाचे ) सहा अंश किंवा ६½ अंश त्याच्या देठाची लांबी असून उरलेले पूर्वीप्रमाणेच करावे. अशा रीतीने हे ब्राह्मणश्रेष्ठा, देठाच्या लांबीचे आठ प्रकार सांगतात. ( १८० )

पुढच्या भागी मुकुलाकार कमळ असून, हे सुव्रता, ( लक्षणोद्धाराच्या भागाचे ) १२ भाग करून पाहिजे तितकी देठाची लांबी घ्यावी. हे ब्राह्मणा, हे नवव्या संख्येचे लक्षण झाले. ( १८१ )

वर सांगितल्याप्रमाणे लिंगाचे सूत्र असावे. नंतर लिंगाचे अग्र पुढे घेऊन लाकडाच्या पीठात स्थापावे. ( १८२ )

लिंग पीठांत ठेवून ते उत्तराभिमुख ठेवावे. शहाण्या माणसाने, हृदयमन्त्राने अनेक कलश तेथे ठेवावेत. ( १८३ )

( पंच ) गव्य, गंधोदक यांनी स्थापना करून, गंधफुले इत्यादी वहावीत. लांब कुशांसहित व सर्व अलंकारांसह रथात किंवा शिबिकेत घालून गावप्रदक्षिणा घालावी ( व नंतर ) सरोवरापाशी आणून जलाधिवास करावा. ( १८४, १८५ )

लक्षणोद्धार सांगितले, प्रतिमालक्षण ऐक.

**काश्यपशिल्पातील लिंगलक्षणोद्धार हे एकोणपन्नासावे पटल संपले.**

# पन्नासावे पटल

## [ प्रतिमेचे लक्षण ]

प्रतिमेचे लक्षण सांगतो. (ते) एकाग्र चित्ताने ऐक. अचल, चल (व) चलाचल असे (प्रतिमेचे) तीन (प्रकार आहेत.) (१)

माती, वाळू आणि त्याचप्रमाणे चुना यांच्या अचल प्रतिमा असतात. दगड, लाकूड आणि तसेच धातू व रत्न यांची प्रतिमा चलाचल सांगतात. लोखंडाची प्रतिमा चल असते. (२, २½)

[ सौयजं हा शब्द सौधजं असा दुरुस्त करून अर्थ दिला आहे. ]

अर्धचित्र, चित्र आणि चित्राभास असे (प्रतिमेचे) तीन प्रकार आहेत. शरीराचा अर्धा भाग (फक्त पुढचा किंवा मागचा अर्ध्या रुंदीपर्यंत) दाखविणारे जे बिंब त्याला अर्धचित्र म्हणतात. सर्व अवयव संपूर्णपणे जेथे दाखविलेले असतात त्याला चित्र असे म्हणावे. कापडावर, भिंतीवर, उठाव, खोली वगैरे दाखवून जे बिंब करतात त्याला चित्राभास म्हणतात. (३-४½)

चुना किंवा जे पदार्थ चित्रासाठी वापरतात त्यांनी अर्धचित्र (ही) करतात. (५)

धातूंनी आभास, चित्र किंवा चित्रार्ध (तीनही) करतात. देवांची प्रतिमा चित्राभासाप्रमाणे असली तर श्रेष्ठ फळ मिळते. चित्र असेल तर मध्यम व अर्धचित्र असेल तर कनिष्ठ फळ मिळते. (६)

विटांचे चित्र (प्रकारचे बिंब) श्रेष्ठ, चित्रापेक्षा (विटांचे चित्र-) आभास श्रेष्ठ व त्या दोघांहून आभासार्ध (अर्धचित्र) श्रेष्ठ असते. मातीची मूर्ती सर्वांत श्रेष्ठ असते. (७)

[ येथे पीठ या शब्दाऐवजी चित्र हा शब्द वापरून अर्थ दिला आहे. ]

मातीच्या (चित्रापेक्षा) लाकडी (चित्र) श्रेष्ठ, लाकडापेक्षा दगडाचे (बिंब) श्रेष्ठ व दगडाच्या (प्रतिमेपेक्षा) लोखंडाची (प्रतिमा) श्रेष्ठ असते, व कर्त्याला त्याच प्रमाणात फल मिळते. (८)

लोखंडाच्या (प्रतिमेपेक्षा) सोन्याची (प्रतिमा) उत्तम व चांदीची मध्यम असते. तांब्याची (चित्रप्रतिमा) कनिष्ठ म्हणून सांगतात, व त्या त्या प्रमाणात फल मिळते. (९)

प्रतिमेचे माप (प्रकार चित्र, चित्रार्ध, आभास वगैरे) व ती ज्या द्रव्याची केली यावरून श्रेष्ठ, मध्यम (व) कनिष्ठ प्रतिमा होते. सर्व प्रकारच्या द्रव्यांच्या (प्रतिमेत) देवत्व मात्र सारखेच असते. (१०)

काश्यप म्हणतात, "हे देवेश, देवत्व जर सारखे असेल तर श्रेष्ठ इत्यादी फल कसे? (फलांमध्ये फरक का बरे?)"

(शंकर म्हणतात,) स्थलाच्या भेदाने जमीन एकच असली तरी वृक्षांचे जसे प्रकार होतात, (११)

त्याचप्रमाणे देवत्व सारखे असले तरी द्रव्याप्रमाणे त्याचे फल निरनिराळे मिळते, म्हणून जसे जमेल तसे (यावच्छक्य) त्या द्रव्याची देवमूर्ती करावी. (१२)

जो मनुष्य या पृथ्वीवर पुत्र, मित्र ( व ) स्त्रियांसह असून कर्ता आहे, विषयांची गोडी ज्याने यथेच्छ चाखली आहे व इच्छिलेल्या विषयांत ज्याला सुख मिळाले आहे ( असा मनुष्य ) हे ब्राह्मणा, सालोक्यादी फले भोगणारा होतो. (१३, १३½)

[ सलोकता, समीपता व सायुज्यता ही परमेश्वरप्राप्तीची तीन फले आहेत. ]

मनाने, वाचेने व कर्माने जो मनुष्य संयमित असेल त्या मनुष्यालादेखील त्याच्या कर्मा-प्रमाणे चांगल्या फलांची प्राप्ती तत्काल होते तेव्हा काहीही ( कर्म ) न करता सर्व (कर्मे) शिवात्मक मानावी. (१४, १५)

[ कायावाचामनाने ही जी कामे केली जातात त्यांच्यामुळे तत्काल मनुष्याला फलभागी व्हावे लागते तेव्हा शंकराला सर्व कर्मे अर्पण करून फलापासून मनुष्याने दूर असावे. ]

हे ब्राह्मणा, सुखासनात असलेली ( आणि ) उमा व स्कंद यांच्यासह शंकरमूर्ती असते. तिसरी चंद्रशेखरमूर्ती व चवथी वृषवाहन ( शंकराची ) मूर्ती असते. ( १६ )

पाचवी नृत्तमूर्ती नंतर ( सहावी ) गंगाधर ( मूर्ती ), सातवी त्रिपुरारीची आणि त्याचप्रमाणे आठवी कल्याणसुंदराची ( मूर्ती असते. ) ( १७ )

नववी अर्धनारीनटेश्वराची व दहावी गजहारीची मूर्ती ( असते ); तसेच पाशुपतमूर्ती असावी. बारावी कंकाल (मूर्ती ) असते. ( १८ )

तेरावी हरी (अर्धहरा )ची ( मूर्ती ) असावी, चौदावी भिक्षाटनमूर्ती ( व ) चण्डेश्वरप्रसाद मिळून ह्या पंधरा ( शंकराच्या मूर्ती ) सांगतात. ( १९ )

सोळावी दक्षिणामूर्ती व नंतर कालारुण ( कालारि ?) मूर्ती असावी. ( या ) सर्व प्रतिमांचे माप अगोदर सांगतो. ( २० )

सर्व प्रकारच्या लिंगांच्या शीर्षाचे माप सांगतो. त्यात शिरोवर्तनही दिले आहे. ( शीर्षाचे माप वरील वर्तनासह दिले आहे. ) ( २१ )

( लिंगाच्या ) स्थूल भागाची रुंदी, लांबी ( सांगतात. ) पूजाभागाचे ( वरच्या वर्तुळाकार शिवभागाचे ) दोन भाग करून त्यांचे ( प्रत्येकी ) ३२ सारखे भाग करावेत. त्यांतील २७, २५, २३, २१ किंवा १९ अंश किंवा १६ अंश किंवा १३,११,९,७ किंवा पाच भाग ( शिरोवर्तन ? ) असावे. (२२–२४)

अथवा शिवभागाच्या ( दोन भागांपैकी ) शेवटल्या भागाचे नऊ विभाग करावेत. त्यांतील एक अंशाने सुरुवात करून, एक एक अंशाने वाढ करून, २७ अंशांपर्यंत ( पूजाभागाचे ) २७ प्रकार होतात. ( शिवलिंगाच्या ) प्रतिमेच्या पूजाभागाचे उंचीच्या ( प्रकारांनी ३८ प्रकार होतात. ( २५,२६ )

[ वर दिलेले २७ प्रकार व श्लोक २२–२४त दिलेले ११ प्रकार असे एकंदर ३८ प्रकार होतात. ]

त्याचप्रमाणे ( वरीलप्रमाणेच) लिंगाच्या रुंदी व परिघाचे ( प्रत्येकी ३८ प्रकार ) कल्पावेत. लिंगाच्या मापाप्रमाणे बिंबाचे ( लिंगप्रतिमेचे ) १०३ ( ११४ ? ) प्रकार होतात. ( २७ )

[ तत्त्व म्हणजे सत्त्व, तामस व राजस हे तीन गुण तेव्हा तत्त्वाधिकशत म्हणजे १०३ असा अर्थ होतो मात्र हिशोबाने ११४ प्रकार होतात. ]

गर्भागाराचे नऊ भाग केले असता ( लिंगाचे उंचीने ) नऊ प्रकार होतात. किंवा गर्भागाराचे २७ भाग केले असता त्याच्या एक अंशापासून, एक एक अंशाने वाढ करून २७ प्रकारच्या ( लिंग-प्रतिमा ) होतात. ( २८, २८½ )

[ गर्भागाराच्या रुंदीच्या $\frac{१}{९}$, $\frac{२}{९}$ ते $\frac{९}{९}$ असे लिंगाचे नऊ प्रकार. तसेच गर्भागाराच्या रुंदीच्या $\frac{१}{२७}$, $\frac{२}{२७}$ ते $\frac{२७}{२७}$ असे लिंगाचे उंचीने २७ प्रकार होतात. ]

( दाराच्या उंचीचे नऊ भाग ? केले असता ) पाच अंश उंचीचे ( लिंग ) उत्तम, चार अंशांचे मध्यम आणि तीन अंशांचे अधम ( लिंग ) असते; असे दाराच्या मापाने ( लिंगाचे ) तीन प्रकार होतात. ( २९, २९½ )

[ श्लोक ४९.७३–७३½ पहावा. ]

अधम व उत्तम यांच्या मधल्या अंतराचे आठ विभाग केले असता शिवलिंगांचे उंचीप्रमाणे दाराच्या मापावरून नऊ प्रकार होतात. ( ३०, ३०½ )

किंवा दाराची उंची २७ भागांत विभागून, एक अंश कमी करीत बिंबाच्या उंचीचे २७ प्रकार होतात. अशा रीतीने दाराच्या मापाने (शंकराच्या) प्रतिमेच्या उंचीचे ३६ प्रकार होतात. ( ३१, ३२ )

त्याचप्रमाणे अधिष्ठानाच्या व खांबाच्या मापाने बिंबाची ( उंचीची ) कल्पना करावी किंवा प्रासादाच्या बाहेरील रुंदीच्या मानाने ( बिंब ) कल्पावे. ( ३३ )

एक ते नऊ हातांपर्यंत हाताच्या मापाने ( लिंगाचे ) नऊ प्रकार होतात. एक तालापासून नऊ तालांपर्यंत ( लिंगाचे ) नऊ प्रकार होतात. ( ३४ )

कर्त्याच्या उंचीइतकी किंवा यजमानाच्या उंचीइतकी त्याची ( लिंगाची ) उंची असावी, अथवा कर्त्याची उंची नऊ भागांत विभागून एक एक अंशाने कमी करीत ( नऊ प्रकारांनी ) लिंगाची उंची मिळते. ( ३५, ३५½ )

( शिवलिंगाच्या ) पूजाभागाचे ९६ भाग करून त्यांतील एक अंश अंगुल ( मापाचे ) समजावे, व मूळ लिंगाच्या अंगुलाइतके ते जाणावे. किंवा शहर, प्रासाद यांच्या मापासाठी जे मानांगुल घेतात तेच अंगुलाचे माप घ्यावे. ( ३६, ३७ )

कर्त्याच्या उजव्या हाताच्या मधल्या बोटाच्या मधल्या पेराच्या लांबीइतके किंवा रुंदीइतके असे मानांगुलाचे दोन प्रकार माहिती आहेत. (३८)

सात अंगुलांनी सुरुवात करून, दोन दोन अंगुलांनी वाढ करीत १२६ अंगुलांपर्यंत ( लिंगाच्या प्रतिमेचे ) माप असावे. मात्र पहिल्या लिंगाचे माप तीन अंगुलांचे असावे व दोनांनी वाढवून त्याचे प्रकार होतात. (३९, ३९½ )

घरातील किंवा स्वतःसाठी जे लिंग ( पूजेस घ्यावयाचे ) त्याचे माप मात्र एका अंगुलाचे असावे. याहून वेगळे (माप घेतले) असता तसे करणाऱ्या कर्त्याचा नाश होतो, अंगुलांच्या मापाने निर्माण केलेली (शिव) प्रतिमा सर्व जातींना योग्य असते. ( ४०, ४१ )

( प्रतिमेचे ) आय इत्यादी सहा ( गुण ) शुभ यावेत म्हणून तिची उंची अंगुलाने वाढविण्यास हरकत नाही. मात्र तीन व सहा अंगुलांपेक्षा ते माप आयादीकरिता वाढवू नये. ( ४२ )

[ आय, व्यय, नक्षत्र, वार, योनि व अंशक हे जसे वास्तूचे शुभ पाहिजेत, तसेच प्रतिमेचे-देखील शुभ असावयास हवेत. ते शुभ येण्यासाठी प्रतिमेची उंची काहीशी कमीजास्त करण्यास हरकत नाही असा या श्लोकाचा अर्थ आहे. श्लोक फार अशुद्ध असल्याने अर्थ अंदाजाने लावला आहे. अंगुलांपेक्षा लिंगाचे माप निराळे असेल, हाताच्या, दाराच्या, गर्भगृहाच्या वगैरे तर आयादी शुभ येण्यासाठी प्रतिमेच्या मापात जातीनुसार किती बदल करता येतो ते खाली दिले आहे. ]

लिंगाचे माप अंगुलांशिवाय असेल तर त्याचे ८४ भाग करून त्यांतील एक भाग ( प्रतिमेच्या मापात ) मिळवून जे अंश होतात ते ब्राह्मणांच्या ( प्रतिमेचे आयादी काढण्यास ) योग्य असतात. (४३)

[ श्लोकार्ध ४२½ 'अङ्गुलादन्यय(द्य)न्मानं सं(स)वेदाशि(शी)ति या भवेत्।' असा आहे. तो 'अङ्गुलादन्यद्यन्मानं वेदाशीति विभज्य च। असा दुरुस्त करून अर्थ दिला आहे. पुढे आलेले श्लोक फार अशुद्ध आहेत. त्यात दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. काय दुरुस्ती केली ते त्या त्या ठिकाणी दिले आहे. रौरवागम नावाच्या पुस्तकात अंशुमत्काश्यप या पुस्तकातील उतारे दिले आहेत. त्यांची मदत या दुरुस्तीकरिता घेतली आहे. रौरवागम ( भाग २ ) हे एन्. आर. भट्ट यांनी संपादित केलेले व इन्स्टिटयूट फ्रान्सिस द इन्डॉलॉजी या पाँडिचेरी येथील संस्थेने प्रसिद्ध केलेले पुस्तक आहे. ]

तसेच ( लिंगाच्या मापाचे ) दोन अधिक साठ ( एकूण ६२ ) अंश केले असता त्यांतील एक भागाने ( प्रतिमेचे माप ) वाढविल्यास ते राजासाठी योग्य जाणावे. राजाच्या भरभराटीस ते कारण होते. ( ४४ )

( प्रतिमेच्या मापाचे ) २४ भाग करून त्यांतील एक भाग ( प्रतिमेच्या मापात ) मिळविल्यास ते ( लिंग ) वैश्य जातीकरिता योग्य असते असे सांगतात; व ते वैश्यांची भरभराट करणारे आहे. ( ४५ )

( प्रतिमेच्या मापाचे ) १६ भाग करून त्यांतील एक भाग ( प्रतिमेच्या मापात ) मिळविल्यास ( ते लिंग ) शूद्रांची भरभराट करते. (४५½)

[ वरील माहितीने असे दिसून येईल की लिंगाचे जे माप घेतले त्यात फारच थोडा फरक आयादींकरिता ते लिंग ब्राह्मणांकरिता असेल तर करता येतो. लिंगाच्या मापात लिंग जसजसे खालच्या जातींकरिता असते तसतसा अधिक फरक करता येतो.]

अशा रीतीने जातींप्रमाणे अंशांची वाढ केल्यानंतर त्या अंशांच्या ( संख्येला ) आठाने गुणून २७ ने भागले असता जो शेष उरतो त्याने अश्विनी वगैरे नक्षत्रे मिळतात. ( ४६, ४६½ )

[ श्लोकार्ध ४६½ सप्तविंशति संख्या तु हृते शेषाद्दिनं भवेत् याची दुरुस्ती 'सप्तविंशति-भिर्न्हृसे शेषमश्वादिभं भवेत्' अशी करून अर्थ दिला आहे.]

त्या ( प्रतिमेच्या ) आलेल्या जन्मनक्षत्राचे राजा व कर्ता यांच्या जन्मनक्षत्रांतील अंतर मोजून ते ( प्रतिमेचे जन्मनक्षत्र ) शुभ यावयास हवे. जर शुभ ( नक्षत्र ) आले नाही तर प्रतिमेच्या उंचीचे १३० भाग करून एक एक भाग त्यात मिळवीत जोपर्यंत शुभ आयादी येत नाहीत तोपर्यंत करावेत. अशा रीतीने जे माप येईल ते पायापासून पगडीपर्यंत प्रतिमेचे माप समजावे. ( ४७–४९ )

[श्लोकार्ध ४७ ‘तद्दिनं जातिऋक्षं स्यात्तद्दिनं सुखसंपदे’ हा ‘तद्दिनं जातिऋक्षं स्यान्नृपवास्तुदिनान्वितम्’ असा घेऊन अर्थ दिला आहे. श्लोकार्ध ४७½ त ‘नृपादिताम्’ हा शब्द ‘नृपादिनाम्’ असा केला आहे. श्लोकार्ध ४८½ त ‘शबरं’ हा शब्द ‘शश्यंशं’ असा घेतला आहे.]

आयाकरिता अंश (कसे घ्यावेत) ते सांगितले व अंशक, आय इत्यादी त्यावरून कल्पावे. अंशांना आठांनी गुणून १२ ने भागले असता हे ब्राह्मणा, जो शेष उरतो त्याला आय म्हणतात. अंशांना आठांनी गुणून २७ ने भागून जो शेष उरतो त्याने अश्विनी इत्यादी (नक्षत्रे) मिळतात. (५०, ५१)

[श्लोक ५० "कर्तुवांशकमिदं ख्यातमंशैरायादि कल्पयेत्।
अष्टाभिर्वृद्धिदेशांशभानुभिस्तुस्तुहृते द्विज॥" हा
"आयांशकमिदं ख्यातं चैकांशायादि कल्पयेत्।
अष्टाभिर्वर्धयेदंशं भानुभिर्न्हासयेद्विज॥ असा घेऊन अर्थ दिला आहे.]

नवांनी गुणून नंतर २७ ने भागावे जो शेष उरेल त्याला व्यय म्हणतात. अंशांना तीनाने गुणून आठांनी भागितले असता जो शेष उरतो त्याने ध्वज इत्यादी योनी मिळतात. नवाने गुणून साताने भागितले असता (जो शेष उरतो त्याने) रविवार इत्यादी वार मिळतात. (५२,५३)

[श्लोकार्ध ५१½ ‘त्वंशराशिभिर्न्हासयेत्ततः’ च्याऐवजी ‘त्वेशं नाडिभिर्न्हासयेत्ततः’ असा दुरुस्त केला आहे. श्लोकार्ध ५२ ‘ख्यातमंशशेषानलेन तु’च्या ऐवजी ‘ख्यातमंशं वै त्वनलेन तु’ असा दुरुस्त केला आहे. श्लोकार्ध ५२½ त ‘प्रोक्तं’च्या ठिकाणी ‘न्हासे’ हा शब्द घेतला आहे व वरील अर्थ दिला आहे.]

चाराने गुणून नवाने भागितले असता जो शेष मिळतो त्याला अंशक म्हणतात. असे आयादी सहा (गुण) मिळतात. (५४)

[१) आय २) नक्षत्र ३) व्यय ४) योनि ५) वार व ६) अंशक.

श्लोकार्ध ५३½ त ‘न्हसयच्चेदसंज्ञया’ याऐवजी ‘न्हासयेन्नवसंख्याया’ अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे.]

आय जास्त व व्यय कमी, तसेच आय खूप मोठा असल्यास ते शोभून दिसते. ध्वज, धूम, सिंह, कुत्रा, बैल, गाढव, हत्ती व कावळा अशा आठ योनी आहेत. त्यांपैकी ध्वज, सिंह, बैल (व) हत्ती या योनी (लिंगाकरिता) शुभ जाणाव्यात. इतर (योनी) अशुभ जाणाव्यात. (५५,५६)

[श्लोकार्ध ५४½ त ‘पुष्कलाभं’च्या ऐवजी ‘पुष्कलायं’ असा शब्द घेतला. श्लोकार्ध ५५ ‘ध्वजधूमं च सिंहं च श्वानवृक्षादहस्ति च।’ हा

‘ध्वजो धूमश्च सिंहश्च श्ववृषौ खरहस्तिनौ।’ असा घेतला. श्लोकार्ध ५५½ ‘काकश्चयोनयश्चाष्टौ तेषु हारिवृषंगजं’ हा

‘काकश्चयोनयश्चाष्ट तेषु केतुहरिवृषः’ असा घेतला. श्लोकार्ध ५६ मध्ये ‘योनयः’ या शब्दाऐवजी ‘गजश्च’ हा शब्द घेतला.]

(धूमामुळे) विपत्ती, (कुत्र्यामुळे) शत्रुत्व, (गाढवयोनी असल्यास) मृत्यू व (कावळा आल्यास) सर्वनाश ओढवतो. सहावे, आठवे व १२ वे नक्षत्र ही नक्षत्रे सोडून इतर नक्षत्रे शुभ असतात. (५७)

[ श्लोक ५७ अपुरा व अशुद्ध आहे तो खालीलप्रमाणे सुधारून अर्थ दिला आहे.

विपत्तिः प्रत्यरं चैव वधो वैनाशिकस्तथा ।

षष्ठाष्टद्वादशंलग्नं वर्ज्यं शेषाः शुभवाहाः ॥ ]

कर्त्याचे जन्मनक्षत्र, राजाचे व वास्तूचे जन्मनक्षत्र या तिघांपासून बिंबाच्या नक्षत्रापर्यंत मोजावे. जर ते शुभ असेल तर त्याचा स्वीकार करावा. ( ५८ )

[ कर्ता, राजा व वास्तू यांच्या जन्मनक्षत्रापासून वर दिल्याप्रमाणे बिंबाचे नक्षत्र काढून यांच्यामधील अंतर ६,८ किंवा १२ असे येऊ नये. याहून वेगळे असल्यास त्या बिंबाचे नक्षत्र शुभावह असते. ]

सोमवार इत्यादी वार शुभ असतात. मंगळवार वर्ज्य समजावा. रविवार व शनिवार मध्यम असून इतर वार उत्तम समजावेत. ( ५९ )

रविवारसह विशाखादी चार चार नक्षत्रे अनुक्रमे विरह, मृत्यू, विनाश व अमृत असे फळ देतात. (?) ( ६० )

राजा, तस्कर, भुक्ति, शक्ति आणि धन, षण्ढ, अभय, निर्धन, ( ऋण ) व प्रेष्य असे नऊ अंशक सांगतात. ( ६१ )

त्यांमध्ये तस्कर, षण्ढ आणि तसेच ऋण त्यागावेत. गणांमध्ये देव व मनुष्यगण ( बिंब व कर्ता यांचे) यांशिवाय इतर गण येत असल्यास ते वर्ज्य समजावे. ( ६२ )

[ श्लोकार्ध ६२ 'गणेव्यस्मुरमानुषं योगमात्रं विवर्धयेत्' याऐवजी 'गणेषु सुरमानुष्यं योगमन्यं विवर्जयेत्' अशी दुरुस्ती केली.]

अशा रीतीने परीक्षा करून शुभ पूर्ण फल देणारे ( बिंब ) करावे. चारी वर्णांच्या भरभराटीसाठी जात्यंशकाची योजना करावी. ( ६३ )

[ श्लोकार्ध ६२½ 'शोभाढ्यं माधुर्यं तु सुशोभयेत्' याऐवजी 'शोभाढ्यमायामं तु सुयोजयेत्' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. जात्यंशकासाठी श्लोक ४३ ते ४६ पहावेत. ]

उत्तम दशताल इत्यादी (मूर्तींच्या मापांची) माहिती आता सांगतो. ( ६४ )

[ श्लोकार्ध ६३½ अत्यंत अशुद्ध आहे. त्याचा अर्थ लावता येत नाही. श्लोक ६४ येथे संदर्भरहित आला आहे.]

मातीची प्रतिमा ( करावयाची ) असेल तर शूलाची (आतल्या लाकडी सांगाड्याची प्रथम ) स्थापना करावी. दगडाची प्रतिमा ( करावयाची ) असेल तर लिंगासाठी सांगितलेल्या लक्षणांप्रमाणे असलेली शिला ग्राह्य समजावी. लोखंडाची प्रतिमा ( करावयाची ) असेल तर मेणाने ती तयार करावी. ( ६५, ६५½ )

[ मातीच्या प्रतिमेसाठी लाकडी सांगाडा अगोदर करावा लागतो. त्याची माहिती पटल ८०त दिली आहे. धातूच्या प्रतिमेसाठी Cire Purdue method वापरावी असा उल्लेख येथे आला आहे व नको तो महत्वाचा आहे. ]

सोळा खांबी मंडपात साळींनी स्थंडिल करून कमळ, दर्भ व फुले ( त्यावर ) पसरावीत. त्याच्यावर लाकडी फळी ( वगैरे सर्व ) पूर्वी सांगितल्याप्रमाणे करावे. ( ६६, ६७ )

आचार्य, शिल्पी व कर्ता यांनी (प्रतिमेचे) शुभ माप ठरवावे. त्या मापाने वर आलेले अवयव वाळूनेच करावेत. (६८)

(प्रतिमेचे) मुख वरच्या दिशेला येईल त्याप्रमाणे शीर्ष फळीवर ठेवावे. गन्ध, फुले, धूप, दीप आणि अर्घ्याने पूजा करावी. (६९)

(स्थंडिलाच्या) उजव्या बाजूस पवित्र अग्नी असावा. समिधा, तूप, चरू इत्यादी द्रव्यांचे हवन करून १०८ हवी द्याव्यात. (७०)

द्रव्य संपेपर्यंत आहुती देऊन नंतर पूर्णाहुती द्यावी. मध्यमूलामध्ये प्रतिमेचे व अग्नीचे ध्यान करावे. (७१)

[श्लोक ७२ अशुद्ध व अपुरा असल्याने अर्थ लावलेला नाही.]

शीर्षाचा संधी ईशाने, मुकुटाचा कवचाने करावा. अस्त्राने अस्त्रसंधी करून पायांपाशी ते समर्पित करावे. (७३)

प्रथम व नंतर संधान करून क्रमाने संपूर्ण आचरावे. त्यानंतर उपांगे करावीत व नंतर प्रत्यंगे करावीत. (७४)

त्या त्या अंगापाशी एकूण ३८ कलान्यास करावेत. वस्त्र, दागिने व सूत्र यांना उपांग म्हणतात. (७५)

प्रत्येक अंगाला स्पर्शून मंत्र म्हणून शुद्धीकरण करणे याला प्रत्यंग म्हणतात. दहा तालांपासून तीन तालांपर्यंत (प्रत्येक तालाचे) श्रेष्ठ, मध्यम व अधम असे तीन प्रकार असतात. (७६)

[श्लोक ६७ ते ७६ हे फार अशुद्ध आहेत. व ते पूजाविधी सांगतात. त्यांचा अर्थ अंदाजाने दिला आहे.]

उत्तम दशतालाचे (माप) १२४ अंगुले सांगतात, मध्यम दशताल (मूर्ती) १२० अंगुलांची असते. (७७)

११६ अंगुल अधम दशतालाचे (माप) असते. ११२ अंगुले उत्तम नवतालाचे (माप) आहे. (७८)

१०८ अंगुले मध्यम नवताल असते. १०२ (१०४ ?) अंगुले कनिष्ठ नवताल असते. (७९)

प्रत्येक ताल या रीतीने चार अंगुलांनी लहान असतो. उत्तम दशतालात ब्रह्मा, विष्णू, महेश्वर (यांच्या मूर्ती) असाव्यात. (८०)

मध्यम दशतालात उमा तसेच सरस्वती, उषा, भूमी, दुर्गा, लक्ष्मी आणि तसेच माता असतात. (८१)

त्याचप्रमाणे (मध्यम दशतालाने) ज्येष्ठा (गौरी) सर्व अंगांसह करावी. चंद्र, सूर्य, अश्विनी, ऋषी तसेच ग्रह (गुह ?), अर्थ (आर्य ?), षणमुख तसेच चण्डेश, क्षेत्रपाल हे, हे द्विजसत्तमा, कनिष्ठ दशतालात करावेत. (८२, ८३)

वसूंच्या आठ मूर्ती, विघ्नेश, लोकपालक आणि इतर देवता या उत्तम नवतालात कराव्यात. (८४)

यक्ष, अप्सरागण, अस्त्रमूर्ती, मरुद्गण तसेच विद्याधरगण हे मध्यम नवतालात (करावेत) (८५)

असुर, सिद्ध, गन्धर्व तसेच पितर, हे विचक्षण माणसाने, कनिष्ठ, नवतालांत करावेत. (८६)

मध्यम आठ तालात तसेच सात तालात पिशाच करावे. सहा तालात कुबडी माणसे, ब्राह्मणश्रेष्ठाने करावीत. ( ८७ )

शहाण्या माणसाने, पाच ताल मापाने कुबेर करावा, त्याच्या (पाच तालांच्या ) मध्यम व अधम मापाने सर्व प्राण्यांचा समुदाय करावा. ( ८८ )

बालक चार किंवा तीन तालांत करावे, तसेच दोन तालांत किन्नर व एक तालाने कासव करावे. ( ८९ )

असे देवमूर्तींना अनुकूल ( योग्य असे ) तालाचे माप सांगितले. प्रतिमेची उंची १२४ अंश करावी. ( प्रतिमेच्या उंचीचे १२४ भाग करावेत ) ( ९० )

तेच तालाचे अंगुलात माप असून त्या अंगुलाचे आठ भाग केले असता (त्याच्या) एका अंशाला यव म्हणतात. यवांनी व अंगुलांनी पगडीपासून पायापर्यंत ( प्रत्येक ) अवयवाचे माप घेतात. एक अंगुले तीन यव ही पगडीची उंची सांगितली आहे. ( ९१, ९२ )

त्या पगडीपासून केसांच्या कडेपर्यंतचा ( भाग ) सहा अंश सांगतात. केसांच्या कडेपासून नेत्रसूत्रापर्यंत दोन अंश तीन यव अंतर असते. ( ९३ )

नेत्रसूत्रापासून नाकपुडीपर्यंत व नाकपुडीपासून हनुवटीपर्यंत प्रत्येकी तीन अंश तीन यव उंची सांगतात. ( ९४ )

हनुवटीपासून गळ्यापर्यंत ( अंतर ) चार यव सांगतात. गळ्याची उंची तीन अंगुले सात यव असते. ( ९५ )

[ 'यवैकोनमुदांशं' च्या ऐवजी 'यवैकोन युगांशं' अशी दुरुस्ती केली आहे. ]

केसांच्या मुळापासून हनुवटीच्या सूत्रापर्यंतच्या भागाला हिक्कासूत्र ( ? ) म्हणतात. हिक्कापासून हृदयापर्यंत व हृदयापासून नाभीपर्यंत ( व ) नाभीपासून मेढ्रमूलापर्यंत, हे ब्राह्मणश्रेष्ठा, सारखे अंतर असून ते प्रत्येकी १३ अंश तीन यव असते. (९६, ९७)

[ श्लोकार्थ ९५½ 'केशमूलाद्धनुसूत्रं हिक्कासूत्रमुदाहृतम्' याऐवजी शिल्परत्न (भाग २) अध्याय ५ मध्ये ओळ आहे 'कण्ठान्ततिर्यक् सूत्रं तु तालुसूत्रमुदाहृतम्'.

दोन्ही खांद्यांना जोडणाऱ्या रेषेला हिक्कासूत्र म्हणतात.

श्लोकार्थं ९६½ 'नाभेस्तुमे अग्रमूलं तु ......' हा 'नाभेस्तु मेढ्रमूलं तु ......' असा सुधारून अर्थ दिला आहे. ]

मेढ्रमूलाच्या मध्यभागी जे सूत्र असते (मध्यभागातून जे सूत्र जाते) त्याला मध्यसूत्र म्हणतात. मध्यसूत्राच्या खाली मांडीची लांबी नऊ भाग असते. ( ९८ )

[ श्लोक ९७½ खाली दिल्याप्रमाणे सुधारून अर्थ केला आहे. ]

'मेढ्रमूलात्सूत्रमध्यं मध्यसूत्रं तदुच्यते ।' श्लोक ९८ तील पहिला शब्द 'अर्धसूत्राद्' च्या ऐवजी 'मध्यसूत्राद्' असा सुधारून अर्थ दिला आहे. ]

तिच्या ( मांडी ) पासून चार अंगुलांचा गुडघा ( व ) जंघेची लांबी मांडीइतकीच ( नऊ भाग ) असते. पायाच्या तळव्यांची उंची तीन भाग असते; अशी निरनिराळ्या अवयवांची उंची सांगतात. ( ९९ )

आंगठ्याच्या अग्रापासून हाताच्या मुळापर्यंत हाताचा तळवा १७ अंगुले असतो. हिक्का-सूत्राच्या खाली हाताची (कोपऱ्यापर्यंत) लांबी सात अंगुले असावी. (१००)

कोपराची उंची दोन भाग असावी, प्रकोष्ठ (कोपर ते मनगट हे अंतर) २१ अंगुले असतो. मधल्या बोटाच्या अग्रापासून मनगटापर्यंत लांबी १३½ अंगुले असते. (१०१)

मुखाच्या (चेहऱ्याच्या) पुढील भागाची लांबी १३½ अंगुले असावी. मुखापासून कानाच्या कडेपर्यंत रुंदी १३ अंगुले मानतात. (१०२)

[श्लोकार्ध १०१½ सार्धभाराङ्गुलं हा शब्द सार्धभान्वाङ्गुलं असा घेऊन अर्थ केला आहे.]

कंठाच्या अग्राची रुंदी ९½ अंगुले व कंठाच्या मुळाची रुंदी दहा अंगुले असते. हृदयापासून हाताच्या कडेपर्यंत (अंतर) २४ किंवा २४½ अंगुले असते. (१०३)

कुशींमधील अंतर २२½ अंगुले असते. हाताच्या मुळाची रुंदी नऊ अंश चार यव असावी. (१०४)

हाताची लांबी २१ अंगुले असावी. हृदयाजवळच्या स्तनभागाची रुंदी (हातांच्या रुंदीसह) २९ अंगुले असावी. (१०५)

मध्यभागाची रुंदी (कंबरेची) १६ अंश चार यव सांगतात. पार्श्वभागाची रुंदी १९ अंश सांगतात. (१०६)

कंबरेच्या वरच्या भागाची रुंदी १८ अंगुले सांगतात. त्याच्याखाली कंबरेची पाठीमागची रुंदी २०½ अंश असावी. (१०७)

मांडीच्या मुळाची रुंदी १३¾ भाग असावी. मांडीच्या मधल्या भागाची रुंदी १२¼ अंश असावी. (१०८)

गुडघ्याची रुंदी ९¾ (अंगुले) सांगतात. नलिकेची (पोटरीची) रुंदी ८¼ भाग असावी. (१०९)

घोटयाची रुंदी दोन अंश व एक यव असते. त्याची तळापासून वरपर्यंतची जाडी साडेचार अंगुले सांगितली आहे. (११०)

[श्लोक ११० खाली दिल्याप्रमाणे सुधारून वरील अर्थ केला आहे.

'यवोपेतद्वयाशं तु गुल्फविस्तारमुच्यते ।
अक्षादातलतुंगं तु सार्धवेदांगुलं स्मृतम् ॥']

नखाची रुंदी लांबीच्या निम्मे असावी व (नखाग्र) पाव भागाने कमी रुंदीचे असून वृत्ता-यत असते. (पायाच्या) तर्जनीची लांबी चार अंश तीन यव सांगतात. (१११)

मधल्या बोटाची लांबी ३¾ भाग असावी. अनामिकेची लांबी तीन भाग एक यव असावी. (११२)

करंगळीची लांबी २½ अंश मापाची असावी. तर्जनी इत्यादी नऊ आणि ७½........(११३)

[श्लोकार्ध ११३ अशुद्ध व अपूर्ण आहे.]

नखाची रुंदी बोटाच्या रुंदीच्या निम्मे, पूर्वी सांगितल्याप्रमाणे जाणावी. त्या त्या बोटाची रुंदी, शहाण्या माणसाने, चार भागांत विभागावी. (११४)

( त्यांतील ) तीन भाग बोटांच्या अग्राची उंची ( रुंदी ?) असून उरलेले नखांतील अंतर असावे. ( ११४$\frac{1}{2}$ )

हाताच्या मध्याची रुंदी आठ अंश व तीन यव असावी. कोपराची रुंदी ( ७$\frac{1}{4}$ ) भाग असावी. प्रकोष्ठाच्या मध्याची रुंदी ५$\frac{3}{4}$ भाग, मनगटाची रुंदी ३$\frac{3}{4}$ अंश, तळव्याची लांबी सात अंश व मधल्या बोटाची लांबी ६$\frac{1}{2}$ अंश असावी ( ११५–११७ )

[ श्लोकार्ध ११५त त्रियवाधिकविस्तारं या ऐवजी त्रियवाधिकवस्वंशं अशी शब्दयोजना घेऊन अर्थ केला आहे.]

अनामिकेची लांबी ५$\frac{1}{4}$ भाग सांगतात. तर्जनीची लांबी पाच अंश एक यव सांगतात. (११८)

आंगठ्याची व करंगळीची लांबी ४$\frac{1}{4}$ भाग असावी. आंगठ्याच्या मुळाची रुंदी १$\frac{1}{4}$ अंश सांगतात. ( ११९ )

तर्जनीची ( रुंदी ) आठ यव सांगतात. मधल्या बोटाची ( रुंदी ) नऊ यव, अनामिकेची ( रुंदी ) आठ यव सांगतात. करंगळीची ( रुंदी ) सात यव असावी. ( १२० )

आंगठ्यापासून इतर सर्व बोटांच्या मुळांची ही रुंदी आहे. त्या त्या ( बोटांच्या ) मुळाच्या ( रुंदीच्या ) $\frac{1}{16}$ ने कमी रुंदीचे बोटाचे अग्र असावे ( १२१ )

( बोटाच्या ) अग्राची रुंदी सहा अंश असेल तर पाच अंश नखाची रुंदी असावी. ( नखाच्या ) दोन्ही बाजूंना मांसल भाग असावा. नखाचा आकार वृत्तायत असावा. ( १२२ )

नखाच्या रुंदीच्या सवापट नखाची लांबी सांगतात. नखाच्या लांबीच्या दुप्पट खाली पेराची लांबी योग्य समजतात ( १२३ )

आंगठ्याच्या मुळाच्या पेराची लांबी १७ यव असावी. तर्जनीच्या व अनामिकेच्या मुळाच्या पेराची लांबी दोन अंगुले ( १६ यव ) असावी. ( १२४ )

मधल्या बोटाच्या मुळाच्या पेराची लांबी १८ यव असावी करंगळीच्या मुळाच्या पेराची लांबी १३ यव असावी. ( १२५ )

मधल्या पेराची लांबी मूळ आणि अग्राच्या पेरांच्या लांबीच्या मध्याइतकी असते. आंगठा २$\frac{1}{2}$ पेरांचा व इतर बोटे तीन पेरांची असतात. ( १२६ )

[ मधल्या पेराची लांबी = $\frac{1}{2}$ ( मूळ + अग्र पेरांची लांबी ]

बोटांच्या खालच्या तळव्याच्या अग्राच्या भागाची रुंदी आठ अंगुले असावी. हाताच्या तळव्याच्या मध्यभागाची रुंदी सहा अंश असावी. ( १२७ )

तळव्याच्या मुळाची रुंदी ६$\frac{1}{2}$ अंश असावी. आंगठ्याच्या मुळापासून तर्जनीच्या मुळापर्यंतचे (अंतर) २$\frac{1}{2}$ अंगुले सांगतात. याला पोपटाचे पोट (शुकोदर) म्हणतात. ( १२८, १२८$\frac{1}{2}$ )

आंगठ्याच्या मुळापासून मनगटापर्यंतची लांबी चार अंगुले सांगतात. २$\frac{1}{2}$ अंश त्या भागाची जाडी असावी. ( १२९,१२९$\frac{1}{2}$ )

हाताच्या ( तळव्याच्या ) पाठीमागच्या भागाची जाडी तीन अंश व अग्राची जाडी आंगठ्याच्या जाडीइतकी असते. (१३० )

बोटांच्या खाली (तळव्याची) उंचवट्यांसह जाडी २½ अंश असते. हाताच्या पाठीमागच्या दोन भागांची रुंदी शुकोदराच्या रुंदीइतकी असते. (१३१)

उरलेला मध्यभागांतील तळवा खोलगट, ¾ भाग असावा. तेथे बारीक रेषांनी शंख, चक्र, शूल याप्रमाणे आकृती काढाव्यात. (१३२)

कमळाप्रमाणे किंवा कुशगवताप्रमाणे तळव्यावरील रेषा कल्पाव्यात. हे ब्राह्मणा, त्या रेषांची खोली ½ यव असावी. (१३३)

वर्तुळाकृती अंग दाखवावयाचे असेल तेव्हा वर्तुळाच्या व्यासाचे पाच भाग करून एक अंश घ्यावा व त्याच्या तिप्पट जो विस्तार त्याला परीघ म्हणतात. परीघापासून रुंदी काढता येते (?) (१३४,१३४½)

कानाच्या वरच्या डोक्याची परिमिती ३८ अंगुले असावी. कानाच्या वर डोक्याची उंची ११ अंगुले सात यव असावी. कानांमधील पुढून अंतर (परिमितीने) २२ अंगुले असावे. (१३५,१३६)

[श्लोकार्ध १३५½ 'कर्णोर्ध्वे तु शिरस्तात्तु' हा शब्दसमूह 'कर्णोर्ध्वे तु शिरस्तारं' असा सुधारून अर्थ केला आहे. तसेच श्लोकार्ध १३६ त 'पूर्वनालं'च्या ऐवजी 'पूर्वनाहं' असा शब्द घेतला.]

कानांच्यामधील (डोक्याचे) पाठीमागील अंतर (परिमितीने) १२ अंगुले सांगतात. त्यांच्या मध्यभागी कानाचे स्थान सांगतात (१३७)

[श्लोकार्ध १३६½ त 'पूर्वनाहं'च्या ऐवजी 'पृष्ठनाहं' असा घेतला.]

डोक्यावरील मध्यभागील वर्तुळाचा (घेऱ्याचा) व्यास चार अंगुले असावा. त्यापासून पुढील केसांच्या कडांपर्यंत (अंतर) नऊ अंगुले सांगतात. (१३८)

[श्लोकार्ध १३७½ 'मध्यमामूर्तिमंडलं' या ऐवजी 'मध्यमान्मूर्ध्नि' असा बदल करून अर्थ केला आहे.]

त्या वर्तुळापासून कान व केसांच्या सीमांपर्यंत नऊ अंगुले व वर्तुळापासून पाठीमागच्या केसांच्या सीमेपर्यंत १०½ अंगुले अंतर असावे. (१३९)

[श्लोकार्ध १३९ त 'सार्धमध्याङ्गुलं'च्या ऐवजी 'सार्धधर्माङ्गुलं' असा बदल करून अर्थ दिला आहे.]

कपाळाच्या आडव्या भागाची लांबी नऊ अंगुले सांगतात. केसांच्या सीमेपासून नेत्रसूत्र या दोघांच्यामध्ये भुवया असतात. (१४०)

भुवयांची लांबी (एकंदर) नऊ अंगुले असून त्यांचा आकार धनुष्याप्रमाणे असावा. दोन्ही भुवयांमधील अंतर, हे ब्राह्मणा, ४½ यव असावे. (१४१)

भुवईची लांबी पाच अंगुले व (तिची) मध्यभागी रुंदी दोन यव असावी. तिच्या मध्य-भागाहून भुवईची टोके बालचंद्राप्रमाणे लहान (होत गेलेली) असावीत. (१४२)

कर्णिकेची (डोळ्यातील लोलकाची) लांबी व रुंदी एक यवाच्या मापाची सांगतात. (डोळ्यातील) काळ्या वर्तुळाची (बुबूळाची) रुंदी व उंची सहा यव असावी. (१४३)

[ श्लोकार्ध १४३ 'कृष्णमण्डलविस्तारं चोत्सेधं च यवं भवेत।'
कृष्णमण्डलविस्तारं चोत्सेधं षड्यवं भवेत्।
असा दुरुस्त करून अर्थ दिला आहे. ]

काळचा वर्तुळाच्या आजूबाजूला असलेल्या पांढऱ्या भागाची रुंदी ( कवडीची रुंदी ) तेवढीच असावी. मत्स्याकृती किंवा धनुष्याकृती किंवा अर्धचंद्राकृती डोळ्यांचा आकार असावा. हे ब्राह्मणा, त्याच्या ( डोळ्याच्या ) आकाराला अनुकूल असे पांढऱ्या रंगाचे वर्तुळ असावे. ( १४४, १४५ )

[ श्लोकार्ध १४३$\frac{१}{२}$ त 'तां तत्समं व्यासं' या ऐवजी 'सितांशं तत्समं व्यासं' अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. येथे पांढरा भाग सहा यव, काळे वर्तुळ सहा यव व त्यानंतर पुन्हा पांढरा भाग सहा यव असा चारी बाजूंनी पांढरा भाग सहा यव रुंदीचा आहे. ]

डोळ्याच्या कडांना $\frac{१}{२}$ यव रुंदीचा लाल रंगाचा भाग असावा. काळ्या वर्तुळाच्यामध्ये ज्योतिर्मंडल एक यवाचे असते. ( १४६ )

त्याच्यामध्ये त्याचा ८ भाग दृष्टिमंडल असावे. तेथे १$\frac{१}{२}$ यव मापाचा वरचा पडदा असावा. ( १४७ )

खालचा पडदा त्याच्या ( वरच्या पडद्या– ) इतकाच असून त्याची लांबी १८ यव असावी. हे ब्राह्मणा, डोळ्यांमधील अंतर २$\frac{१}{४}$ अंगुले असावे. ( १४८ )

वरील पडदा व भुवई यांच्यामधले अंतर ६$\frac{१}{२}$ यव असावे. खालच्या पडद्याचे स्थान त्याच सूत्रात पण किंचित वेगळे असावे. ( १४९ )

दृष्टी खाली असेल तर कर्त्याचा नाश होतो, दृष्टी वर असेल तर विपत्तिकारक असते. बाजूंकडे दृष्टी असल्यास फार नाश होतो किंवा गावाची हानी होते. ( १५० )

[ श्लोकार्ध १५० 'बहुनाशं भवेत्पार्श्वे दृष्टिश्चेद्भावमासनम्' या ऐवजी 'बहुनाशं भवेत्पार्श्वदृष्टिः ग्रामहानिं करोतु वा' असा घेऊन अर्थ दिला आहे. ]

तेव्हा सर्व प्रयत्नांनी दृष्टी सम असावी. डोळ्यांची ( माहिती ) अशी सांगितली, ( आता ) नाकाचे लक्षण सांगतो. ( १५१ )

नाकपुडीच्या बाहेरील रुंदी १८ यव असावी. त्याच्या निम्मे ( नऊ यव ) नाकाच्या मधल्या भागाची रुंदी असावी व नाकाच्या मुळाची रुंदी त्याच्या अर्धी (४$\frac{१}{२}$ यव ) असावी. ( १५२ )

गोजीच्या मुळापासून नाकाच्या अग्रापर्यंतची उंची दोन अंगुले असावी. नाकपुड्यांचा मधला पडदा एक पुष्कर ( कमलपरागाइतका ) असतो असे जाणावे. ( १५३ )

नाकाच्या टोकाचा भाग १$\frac{१}{२}$ यव पुढे आलेला असतो. नाकाच्या बोंडीची उंची व लांबी ४$\frac{१}{२}$ यव व त्याच्या निम्मे ( २$\frac{१}{४}$ यव ) तिची रुंदी असावी. (१५४)

वरच्या ओठावरील खोलगट भाग गोजी म्हणून प्रशंसिला आहे. गोजीची रुंदी एक यव असते. हे ब्राह्मणा, अशी गोजी नाकाखाली करावी. (१५५)

[ श्लोक १५५ 'यवमानं तु तां गोजीं कृत्वैवं नासिकादधः' अशी दुरुस्ती केली आहे. ]

तोंडाची आडवी लांबी ४½ अंश जाणावी. वरच्या ओठाची लांबी (व) तोंडाची लांबी सारखीच सांगतात. (१५६)

वरील ओठाच्या मधल्या भागाची रुंदी ३½ यव असावी, व प्रथमपासून तोंडाच्या सीमेपर्यंत ही कमी कमी होत जावी. (१५७)

[श्लोक १५७ त 'अपूर्वंकृतशान्तारमास्य' हा शब्दसमूह 'आनुपूर्व्या कृशं तारं' असा सुधारून अर्थ केला आहे.]

वरच्या ओठाच्या वरती पालीची (ओठ व नाक यांच्या मधला भाग) जाडी एक यव मापाची असावी. पालीची रुंदी तीन यव असून तिची लांबी वरच्या ओठाइतकी असते. (१५८)

खालच्या ओठाची लांबी १८ यव सांगितली आहे. हे ब्राह्मणश्रेष्ठा, त्या (ओठाची) रुंदी एक अंगुले एक यव असावी. (१५९)

पालिकेसह ओठ एक यव खाली आलेला असावा. हनुवटीपासून खालच्या ओठापर्यंतची उंची ६½ अंश सांगतात. (१६०)

चेहरा किंचित हंसरा व ऐटदार करावा. खालच्या ओठापासून हनुवटीचा आधार २½ अंगुले असावा. (१६१)

हनुवटीपासून हनुवटीच्या कडेचे स्थान ८½ सांगतात. त्या (हनुवटीच्या कडेची) रुंदी २½ अंगुले व आकार वृत्तायत असावा. (१६२)

हनुवटीच्या खळग्यापासून कानाचे अंतर १२ अंगुले असावे. हनुवटीच्या खळग्याच्या बाहेरून सुरुवात करून कंठाचा प्रवेश २¾ अंगुले सांगतात. तेथे (प्रवेशापाशी) कान असावा. डोळा व त्याच्या कडील कानाची सीमा या दोघांमधील अंतर सात अंगुले असावे. (१६३, १६४)

[श्लोक १६३ त 'भानोः' या शब्दाऐवजी 'हतोः' हा शब्द घेऊन अर्थ केला आहे. श्लोकार्ध १६३½ त 'कण्ठवेशमितिख्यातं तनेतन्यं (तो नेत्रं) वदामि ते' यात 'कण्ठवेशमितिख्यातं तत्र कर्णं प्रकल्पयेत्' अशी दुरुस्ती केली. तीदेखील योग्य वाटत नाही.]

कानाची रुंदी १८ यव सांगितली आहे. नेत्रसूत्राच्यावर कानाची उंची आठ यव सांगतात. (१६५)

कानाचा वरचा भाग त्याच्या निम्मे (नऊ भाग) असतो. (कानाचा) उरलेला भाग वर्तुळाकार असावा. ... ... ... ... (१६६)

['तदूर्ध्वं' च्या ठिकाणी 'तदर्धं' व 'तु मूर्धतः'च्या ऐवजी 'उदाहृतम्' अशा दुरुस्त्या करून श्लोकाचा अर्थ लावला आहे.]

नेत्रसूत्राच्या खाली कर्णबन्ध १७ यव असावा. तेथून (नेत्रसूत्रापासून) कानाची नाली ४½ अंगुले लांबवावी. (१६७)

पहिल्या (कर्णबन्धाजवळच्या नालीच्या) भागाची खोली एक अंगुल व नंतरच्या (नालीच्या भागाची) खोली दीड अंगुले असते. नालीची रुंदी त्यांच्या खोलीहून अर्धा अंगुले जास्त असते. (१६८)

[श्लोक १६८ सुधारला आहे तो याप्रमाणे–

'पूर्वभागे नतं व्योमभागं सार्धांशकं परम्।
नालयोर्व्यासमाख्यातं पुनरर्धांगुलं तयोः॥']

(कानाच्या) नालींमधले अंतर ३/४ अंगुले असून त्याची लांबी चार अंगुले असावी. उरलेल्या कानाची लांबी आठ अंगुले सात यव असावी. ( १६९ )

[ श्लोक १६८१/२ त 'ता ( ना ) लाकारौ त्रिपादंच वेदांशं विस्तृतायतम्' ।

'नालान्तरं त्रिपादांशं च वेदांशं विस्तराद् घनम्' अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे.]

पिप्पलीची जाडी एक अंश व लांबी त्याच्या दुप्पट (दोन अंश ) असावी. उंची अर्धा अंगुले असून मुळापासून अग्राकडे कमी कमी होत जाते. ( १७० )

पिञ्चषीची लांबी दोन अंश व जाडी सहा यव असावी. नेत्रसूत्राखाली कानाचे छिद्र अर्धा अंगुले असावे. ( १७१ )

कानाचे छिद्र खोल, सारखे, खाली वळलेले असे असावे. कानाच्या पाळीची जाडी ११/२ यव व निर्गमन चार यव असावे. ( १७२ )

[ श्लोकार्ध १७११/२ त 'नतं' च्या ठिकाणी 'ततो' व 'वक्षलम्' च्या ठिकाणी 'वर्तुलम्' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

कानाच्या पाठीमागच्या भागाची रुंदी ११/२ अंश सांगतात. केसांच्या कडेपासून कानाच्या पाठीमागच्या भागापर्यंत या दोघांमधील अंतर १/२ अंश असावे. ( १७३ )

पाठीमागील केसांच्या कडेपासून कान अडीच अंश अंतरावर असावा. कानाच्या खाली मानेची पाठीमागची बाजू तीन अंगुले तीन यव उंच असते. ( १७४ )

कृकाटिकेच्या खाली ( मानेचा पाठीमागील सरळ भाग, त्याच्या खाली ) मानेचे पाठीमागील अग्र नऊ अंगुले असावे. मानेच्या पाठीमागील भागाच्या मुळाची रुंदी १०१/२ अंगुले असावी. (१७५)

मुळापासून अग्रापर्यंत क्रमाक्रमाने निमुळती होत जाणारी गोलाकार मान सांगतात. हिक्का-सूत्राच्या वर खांद्याची ( की खांदा व मान यांच्या जुळणीची ? ) उंची चार अंगुले असते. ( १७६ )

[ श्लोक १७५१/२ त 'कर्षं' या ऐवजी 'क्षीणं' हा शब्द घेतला. स्कन्धतुङ्गं या शब्दाऐवजी शिल्परत्न ( दुसरा भाग ) श्लोक ५.८७ यात 'स्कंधसंन्धितुंगं' असा शब्द आहे. ]

तेथून ( खांद्यांपासून ) कमरेच्या कडेपर्यंत कणा २७ अंश लांब असावा. त्या कण्याची खोली व रुंदी ( अनुक्रमे ) १/२ व १६ यव असावी. (१७७)

[ श्लोकार्ध १७६१/२ 'तस्मादाकटिसीमान्तं बंशिक्ष (शमृ) क्षांशमायतम्' च्या ऐवजी 'तस्मादाकटिसन्ध्यन्तं वंशमृक्षांशमायतम्' असा बदल करून अर्थ दिला आहे.]

कण्याच्या खाली कण्याचे मुळ ( माकड हाडाची जागा ) तीन अंगुले असते. त्याखाली तेवढीच उंची असावी (?) तेथील रुंदी तुला सांगतो. ( व रुंदी तेवढीच असते. ) ( १७८ )

[ माकडहाडाची रुंदी, लांबी व उंची तीन अंगुले असते. ]

कुशींमधले अंतर, हे ब्राह्मणा, २७१/२ अंगुले सांगतात. कुशींच्या खालच्या पुठ्ठ्यांची उंची सात अंगुले सांगतात. ( १७९ )

[ 'कक्षयोः स्वंसफकतुङ्गं या ऐवजी कक्षाधस्यांसफलकतुङ्गं अशी दुरुस्ती केली. ]

कुशीच्या वर हाताच्या कडेपर्यंतचे अंतर सात अंगुले सांगतात. मध्यभागाची रुंदी १६½ अंगुले सांगतात. (१८०)

कुशींच्या पुढील भागाची रुंदी सात अंगुले सांगतात. नाभिसूत्रापाशी मात्र रुंदी २०½ अंगुले असावी. ( १८१ )

[ ‘ सार्धत्र्यवर्धांगुलं ’ च्या ऐवजी ‘ सार्धविंशांगुलं ’ अशी दुरुस्ती केली आहे. ]

कंबरेपाशी रुंदी १८ अंश सांगतात. ९¾ भाग स्फिक्‌पिण्डाची रुंदी असावी. (१८२)

[ ‘ पादोनकर्मभागं ’ या ऐवजी ‘ पादोनधर्मभागं ’ अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

( स्फिक्‌पिण्ड ) संपूर्ण गोल असून त्यांच्यामधले अंतर चार यव असते. पुढील रुंदी अशी सांगितली, बाजूंकडून रुंदी एवढीच असते. ( १८३ )

[ ‘ सवित्तौ ’ च्या ठिकाणी ‘ सुवृत्तौ ’, ‘ अपरेतरबिंबोक्तं ’ च्या ऐवजी ‘ तारमेवोक्तं ’ अशा दुरुस्त्या करून अर्थ केला आहे. ]

कुशींच्या वरच्या भागाची रुंदी सात अंगुले सांगतात. स्तनसूत्रापाशी १६¼ अंगुले रुंदी असते. ( १८४ )

मध्यभागाच्या बाजूंची जाडी १२¼ अंश असावी. पार्श्वभागाच्या बाजूंची जाडी १७ अंगुले असावी. ( १८५ )

तेथे पार्श्वभागाची उंची, हे ब्राह्मणा, सात अंगुले सांगितली आहे. नाभिसूत्राच्याखाली व वर ( पार्श्वभाग ) १२ अंगुले असावा. ( १८६ )

पार्श्वभागाच्या खाली कुल्ल्यांची उंची ५½ अंगुले असावी. त्यांची जाडी, हे बुद्धिमंता, १२½ अंगुले असावी. ( १८७ )

स्फिक्‌पिण्डांचे मांड्यांच्या मुळापासून निर्गमन ४½ अंगुले असावे. त्या पिण्डांची जाडी अर्धसूत्रापासून (?) ½ अंगुले असावी. ( १८८ )

कुशींपासून जठरभाग २½ अंगुले खाली असतो. नाभी संपूर्ण गोल असून तेथे गोलाकार दोन रेषा असतात. ( १८९ )

[ श्लोक १८९ खालीलप्रमाणे सुधारून अर्थ केला आहे.

‘ कक्षाज्जठरनिम्नं तु सार्धद्व्यङ्गुलकं भवेत् ।
सूत्रं सुवृत्तनाभेस्तु रेखे द्वे परिवेष्टिते ॥ ’]

त्या रेषांची रुंदी ( व्यास ) व उंची चार यव असते. हिक्कापासून नेत्रसूत्रापर्यंत जाणाऱ्या सूत्रास जानुसूत्र ( ? ) म्हणतात. ( १९० )

[ श्लोकार्ध १९० सुधारून असा घेतला.

‘ हिक्कादाश्वाक्षिसूत्रं तज्जानुसूत्रामुदाहृतम् ’ व अर्थ केला. ]

कुशींच्या मध्यापासून बगलांपर्यंत व स्तनांमधले अंतर सारखे असावे. दोन्ही स्तनांच्या मध्ये हृदयाचा खळगा १½ अंगुले खोल असतो. ( १९१ )

कंठाच्या मुळापाशी जी नाल असते तिची रुंदी तीन यव मापाची व लांबी १½ अंगुले कल्पावी. ती मन्त्राप्रमाणे ( ? ) असावी. ( १९२ )

हिक्कासूत्राच्या खाली कण्ठाचे मूळ कल्पावे. हिक्कासूत्राच्यावर ( शंकरमूर्तीच्या बाबतीत ) निळा रंग असावा. ( १९३ )

हृदयापेक्षा स्तनपीठ दोन अंगुले उंच सांगितले आहे. स्तनमण्डलाची रुंदी १७ यव सांगितली आहे. ( १९४ )

त्याच्यामध्ये जी बोंडी तिची उंची व रुंदी दोन यव असावी. नाभीपेक्षा स्तनाची रुंदी एक अंगुल दोन यवांनी जास्त असते. ( १९५ )

[ 'व्योमावशं द्वयाधिकम्' हे 'व्योमांशं द्वियवाधिकम्' असे दुरुस्त केले. ]

नाभिप्रदक्षिणक्रमाने गोल असून तिच्या मुळाची रुंदी दोन यव असावी. हे ब्राह्मणश्रेष्ठा, त्या नाभीच्या वर्तुळाच्या केन्द्रस्थानी नाभिसूत्र असते. (१९६)

नाभीच्या खाली असलेल्या पार्श्वभागाची उंची पाच अंगुले असते. त्याच्या खाली २½ अंगुलांवर कटिपार्श्व ( कुल्ले ) असतात. (१९७)

[ 'पादोनस्तोच्चयं'च्या ऐवजी 'पादोनं श्रोण्युच्चं' अशी दुरुस्ती केली आहे. ]

त्या ( कटिपार्श्वा ) पासून मेढ्रमुळापर्यंत जे मेढ्रपीठ ते चार अंगुले असावे. लिंगाची लांबी ५¼ अंगुले सांगितली आहे. ( १९८ )

[ 'पादतन्मात्रं' च्या ऐवजी 'सपादपंचमात्रं' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

लिंगाच्या मुळापाशी रुंदी १७ यव सांगतात. लिंगाच्या लांबीच्या तीन भागांपैकी एक भाग त्याचे पुढचे टोक असावे. ( १९९ )

तेथे लिंगाच्या पुढच्या भागाच्या मुळाची रुंदी एक यवाने जास्त असते. लिंगाच्या पुढच्या टोकाचा भाग मिटलेल्या तांबड्या कमळाप्रमाणे असावा असे सांगतात. ( २०० )

[ श्लोकार्धं १९९½ 'तत्र आगण्डमूले तु यवमानं द्रुह(गुदा)न्तरम्' शुद्ध करून 'यदग्रखण्डिमूलं तु यवमानं बृहत्तरम्' अर्थ केला आहे. ]

मुष्काची लांबी व रुंदी ४½ अंगुले असावी. त्याची जाडी ३½ अंश असून मुळापासून टोकापर्यंत जाडी वाढत जाते. ( २०१ )

मेढ्रपीठाच्या मुळाची रुंदी साडेसात अंगुले असावी. मेढ्रपीठाच्या मुळाचा शेवट मांडीच्या मांसल मुळात होतो. ( २०२ )

गुडघ्याच्या वर्तुळाची रुंदी ४¼ अंगुले असावी. गुडघ्याच्या वर्तुळाचे निर्गमन २½ अंगुले सांगितले आहे. (२०३)

गुडघ्याच्या पाठीमागील भाग २½ अंगुले खाली झुकलेला असतो. मध्यभागी, बाजूंना व उरलेला भाग जसा सुंदर दिसेल तसा करावा. (२०४)

[ 'पृष्ठजान्वोतां' च्या ऐवजी 'पृष्ठजानुनतं' अशी दुरुस्ती केली. ]

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील उत्तम दशताल पुरुषाचे माप या नावाचे पन्नासावे पटल संपले.**

# एकावन्नावे पटल

## [ मध्यम दशताल विधान ]

मध्यम दशतालात स्त्रीचे माप आता सांगतो. सरस्वती, दुर्गा, उमा, भूमि, ( सात ) माता, लक्ष्मी आणि तसेच ज्येष्ठा या रीतीने कराव्यात. शंकर, ब्रह्मा, रथामधील विष्णू, शक्ति यांच्याकरिताही ( मध्यम दहा तालांत माप ) घ्यावे. ( १, २ )

त्यांच्यातील परस्परांचे माप व त्यांना योग्य असलेले माप याप्रमाणे त्यांचे माप असावे. शंकराच्या नाकाच्या सीमेपर्यंत शक्तीची उंची हे उत्तम ( माप ) आहे. ( ३ )

शंकराच्या स्तनभागापर्यंत (शक्तीची उंची ) हे सर्वात कनिष्ठ माप आहे. त्यांच्यामधील (मापाच्या ) आठ भागांनी शक्तीचे माप नऊ प्रकारचे होते. ( ४ )

शंकराच्या खांद्यांपर्यंत ( शक्तीची उंची ) हे सर्वांत उत्कृष्ट माप व ( शंकराच्या ) स्तनभागापर्यंत ( शक्तीची उंची ) हे कनिष्ठ माप सांगितले आहे. त्यांच्यामधल्या ( मापाच्या ) आठ भागांपैकी प्रत्येक एक भाग असे शक्तीचे माप नऊ प्रकारचे होते. ( ५ )

[ 'शंभोर्हि ख्यातमुद्दिष्टं' यात 'शंभोर्हिक्कान्तमुत्कृष्टं' असा बदल करून अर्थ दिला आहे. ]

( अशा रीतीने ) पायापासून पगडीच्या कडेपर्यंत ( शक्तीचे उंचीने ) १८ प्रकार होतात. तिच्या अंशाची ( अंगुलाचे माप ) लांबीप्रमाणे योजना कशी करतात ते सांगतात. ( ६ )

श्रीभंग, बसलेली आणि नृत्य करणारी (अशा) मानवी ( रूपाच्या देवी ) मूर्तीची व समपाद स्थानात उभ्या देवीची वर ( दिलेली ) उंची युक्तीने ठेवावी. ( ७ )

ब्राह्मणाने दुर्गा, ज्येष्ठा, लक्ष्मी आणि विशेषतः ( सात ) माता यांच्या मापाच्या बाबतीत प्रतिमेच्या मानाने ( लिंग इत्यादींच्या मानाने ) कल्पावे . ( ८ )

मूळलिंगाची गौरी ( एकटी, शंकराशिवायची गौरी मूर्ती ) लिंगाच्या ( प्रतिमेच्या ) मापाने कल्पावी. स्त्रीचे मान १२० भागांत विभागून, ( ९ )

[ गौरीमूर्ती शंकराच्या मूर्तीबरोबर नसून एकटी असेल तर शंकराच्या मापावरून वर दिल्याप्रमाणे तिचे माप न घेता ती मध्यम दशताल मापात घ्यावी. ]

एक अंश ( भाग ) म्हणजे एक अंगुल सांगतात व त्याच्या $\frac{१}{२}$ यवाचे ( माप ) होते. त्या अंगुलाने व यवाने अवयवांची मापे घ्यावीत. ( १० )

उमा इत्यादी देवींकरिता हीच अंगुलाची लांबी असावी. पगडीची उंची एक अंश, केसांच्या कडेपर्यंत ( उंची ) तीन अंगुले असावी. ( ११ )

केसांच्या कडेपासून नेत्रसूत्रापर्यंत ४$\frac{३}{४}$ अंश ( उंची ), नेत्रसूत्रापासून नाकपुडीपर्यंत ४$\frac{१}{२}$ अंश उंची सांगतात. ( १३ )

हिक्कापासून (खांद्यांपासून) हृदयापर्यंत, हृदयापासून नाभीपर्यंत (व) नाभीपासून योनीपर्यंतचे ( माप ) सारखेच असून १३ अंगुले असते असे सांगतात. ( १४ )

[ 'ही (वि) ख्यातं (हृ) दयान्तं' च्या ऐवजी 'हिक्कादि हृदयान्तं' असा शब्दप्रयोग घेऊन अर्थ केला आहे.]

मांडीची लांबी २६ अंश व गुडघा चार अंश असतो. मांडीइतकीच जंघेची लांबी असते व पावलाची उंची चार अंगुले असते. पायाच्या तळव्याची आंगठ्याच्या पाठीमागील भागापासून अग्रापर्यंतची लांबी तेवढीच ( चार अंगुले ) असावी. ( १५ )

[ श्लोक फार अशुद्ध आहे तो शिल्परत्न ६.४½ वरून खाली दिल्याप्रमाणे शुद्ध करून अर्थ केला आहे.

'ऊरुदीर्घं तु षड्विंशदंशं जानुयुगांशकम्' तसेच 'दीर्घपान(द) तलं युगम्' या ऐवजी 'तलोच्चं तु युगांशकम्' अशी दुरुस्ती केली आहे.]

( पायाच्या ) तर्जनीची लांबी चार भाग सांगितली आहे. ( मधल्या बोटाची लांबी ) ३¼ अंगुले (व) तेथील अनामिकेची लांबी तीन भाग असावी. ( १६ )

करंगळीची लांबी २½ भाग असावी. आठ, आठ, साडे सात, सात (व) सहा यव ( ही अनुक्रमे ) आंगठ्यापासून करंगळीपर्यंत पायाच्या बोटांची रुंदी असावी. नखाची रुंदी ( बोटाच्या रुंदीच्या) ⅔ व त्याच्या ⅛ भाग कमी करून वृत्तायताकार (नखाग्रे ) असावीत. ( १७, १८ )

बोटांच्या पुढल्या भागाची रुंदी नखाच्या रुंदीइतकी असावी. मध्यभागी गुडघ्याची रुंदी सहा अंगुले असावी. ( १९ )

[ बहुधा तळव्याची पुढच्या भागाची रुंदी सहा अंगुले असावी असे पाहिजे.]

( तळव्याची ) मधल्या भागाची रुंदी पाच अंगुले व ( तळपायाच्या) शेवटल्या भागाची ( टाचेची ) रुंदी चार अंगुले असावी. तळपायाचा उचललेला भाग व घोटा यांमधील अंतर पाच भाग असावे. ( २० )

नळी १२ अंश व जंघेच्या मधल्या भागाची रुंदी सहा अंगुले असावी. गुडघ्याची रुंदी सात अंश (व) मांडीच्या मुळाची रुंदी १२ अंश असावी. ( २१ )

कंबरेची रुंदी २४ अंगुले असावी, योनिपीठाची रुंदी सात अंगुले सांगतात. ( २२ )

योनिभाग चार अंश असून औदुंबराच्या खाली आलेल्या पानासारखा ( निमुळता ) असतो. जेवढी रुंदी तेवढीच योनीची उंची असून ती बरोबर मध्यभागी असावी. ( २३ )

श्रोणीपाशी रुंदी २० अंगुले एक यव असावी. नाभीची खोली व रुंदी एक यव सांगतात. ( २४ )

मध्यभागाची ( बगला ते पार्श्वभाग यांमधील सर्वांत अरुंद भागाची ) रुंदी ११ अंगुले सांगतात. स्तनांची रुंदी १३½ अंगुले असावी. ( २५ )

स्तनांमधील अंतर नऊ अंश असून स्तनाग्रे दोन अंश असावी. स्तनांची उंची ४½ अंश व स्तनाग्रांची उंची एक अंश असावी. ( २६ )

स्तनाक्ष व स्तन ही ( दोन्ही ) वर्तुळाकार व अत्यंत सुंदर करावीत. स्तनांमधील अंतर आठ अंश एक यव असावे. ( २७ )

स्तनाक्षांमधले ( दोन स्तनाग्रांमधले ) अंतर, हे ब्राह्मणा, १७ अंगुले सांगतात. हातांपर्यंतची रुंदी ३१ अंगुले असावी. (२८)

हिक्कासूत्राच्या खाली हाताची लांबी २६ अंगुले असावी. कोपऱ्याची उंची दोन भाग असून प्रकोष्ठाची (लांबी) १८ अंगुले असावी. (२९)

मनगटापासून तळव्यापर्यंतचे अंतर (म्हणजे तळव्याची लांबी) सात अंगुले सांगतात. तेथून मधल्या बोटाची लांबी सहा अंगुले व नंतर तर्जनी असावी. (तर्जनीची लांबी पाच अंगुले असावी.) (३०)

अनामिकेची लांबी तर्जनीइतकी असते. आंगठा व करंगळी यांची लांबी चार अंगुले असावी. बोटांची ही लांबी दोन्ही हातांकरिता असावी. (३१)

नऊ, सात, आठ, सात यव आंगठा इत्यादी (बोटांची) रुंदी असते. त्यातील सहा अंश (यव) येथील नखाची रुंदी सांगतात. (३२)

नखांची लांबी नऊ यवांहून जास्त असून ते निमुळते होत गेलेले असावेत. हाताच्या तळव्याची रुंदी पाच अंगुले ठेवावी. (३३)

मनगटाची रुंदी तीन अंगुले, कोपऱ्याची रुंदी पाच अंगुले, हाताची रुंदी सहा अंश व हाताच्या मुळापाशी रुंदी सात अंश असावी. (३४)

हाताच्या मुळापासून मनगटापर्यंत कोवळ्या बांबूप्रमाणे (हात) बारीक होत जातो. हाताची रुंदी अशी असावी. गळ्याची रुंदी सात अंश असावी. (३५)

गळ्याच्या पुढल्या भागापाशी व मुळापाशी रुंदी आठ अंश एक यव असावी. चेहऱ्याची रुंदी ११ अंश असून कोंबडीच्या अंड्याप्रमाणे उभट आकार असावा. (३६)

भुवया व केसांची कडा यांमधले अंतर २$\frac{1}{4}$ अंगुले असावे. भुवईचा मध्यभाग व नेत्रसूत्र यांमधले अंतर २$\frac{1}{2}$ अंगुले असावे. (३७)

[श्लोक ३८ व ३८$\frac{1}{2}$ अपुरे व अत्यंत अशुद्ध आहेत. मात्र अजून नाकाचे वर्णन आलेले नाही तेव्हा हे नाकाचे वर्णन असावे. ५०·१५२ त उत्तम दशताल पुरुषाच्या नाकाचे वर्णन आहे. त्यावरून म्हणता येईल की नाकाची बाहेरील रुंदी एक अंगुल व एक यव असावी. त्याच्या निम्मे (४$\frac{1}{2}$ यव) नाकाच्या मधल्या भागाची रुंदी असावी व नाकाच्या मुळाची रुंदी त्याच्या निम्मे (२$\frac{1}{4}$ यव) असावी.]

पाय हत्तीच्या सोंडेच्या (आकारा) प्रमाणे करावा. हात गोपञ्चाप्रमाणे (गोपुच्छा-प्रमाणे ?) करावा. उरलेले अवयवांचे माप (उत्तम दश) तालाकरिता सांगितल्याप्रमाणे घ्यावे. (३९)

स्त्रियांचे माप सामान्यतः असे घ्यावे. आता त्यातील वैशिष्ट्य ऐक. गौरी याप्रमाणे (या मापाची), दोन हातांची, शान्त मुद्रेची, दोन डोळ्यांची (व) पसरलेल्या सहा (?), (४०)

करण्डमुकुट किंवा किरीटमुकुट घातलेली असते. (किंवा) बांधलेल्या केसांचाच मुकुट घातल्याने मनोहर दिसणारी (अशी) करावी. (४१)

केसांच्या कडांपासून मुकुटाची उंची १८ अंगुले असेल तर तो कनिष्ठ मुकुट, २१ अंगुलांचा मध्यम व २४ अंगुलांचा श्रेष्ठ मुकुट असतो. (४२)

डोक्याच्या घेराहून मुकुटाची रुंदी एक यवाने जास्त असावी. मुकुटाच्या मुळाचे सात (किंवा) आठ विभाग करून एका भागाने अग्राची रुंदी कमी असावी. (४३)

किरीटमुकुट व बांधलेल्या केसांची रचना अशा प्रकारे करावी. मुळापासून (खालून वर) क्रमाक्रमाने बारीक होणारा करण्डमुकुट असतो. (४४)

मुकुटाच्या अग्रापाशी मिटलेल्या कमळाचा आकार द्यावा. तीन, पाच, सात किंवा नऊ करण्ड (करण्डमुकुटावर) शोभत असतात. (४५)

चार पुरीम (?) ल्यालेली, निरनिराळ्या फुलांनी अलंकृत केलेली, उपग्रीवासह हार (व) मोत्यांच्या माळा यांनी सुशोभिलेली, (४६)

कानांत त्यांच्या (कानांच्या) चौपट लांबीची कुंडले असतात. मकरकुंडले किंवा वर्तुळाकार कुंडले (कानांत) घातलेली, (४७)

[ 'मुकुटं' च्या ऐवजी 'मकरं' शब्द घेतला आहे. ]

कटके (बांगड्या, पाटल्या वगैरे), करदोडा, उपग्रीवासह हार यांच्यासह बाजुबंद व छिन्नवीरासह– (४८)

[ 'सारोपग्रीव' च्या ऐवजी 'हारोपग्रीव' शब्द घेतला आहे. ]

यज्ञोपवीत घातलेली, केयूर ल्यालेली व सुंदर चेहऱ्याची, रेशमी वस्त्र नेसलेली, सावळ्या रंगाची व सुंदर स्तनांची देवी असावी. (४९)

उजव्या हातात कमळ (उत्पल) व डावा हात लांबविलेला (सरळ) असावा. आभंग किंवा समभंगमुद्रेत अशी अत्यंत सुंदर असावी. (५०)

उजवा पाय सरळ ठेवलेला व डावा पाय आभंगात तीन अंश व समभंगात चार अंश आखडून (वाकवून) घेतलेला असावा. (५१)

नतमान (उंचीचे माप) सांगितले. आता अनुक्रमाने सूत्रांची (माहिती) सांगतो. कपाळाच्या मध्यभागाच्या डाव्या बाजूने डोळ्याच्या खाली (डाव्या) नाकपुडीवरून, हनुवटीच्या डाव्या बाजूने, तेथून स्तनांच्या अंतराच्या मध्यातून, नाभीच्या उजवीकडून व डाव्या मांडीच्या उजव्या बाजूने जाऊन, उजव्या पायाच्या टाचेच्या डाव्या बाजूला (आभंगसूत्र) लांबवावे. (५२–५३½)

[ श्लोक ५२½ त 'हरेर्वारे' च्या ऐवजी 'हनोर्वामे' अशी दुरुस्ती केली आहे. ]

पाय व आंगठा यांच्यामधले अंतर १६ अंगुले असते. त्या (अंतराच्या) तीन भागांपैकी एक भाग (५⅓ अंगुले) (दोन) पायांच्या टाचांमध्ये (अंतर) असावे असे सांगतात. असे आभंग सांगितले. आता समभंग ऐक. (५४, ५५)

[ 'तत्र भागैकभागं' च्या ऐवजी 'तत्रिभागैकभागं' अशी दुरुस्ती केली आहे. ]

कपाळाचा मध्य व नाकाचे अग्र यापासून पायांच्या पाठीमागील टाचांच्या मध्यभागापर्यंत ब्रह्मसूत्र पसरून, त्यापासून (खाली दिल्याप्रमाणे निरनिराळ्या अवयवांचे) अंतर मोजावे. (५६)

त्या (ब्रह्म–) सूत्रापासून स्तनांमधला मध्यभाग उजव्या बाजूला तीन अंगुले असावा. त्या सूत्राच्या डाव्या बाजूला नाभीचे निर्गमन दोन अंगुले असावे. (५७)

त्या सूत्राच्या डाव्या बाजूला योनिमध्य चार अंगुले अंतरावर असावा. त्या सूत्राच्या उजव्या बाजूला गुडघ्याचे निर्गमन तीन अंगुले असावे. (५८)

उरलेले पूर्वी सांगितलेल्या गौरीच्या लक्षणाप्रमाणे असावे. सरस्वती, शक्ति इत्यादींचे (माप) पूर्वी सांगितल्याप्रमाणे घ्यावे किंवा घेऊ नये ( ? ) (५९)

[ श्लोक ४८.९० ते ९५ यात गौरीचे लक्षण दिले आहे. श्लोक ४८.११४ ते ११६½ सरस्वतीचे लक्षण दिले आहे. ]

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील मध्यम दशतालविधान नावाचे एकावन्नावे पटल संपले.**

## बावन्नावे पटल

### [ अधम दशताल विधान ]

कनिष्ठ दशतालाच्या ( मूर्तीच्या अवयवांचे माप ) हे ब्राह्मणश्रेष्ठा, सांगतो ऐक. चंद्र, सूर्य (आदित्य), अश्विनी, तसेच ऋषी, गुह ( कार्तिकेय) त्याचप्रमाणे आर्य ( सूर्य ), शतमुख ( षण्मुख? ), चण्डेश आणि क्षेत्रपालक हे, विचक्षण माणसाने कनिष्ठ दशताल मापाने करावेत. ( १, २ )

अधम दशताल मापाचे ११६ अंश असतात. पगडी एक अंगुले सांगतात, केसांचे माप तीन अंगुले. ( ३ )

केसांपासून हनुवटीपर्यंत अंतर १२½ अंगुले असावे. गळ्याचे माप, हे ब्राह्मणश्रेष्ठा, चार अंगुले सांगतात. (४)

हिक्कापासून स्तनमुळाच्या कडेपर्यंत १२½ अंगुले (अंतर) असावे. स्तनापासून नाभीपर्यंतचे अंतर तेवढेच (१२½ अंगुले) सांगतात. ( ५ )

नाभीपासून मेढ्रमुळाच्या कडेपर्यंत १२½ अंगुले ( अंतर ) असते. त्या मेढ्रमुळापासून गुडघ्याच्या अग्रापर्यंत ( अंतर) २५ अंश असावे. ( ६ )

गुडघा चार भाग, जंघा मांडीएवढी असावी. पावलाची उंची चार अंश असावी. हे उंचीचे ( माप ) झाले. (७)

पगडीपासून पाठीमागच्या केसांच्या कडांपर्यंत अंतर १२½ अंगुले असावे. पगडीच्या बाजूकडील कडांपासून केसांच्या कडांपर्यंतचे अंतर पाच अंगुले सांगतात. ( ८ )

केसांच्या ( कडे ) पासून हनुवटीपर्यंतच्या मापाचे तीन भाग करून, केसांच्या कडांपासून नेत्रसूत्रापर्यंत, तेथून नाकपुडीच्या अर्ध्या लांबीपर्यंत व तेथून हनुवटीपर्यंत प्रत्येकी एक भाग अंतर असावे. ( ९ )

हे ब्राह्मणा, डोळ्यांमधले अंतर दोन अंगुले एक यव असावे. डोळ्यांची लांबी तेवढीच (दोन अंगुले एक यव) किंवा ( एकूण) लांबी पाच अंगुले असावी. ( १० )

भुवईच्या मध्यापासून वर केसांच्या कडांपर्यंतचे अंतर १७ यव सांगतात. भुवईच्या मध्याची रुंदी ( मध्यभागील भुवईची रुंदी ) एक यव असून, टोकांना ती बारीक होत जाते. ( ११ )

डोळ्यांची रुंदी सहा यव, वरचा पडदा अर्धा यव व खालच्या पडद्याची रुंदी तेवढीच असावी, करवीर (कनीनिका) एक यव (व्यासाची) असावी. ( १२ )

डोळ्याच्या लांबीचे तीन भाग करून एक अंश काळे वर्तुळ ( बुबूळ ) असावे. काळ्या रंगाच्या वर्तुळात एक यव प्रमाणात ज्योतिर्मण्डल असावे. ( १३ )

ज्योतिर्मण्डलाच्या मध्यभागी एक यूका मापाची दृष्टी असावी. ( डोळ्याच्या ) खालच्या पडद्यापाशी विशेषत: नेत्रसूत्र असावे. ( १४ )

तिच्या ( भुवईच्या ) केसांच्या टोकांमधला आकार लहान चंद्रकोरीप्रमाणे असावा. कानाची जागा व कान उत्तम दशतालाप्रमाणे असावेत. ( १५ )

नाकाच्या मुळाची रुंदी एक यव सांगितली आहे. नाकाच्या अग्राची रुंदी एक अंगुल सांगतात. ( १६ )

खालच्या ओठाची लांबी दोन अंगुले सांगतात. त्याची रुंदी त्याच्या निम्मे (एक अंगुले ) व हनुवटी दोन अंगुले असावी. ( १७ )

तिची ( हनुवटीची ) रुंदी तेवढीच (दोन अंगुले ) असून तिच्यातील खळगा अर्धा यव (व्यासाचा ) असावा. त्याच्यापासून खालच्या ओठाचे निर्गमन सात यव असावे. ( १८ )

गळ्याच्या मुळाची रुंदी आठ अंगुले सांगतात. गळ्याच्या अग्राची रुंदी ७½ अंगुले असावी. ( १९ )

वक्षस्थलाची रुंदी ३७ अंगुले, हाताची लांबी २५ अंगुले सांगतात. ( २० )

प्रकोष्ठाची लांबी १९ अंगुले, त्याच्यापासून ( मनगटापासून ) मधल्या बोटाच्या टोकापर्यंत अंतर १२½ अंगुले असावे. ( २१ )

त्याच्या निम्मे ( ६¼ अंगुले ) तळव्याची लांबी असून उरलेली लांबी ( ६¼ अंगुले ) मधल्या बोटाची असावी. त्याच्या आंगठ्याची लांबी १८ यव सांगतात. ( २२ )

अनामिकेची लांबी ४½ अंगुले सांगितली आहे. तर्जनीची लांबी तेवढीच ( ४½ अंगुले ) असून करंगळीची (लांबी ) चार अंगुले असावी. ( २३ )

आंगठा इत्यादी बोटांची रुंदी ( अनुक्रमे ) दहा, नऊ, आठ, ( नऊ ) व पाच यव असावी. त्यांच्या मुळांपेक्षा टोकांची रुंदी ½ ने कमी असावी. ( २४ )

( बोटाच्या ) टोकांची रुंदी पाच अंश असेल तर चार अंश नखाची रुंदी असावी. रुंदीपेक्षा नखाची लांबी ¼ ने जास्त असावी ( म्हणजे पाच अंश ) असे सांगतात. ( २५ )

आंगठ्याच्या ( नखांची लांबी ) मात्र ( नखाच्या रुंदीच्या ) निम्म्याने जास्त असावी, इतर ( बोटांच्या नखाची लांबी रुंदीच्या ) पाऊणपट असावी. तळव्याच्या मध्यभागी रेघा असाव्यात व ( तळव्याच्या ) बाजूंवर शूलांप्रमाणे (रेघांनी आकृती ) काढावी. ( २६ )

[ श्लोकार्ध २५½ चा अर्थ आंगठ्याला दोन पेरे व इतर बोटांना तीन पेरे असावेत असा होऊ शकेल व तो अधिक संयुक्तिक वाटतो. ]

(तळव्याच्या) मुळाकडील भागाची जाडी ...... त्याला कोलक (?) म्हणतात. (तळव्याच्या) पुढच्या भागाची जाडी ⅛ अंशाने कमी असावी. (२७)

तळव्याच्या लांबीइतकीच तळव्याची रुंदी जाणावी. मनगटाची रुंदी तीन अंगुले दोन यव असावी. (२८)

प्रकोष्ठाच्या मुळाची रुंदी ५½ अंगुले सांगतात. हाताच्या अग्राची रुंदी ६½ अंगुले सांगतात. (२९)

हाताच्या मध्यभागाची रुंदी सात अंगुले सांगितली आहे. हिक्कासूत्रापासून कुक्षींपर्यंत आठ अंगुलांचे अंतर सांगतात. (३०)

कुक्षींमधले अंतर २२ अंगुले सांगतात. हृदयापाशी रुंदी १८ अंगुले असावी. (३१)

पोटाची रुंदी १७ अंगुले असावी. श्रोणिप्रदेशाची रुंदी दहा (१८?) अंगुले सांगतात. (३२)

नाभीची रुंदी सहा यव व खोली अर्धा यव असावी. स्तनाच्या वर्तुळाचा व्यास अर्धा अंगुले सांगतात. (३३)

स्तनाग्राची उंची व रुंदी सारखीच असावी. गुडघ्याच्या मध्यभागी रुंदी ६½ अंगुले सांगतात. (३४)

नळीची रुंदी ४½ अंगुले असावी. पायाच्या तळव्याची पुढच्या भागाची रुंदी नऊ (चार?) अंगुले सांगतात. (३५)

तळपायाच्या मध्यभागाची रुंदी पाच अंगुले सांगतात. पायाच्या आंगठ्याची लांबी चार अंगुले सांगतात. (३६)

त्याच्या (तळपायाच्या आंगठ्याच्या) टोकापासून घोटयाच्या उंचवटयापर्यंत अंतर १२½ अंगुले असावे. (पायाच्या) अनामिकेची लांबी ३३ यव असावी. (३७)

मधल्या बोटाची लांबी तिच्या (अनामिके) इतकीच (३३ यव) असून तिची रुंदी (लांबीच्या) ¼ असावी, (?) करंगळीची लांबी २½ अंगुले (२० यव) असावी. (३८)

[मधल्या बोटाची रुंदी येथे अप्रस्तुत आहे. खालच्या श्लोकात ती दिली आहे. तेव्हा तर्जनीची लांबी चार अंगुले (३२ यव) असावी अशा अर्थाचा हा श्लोक सुधारून घ्यावयास हवा.]

करंगळी इत्यादी बोटांची रुंदी अनुक्रमे सात, आठ, नऊ, दहा व १३ यव असावी. (३९)

(बोटाच्या) टोकाची (रुंदी) मुळाच्या (रुंदी) इतकीच सांगतात. (बोटाच्या) रुंदीचे तीन भाग केले असता नखाची रुंदी दोन भाग व त्याच्या टोकाचा आकार वृत्तायत असतो. (४०)

आंगठ्याचे मूळ व तळपायाचा पुढील भाग येथील जाडी दोन अंगुले असावी. करंगळीच्या मुळाची जाडी नऊ यव असावी. (४१)

घोटयापासून टाचेपर्यंत अंतर एक भाग असून टाचेची उंची तेवढीच (एक अंगुले) असावी. पाठीमागील वर्तुळाकार भागाची (टाचेची) रुंदी ८¾ अंगुले असावी. (४२)

वक्षस्थलाच्या वरच्या भागाची रुंदी ३५ अंगुले असावी. कुक्षीं(?) मधले अंतर २४ अंगुले सांगतात. (४३)

येथे ज्याचे (अवयवाचे माप) सांगितलेले नाही त्याचे (माप) उत्तम दशतालाप्रमाणे असावे. ज्यांची ( चंद्र, आदित्य वगैरे ) त्यांची आकृती (हातांची संख्या, मुकुटाचा प्रकार, आयुधे वगैरे ) पूर्वी सांगितल्याप्रमाणे असावीत. ( ४४ )

[ वरील माहितीसाठी पटल ४८ पहावे. ]

**काश्यपशिल्पातील दशताल नावाचे बावन्नावे पटल संपले.**

# त्रेपन्नावे पटल

## [ उत्तम नवताल विधान ]

आता नवताल सांगतो. एकाग्रचित्ताने ऐक. वसूंच्या आठ मूर्ती, कुबेर, लोकपालक ( व ) इतर देवता या उत्तम नवतालात कराव्यात. ( १, १½ )

मूर्तीची ( उंची ) ११२ भागांत विभागली असता, पगडी एक भागाने, ( तेथून ) केसांची कडा तीन अंगुले, केसांच्या कडेपासून नेत्रसूत्रापर्यंत चार भाग असावेत. ( २,३ )

तेथून ( केसांच्या कडेपासून ) नाकपुडीच्या सीमेपर्यंत चार अंश ( व तेथून ) हनुवटीपर्यंत चार अंश. गळ्याचे माप ( उंची ) चार अंश; ( गळ्यापासून ) हृदयापर्यंत १२ अंगुले, हृदयापासून नाभीपर्यंत १२ अंगुले व नाभीपासून मेढ्रमुळापर्यंत १२ अंगुले ( अंतर ) असावे. ( ४, ५ )

मांडीची लांबी २४ अंश, गुडघ्याची लांबी चार अंगुले, जंघा मांडीइतकीच ( २४ अंगुले लांब ) असावी. पावलाची उंची चार अंश असावी. ( ६ )

हिक्का (सूत्रा-) च्या खाली हाताची लांबी २४ भाग असावी. प्रकोष्ठाची (लांबी) १८ अंश असून दहा अंश तळहाताची लांबी असावी. ( ७ )

[ 'द्विनवांशं' अशी दुरुस्ती रूपमण्डन १·३४½ वरून केली आहे.]

त्यापासून ( तळव्यापासून ) मधल्या बोटाची लांबी सहा अंगुले सांगितली आहे. उरलेल्या ( अवयवांची मापे ) कनिष्ठ दशतालात सांगितल्याप्रमाणे असावीत. ( ८ )

तेव्हा प्रत्येक अवयवासाठी असे ( माप ) घ्यावे. असे माप सांगितले. ( वसू, कुबेर वगैरेंचे ) लक्षण पूर्वीच सांगितले आहे. ( ९ )

[ वसू, कुबेर यांच्या लक्षणांसाठी पटल ४८ पहावे.]

**काश्यपशिल्पातील उत्तम नवताल नावाचे त्रेपन्नावे पटल संपले.**

# चोपन्नावे पटल

## [ मध्यम नवताल ]

अनुक्रमानें मध्यम नवतालाचे ( माप ) संक्षेपानें सांगतो. यक्ष, अप्सरांचा समुदाय आणि तसेच अस्त्रांच्या मूर्ती, हे ब्राह्मणश्रेष्ठा, मध्यम नवतालाने कराव्या. ( १, १ १/२ )

प्रतिमेची उंची १०८ भागांत विभागली असता, पगडी एक भागाने, केस पाऊण ताल (९ अंगुले की तीन अंगुले ? ) केसांच्या कडेपासून नेत्रसूत्रापर्यंतचे अंतर तीन अंगुले सात यव असते. ( २,३ )

नेत्रसूत्रापासून नाकपुडीच्या अग्रापर्यंत तेवढेच माप व तोंडही तेवढेच ( तीन अंगुले सात यव अंतरावर ) असावे. गळयाचे माप ( उंची ) ३ ३/४ अंगुले सांगतात. ( ४ )

हिक्कापासून हृदयापर्यंत ( अंतर ) ११ अंगुले पाच यव असावे. ( हृदयापासून ) नाभीपर्यंत तेवढेच व ( नाभीपासून ) मेढ्रमुळापर्यंत ( अंतर ) तेवढेच ( ११ अंगुले पाच यव ) असावे. ( ५ )

मांडीची लांबी २३ १/४ अंश असावी. गुडघा गळयाइतका ( ३ ३/४ अंगुले ) लांब व जंघा मांडीइतकी ( २३ १/४ अंश लांब ) असावी. ( ६ )

गुडघ्याइतकी पावलाची उंची असून हात मांडीइतका ( २३ १/४ अंगुले ) असावा. प्रकोष्ठाची लांबी १७ अंगुले सांगितली आहे. ( ७ )

तळहाताची लांबी पाच अंश सात यव असावी. मधल्या बोटाची लांबी तितकीच ( पाच अंश सात यव ) असून उरलेले ( अवयवांचे माप ) युक्तीने करावे. ( ८ )

**काश्यपशिल्पातील मध्यम नवताल नावाचे चोपन्नावे पटल संपले.**

# पंचावन्नावे पटल

## [ अधम नवताल ]

अधम नवतालाचे लक्षण सांगतो. विद्याधरांचा समुदाय, असुर आणि त्याचप्रमाणे पितर, सिद्ध, गंधर्व ( हे अधम ) नऊ ताल उंचीचे करावेत. ( १,१ १/२ )

मूर्तीची उंची १०४ भागांत विभागून पगडीची उंची ३/४ ( अंश ), उरलेला ( केसांच्या कडेपर्यंतचा ) भाग ३ १/२ अंगुले असावा. केसांच्या कडेपासून नेत्रसूत्रापर्यंत (अंतर) ३ ३/४ अंश असावे. ( २,३ )

त्या नेत्रसूत्रापासून हनुवटीपर्यंत ( अंतर ) दुप्पट ( ७ १/२ अंगुले ) असावे व तोंड तितकेच ३ १/४ अंश ) सांगितले आहे. गळयाचे माप ( उंची ) चार अंगुले असावे असे सांगतात. ( ४ )

मान, पाऊल ( व ) गुडघा हे सारखेच ( चार अंगुले उंचीचे ) असावेत. जंघा मांडी-इतक्याच दिसावयास हव्यात. हात मांडीइतकेच लांब असून प्रकोष्ठ १६ अंगुले ( लांब ) असावा. ( ५ )

[ शिल्परत्न ( दुसरा भाग ) अध्याय दहात गळ्याची उंची ३$\frac{१}{२}$ अंगुले सांगितली आहे. ती अधिक बरोबर वाटते. मध्यम नवतालात गळ्याची उंची ३$\frac{३}{४}$ अंगुले दिली आहे तेव्हा अधम नवतालात ती चार अंगुले बरोबर वाटत नाही.

मांडीची लांबी येथे दिलेली नाही. शिल्परत्नाप्रमाणे ती २२$\frac{१}{२}$ अंगुले आहे. इतर अवयवांची मापे शिल्परत्नात वरील मापांइतकीच दिली आहेत. ]

तळहाताची लांबी पाच अंश व तितकेच मधले बोट असावे. उरलेले सर्व अवयव युक्तीने करावेत असे सांगतात. ( ६ )

[ हिक्कापासून हृदयापर्यंत माप ११$\frac{१}{४}$ अंगुले असावे. तेथून नाभीपर्यंत व नाभीपासून मेढ्र-मूलापर्यंत तितकेच माप. ही माहिती येथे दिलेली नाही. शिल्परत्न ( दुसरा भाग ) १०·३ वरून दिली आहे. ]

**काश्यपशिल्पातील अधम नऊताल नावाचे पंचावन्नावे पटल संपले.**

## छप्पन्नावे पटल

### [ आठताल ]

आता विशेषतः आठतालात ( मूर्ती ) कशी असावी ते सांगतो. मूर्तीची उंची १०० अंश असून पगडी ( ची उंची ) एक अंश असावी. (१)

( पगडीपासून ) केसांच्या कडेचे अंतर २$\frac{१}{२}$ अंश असून केसांच्या कडेपासून हनुवटीपर्यंत (अंतर) ९$\frac{३}{४}$ भाग असावे. ( या अंतराचे ) तीन भाग केले असता ( केसांच्या कडेपासून ) नेत्रसूत्रापर्यंत एक भाग, तेथून नाकपुडीपर्यंत तेवढेच व नाकपुडीपासून ( चेहऱ्याच्या ) शेवटापर्यंत उरलेले अंतर ( ३$\frac{१}{४}$ अंगुले ) असावे. गळ्याची उंची ३$\frac{१}{२}$ अंश असावी. ( २,३ )

हिक्कापासून हृदयापर्यंत ( अंतर ) ११ अंगुले दोन यव असावे. ( हृदयापासून ) नाभीपर्यंत ( अंतर ) व नाभीपासून मेढ्रमूलापर्यंतचे ( अंतर ) तितकेच असावे. (४)

मांडीची लांबी २१$\frac{३}{२}$ अंश सांगतात. गुडघ्याची लांबी गळ्याच्या उंचीइतकी (३$\frac{१}{२}$ अंश) असावी. जंघा मांडीइतकी असावी. ( ५ )

पावलाची उंची गुडघ्याइतकी व हात मांडीइतके असावेत. प्रकोष्ठ १६ अंश असावा. तसेच तळहाताची लांबी ५$\frac{१}{२}$ अंगुले असावी. ( ६ )

त्याच्या ( तळहाता ) इतकीच मधल्या बोटाची लांबी ( ५½ अंगुले ) असावी. उरलेली (बोटांची मापे) पूर्वी सांगितल्याप्रमाणे असावीत. येथे जी (मापे) सांगितली नाहीत ती कनिष्ठ दशतालाप्रमाणे घ्यावीत. ( ७ )

**काश्यपशिल्पातील आठताल नावाचे छप्पन्नावे पटल संपले.**

## सत्तावन्नावे पटल

### [ साततात ]

आता विशेषतः सात ताल ( मापाच्या मूर्तींचा ) संपूर्ण विधी सांगतो. पिशाचमूर्तीच्या उंचीचे ८८ भाग करावेत. ( १ )

पगडी अर्ध्या भागाने, ( पगडीपासून ) केसांची कडा एक भाग, ( केसांच्या कडेपासून ) डोळ्यांच्या कडेपर्यंत २½ अंश, ( डोळ्यांच्या कडेपासून ) नाकपुडीच्या अग्रापर्यंत ३½ अंश ( अंतर ) असावे. ( २ )

( नाकपुडीच्या अग्रापासून ) हनुवटीच्या कडेपर्यंत तितकेच ( ३½ अंश अंतर ) असावे. गळ्याची उंची चार अंश असावी. ( गळ्यापासून ) स्तनांच्या कडेपर्यंत सात भाग ( अंतर ) असून ( स्तनांच्या कडेपासून ) नाभीपर्यंत ( अंतर ) ११ अंश असावे. ( ३ )

योनीच्या मूलापर्यंत तेवढेच ( ११ अंगुले अंतर नाभीपासून ) असावे. मांडीची लांबी २० अंश, गुडघ्याचे माप दोन भागांनी असून जंघा मांडीइतकी ( २० अंगुले ) असावी. ( ४ )

पावलाची उंची दोन भाग असून, तळपायाची उंची ( लांबी ? ) १४ अंश असावी. हात मांडीच्या लांबीइतके ( २० अंश ) असून प्रकोष्ठाची ( लांबी ) १५ अंश असावी. ( ५ )

[ 'मन्वंशं तु तलोन्नतम्' ची सुधारणा 'मन्वंशं तु तलायतम्' अशी करावयास हवी. ]

तळहाताची लांबी पाच अंश ( व ) त्याची रुंदी चार अंश असावी. त्या तळहाताच्या लांबी-इतकी मधल्या बोटाची लांबी ( पाच अंगुले ) असावी. ( ६ )

उरलेली अवयवांची मापे पूर्वी सांगितल्यापेक्षा लहान करून घ्यावीत. सातताल सांगितले. उरलेल्या तालांची मापे वर सांगितल्याप्रमाणे ( अवयवांची मापे लहान करून ) घ्यावीत. ( ७ )

**काश्यपशिल्पातील सातताल नावाचे सत्तावन्नावे पटल संपले.**

# अट्ठावन्नावे पटल

## [ पिण्डिकेचे लक्षण ]

आता पहिल्यांदा नागर इत्यादी ( प्रकारच्या ) लिंगाच्या पीठांच्या लक्षणांपासून सकलाच्या लक्षणांपर्यंत ( माहिती ) सांगतो, ती जाणून घे. ( १ )

दगडाच्या ( लिंगाचे ) पीठ दगडी किंवा चुना व विटांनी करावे. लाकडी ( लिंगाचे ) पीठ लाकडाचे किंवा विटांचे असावे. ( २ )

रत्न व लोखंडाच्या लिंगांना रत्नाची ( व ) लोखंडाची योनी (पीठ) असावी. लिंगाच्या उंचीइतकी पीठाची रुंदी असेल तर ते सर्वांत उत्तम पीठ असते. ( ३ )

[ येथे लोहाचे भाषांतर लोखंड म्हणून केले आहे पण त्यात सोने, चांदी, तांबे इत्यादी धातूंचाही समावेश होतो.]

( लिंगाच्या ) पूजाभागाच्या उंचीइतकी पीठाची रुंदी असेल तर ते कनिष्ठ पीठ सांगतात. यांच्यामध्ये ( उत्तम व कनिष्ठ पीठाच्या रुंदीच्या अंतराचे ) आठ भाग करून उत्तम इत्यादी (प्रत्येकी) तीनतीन प्रकार होतात. ( ४ )

पीठाची रुंदी तीन भागांत विभागली असता त्याची उंची दोन भाग असेल तर ते उत्तम पीठ. ( पीठाच्या ) रुंदीच्या निम्मे उंची असेल तर ते कनिष्ठ पीठ. त्याच्यामध्ये ( त्या दोन रुंदींच्या अंतराचे ) आठ भाग केले असता पीठाच्या उंचीचे नऊ प्रकार होतात. आणि उत्तम इत्यादी (प्रत्येकी) तीनतीन प्रकार होतात. ( ५, ५$\frac{१}{२}$ )

हे ब्राह्मणा, अनुक्रमानुसार सांगितलेले हे नागरपीठ सांगतात. ( ६ )

लिंगाच्या उंचीइतकी रुंदी असलेले पीठ श्रेष्ठ असते. ( व लिंगाच्या पूजाभागाइतके रुंदी असलेले पीठ कनिष्ठ असते ? ) त्यांच्यामधल्या (अंतराचे ) आठ भाग केले असता पीठाची नऊ प्रकारची रुंदी मिळते. ( ७ )

पीठाची रुंदी नऊ प्रकाराने सांगतात. ब्रह्मा व विष्णू यांच्या भागाच्या उंचीला आठाने भागून, दोन भाग किंवा जे येतील ते भाग किंवा एक भाग अथवा स्थलांश ( जो शेष येईल तो ) काढून टाकून उरलेले भाग पीठाची उंची असते. हे द्राविड पद्धतीचे पीठ सांगतात. ( ८, ९ )

पूजाभागाच्या परीघाच्याइतकी रुंदी असलेले पीठ श्रेष्ठ (समजतात.) (पूजाभागाच्या) परीघाचे १६ अंश करून त्यांतील १२ अंशांइतकी रुंदी असलेले पीठ अधम असते. ( १० )

त्यांच्यामधील अंतराचे आठ भाग करून पीठाच्या रुंदीचे नऊ प्रकार होतात किंवा लिंगाच्या व्यासाइतक्या लांबीची बाजू असलेला चौरस केला असता त्याच्या कर्णाच्या दुप्पट किंवा अडीचपट किंवा तिप्पट रुंदी विशेषाने पीठाची असावी. ( ११, १२ )

गर्भागाराच्या तीन भागांपैकी एक भाग किंवा चार भागांपैकी एक भाग पीठाची रुंदी सांगतात, व विष्णुभागाइतकी त्याची उंची असावी. ( १३ )

सामान्य नागर इत्यादी सर्व प्रकारच्या लिंगाच्या उपानाची बाहेरील रुंदी पीठाच्या रुंदी-इतकी ठेवावी. (१४)

(पीठाच्या) अग्राची रुंदी त्याच्या (उपानाच्या) आठ, नऊ किंवा दहा अंश कमी असावी. पीठाची उंची विष्णुभागाइतकी, त्याच्या सवापट किंवा दीडपट असावी. (१५)

सामान्य नागर इत्यादी पीठिकांची उंची (त्यांच्या) रुंदीइतकी असावी. सकल (व) लिंग यांच्या सामान्य पीठाचे लक्षण (सांगितले.) (१६)

सकलाच्या उंचीचे नऊ भाग करून एक भाग उंची कनिष्ठ पीठाची (असावी) व तीन भाग उंची श्रेष्ठ (पीठाची) असते. त्यांच्यामध्ये (श्रेष्ठ व कनिष्ठ यांच्या उंचीच्या मधील अंतराचे) आठ भाग करून पीठाची उंची नऊ प्रकारची होते. त्याची (पीठाची) रुंदी सांगतो. (१७, १७½)

पीठाच्या उंचीइतकी रुंदी असलेले पीठ अधम सांगतात. (पीठाच्या उंचीच्या) दुप्पट रुंदी असलेले पीठ उत्तम असते. त्यांच्यामध्ये आठ भाग करून (पीठाची) विशेषत: सकलाच्या (पीठाची) रुंदी नऊ प्रकारची सांगतात. (१८, १९)

लिंगाची पिण्डिका गोमुखाप्रमाणे करावी. विशेषत: सकलाचे पीठ गाईच्या मुखाच्या आकारासारखे असते. (२०)

लिंगाचे पीठ सारख्या बाजू असलेले किंवा सारखी वर्तुळे असलेले असावे, किंवा आयताकार (किंवा) वृत्तायताकार असावे. (२१)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, पद्मपीठ, भद्रपीठ, वेदिका (-भद्र) (आणि) वेदीपीठ असे पीठाचे चार प्रकारचे अलंकार सांगतात. (२२)

(पीठाच्या) उंचीचे १६ भाग करून उपानाची उंची दोन भागाने (करावी.) पद्माची उंची पाच अंश व कंठ पादुकेइतकाच (दोन भाग) असावा. (२३)

वरचे पद्म चार अंश, पट्टिकेची उंची दोन भाग, (कमळाच्या) १६ पाकळ्यांसह असलेली प्रती एक अंश असावी. (२४)

त्यांच्यामध्ये (१६ पाकळ्यांच्यामध्ये) लहान पाकळ्या असाव्यात किंवा आठ मोठ्या पाकळ्या असाव्यात. पाकळ्यांच्या अग्राची उंची अर्धा अंगुल किंवा एक मानांगुल असावी, किंवा पाकळ्यांच्या अग्राची उंची लिंगशरीराच्या मापाने आलेल्या एक अंगुलाइतकी असावी. (२५, २५½)

पीठाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग गोमुखाची लांबी सांगतात. त्याच्या लांबी-इतकीच त्याच्या मुळाची रुंदी सांगितली आहे. मुळाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक (भाग) त्याच्या (गोमुखाच्या) पुढल्या भागाची रुंदी असावी. (२६, २७)

(गोमुखाची रुंदी) मुळापासून अग्रापर्यंत क्रमाक्रमाने कमी करावी. त्याची जाडी रुंदीप्रमा-णेच (मुळापासून अग्रापर्यंत क्रमाने कमी) करावी. पाऊणपट, निम्मे, पावपट किंवा $\frac{1}{6}$, रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग शिलामार्गाची रुंदी असावी. (२८, २८½)

पट्टिकेचे अंतर्गमन हे तिच्या उंचीइतके असावे व त्याहून कमी असल्यास तो (अंतर्प्रवेश) कनिष्ठ समजतात. उपान वगैरे अवयवांचादेखील प्रवेश आणि निर्गमन जसे सुंदर दिसेल तसे करावे, किंवा अधिष्ठानाच्या (अवयवांप्रमाणे) प्रवेश आणि निर्गमन कल्पावेत. (२९,३०)

[ अधिष्ठानाच्या अवयवांच्या अंतर्प्रवेश व निर्गमन यांच्याबाबतीतले नियम ६.१६ ते ६.२० मध्ये दिलेले आहेत. ]

पद्मपीठ सांगितले. आता भद्रपीठ सांगतो. उंचीचे १६ भाग करून एक भागाने उपान सांगतात. ( ३१ )

जगतीची उंची चार अंश ( व ) तीन अंश कुमुदाची उंची करावी. पट्टिकेचे माप एक अंश, कंठाचे माप तीन अंश असावे. ( ३२ )

त्याच्यावर पट्ट एक अंश ( व ) पट्टिका दोन अंश असावी. एक अंश घृतवारि ( ? ) असावी, हे संपूर्ण भद्रपीठ झाले. ( ३३ )

पीठाच्या उंचीचे १६ भाग केले असता पादुकेची उंची दोन भाग, जगतीचे माप तीन अंश, कुमुदाची उंची तितकीच ( तीन अंश ), ( ३४ )

पट्टाचे माप एक अंश, कंठाचे माप दोन भागांनी, त्याच्यावर कंप एक अंश ( व ) पट्टिका तीन अंश असावी. एक अंश घृतवारि असावी. याला वेदीभद्र म्हणतात. ( ३५, ३५$\frac{1}{2}$ )

असे (वेदी) भद्र सांगितले, यापुढे वेदीपीठ ( सांगतो ). तेरा अंश उंचीच्या पीठात पादुकेची उंची दोन भाग, त्याच्यावर तितकेच ( दोन भाग ) पद्म, कंप एक अंशाने करावा. ( ३६,३७ )

कंपाचे माप दोन भाग असून ऊर्ध्वकंप एक अंश असावा. त्याच्यावरील पद्म दोन अंश आणि पट्टक तेवढेच ( दोन अंश ) असावे. घृतवारीची उंची एका भागाने कल्पावी. ( ३८, ३८$\frac{1}{2}$ )

पीठाच्या उंचीचे आठ भाग करून उपानाची उंची एक अंश ( व ) एक अंश घृतवारि असावी. उरलेली वेदी चौरस असावी, असे वेदिकापीठ सांगितले. वरीलप्रमाणेच ( पण ) पट्टिका दोन अंश करावी. असे तीन प्रकारचे वेदिकापीठ सांगतात. ( ३९–४०$\frac{1}{2}$ )

पद्मपीठ किंवा भद्रपीठ, वृत्तपीठ किंवा परिमण्डल ( वर दिलेले पीठाचे चार प्रकार ) यांचे अवयव अधिष्ठानाप्रमाणे कल्पावेत. उपपीठाप्रमाणे अवयवांच्या बंधांच्या प्रकारावरून त्या त्या बंधांच्या नावाचे ते पीठ सांगतात. ( ४१, ४२ )

चौरस पीठ जय देणारे, योनीच्या आकाराचे ( पीठ ) प्रजावृद्धी करणारे, धनुष्याच्या आकाराचे पीठ शान्तिकारक ( व ) त्रिकोणी पीठ शत्रूंचा नाश करणारे असते. ( ४३ )

वर्तुळाकार ( पीठ ) भरभराट करते व पंचकोनी ( पीठ ) पुष्टितुष्टिकारक असते. षट्कोणी ( पीठ ) रोगाचा नाश करते असे अनुक्रमाने जाणावे. ( ४४ )

या आकाराच्या पीठांचे अग्र पूर्वी सांगितलेल्या विधीप्रमाणे करावे. जर या आठ ( प्रकारच्या ) पीठांचा जीर्णोद्धार करावयाचा असेल तर, हे ब्राह्मणा, त्यांचा जीर्णोद्धार करताना, पूर्वी जसा ( पीठाचा ) आकार होता तोच ( आकार ) पुनःपुन्हा ( प्रत्येक जीर्णोद्धाराच्या वेळी ) द्यावा. नंतरच्या वेळेला ( पूर्वीच्या आकाराहून ) निराळा आकार दिल्यास कर्त्याचा नाश होतो. ( ४५, ४६ )

तेव्हा सर्व प्रयत्नांनी पूर्वीचाच आकार ( पीठाला ) द्यावा. रुंदीच्या प्रमाणात, रुंदीच्या सवापट किंवा दीडपट ( हे पीठ असावे. ) ( ४७ )

आजय, मुखभद्र किंवा भद्र किंवा उपभद्रासह लिंगाचे पीठ आयताकार कधीच करू नये. ( ४८ )

सम ( संख्येचे ) कोन असलेले ( चौरस ), समवर्तुळ असलेले किंवा आयताकार किंवा इतर कोणत्याही आकाराचे पीठ हे सर्वच परंतु या अनुक्रमाने संपत्तिकारक असतात. ( ४९ )

पिण्डिकेचे लक्षण सांगितले, पायाच्या दगडाच्या उंचीची ( माहिती ) ऐक. ( ५० )

**काश्यपशिल्पातील पिण्डिकेचे लक्षण नावाचे अठ्ठावन्नावे पटल संपले.**

## एकोणसाठावे पटल

### [ पीठाचा लक्षणोद्धार ]

आता विशेषतः पायाचा दगड इत्यादींचे लक्षण सांगतो. लिंगाच्या रुंदीच्या तिप्पट (पायाच्या दगडाची ) रुंदी असून त्याच्या पावपटीइतकी उंची असावी. ( १ )

श्रेष्ठ, मध्यम ( व ) कनिष्ठ ( लिंग ) यांच्यामध्ये आठ भाग पाडले असता उंचीचे नऊ प्रकार होतात. वेसर लिंगात $\frac{१}{९}$ उंची सांगितली आहे. ( २ )

लिंगाच्या रुंदीची दुप्पट करून तिच्यासह ( लिंगाच्या रुंदीच्या तिप्पट ) आठ भाग केल्यास लिंगाच्या मुळाप्रमाणे आकार असलेला एक अंश खड्ड्यात ठेवावा. ( ३ )

( पायाच्या दगडांत ) नऊ रत्नांच्या प्रमाणाने नऊ घरे करावीत किंवा आधार नावाच्या शिलेसह ( पायाचा दगड ) समतल करावा. ( ४ )

त्याच्या ( पायाच्या दगडापासून ) पीठाच्या (खालच्या ? ) कडेपर्यंत नंद्यावर्त (नावाच्या) शिलेची उंची असावी. ( तिची रुंदी ) लिंगपीठासारखी किंवा एक, दोन किंवा तीन अंगुले (त्याहून) जास्त असावी. ( ५ )

नागर पद्धतीच्या ( लिंगाच्या ) पायाच्या दगडाची रुंदी वर्तुळाशिवाय इतर आकाराची असू नये. द्राविड पद्धतीत पीठाच्या रुंदीच्या ( आकाराहून ) निराळा आकार ( पायाच्या दगडाचा ) असतो व रुंदी पीठाच्या रुंदीहून दोन किंवा तीन अंगुले जास्त असते. ( ६ )

वेसर पद्धतीत, लिंगाच्या रुंदीचे चार भाग करून, पीठापासून एक एक भागाने वाढ करून नन्द्यावर्त शिलेच्या रुंदीचे नऊ प्रकार सांगतात. ( ७ )

लिंगाच्या चारी बाजूंना ( वर सांगितलेल्या मापाचे ) चार चौरस कल्पावेत. चौरसांची उंची, लांबी यांची मापे सांगितलीत. ( ८ )

पूर्वेकडील भागात उत्तरेकडे ( दगडाचे ) अग्र येईल ( व ) दक्षिणेकडील भागात पूर्वेकडे अग्र येईल ( याप्रमाणे चौरस दगड ) ठेवावेत. पश्चिमेकडील भागात उत्तरेकडे अग्र येईल व उत्तरेकडील भागात पूर्वेकडे अग्र येईल असे ( दगड ) ठेवावेत. ( ९ )

पहिल्या ( दगडाचें ) अग्र शंकराच्या भागात ( ईशान्य दिशेला ), दुसऱ्याचे अग्र अनल भागात ( आग्नेय ), तिसऱ्याचे अग्र निर्ऋतिभागात व चवथ्याचे मूळ वायुभागात ( वायव्य दिशेला ) असावे. या नन्द्यावर्त शिलांची वरीलप्रमाणे योजना करावी. ( १०, १०½ )

त्यांच्या ( नंद्यावर्त शिलां ) वरती अष्टबंधन करून त्यावर शहाण्या माणसाने पिण्डिका ठेवावी. चुन्याने किंवा वज्रबन्धाने माखून ( त्यांचा लेप देऊन ) त्यावर पीठ ठेवावे. ( ११, ११½ )

उत्तम पीठ एक अंश असून दोन अंशांचे मध्यम पीठ असते. तीन, चार किंवा पाच अंशांचे ( इतक्या संख्येच्या दगडांचे ) पीठ कनिष्ठ सांगितले आहे. त्यांच्यावरील पीठाचा भाग एकाच दगडाने करावा. (१२, १३)

पीठाचा जेथे त्याच्या गलाशी संधी करतात तो भाग निरनिराळ्या वस्तू ( वापरून केलेल्या अष्टबंधाने ? ) मजबूत करावा. गलाच्या खाली दोन कोन असलेले (द्व्यश्र) दोन मोठे दगड असतील तर एक पूर्वेकडे व दुसरा पश्चिमेकडे ठेवावा. ( १४ )

[ पीठातील गलाच्या खालचा भाग दोन दगडांनी बनवावयाचा असेल तर दगड कसे ठेवावेत ते सांगितले आहे. द्व्यश्र म्हणजे दगडाची एक बाजू इतर बाजूंना काटकोनात असून तिच्या समोरची बाजू वर्तुळाकार असते. ]

जर ( पीठ बांधण्यासाठी ) तीन दगड असतील तर एक मध्यभागी ठेवावा व इतर दोघे डाव्या व उजव्या बाजूला ठेवावेत. चार ( दगडांचे पीठ ) असेल तर दोन द्रोणाकृतींनी चौरस होईल अशी त्यांची रचना असावी. ( १५ )

किंवा पाच अथवा सहा ( दगडांनी ) लक्षणांसहित पिण्डिका करावी. ( हे दगड ) चुन्याने किंवा अष्टबन्धनाने मजबूत व निच्छिद्र असे रचावेत. ( १६ )

विटांनी किंवा दगडांनी चुना वापरून मजबूत ( पीठ ) करावे. लोखंड किंवा चांदी वापरून मजबूत होईल असे करावे. ( १७ )

सर्व ठिकाणचे बंधकद्रव्य अष्टबन्ध असावे असे सांगतात. विष्णुभागाच्या वर कडेपर्यंत आणि पिण्डिकेच्या वरचा भाग समतल असावा, उंचसखल करू नये, केल्यास कर्त्याचा नाश होतो. ( १८, १८½ )

लिंगाचे मुख तयार करणे त्यास लक्षणोद्धार म्हणतात. ( १९ )

प्रासादाच्या पुढच्या बाजूला, ईशान्य दिशेला किंवा दक्षिण दिशेला, एक हात उंचीचा ( ओटा ) आरशाप्रमाणे गुळगुळीत व समतल करावा. तो गाईच्या शेणाने सारवून पीठ चूर्णांनी ( कुंकू, गुलाल वगैरे ) अलंकृत करावा. ( ते पीठ ) निरनिराळ्या धूपांनी, दिव्यांनी आणि निरनिराळ्या फुलांनी अलंकारावे. ( २०, २१ )

वेदिकेवर तांदूळ, तीर्थ, दर्भ, लाह्या ( व ) फुले यांनी अलंकारिलेले साळींचे स्थण्डिल करावे. ( २२ )

तीन अधम प्रकारच्या लिंगांसाठी असा मण्डप करावा. उरलेल्या ( तीन मध्यम व तीन उत्तम प्रकारच्या ) लिंगांच्या लांबीइतकी रुंदी असेल अशी वेदिका करावी. ( २३ )

त्याच्या तिप्पट रुंदीची मण्डपाची रुंदी असावी. इतर सर्व अलंकार ( वेदिकेचे ) पूर्वीप्रमाणेच असावेत. ( २४ )

हा विधी झाल्यावर सावध अशा स्थपतीने पूर्वेकडे डोके करून व तोंड वर करून कुशांसह आठ कलश ( लिंगाच्या ) सभोवार ठेवावेत. ह्या आठ लोकपालांना दोरा व नवीन वस्त्रे ( यांनी अलंकारून ) गंधोदकाने ( ते कलश ) भरावेत. ( २५, २६ )

त्या त्या लोकपालांची नावे घेऊन गन्ध, फुले आणि धूप यांनी त्यांची पूजा करावी. लिंगमुळाच्या डाव्या बाजूला पिण्डिकेचा दगड ठेवावा. ( २७ )

तांबडचा रंगाच्या वस्त्रादिकांनी गुंडाळून लिंगपीठाची पूजा करावी. वेदिकेच्या सत्त्व ( उत्तर ) किंवा इंद्रभागी ( पश्चिमेकडे ) कुण्ड किंवा स्थण्डिल करावे. ( २८ )

अग्निकार्यात सांगितल्याप्रमाणे अग्न्याधानादिकांचा विधी करावा. ब्रह्मवृक्षाच्या समिधांनी विधिपूर्वक होम करावा. ( २९ )

'आपोहिष्ठा ... ... ....' या मन्त्राने, 'इदं विष्णुश्च ... ... ...' या मन्त्राने ( व ) 'ब्रह्मजज्ञान ... ... ...' मन्त्राने तुपाची आहुती द्यावी. ( ३० )

अघोर मन्त्राने चरुहोम करावा. प्रत्येक आहुती १८ ( १०८ ? ) वेळा द्यावी. अशा रीतीने रात्री जागरण करून पहाटे चांगल्या मुहूर्तावर सकलीकृतविग्रह केलेल्या ( स्नानादींनी शुचिर्भूत झालेल्या ), पांढऱ्या रंगाचे वस्त्र व उत्तरीय नेसलेल्या, गन्ध, उटणी ल्यालेल्या, पांढरे यज्ञोपवीत घातलेल्या स्थपतीने शुद्ध होऊन पूर्वीप्रमाणेच अग्नीची पूजा करून स्विष्टपूर्णाहुती द्यावी. ( ३१–३३½ )

[ श्लोक ३४ व्या पासून ७४ पर्यंत, म्हणजे पटल संपेपर्यंतचे श्लोक पटल ४९ मध्ये असलेल्या प्रमाणे आहेत, तेव्हा त्यांचा अर्थ न देता अनुक्रम देतो.

| ५९ व्या पटलातील श्लोक | ४९ व्या पटलातील श्लोक |
|---|---|
| ३४–४१ | १४४–१५१ |
| ४२–४३½ | १५३–१५४½ |
| ४४–४४½ | १५१½–१५२ |
| ४५–६२ | १५५–१७२ |
| ६३–७४ | १७५–१८५ ] |

**काश्यपशिल्पातील पीठाचा लक्षणोद्धार नावाचे एकोणसाठावे पटल संपले.**




आकृती ६१·१ : सुखासन मूर्ती



आकृती ६२·१ : सोमास्कंदेश्वर



आकृती ६३·१ · चंद्रशेखर



आकृती ६५·१ : नृत्तमूर्ती–१



आकृती ६५·२ : नृत्तमूर्ती–२



आकृती ६८·१ : कल्याणमूर्ती



आकृती ७४·१ : भिक्षाटन



आकृती ७६·१ : दक्षिणामूर्ती



आकृती ७७·१ : कालारि शिव

# साठावे पटल

## [ सकल स्थापनेचा विधी ]

आता शंकराच्या ( लिंगाच्या ) स्थापनेनंतर विष्णूच्या स्थापनाचा विधी ( सांगतो ). शहराच्या पश्चिमेकडे किंवा मध्यभागी ( विष्णूची ) मूर्ती असणे सर्वांत उत्तम असते. ( १ )

मत्स्य (अवतारा) पासून कलि (कल्कि अवतारा) पर्यंत विष्णूच्या मूर्ती असाव्यात. त्याच्या पायांपाशी, हे शिल्पींमधील श्रेष्ठ ( ब्राह्मणा ), वास्तुदेवांची स्थापना करावी. ( २ )

विष्णूच्या पुढे किंवा विष्णूच्या जवळ ( एका बाजूला ) पूर्वेकडे त्याचप्रमाणे पुढे नमस्कार केल्याप्रमाणे हात जोडलेला पक्षी ( गरुड ) असावा. ( ३ )

देवालयात किंवा अरण्यात नदीतीरापाशी, पवित्र तीर्थक्षेत्री, गावात किंवा वास्तूच्या मध्ये पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख ( विष्णुमूर्ती ) असावी. ( ४ )

वरुणस्थानी (पश्चिमेकडे) आणि वैश्य जागेवर, यम आणि इन्द्र यांच्या पदावर (विष्णुमूर्ती) स्थापन करावी. पिशाच, अग्नि, निर्ऋति व वायु या पदांवर स्थापना करून पूजा करावी. ( ५ )

[ ' वैश्य ' हा शब्द सुधारून ' भृश ' असा पाहिजे. ]

आता विशेषतः सकलाचे ( शंकरमूर्तीकरिता ) उत्तम जागा सांगतो. शांकर ( ईशान्य ) दिशेला नृत्तमूर्ती असून आग्नेयेकडे वृषवाहन ( शंकर ) असावा. ( ६ )

हे ब्राह्मणा, सोमास्कन्द नैर्ऋत्येकडे, कंकाल ( मूर्ती ) वायव्य दिशेकडे ( व ) भिक्षाटन (मूर्ती) जयन्तपदावर असावी. ( ७ )

सत्यपदावर सुखासन ( महादेव ) व विधि ( ब्रह्मा ) पदावर त्रिपुरान्तकाची ( मूर्ती ) असावी. सुग्रीवपदावर हरिहर ( मूर्ती ), ( व ) गंधर्वपदावर चंद्रशेखर ( मूर्ती ) असावी. ( ८ )

शोषपदावर ……… मुख्यपदावर कालारिमूर्ती असावी. अदितीपदावर अर्धनारी ( नटेश्वर ) असून इंद्रपदावर कल्याण ( मूर्ती ) असावी. ( ९ )

पर्जन्यपदावर क्षेत्रपाल ( व ) दक्षिणेकडे दक्षिणेश्वराची ( मूर्ती ) असावी. पश्चिमेकडे अद्भुतलिंग ( लिंगोद्भव ? ) व उत्तरेकडे गजहारि ( मूर्ती ) असावी. ( १० )

( याप्रमाणे ) देवालयाच्या वरती अंतराळामध्ये ( शंकराच्या मूर्ती ) कल्पाव्यात असे सांगतात. देवालयात गर्भागारात सकलाची स्थापना करावी. ( ११ )

प्राकारात आठ किंवा चार दिशांना द्वारशोभा वगैरे कराव्यात. प्राकाराच्या उंचीच्या मध्यभागी आणि लांबीच्या मध्यभागी कोनाड्यांत या मूर्ती असाव्यात. ( १२ )

किंवा, हे ब्राह्मणा, हर्म्याच्या ( मूळ प्रासादाच्या ) मध्यभागाच्या दोन भागांपैकी एका भागात ( मूर्ती असाव्यात. ) ( १३ )

[ हा श्लोक फार अशुद्ध आहे तेव्हा अर्थ दिलेला नाही. ]

**काश्यपशिल्पातील सकलाच्या स्थापनेचा विधी नावाचे साठावे पटल संपले.**

# एकसष्टावे पटल

## [ सुखासनमूर्ती ]

आता विशेषत: सुखासनाबद्दलचा संपूर्ण विधी सांगतो. ( मूर्ती ) बसलेली असून तिचा भाव राजस असावा. भद्रपीठाची बैठक असावी. ( १ )

डाव्या पायाने पीठ आच्छादावे ( म्हणजे डावा पाय मुडपून पीठावर घेतलेला असतो. ) ( व ) उजवा पाय ( खाली ) लांबविलेला असावा. ( मांडी ) वरील शरीर ताठ असते. विशेषत: आसनाच्या वर ४½ अंगुलांपेक्षा ( थोडेसे ) जास्त ( माप ) स्फिक्पिण्डाचे असावे. ( २, २½ )

वसला असताना पुढील केसांच्या कडांपासून गुडघ्याच्या बाहेरील कडेपर्यंत ( डावीकडील जे सूत्र असते ते व ) गुडघ्याच्यावरून पुढील केसांच्या कडेपर्यंत ( उजवीकडील हे सूत्र ) गुडघा, कंठाचा बाहेरचा भाग व मुखाचा बाहेरचा भाग तसेच ( डावीकडील सूत्र ) वरच्या हाताच्या मन-गटाचा मध्य यांच्यातून जाते. ( ३–४ )

बसलेल्या ( मूर्तीचे ) हे स्वसूत्र असून, पूर्वसूत्र आता ऐक. जटांचा मध्यभाग, नाकाचे अग्र, स्तनांचा ( मध्य ) भाग, नाभीचा केंद्रबिंदू ( यांतून जाणारे ते पूर्वसूत्र ). ( ५ )

डाव्या पायाच्या घोट्याच्या मध्यभागातून ब्रह्मसूत्र टाकावे. ( या ब्रह्मसूत्रापासून ) उजवी-कडच्या गुडघ्याची कडा ३१ अंगुले अंतरावर असावी. ( ६ )

[ ब्रह्मसूत्र व पूर्वसूत्र ही एकच आहेत. ]

किंवा ( हे अंतर ) ३० अंगुले अथवा २९ अंगुले असावे. सूत्रापासून त्याच्या ( उजव्या पायाच्या ) आंगठ्याचे व नळीचे अंतर १२ अंगुले असावे. किंवा ( ते अंतर ) १३ अंगुले अथवा १० अंगुले असावे. ( ७,७½ )

पावलाच्या पाठीमागच्या भागाचे पीठाच्या बाहेर निर्गमन दोन किंवा तीन अंगुले असावे. ( ८ )

ते सूत्र व अभय ( मुद्रा असलेल्या तळ- ) हाताच्या मधल्या रेषेची कडा यांमधले अंतर हे ब्राह्मणश्रेष्ठा, १४ अंगुले सांगितले आहे. मांडीच्या वर दोन्ही मनगटांच्या कडांचे निर्गमन दोन किंवा तीन अंगुले असावे. ( ९ )

कटक किंवा सिंहकर्ण ( मुद्रेत ) तो ( दुसरा हात ) असावा असे विधान आहे. तर्जनीपासून करंगळीपर्यंत तेथील बोटे वळलेली असतात. ( १० )

तेथील आंगठा किंचित वळलेला असतो. अशा रीतीने कटकाचा ( मुद्रेचा ) आकार होतो. मधले बोट तळव्याच्या मध्याकडे वळविलेले व अनामिका अर्धीच वळलेली, उरलेली बोटे पूर्वीप्रमा-णेच ( कटकमुद्रेप्रमाणेच ) वळलेली असतात अशी ही सिंहकर्ण ( मुद्रा ) असते. ( ११, ११½ )

वरच्या हातांचा पुढचा भाग ( अग्र ) हिक्कासूत्राच्या समपातळीत असावा. ( १२ )

अनामिका व आंगठा वळलेले असून ते तळव्याच्या मध्यावर टेकलेले असतात. करंगळी-देखील थोडीशी वळलेली असावी. उरलेली दोन ( तर्जनी व मधले बोट ) सरळ असावीत. ( १३ )

अशी सुलक्षणी सुंदर आकृती करावी. कोपरे श्रोणींच्या बाजूंना पाच, सहा ( वा ) सात ( अंगुलांवर ) असावेत. ( १४ )

कुशींचा मध्यभाग व नाकाचे अग्र पूर्वसूत्राला स्पर्श करतील असे असावेत. मेढ्रमूळ डाव्या पायाच्या घोटचाच्या मध्यापासून सहा अंगुले किंवा सात अंगुले अथवा पाच अंगुले (अंतरावर) असावे. ( १५, १५½ )

नाभीच्या मध्यभागापासून डाव्या पायाच्या नळीचे अग्र १४ अंगुले किंवा १३ अंगुले अथवा १२ अंगुले ( अंतरावर) असावे. ( १६, १६½ )

जटेच्या पुढचा भाग व मध्यसूत्र या दोघांमध्ये अंतर १४ अंगुले, १३½ अंगुले किंवा १३ अंगुले असावे. ( १७, १७½ )

सरळ, सुखासीन, प्रवाळाप्रमाणे तांबडा रंग असलेला, तीन डोळे असून सुंदर चेहऱ्याचा, राजसगुणांनी संपन्न, व्याघ्राजिन व रेशमी वस्त्र नेसलेला असा (शंकर) असावा. ( १८, १९ )

वरचे दोन्ही हात कर्तरी ( मुद्रेत ) असून त्यांचे मुख ( तळवा ) बाहेर किंवा आत असावेत. उजव्या हातात परशू व डाव्या हातात कृष्ण असावा. ( २० )

[ कर्तरीमुद्रा श्लोक १३ त दिली आहे. डाव्या हातात कृष्णसारमृग असावा अशी दुरुस्ती पाहिजे. ]

उजवा हात अभय ( मुद्रेत ) व डावा हात सिंहकर्णाप्रमाणे कटक ( मुद्रेत ) असावा. विशेषतः डाव्या कानात शंखपत्र असावे. ( २१ )

[ शंखपत्र– स्त्रियांच्या कुंडलांचा प्रकार ]

या ( शंख)पत्राची रुंदी तीन, चार किंवा पाच अंगुले असावी. कानाच्या नालीइतकी जाडी व तिच्या तिप्पट ( शंख ) पत्राची रुंदी असावी. ( २२ )

अशी ( शंख ) पत्राची जाडी सांगितली. ते पांढऱ्या रंगाचे व अत्यंत मार्दवयुक्त असावे. उजव्या कानात मकर अथवा सिंहकुंडल असावे. ( २३ )

तीन, चार ( किंवा ) पाच अंगुले रुंदी व उंची असलेले असे कुंडल करून कानावरून खांद्यावर येईल असे ठेवावे. ( २४ )

किंवा हे ब्राह्मणा, कानात वर्तुळाकार कुंडले घालावीत. वर्तुळाकार कुंडलांची रुंदी १८ यव असावी. ( २५ )

किंवा त्याची उंची चार अंगुले, कुंभ, मिटलेले कमळ याप्रमाणे किंवा इतर रीतींनी सौंदर्यपूर्ण वर्तुळाकार कुंडल कल्पावे. ( २६ )

समसंख्येच्या जटांसह जटामुकुट असावा. हे ब्राह्मणा, मुकुटाची उंची २४ अंगुले किंवा २१ अंगुले किंवा १८ अंगुले असावी. केसांच्या कडांपासून मुकुटाची उंची ( मोजावी ). कपाळावर मुकुट पट्टासहित असावा. ( २७, २८ )

चेहऱ्याच्या सीमेइतकी, हे ब्राह्मणा, मुकुटाच्या मुळाची रुंदी असावी. त्याच्या सात, आठ किंवा नऊ अंशांनी ( मुकुटाच्या ) अग्राची रुंदी कमी असावी. ( २९ )

चार पूरिम असावेत. पूरिमांची उंची १२ अंश असावी. उजव्या बाजूला नाग व रुईची फुले व डाव्या बाजूला अर्धचंद्र ठेवावा. ( ३० )

किंवा शंकराच्या उजव्या बाजूला अर्धचंद्र आणि डाव्या बाजूला नाग व रुईची फुले धारण केलेली असावीत. कडदोरे तीन असून कडदोऱ्यांची रुंदी एक यव असावी. ( ३१ )

कंबरेच्या वरच्या अर्ध्या भागापाशी कटिसूत्र बांधावे. पाच, सहा किंवा सात अंगुले कीर्तिमुखाची रुंदी असावी. ( ३२ )

मेढ्राच्या वरती ( कीर्तिमुखाची ) रुंदीइतकी उंची असावी. कटिसूत्रापासून मांडीच्या १/३ भागापर्यंत मांडीवरील सूत्र असते. ( ३३ )

मांडीवरील मोत्यांच्या माळांत अंतराअंतरावर रत्ने गुंफलेली असतात. ( असे ) कटिसूत्र सांगितले. कटक वळ्यांसह असावे. ( ३४ )

प्रकोष्ठावर कटक वळ्यांसह असून, हे द्विजसत्तमा, करंगळीच्या परिघाइतके ( परिघ असलेले ) नाजूक वळे चांगले असते. ( ३५ )

किंवा वळ्याची जाडी दोन किंवा तीन यव असावी. वळ्यांची जोडी खालच्या व वरच्या ( हातांच्या ) प्रकोष्ठांवर असावी. ( ३६ )

सौंदर्यपूर्ण रत्नांचा बंध वळ्यांवर करावा. हे ब्राह्मणा, केयूर कोपऱ्यावर असावे. ( त्याचा ) मुकुट भरीव असावा. ( ३७ )

केयूर एकाच आकाराचे असावे. ते आठ पाकळ्यांच्या कमळासह असून त्यात निरनिराळी रत्ने असावीत; किंवा नागबन्ध असावा.

हाताच्या मध्यभागी ( दण्डावर ) हे ब्राह्मणा, पानाच्या आकाराचे पूरिम असावे. पानाच्या आकाराच्या पूरिमाचा देठ केयूराप्रमाणे भरीव असावा. ( ३९ )

त्या पूरिमापासून खालच्या देठाचे हाताच्या भोवती दोन, तीन, किंवा चार, पाच वेढे असतात. पत्रपुरिमाच्या रुंदीच्या १ १/२, १ ३/४ किंवा दोनपट त्या हाताच्या वळ्यांची उंची असावी. ( ४०, ४१ )

मधले बोट सोडून इतर बोटांत त्यांच्या त्यांच्या ( आकाराच्या ) आंगठ्या घातलेल्या दाखवाव्यात. आंगठ्या बोटाच्या मुळाजवळच्या पेरावर असून त्या रत्नांसहित असाव्यात. ( ४२ )

पोटावरील बंधाची रुंदी एक, दोन, तीन किंवा चार यव असते. किंवा ( हे ) उदरबंधन दोन यवांचे असते. ( ४३ )

तो बन्ध निरनिराळ्या अलंकारांसह निरनिराळ्या रत्नांनी सुशोभित केलेला असून नाभीच्या वर तीन अंश नेलेला किंवा अधिक वाढविलेला असावा. (४४)

पायाच्या मधल्या बोटाशिवाय इतर बोटांत वळी असावी. त्यांचे दोन वेढे असून बोटांच्या मध्यभागी ती ( वळी ) दाखवावीत. ( ४५ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, पायाच्या घोट्यापाशी जाळी असलेले जालकाबन्धसूत्र ( तोरड्या ) असावे. त्यांची जाडी दोन यव असावी. (४६)

त्या जालकसूत्राचा देठ १/५ यव मापाचा ( जाडीचा ) असावा. जाळीच्या देठाची उंची तीन यव असून उरलेल्या उंचीची जाळी असावी. ( ४७ )

त्या पावलाच्या उंचीइतकीच ( जालकबंधसूत्राची ) रुंदी असते व यवमानही (?) तेवढेच असावे. तोरडीचा उरलेला भाग कमी जाड किंवा भरीव जसा योग्य वाटेल तसा करावा. ( ४८ )

( तोरडीच्या ) आत खडे बसविलेले असतील तर तिला 'गाढावृत्त' म्हणतात. खड्यां-शिवाय नुसतीच भरीव असेल तर तिला 'गाठनीव्र' म्हणतात. ( ४९ )

परशू व हरिणी यांची लांबी १२ अंगुले सांगितली आहे. परशू व हरिणी ( यांपैकी ) जे योग्य असेल ते किंवा दोन्ही ठेवावीत. ( ५० )

यज्ञोपवीताची जाडी ½ यव असावी. उपवीत दोन दोऱ्यांचे असून त्याची जाडी यज्ञोपवीता-इतकीच असावी. ( ५१ )

( उत्तरीय ) वस्त्र खांद्यावर ठेवून नाभीच्या खाली एक अंगुलापर्यंत असते. यज्ञोपवीताचे सूत्र नाभीच्या उजव्या बाजूस असावे. ( ५२ )

वरच्या बाजूला, डाव्या भागावर ( खांद्यावर ) यज्ञोपवीत ठेवलेले असावे. छातीवरील माळेचा आधार घेत ( ते ) स्तनाच्या खाली आठ अंगुले असते. अशी यज्ञोपवीताची माहिती झाली, आता छन्नवीर ऐक. हे ब्राह्मणा, ते दोन्ही खांद्यांवर असते. ( ५३, ५४ )

गळ्यातील हार हिक्का ( सूत्राच्या ) खाली सहा अंगुले लांब असावा. त्याची रुंदी चार अंगुले व जाडी तीन यव असावी. निरनिराळ्या हिरेमाणकांचा सुंदर हार करावा. ( ५५, ५६ )

हिक्कासूत्राच्या वर रुद्राक्ष, रत्ने किंवा सोन्याची दोरी यांचा केलेला उपग्रीव बांधावा. ( ५७ )

उपग्रीव सांगितला. निरनिराळी फुले माळलेल्या अशा व सर्व अवयव सुंदर आहेत असा देव करावा. उरलेले युक्तीने करावे. ( ५८ )

असे सुखासन सांगितले, तसेच उमा व स्कंद यांसह ( शंकराची मूर्ती ) सांगतो. ( ५९ )

**काश्यपशिल्पातील सुखासन नावाचे एकसष्टावे पटल संपले.**

## बासष्टावे पटल

### [ सोमास्कन्देश्वर ]

हे ब्राह्मणा, आता विशेषतः सोमास्कन्देश्वराची माहिती सांगतो. ( शंकरासाठी ) सुखासन जसे वर सांगितले तसेच येथे असावे. ( १ )

देवाच्या डाव्या बाजूला सुखासनात ( बसलेली ) पार्वती असावी. तिचा उजवा पाय ( मांडी घातल्यासारखा ) मुडपलेला व डावा पाय ( खाली ) लोंबता ठेवावा. ( २ )

आसनाच्या वर स्फिग्मान चार अंगुले असते. आसनावरील शरीर ताठ व उंच केलेले असावे. ( ३ )

[ 'स्विष्टीनां' च्या ऐवजी 'स्फिग्मानं' असा शब्द घेतला, तसेच 'मानसोपरि' च्या ऐवजी 'आसनोपरि' हा शब्द घेऊन अर्थ केलेला आहे. ही दुरुस्ती अंशुमत्काश्यप या पुस्तकावरून केलेली आहे. ]

( शंकराचा ) चेहरा देवीकडे थोडासा वळलेला असावा. तो ( चेहरा ) सुंदर व किंचित लवलेला असावा. डावा हात वरद ( मुद्रेत ) व उजव्या हातात कमळ धारण केलेले असते. (४)

[ 'लक्षणं भागसंयुतम्' च्या ऐवजी 'ललितं भंगसंयुतम्' असा बदल करून अर्थ दिला आहे. बहुधा हातांचे वर्णन देवीच्या हातांचे आहे. ]

डाव्या हाताच्या तळव्याकडे सर्व बोटे काहीशी वाकलेली असतात मात्र तळवा वरच्या दिशेला वळलेला असतो. ही वरद मुद्रा म्हणून प्रसिद्ध आहे. फूल धरलेला हात सिंहकर्ण मुद्रेत असावा. ( ५ )

[ श्लोक अशुद्ध आहे तो अंशुमत्काश्यपावरून खालीलप्रमाणे सुधारून अर्थ केला आहे.
'किंचित् वक्राङ्गुलाः सर्वे वामहस्ततलोर्ध्वगाः ।
वरदं त्विति विख्यातं पुष्पधृतसिंहकर्णवत् ॥' ]

सर्व दागिन्यांनी सुशोभित केलेली, तांबडे वस्त्र नेसलेली व छन्नवीरासह देवी ( देवाच्या ) डाव्या मांडीवर ठेवावी. ( ६ )

किंवा दुसऱ्या प्रकाराने देवीचे आसन तुला सांगतो. डावी मांडी जेथे बैठकीच्या बाहेर येते तेथे उजव्या हाताचा तळवा ठेवावा. ( ७ )

( आणि ) वर सांगितल्याप्रमाणे उजव्या हातात कमल धारण केलेले असते. उजवीकडील गुडघा बैठकीपासून थोडासा वर उचललेला असतो. ( ८ )

[ 'पाश्चाद' ऐवजी 'प्राग्वत्' व 'पीठं तु दक्षिण' च्या ऐवजी 'पीठात्तु दक्षिण' असा बदल करून अर्थ दिला आहे. ]

पीठ व गुडघा यांच्यामध्ये अंतर तीन, चार किंवा पाच अंगुले असावे; अथवा सहा, सात किंवा आठ अंगुले पीठ व गुडघा यांच्यामध्ये अंतर असावे. (९)

अशा दोन मुद्रा असलेली देवी सांगतात. स्त्रीकरिता सांगितलेल्या मापाप्रमाणे देवीचे माप घ्यावे. (१०)

[ 'श्रीमान्नेनु ( मता चो ) क्तमार्गेण' या ऐवजी 'स्त्रीमानस्योक्तमार्गेण' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

देवेश (शंकर) जर उभा असेल तर देवी ( पार्वती ) देखील उभी असावी. शंकर बसलेला असल्यास ( देवीदेखील ) बसलेली असावी. याहून उलटे केल्यास ते विपत्तिकारक होते. ( ११ )

देवीचे लक्षण असे (सांगितले), स्कन्दाचे लक्षण सांगतात. देवी व देवेश यांच्यामध्ये स्कन्दाची लहान मूर्ती स्थापावी. ( १२ )

उत्तम स्कन्दाची उंची देवीच्या हिक्कासूत्राच्या खालपर्यंत असावी. (देवीच्या) स्तनसूत्रापर्यंत ( त्याची उंची असेल ) तर ते कनिष्ठ माप होय. त्यांच्यामध्ये ( उत्तम व कनिष्ठ माप यांच्या मधल्या अंतराचे ) आठ भाग केले असता स्कन्दाचे माप नऊ प्रकारे होते. ( व उत्तम ते कनिष्ठ ) असे ( प्रत्येकी ) तीन तीन प्रकार होतात. रेशमी वस्त्र नेसलेला किंवा त्याशिवाय असावा. ( १३, १४ )

[ ‘ स्कन्दमानं तदुत्तरम् ’ च्या ऐवजी ‘ स्कन्दमानं तदुत्तमम् ’ हा बदल करून अर्थ दिला आहे. ‘ जात्या व्यासयुतं ’ च्या ऐवजी ‘ जात्यंशुकयुतं ’ असे शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

त्याचे ( स्कन्दाचे ) माप (उंची) ६४½ अंशात विभागले असता, एक अंश ( हे ) अंगुलाचे माप सांगतात. त्याच्या ½ यव होतो. ( १५ )

डोक्याचे माप एक अंगुले आणि तसेच तेथून केसांच्या कडेपर्यंतचे अंतर तेवढेच ( एक अंगुले ) असावे. ( तेथून ) डोळ्यांच्या सूत्रापर्यंतचे अंतर तीन भाग व त्याप्रमाणे ( नेत्रसूत्रापासून ) नाकपुडीपर्यंतचे माप तेवढेच ( तीन भाग ) असावे. ( १६ )

( नाकपुडीपासून ) हनुवटीपर्यंत तीन अंश व गळ्याची उंची दोन अंश असावी. हिक्कासूत्रापासून स्तनाच्या सीमेपर्यंतचे अंतर नऊ भाग सांगतात. ( १७ )

स्तनाच्या सीमेपासून नाभीपर्यंतचे अंतर आठ अंगुले सांगतात. नाभीपासून मेढ्रमूळापर्यंत अंतर सात अंगुले माहिती आहे. ( १८ )

[ ‘ तस्मानिन्मि (न्नाभ्य) वसानं तु ’ च्या ऐवजी ‘ स्तनान्तान्नाभिसीमान्तं तु ’ अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. ]

मांडीची लांबी १२ अंश असावी, गुडघा दोन अंगुले असावा. जंघा मांडीइतकीच ( १२ अंगुले ) असते. पावलाची उंची दोन अंगुले असावी. (१९)

पायाच्या तळव्याची लांबी दहा अंश, हाताची लांबी १४ ( अंगुले ), प्रकोष्ठाची लांबी दहा अंश, तळहात चार अंगुलांचा असावा. ( २० )

मधले बोट चार अंगुले, अनामिका ३½ अंश, तिच्याइतकीच तर्जनीची लांबी असून करंगळी तीन अंगुले असावी. ( २१ )

आंगठ्याची लांबी तीन अंश ( व ) तळव्याची रुंदी चार अंश ( असते. ) प्रकोष्ठाच्या अग्राची ( मनगटाची रुंदी ) तीन अंश व त्याच्या (प्रकोष्ठाच्या) मुळाची ( रुंदी ) चार अंगुले असावी. ( २२ )

हे द्विजसत्तमा, हाताच्या मुळाची रुंदी पाच अंश असावी. तोंडाची रुंदी ८½ अंश व कानाची रुंदी सात अंश असावी. ( २३ )

कुक्षींमधल्या अंतराची लांबी १३ अंगुले असावी. छातीची रुंदी पाच अंश ( १२ अंश ? ) व मधल्या ( कंबरेच्या सर्वांत निरुंद ) भागाची रुंदी ११ अंश असावी. ( २४ )

श्रोणींपाशी रुंदी १२ अंश व कटिस्थानी १३ अंश रुंदी असावी. मांडीच्या मुळाची रुंदी आठ अंगुले सांगितली आहे. ( २५ )

गुडघ्याची रुंदी सहा अंगुले, जंघेच्या मुळाची रुंदी चार अंगुले, नळीची रुंदी तीन अंश व तळव्याची रुंदी सहा अंश असावी. ( २६ )

किंवा तळव्याच्या पाठीमागील भागाची ( टाचेची ) रुंदी तीन अंश असावी. उरलेले अवयव युक्तीने कल्पावेत. केस शेंडीप्रमाणे दाखवावेत किंवा केसांच्या कडेपासून करण्डमुकुट घातलेला असावा. ( २७ )

[ ‘ केशान्ते नासिकोपेतं ’ ची दुरुस्ती ‘ केशान्ते वा शिखोपेतं ’ अशी करून अर्थ केला आहे. ]

दोन्ही हातांत फुले असावीत किंवा डावा हात वरद मुद्रा धारण केलेला किंवा कटक अथवा सिंहकर्ण मुद्रेत असावा. ( २८ )

उजव्या हातांत फुले असतात किंवा कवठ ( की बेलफळ ? ) व आंब्याचे फळ असते. कडदोरा घातलेला, नागडा व छन्नवीर घातलेला असतो. ( २९ )

मऊ केस असलेली व गळ्यात लहान मुलांना शोभतील असे दागिने घातलेली, बसलेली किंवा उभी अथवा नाचत असलेली अशी स्कन्द (मूर्ती) घडवावी. ( ३० )

स्कंद बसलेला असेल तर दोन्ही पाय बैठकीवर ठेवावेत ( दोन्ही पायांनी मांडी घातलेली असते. ) उभा असेल तर दोन्ही पायांचे तळवे स्थलभंगा- ( स्थानक मुद्रे- ) प्रमाणे ठेवलेले असतात. ( ३१ )

दोन्ही पाय किंचित वाकलेले व गुडघे जरा बाहेर आलेले व पावले थोडीशी तिरपी व जणू काही थोडेसे चालतच जात आहे असा युक्तीने (उभा स्कंद) दाखवावा. ( ३२ )

नाचत असेल तर पाय स्वस्तिक ( मुद्रेत ) असून उजवा पाय वाकविलेला व डावा पाय पीठापासून सात, सहा किंवा पाच अंगुले उचललेला असतो. ( ३३, ३३½ )

[ 'पीठोत्सेधं कलावधि' च्या ऐवजी 'पीठात् सप्ताङ्गुलावधि' अशी दुरुस्ती करून अर्थ केला आहे. ]

उजवा हात फळासह वरद ( मुद्रेत ) असून दुसरा हात सूची ( मुद्रेत ) असतो; किंवा डाव्या हातात फळ ठेवावे. ( ३४, ३४½ )

हिक्कासूत्र कर्णबन्धाच्या वरच्या कडांना समपातळीत असून त्या दोघांमधल्या अंतरास लंबसूत्र म्हणतात, व ते नाचणाऱ्या मूर्तीप्रमाणे असावे. उमा व स्कंद यांच्यासह ( शंकरमूर्ती ) सांगितली, आता चंद्रशेखर मूर्ती ऐक. ( ३५, ३६ )

[ हिक्कासूत्र म्हणजे दोन्ही खांदे समपातळीत असावे. तसेच कानांना जोडणारे सूत्रही समपातळीत असावे म्हणजे या दोन सूत्रांमधले लंबरूप अंतर सर्वत्र सारखे असेल. खांद्यांची व कानांची रचना नृत्तमूर्तीतही अशीच असते. ]

**काश्यपशिल्पातील ( सोमास्कन्देश्वर मूर्ती नावाचे ) बासष्ठावे पटल संपले.**

## त्रेसष्ठावे पटल

### [ चंद्रशेखरमूर्ती ]

आता विशेषतः चंद्रशेखरमूर्ती सांगतो. एकटा ( शंकर ), गौरीबरोबर व गौरीला आलिंगन देत असलेला असे ( चंद्रशेखरमूर्तीचे ) तीन प्रकार आहेत. ( १ )

केवल म्हणजे गौरीशिवाय, गौरीबरोबर म्हणजे सहजभावामध्ये गौरीजवळ असलेला व आलिंगित म्हणजे देव व देवीने परस्परांस एका हाताने आलिंगन दिलेल्या अशा तीन प्रकारच्या (शंकराच्या) मूर्ती असतात. केवलमूर्ती समपाद ( मुद्रेत ) असून बैठकीवर उभी अशी दाखवावी. ( २, ३ )

समभंग, त्रिभंग किंवा आभंग (मुद्रेत) चंद्रशेखराची केवल मूर्ती सांगतात. अभयमुद्रेसहित समपाद व बैठकीसहित अशी त्या ( तीन प्रकारां– ) मध्ये प्रथम मूर्ती असून त्या प्रतिमेच्या उंचीचे ( वगैरे ) माप अगोदरच सांगितले आहे. ( ४, ५ )

लांबीचे माप व उप- ( रुंदीचे ) माप यांची माहिती अनुक्रमाने सांगतो. प्रलम्ब फळीची लांबी १२ अंगुले असते. तिची रुंदी १८ अंगुले व जाडी ४½ अंगुले असते. ( प्रलम्बफळीला ) चार पाय असून त्यांची उंची प्रतिमेच्या उंचीइतकी असते. ते पाय सात अंगुले ( रुंदी, जाडीचे ) असतात. ती फळी समपातळीत आणलेल्या जमिनीवर ठेवावी. ( ६–७½ )

प्रलम्बफळीच्या वर समसूत्राचे स्थान निश्चित करून, पुढे, मागे व दोन्ही बाजूंना मानसूत्र ( वरून खाली ) लांबीत टाकावे. त्यांच्या शेजारी मानसूत्रांच्या मधला भाग पोकळ आहे असे समजून सूत्रांची टोके तेथपर्यंत लांबवावीत. ( ८, ९ )

हे द्विजसत्तमा, त्या सूत्रांना धरून प्रतिमा करावी. त्या प्रतिमेच्या पुढच्या बाजूला, मागच्या बाजूला व शरीराच्या मध्यभागातून ती सूत्रे लांबीत ( वरून खाली ) टाकावीत. ( १० )

या पाच सूत्रांना ब्रह्मसूत्रे म्हणतात. दोन्ही कुशींच्या कडांवरून ( व ) चेहऱ्याच्या रुंदीच्या दोन्ही बाजूंनी दोन दोन सूत्रे लांबीत ( वरून खाली ) टाकावीत. अशी ही नऊ सूत्रात्मक उभी तसेच बसलेली मूर्ती असावी. ( ११, ११½ )

मुकुटाचा मध्यभाग तसेच कपाळाचा मध्यभाग, नाकाच्या शेंड्याचा मध्य तसेच हनुवटीचा मध्य, खांद्यांच्या मध्यभागी, छातीच्या मध्यभागी, नाभीचा मध्य, लिंगाचा मध्य व पावलांच्या तळव्यांच्या अंतराच्या मधोमध पूर्वसूत्र लांबीत ( वरून खाली ) टाकावे. पाठीमागील सूत्र ( अपरसूत्र ) आता सांगतो. ( १२–१४ )

हे ब्राह्मणा, मुकुटाच्या मध्यभागी, पाठीच्या कण्याचा मध्य, पार्श्वभागाचा मध्य, स्फिक्पिण्डातील अंतराच्या मध्यभागी, मांडी, जंघा आणि पावलांच्या टाचांच्या अंतराच्या मध्यभागी असें अपरसूत्र लांबीत टाकावे. ( हे ) पाठीमागील सूत्र येथेच (सांगितल्या जागीच) असावे. ( १५, १६ )

दोन्ही बाजूंच्या कानांच्या पाळींच्या कडांवरून, गळ्याच्या बाजूंच्या मध्यभागावरून शरीराच्या बाहेरील ( बाजूंच्या ) मध्यभागावरून, पायांच्या घोट्यांच्या मध्यावरून जाणारी ( सूत्रे टाकावीत. ) ( १७ )

शरीराच्या आतून अशीच पाच सूत्रे कल्पावीत. दोन कानांच्या आतल्या भागातून गेलेली ( दोन ) सूत्रे ( ही ) स्तनाग्रांच्या मध्यावरून व पाय आणि मांडी यांच्या मधल्या पण बाहेरील भागातून जातील अशी लांबीत ( वरून खाली ) टाकावीत. ( १८, १८½ )

पूर्वसूत्र जटेच्या अग्राच्या मध्याच्या ( पुढे ) १२ अंगुलांवर असते. व अपरसूत्र ( पाठीमागील सूत्र ) जटेच्या अग्राच्या मध्याच्या ( मागे ) सहा अंगुलांवर असते. पूर्वसूत्र व कपाळाची कडा यांमधले अंतर दोन अंगुले असावे. ( १९, २० )

[ श्लोकार्ध १९½ त 'पूर्वसूत्रं' च्या ऐवजी 'अपर सूत्रं' असा शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

अपर सूत्र डोक्याच्या मागच्या भागापासून ३¾ अंगुलांवर असते. पूर्वसूत्रापासून हनुवटीची कडा दोन अंगुले एक यव असावी. (२१)

[ 'मन्म(न्व)न्तं' च्या ऐवजी 'हन्वन्तं' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

पाठीचा कणा व अपरसूत्र या दोघांमधले अंतर दोन अंगुले सात यव असावे. हिक्काची सीमा व पूर्वसूत्र या दोघांमधील अंतर सहा अंगुले असावे. ( २२ )

[ 'यवोनं द्व्यन्तरान्तरे' 'यवोनाग्न्यङ्गुलान्तरं' अशी दुरुस्ती केली आहे ]

खांद्यांच्या पाठीमागील उंचवट्यांचा भाग अपर सूत्रापासून १६ यव अंतरावर असावा. छाती व पूर्वसूत्र या दोघांमधील अंतर दोन अंगुले असावे. ( २३ )

खांद्यांच्या पाठीमागच्या उंचवट्यांमधील मध्यभाग व अपरसूत्र या दोघांमधले अंतर १४½ यव असावे. पोटाचा मध्यभाग व पूर्वसूत्र यांच्यातील अंतर तितकेच ( १४½ यव) असावे. (२४)

पाठीची पन्हळ अपरसूत्रापासून १¾ अंगुले खोल असावी. पूर्वसूत्रापासून नाभिमध्य १½ अंगुले अंतरावर असावा. ( २५ )

[ 'वशं निम्नपरं सूत्रं पादोनाष्टार्हकं परम्' ही ओळ 'वंशनिम्नापरं सूत्रं पादोनद्व्यङ्गुलान्तरम्' अशी अंशुमत्काश्यपाप्रमाणे सुधारली आहे. या पटलातील सर्व दुरुस्त्या या पुस्तकावरून केलेल्या आहेत. ]

नाभीसूत्र व अपरसूत्र यामधले अंतर २½ अंगुले असावे. पूर्वसूत्रापासून मेढ्रमूळाची सीमा तीन अंगुले सांगितली आहे. ( २६ )

अपरसूत्रापासून त्यापर्यंत (मेढ्रमूळाच्या सीमेपर्यंत) हे अंतर दोन अंगुले असावे. मांडीचा पुढील भागाचा मध्य व त्याचप्रमाणे गुडघ्याचा मध्य, जांघेचा मध्य आणि नळीच्या पुढच्या भागाचा मध्य यांमध्ये आडवे सूत्र कल्पून त्यांच्या मधील अंतर मोजावे ( २७, २८ )

[ श्लोकार्ध १७ मध्ये 'जटामध्यं'च्या ठिकाणी 'जानुमध्यं' अशी दुरुस्ती केली आहे. ]

त्या त्या जागी पुढच्या बाजूला आडवे सूत्र कल्पावे. मांडीच्या मध्यातून जाणारे (सूत्र) व पूर्वसूत्र यांच्यामधले अंतर दोन अंगुले असावे. ( २९ )

तेथेच ( मांडीच्या मध्यातून जाणारे सूत्र ) व अपरसूत्र यांमधील अंतर २६ यव असावे. गुडघ्याच्या मध्यातून जाणाऱ्या सूत्राचे पूर्वसूत्रापासून अंतर सहा अंगुले असावे. ( ३० )

तेथेच अपरसूत्र ४¾ अंगुलांवर असते. जंघेचा मध्य व पूर्वसूत्र यामधले अंतर आठ अंगुले सांगतात. (३१)

तेथेच अपरसूत्राच्या सीमेपर्यंत २६ यव (अंतर) असावे. पूर्वसूत्रापासून नळीच्या मध्याचे अंतर ८½ अंगुले असावे. (३२)

नळीचा मध्य व अपरसूत्राची सीमा (हे अंतर) ४¾ अंगुले असावे. पूर्वसूत्रापासून आंगठ्यांची अग्रे २½ अंगुलांवर असावीत. (३३)

त्या (पूर्व) सूत्रापासून टाचेपर्यंत अंतर १४½ अंगुले असावे. पूर्वसूत्रापासून शरीराच्या मध्यातून जाणाऱ्या सूत्राचे अंतर ९½ अंगुले असावे. ( ३४ )

[ ‘ सार्धमन्विष्यमिष्यते ’च्या ऐवजी ‘ सार्धमन्वंशमिष्यते अशी दुरुस्ती केली आहे. अंशुमत्-काश्यपाप्रमाणे शरीरमध्य व पूर्वसूत्र यांमधले अंतर १८ अंगुले असावे. ]

शरीराच्या मध्यातून जाणारे सूत्र व डोक्याचा पाठीमागील भाग यांमधील अंतर चार अंगुले असावे. त्या शरीरमध्यातून जाणाऱ्या सूत्रापासून खांदे ५½ अंगुले ( अंतरावर ) असावेत. ( ३५ )

त्या ( सूत्रापासून ) छातीच्या पाठीमागचा भाग ६½ अंगुले ( व ) पोटाच्या मध्यभागाच्या पाठीमागील भाग या सूत्रापासून ४½ अंगुले असावा. ( ३६ )

( शरीराच्या मध्यभागातून जाणाऱ्या सूत्रापासून ) नाभीभागाच्या पाठीमागचा भाग ५½ अंगुले असून कंबरेचे निर्गमन सहा अंश असावे. स्फिक्पिण्डाच्या पुढील भागाचे अंतर ८½ अंश असावे. ( ३७ )

( त्या सूत्रापासून ) मांडीचा मध्य चार अंशांवर ( व ) गुडघ्याच्या पाठीमागचा भाग तेवढ्याच ( अंतरावर ) असावा. जंघेचा मध्यभाग तीन अंशांवर व नळी ( तिचा मध्यभाग ) दोन अंगुलांवर असावा. ( ३८ )

घोट्यांपासून ( पायांच्या ) टाचा चार अंगुलांवर असून त्यावरून अपरसूत्र जाते. पार्श्वसूत्रांच्या मध्यभागी समसूत्रात ( एकाच पातळीत ) टाचा असतात. ( ३९ )

[ संपूर्ण श्लोक अंशुमत् काश्यपाप्रमाणे सुधारला आहे.

‘ गुल्फात् पार्ष्णियुगाङ्गुल्यं परसूत्रे समायुतम् ।
पार्श्वसूत्रेच मध्यस्थं समसूत्रे तु संस्थिताः ॥ ’ ]

पार्श्वसूत्रांपुढे हातांपर्यंतचे अंतर चार अंगुले असावे. त्या सूत्रांपासून ( पाठीमागे ) हातांपर्यंत अंतर आठ अंगुले असावे. ( ४० )

[ श्लोकार्ध ४० ‘ बाह्यपर्यन्ताव ( वं ) समातृ ( त्र ) कम् ’ ची सुधारणा ‘ बाहुपर्यन्तं वसुमात्रकम् ’ अशी करून अर्थ दिला आहे. ]

खालचे व वरचे हात कोपरापर्यंत एकत्र असतात. त्या हातांचे ( पार्श्वसूत्रांपासून ) अंतर चार अंगुले असावे. वरील हाताचे अग्र ( बोटे ) कर्तरी ( मुद्रेत ) असावे, व ते ( अग्र ) हिक्कासूत्रांपर्यंत असावे. दोन्ही हातांच्या मधल्या बोटांची टोके स्तनसूत्रापर्यंत असावीत. ( ४१, ४२ )

[ ‘ स्तनचूचुक संभवेत् ’ ची दुरुस्ती ‘ स्तनसूत्रसमं भवेत् ’ अशी केली आहे. स्तनसूत्राच्या समपातळीत असतात. ]

उजवा हात अभय व डावा हात वरद ( मुद्रेत ) असावा. पूर्वसूत्रापासून अभयमुद्रेच्या हाताचा मध्यभाग १५ अंगुले अंतरावर असावा. ( ४३ )

वरदमुद्रेतील डाव्या हाताचा तळवा खालच्या बाजूला कल्पावा. तळव्याचे मूळ कंबरेला स्पर्श करते ( व ) त्याचे अग्र मेढ्राच्या पुढे समपातळीत असावे. ( ४४ )

मधल्या बोटाच्या अग्रापासून मांडीचे निर्गमन चार अंगुले असावे. मांडीच्या मुखापाशी ( मुळापाशी ) वरद हाताचा पाठीमागचा भाग नाभीच्या समपातळीपर्यंत उचललेला असावा. ( ४५ )

वरद ( मुद्रेतील ) तळहाताचा मध्य पूर्वसूत्रापासून १६ अंगुलांवर असतो. कर्तरी ( मुद्रा ) असताना मनगटापासून ( तळव्याचे ) तोंड हाताच्या बाहेरच्या बाजूला असावे. ( ४६ )

किंवा ( तळहाताचा मध्य पूर्वसूत्रापासून ) ११ भाग अथवा १० अंगुले असावा. पूर्वसूत्राच्या सीमेपासून कोपराचे निर्गमन १७ अंगुले असावे. (४७)

( पूर्वसूत्रापासून ) जंघा १९ अंगुले, मांड्यांचे मूळ दोन अंगुले आणि तसेच घोट्यांचे अंतर एक अंगुल सांगितले आहे. (४८)

मांड्यांच्या मध्यांमधले अंतर २० अंगुले सांगतात. गुडघ्यांमधले अंतर चार अंगुले, जंघांमधील पाच अंगुले, नळ्यांमधले अंतर सहा अंश व घोट्यांमधले अंतर चार अंश असावे. पायांच्या दोन्ही आंगठ्यांमधले अंतर आठ अंगुले असावे. (४९, ५०)

हे ब्राह्मणश्रेष्ठा, ( चेहऱ्यावर ) आर्जवी राजस भाव कल्पावा. वरचे दोन्ही हात कर्तरी मुद्रेत असून उजव्या हातात टंक असावा. डाव्या हातात हरिणी असून टंकाचे तोंड बाहेरच्या बाजूला येईल असे असावे. हरिणीचे तोंड बाहेरच्या किंवा आतल्या बाजूला असावे. (५१, ५२)

जटामुकुट घातलेला, ( डोक्यावर ) उजवीकडे किंवा डावीकडे चंद्र असल्याने शोभून दिसणारा, प्रवाळाप्रमाणे तांबडा, तीन डोळ्यांचा, सौम्य मुद्रेचा, सर्व दागिन्यांनी भूषविलेला, पिवळे रेशमी वस्त्र नेसलेला असतो. ( महा- ) देवाच्या वस्त्राची शेवटली टोके दोन्ही पायांच्या नळीपर्यंत आलेली असतात. (५३, ५४)

दोन्ही पार्श्वभागी हे वस्त्र मांड्यांच्या मध्यभागी दाखवावे. केवल ( एकट्या ) शंकराची ( मूर्ती ) सांगितली. डाव्या बाजूला असलेल्या गौरीसह शंकराची माहिती सांगतो. (५५)

( शंकर व पार्वती ) निरनिराळ्या बैठकींवर किंवा एकाच बैठकीवर असलेले किंवा निरनिराळ्या भंगांसह ( आभंग इत्यादी ) असतात. किंवा त्याची ( शंकराची ) मांडी हीच बैठक असलेल्या किंवा निराळ्या बैठकीवर बसलेल्या गौरीसह ( शंकर ) असतो. (५६)

वरीलप्रमाणे भंगासह देव व देवी परस्परांच्या (आलिंगनात) असतात. देवाचा एक हात वरद ( मुद्रेत ) व दुसऱ्या हाताने देवीचा स्तन व नाभी यांच्यामधल्या अंतरात डाव्या बाजूने आलिंगन दिलेले असते, किंवा पार्श्वसूत्राच्या वर डाव्या हाताने आलिंगन दिलेले असावे. (५७, ५८)

देवीने उजव्या हाताने शंकराच्या उजव्या बाजूला करदोड्याच्यावर आलिंगन दिलेले असून डाव्या हातात फूल धरलेले असते. (५९)

किंवा शंकर ( मूर्ती ) पूर्वीप्रमाणेच असून देवीच्या उजव्या हाताने फूल धारण केलेले असते व डावा हात (खाली ) लोंबता असावा. (६०)

अशी आलिंगनमूर्तीची तीन प्रकारे कल्पना करावी. सर्व दागिन्यांसह व प्रभामंडल असलेल्या चंद्रशेखराची माहिती सांगितली. आता नंदीवर बसलेल्या ( शंकराच्या मूर्तीचे वर्णन) ऐक. (६१, ६२)

**काश्यपशिल्पातील चंद्रशेखरमूर्तीचे लक्षण या नावाचे त्रेसष्टावे पटल संपले.**

# चौसष्टावे पटल

## [ वृषवाहनमूर्तीचे लक्षण ]

नंदीवर बसलेल्या शंकराच्या मूर्तीचे लक्षण आता सांगतो. समभंग किंवा अतिभंग मुद्रेत हे कल्पवित्तमा, मूर्ती कल्पावी. (१)

उजवा पाय सरळ ( सोट ) व डावा पाय वाकलेला असावा. पगडीच्या मध्याच्या डावीकडून व कपाळाच्या मध्याच्या डावीकडून, (२)

डाव्या डोळ्याची कडा व डाव्या नाकपुडीची कडा (यांच्यावरून), स्तनभागाच्या उजव्या बाजूवरून व नाभिमध्याच्या डावीकडून, (३)

डाव्या मांडीच्या मध्यावरून व डाव्या टाचेच्या मध्यावरून मध्यसूत्र लांबीत टाकावे, असे समभंगाचे ( सूत्र ) झाले. ( उंचीचे ) माप चार अंगुलांनी कमी असावे. ( ४ )

मुख पूर्वी ( समभंगात ) सांगितले त्याप्रमाणे, तसेच उजवीकडील स्तनभाग तसाच ( समभंगात सांगितल्याप्रमाणे ) असावा. नाभीच्या डावीकडे तीन अंशांवरून तसेच डाव्या मांडीच्या मध्यावरून, सरळ ठेवलेल्या पायाच्या व घोटयाच्या मध्यातून (मध्य-) सूत्र लांबीत टाकावे. याला अतिभंग ( मुद्रा ) म्हणतात. ( मूर्तीच्या उंचीचे माप ) पाच अंगुलांनी कमी असावे. ( ५, ६ )

नंदीच्या डोक्यावर ( शंकराचे ) डावे कोपर ठेवावे. हे ब्राह्मणा, हिक्कासूत्राखाली १५ अंगुले किंवा १८ अंगुले– (७)

[ ‘ हिक्कासूत्रं तथा ’ या ऐवजी ‘ हिक्कासूत्रादधो ’ अशी दुरुस्ती केली आहे. व ‘नवाङ्गुलम्’ च्या ठिकाणी ‘ द्विनवाङ्गुलम् ’ असा शब्द घेऊन अर्थ दिला आहे. ]

सरळ खाली डाव्या हाताचे कोपर असावे, व त्या ( कोपराने ) त्याच्यावर ( नंदीवर ) रेललेला असा दाखवावा. नंदीची उंची सांगितली. त्याचे (पुढचे दोन्ही ) पाय स्थानकमुद्रेत असतात. (८)

[ श्लोकार्ध आठ अंशुमत्काश्यपात नाही. ]

नंदीची उंची सांगितली. नंदी त्याच्या लक्षणांप्रमाणे करावा. नंदीच्या डोक्यावरील हाताच्या मधल्या बोटाचे टोक नाभिसूत्राच्या समतल करावे, किंवा ( नाभिसूत्राच्या ) खाली किंवा वर एक अंगुले असावे. त्या हाताच्या तळव्याचा मध्यभाग पूर्वसूत्रापासून दोन यवांवर असावा. ( ९, १० )

[ श्लोकार्ध ९½ त ‘ नताङ्गुलम् ’ च्या ऐवजी ‘ नतोन्नतम् ’ व श्लोकार्ध १० त ‘ (अध ) स्तात्तलमध्ये तु ’ च्या ऐवजी ‘ तद्हस्ततलमध्यात् तु ’ अशी सुधारणा केली आहे. ]

तो (नंदीच्या डोक्यावरील ) हात अधोमुख असून पसरलेला असावा. उजवीकडील खालच्या हाताचा मधला भाग शहाण्या माणसाने, नाभीच्या खाली १५ किंवा १६ अंगुले ठेवून तो सिंहकर्णाप्रमाणे ( त्या मुद्रेत ) असावा. त्या हातांत वाकड्या दंडाचे आयुध असावे. ( ११, १२ )

सरळ पायाच्या ( ज्या पायावर भार दिला आहे त्याच्या ) गुडघ्याच्या वरच्या कडेपासून हिक्कासूत्रापर्यंत ( इतका लांब व ) करंगळीइतक्या जाडीचा व पुढच्या बाजूला तीन तोंडे असलेला लोखंडी किंवा लाकडी वक्रदण्ड असावा. ( १३, १३½ )

[ 'अग्रं वक्त्र त्रयान्वितं' याऐवजी अंशुमत्काश्यपात 'वक्रान्वितं भवत्' असे शब्द आहेत. ]

( ज्या हातात वक्रदण्ड आहे ) त्या हाताच्या मनगटांपासून मांडीच्या मुळापर्यंतचे अंतर पाच, सहा, सात अंगुले किंवा आठ अथवा नऊ अंगुले असावे. ( १४, १४½ )

जटामुकुट असलेला किंवा जटाभार मोकळा सोडलेला किंवा जय ( जटा ? ) बन्ध डोक्यावर असावा, कर्त्याची जशी इच्छा असेल तसा करावा. सर्व दागिने घातलेली, तांबडया रंगाची व लाल ( सर ) मुखाची ( शंकरमूर्ती ) असावी. ( १५, १६ )

देवी उमा डाव्या किंवा विशेषतः उजव्या बाजूला असावी. उजवा पाय स्वस्तिक ( सुस्थित ? ) मुद्रेत व डावा पाय ( किंचित ) वाकलेला असावा. ( १७ )

उजव्या हातात कमळ असून डावा हात पसरलेला ( सरळ खाली आलेला ) असतो. स्त्री ( मूर्ती– ) च्या मापाबद्दलच्या माहितीप्रमाणे देवी पार्वती करावी. ( १८ )

नंदीवर बसलेल्या शंकराच्या मूर्तीची ( माहिती ) सांगितली. याच्यापुढे नृत्तमूर्ती ( नृत्य करणाऱ्या शंकराच्या मूर्तीची माहिती ) सांगतो. ( १९ )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील वृषवाहनमूर्तीचे लक्षण नावाचे चौसष्टावे पटल संपले.**

## पासष्टावे पटल

### [ नृत्तमूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः नाचणाऱ्या ( शंकराच्या ) मूर्तीचे लक्षण सांगतो. ( शंकराचा ) उत्साह वाढविण्यासाठी दुर्गादेवी जन्माला आली. ( १ )

[ श्लोक दोन अशुद्ध असल्याने अर्थ दिलेला नाही. ]

सर्व लोकांच्या हिताकरिता, देवांचे संकट नाहीसे होण्यासाठी व राजा आणि राष्ट्र यांच्या भरभराटीसाठी असे नृत्य ( शंकर ) करतो. ( ३ )

[ 'देवानां मूर्तिनाथाय' असे नसून 'देवानां आर्तिनाशाय' असे पाहिजे. ]

नृत्याचे १८ प्रकार आहेत त्यांतील पहिले नऊ सांगतो. हे श्रेष्ठ ब्राह्मणा, पूर्वी सांगितलेल्या रीतीप्रमाणे मूर्तीचे माप असावे. ( ४ )

[ 'प्रकृतौ' नसून 'प्रागुक्त' असा शब्द पाहिजे. ]

सर्व अवयव उत्तम दहा तालांच्या ( मापाने ) कल्पावेत. १२, ११ किंवा १० अंगुलांनी उंची कमी असते. ( ५ )

[ 'नृत्तोन ( न्न ) तं' च्या ऐवजी 'नतमानं' हा शब्द पाहिजे. ]

पगडीच्या मध्याच्या डावीकडून, कपाळाच्या मध्यभागाच्या उजवीकडे (डावीकडे ? ) एक अंगुले ( अंतरावरून ), डाव्या डोळ्याच्या कडेवरून व ( डाव्या ) नाकपुडीच्या शेवटावरून, हनुवटीच्या डाव्या बाजूवरून, खांद्यांच्या मध्यभागावरून व नाभीच्या मध्यभागावरून सरळ ठेवलेल्या पायाच्या घोटयाच्या आतमधल्या मध्यावरून किंवा डावीकडून तसेच (डोक्याच्या पाठीमागच्या) प्रभामंडळाच्या मध्यभागातून पूर्वसूत्र टाकावे. ( ६–७½ )

कपाळापासून (पूर्व ) सूत्राचे निर्गमन तीन भाग किंवा २½ भाग असावे. घोटा व (पूर्व ) सूत्र यांमधले अंतर १२ भाग असावे. खांद्याच्या मध्यापासून (पूर्व) सूत्राचे निर्गमन ७½ (किंवा ) नऊ अंगुले असावे. ( ८, ९ )

[ श्लोकार्ध ८ ' ललाटसूत्रनीव्रं तु युगार्धाङ्गुलमनन्तरम् ' हा ' ललाटात्सूत्रनीव्रं तु युगांशं वा अर्धहीनकम् ' असा अंशुमत्काश्यपावरून घेतला आहे.

घोटा व पूर्वसूत्र यांतले अंतर ' द्वादशांश ' दिले आहे. अंशुमत्काश्यपाप्रमाणे ' तद्वदेव ' म्हणजे तीन किंवा ½ अंगुले अंतर हे अधिक बरोबर वाटते. ]

( पूर्व ) सूत्र व मुकुट आणि बकपक्ष ( बाजूंच्या केसांची झुलपे ) यांमधले अंतर तेवढेच (७½ किंवा नऊ अंगुले ) असावे. कुशीच्या वरच्या बाजूला स्पर्श केलेले असे पूर्वसूत्र टाकावे. ( १० )

[ ' मुकुटोव्य ( द्वे ) कपक्षाग्रं ' च्या ठिकाणी ' मुकुटोबकपक्षाग्रं ' अशी सुधारणा केली आहे. ]

त्या ( पूर्व) सूत्रापासून डोल ( मुद्रेतील) हाताचे टोक १६½ अंगुले असते. त्या (पूर्वसूत्रा ) पासून वरच्या हाताचे अग्र चार अंगुले सांगतात. ( ११ )

त्या ( पूर्वसूत्रा ) पासून अग्नि धारण केलेल्या हाताचे अग्र ३८ अंगुले, ४० किंवा ४३ अंगुले असावे. ( १२ )

हिक्कासूत्राच्या समपातळीत मधल्या (हाताच्या) मधल्या बोटाचे अग्र असावे. त्या हाताच्या तळव्याच्या मध्यभागी किंवा मधल्या बोटाच्या टोकाच्या एक यव अगोदर मधल्या पेरावर पात्रासह किंवा पात्राशिवाय अग्नि ( दाखवावा). त्याची रुंदी पाच अंगुले असावी. ( १३, १४ )

त्याची ( अग्नीची ) उंची सात, आठ किंवा नऊ अंगुले असते. तो (अग्नि ) तीन, पाच किंवा सात जिभा ( अग्निशिखा ) असलेला दाखवावा असे सांगतात. ( १५ )

वर सांगितलेल्या ( अग्नीच्या ज्वालाशिखांपैकी ) मधली जीभ सोडून इतर जिभा ( ज्वाला-शिखा ) उजवीकडे मुख केलेल्या ( वळलेल्या ) अशा कराव्यात. पूर्वसूत्राच्या उजव्या बाजूला हाताचे अग्र ( उजवीकडील मधल्या हाताचे अग्र ) २० अंगुले अंतरावर असते. ( १६ )

[ ' बाह्वग्रं विंशदंगुलम् ' अशी दुरुस्ती केली आहे. ]

त्या ( पूर्वसूत्रा ) पासून डमरू धरलेल्या हाताच्या मनगटाची बाहेरची बाजू ३८ किंवा ४० अंगुले असते. ( १७ )

किंवा डाव्या हातापासून उजवीकडे ४० अंगुले अंतरावर ( डमरू धारण केलेला हात ) असावा. त्या हाताच्या मनगटाचा वरचा भाग हिक्कासूत्राच्या समपातळीत असावा. ( १८ )

डमरूचा मध्यभाग सूचीकर्ण (मुद्रेने ) धरलेला असतो. तर्जनी सरळ असावी व तिचे अग्र सूची (मुद्रे ) प्रमाणे असावे. ( १९ )

[ 'तर्जनी रजनी भवेत्' च्या ऐवजी 'तर्जनी ऋजुका भवेत्' अशी सुधारणा पाहिजे.]

किंवा ( डमरूच्या ) चामडयाच्या वाद्या मधल्या बोटाच्या वर असून अनामिकेच्यावर डमरू (धरलेला) दाखवावा. ( २० )

डमरूची लांबी व रुंदी अनुक्रमे आठ व पाच अंगुले असते. मध्यभागी त्याची रुंदी तीन अंगुले असून तो कमळाच्या आकाराप्रमाणे असावा. ( २१ )

दोन वलये असलेला, गाईचे चामडे चामडयाच्या वादीने बांधलेला ( डमरू ) असावा व त्या त्या द्रव्याने केलेला असावा. ( २२ )

( तर्जनीच्या ) सूचीप्रमाणे असलेल्या अग्रापासून कानाच्या कडेपर्यंत ४० अंगुले अंतर असावे. किंवा ( ते अंतर ) ४५ किंवा ५० अंगुले असावे. ( २३ )

त्या सूचीप्रमाणे असलेल्या मधल्या व तर्जनीच्या बोटांशिवाय इतर बोटे पार्श्वसूत्राच्या समपातळीत असतात. उजवीकडील खालचा हात अभय ( मुद्रेचा ) कल्पावा. ( २४ )

पूर्वसूत्रापासून अभयमुद्रेच्या हाताचा मध्यभाग २४ अंगुले ( अंतरावर ) असतो. त्याच्या मधल्या बोटाचे अग्र हिक्कासूत्राच्या समपातळीत असावे. ( २५ )

(पूर्व) सूत्रापासून कोपऱ्याचे निर्गमन ४२ अंगुले असावे. अभयमुद्रेच्या हाताच्या प्रकोष्ठाच्या मध्यभागी नागवलय ठेवावे. ( २६ )

त्याचा परीघ प्रकोष्ठाच्या मध्यभागाइतका असावा व त्याची रुंदी १$\frac{१}{२}$ अंगुले असावी. त्या सूत्राच्या वर ( वलयाच्या वर ) नागाची फणा १२ अंगुले असावी. ( २७ )

( नागाच्या फणेची ) रुंदी सात अंगुले व जाडी एक अंगुले असावी. पुढच्या बाजूला पहात असलेला व ( तोंडाच्या बाहेर ) जीभ काढलेला असा असावा. ( २८ )

हे ब्राह्मणश्रेष्ठा, अशा रीतीने नागवलयाची कल्पना करावी. (२८$\frac{१}{२}$)

( पूर्व ) सूत्र व कुशीची डावी बाजू यामधले अंतर १२ अंगुले असते. ( पूर्व ) सूत्रापासून डाव्या बाजूला पोटाचा मध्य नऊ अंगुले सांगितला आहे. ( पूर्व ) सूत्रापासून डावीकडच्या वृषाण्डाचे निर्गमन १८ अंगुले असते. ( २९, ३० )

[ 'नवमात् पिण्डसूत्रं' च्या ऐवजी 'वामस्फिक्पिण्डनीव्रं' अशी सुधारणा करून अर्थ दिला आहे. ]

( पूर्व ) सूत्रापासून वाकविलेल्या गुडघ्याचे अंतर १० अंगुले असते. नऊ अंगुले आणि आठ अंगुले असे अनुक्रमाने गुडघ्याचे निर्गमन असते. ( ३१ )

१२, ११ ( व ) १० अंगुले हे नतमान (येवढी उंची कमी ) असावी. उभ्या स्थिर (पायाच्या) गुडघ्याच्या बाहेर डाव्या गुडघ्याचे निर्गमन १६ अंगुले असते किंवा १५ अंगुले अथवा १४ अंगुले दोन्ही गुडघ्यांमधले अंतर असते. उभ्या पायाच्या नळीच्या मध्यापासून डाव्या पायाचा मागचा भाग यांतील अंतर शहाण्या माणसाने ४४ अंगुले ठेवावे किंवा ते अंतर ४७ अथवा ४६ अंगुले असते. ( ३२–३४)

[ श्लोकार्ध ३२ खालीलप्रमाणे अंशुमत्काश्यपाप्रमाणे सुधारला.

'स्थिताङ्घ्रिजानोर्वामांघ्रि जानुनीव्रं कलाङ्गुलम् ॥ ३२ ॥'

तसेच श्लोकार्ध ३४ 'ससप्तषट् चत्वारिंशदङ्गुलं वाथ तद्भवेत् ॥ ३४ ॥']

उभ्या पायाच्या गुडघ्यापासून उचललेल्या पायाच्या पाठीमागचा भाग यांतील अंतर ३४ अंगुले असते; किंवा हे ब्राह्मणा, गुडघा व पायाचा पाठीमागचा भाग (यांतले अंतर) ३३ अंगुले असते. (३५)

उचललेल्या पायाचा गुडघा नाभिसूत्राच्या समपातळीत असावा. डोल (मुद्रेतील) हाताचे कोपर नाभिसूत्रापासून दहा अंगुले अंतरावर असते, किंवा कोपराच्या कडेपर्यंत (नाभिसूत्रापासून अंतर) ११ अंगुले कल्पावे. (३६, ३६½)

['डोलहस्तं स्यान्नालसूत्रं' या ऐवजी 'डोलहस्तस्य नाभिसूत्राद्' असा बदल करून अर्थ दिला आहे.]

त्या हाताचे मनगट व डाव्या पायाचा गुडघा यांमधले अंतर दहा अंगुले किंवा नऊ अंगुले सांगतात. (३७, ३७½)

डोल (मुद्रेतील) हाताच्या मधल्या बोटाच्या अग्रापासून डाव्या पायाच्या गुडघ्याचे अंतर १० अंगुले किंवा ९ अंगुले अथवा ११ अंगुले असावे. (३८, ३९)

[श्लोकार्ध ३८½ खालीलप्रमाणे सुधारला.
'वामपादे तु जङ्घान्तमन्तरं धर्ममात्रकम्'।]

डोल (मुद्रेचा) हात ते अभय (मुद्रेचा) हात या दोघांमधले अंतर दहा अंगुले असते. (किंवा) परस्परांमधले अंतर जसे सुंदर दिसेल तसे ठेवावे. (४०)

केसांच्या कडेपासून बकपक्षाची उंची १८ अंगुले, १७ अंगुले किंवा १६ अंगुले असावी. (४१)

त्याच्या (बकपक्षाच्या उंचीचे) निम्मे किंवा पाऊणपट त्याची रुंदी असावी. उत्तम तऱ्हेने पसरलेला जटाभार असून ५, ६, ७, ९ किंवा हे ब्राह्मणा, ११ संख्येपर्यंत दोन्ही बाजूंना जटा असाव्यात. ३२ अंगुलांनी सुरुवात करून, एक एक अंगुलाने वाढ करीत, ६१ अंगुलांपर्यंत जटांची लांबी सांगतात. (४२, ४४)

करंगळीच्या परिघाइतका जटांचा परीघ सांगितला आहे. जटांचा शेवट फुलांच्या माळा, नाग तसेच रुईची फुले आणि धत्तुराची फुले त्याचप्रमाणे हस्तिशिरीषाची फुले तसेच कवटी व रत्ने यांच्या सुरेख बांधणीने अलंकारिलेला असतो. (४५, ४६)

अशा रीतीने अलंकारिलेल्या मुकुटावर उजव्या बाजूला सुंदर चंद्रकोर असते. शेंदूराने अलंकृत केलेला असतो व (गळ्यात) आठ माळा लोंबत असतात. (४७)

सर्व शरीर भस्मर्चचित असून चेहरा किंचित हसरा असतो. हटसूत्रासह यज्ञोपवीत घातलेले असते. (४८)

[श्लोक ४९ समजत नाही.]

वाघाचे कातडे वस्त्र म्हणून नेसलेले असून ते नृत्याच्या गतिवशात वर गेलेले आहे व त्याची गांठ, हे श्रेष्ठ ब्राह्मणा, डोलमुद्रेच्या हातापाशी असते. (५०)

हाताच्या मुळापासून (बगलेपासून) ते (उत्तरीय वस्त्र) ३६ अंगुले लांब असते. त्याच्या निम्मे अथवा पाऊणपट चक्रमण्डलाची रुंदी असते. (५१)

पायात नुपूर असून सर्व प्रकारच्या दागिन्यांनी भूषविलेला असतो. हाताच्या व पायाच्या सर्व बोटांत रत्नजडित आंगठ्या असतात. मधले बोट सोडून सर्व बोटांत आंगठ्या असतात. (५२, ५२½)

उजवा वाकलेला पाय अपस्मारावरती असतो. महेश्वराच्या पायाचा तळवा नृत्यामुळे तिरपा असतो. डावा पाय तेथून उचलून तो तिरपा उजव्या बाजूला वळलेला असतो व तेथेच डोल (मुद्रेचा) हात आलेला असतो. आता अपस्माराची माहिती सांगतो. (५३–५४½)

तीन, चार, किंवा पाच अंगुलांनी अपस्माराची लांबी सांगतात. अपस्माराच्या उंचीचे ४८ भाग करावेत. (५५, ५५½)

[श्लोकार्ध ५५ शिल्परत्नात (२२·४१) दिला आहे तो असा–

'चतुस्तालेन कर्तव्यमपस्मारं प्रमाणतः।' म्हणजे अपस्माराचे माप चार तालांत घ्यावे आणि हा अर्थ अधिक योग्य वाटतो.]

अपस्माराची पगडी एक भाग, तेथून केसांची कडा दोन भाग, हृदय ते नाभीपर्यंत तेवढेच अंतर असते. नाभीपासून मेढ्रमूळापर्यंत सहा भाग माप असते. (५६, ५७)

[येथे केसांच्या कडेपासून हनुवटीपर्यंत, नंतर गळ्याची उंची, खांद्यापासून हृदयापर्यंत हे माप दिलेले नाही. शिल्परत्नाप्रमाणे (१५·१–२) हे अंतर केसांची कडा ते नेत्रसूत्र दोन अंगुले, नेत्रसूत्र ते नाकपुडी दोन अंगुले, नाकपुडीपासून हनुवटीपर्यंत तीन अंगुले, गळ्याची उंची तीन अंगुले, हिक्कासूत्रापासून स्तनसूत्रापर्यंत नऊ अंगुले. (सहा अंगुले ?)]

मांडी सात अंगुले लांब व गुडघा दोन अंगुले लांब असतो. जंघेची लांबी मांडीइतकीच (सात अंगुले) व पावलाची उंची एक भाग असते. (५८)

खांद्यापासून हाताच्या मधल्या बोटाच्या टोकापर्यंतचे अंतर १४ भाग असते. उरलेले (सर्व अवयव) युक्तीने करावेत. अपस्मार खाली तोंड करून आडवा पडलेला असतो. (५९)

शंकराच्या डाव्या बाजूला (अपस्माराचे) दोन्ही पाय असतात. अपस्माराच्या पोटाची उंची १०, ९ किंवा आठ भाग असते. (६०)

त्याचे मुख लहान मुलाचे खेळताना (जसे जमिनीवर उचललेले असते) तसे वर उचललेले असते. डाव्या हाताने नाग व उजवा हात मुद्रेत असावा. हे उत्तम ब्राह्मणा, धान्याप्रमाणे काळसर रंगाचा अपस्मार असतो. (६१, ६१½)

['दक्षिणे तस्य चेन्द्रियम्' या ऐवजी 'दक्षिणं मुद्रयान्वितम्' असा बदल करून अर्थ दिला आहे. दुरुस्ती शिल्परत्न २२·४२½ प्रमाणे केली आहे.]

पद्मपीठाची उंची १६ भाग असून रुंदी त्याच्या चारपट (६४ अंगुले) असते. त्याची लांबी रुंदीच्या १¼, १½, १¾ किंवा दुप्पट असते. वरचे व खालचे पद्म आणि पिण्ड्का सांगितल्याप्रमाणे असावी. (६२, ६३)

(शंकराची नृत्तमूर्ती) खाली दिलेल्या लक्षणांच्या प्रभामंडलासह करावी. तीन अंगुलांनी सुरुवात करून शंभर अंगुलांपर्यंत– (६४)

(किंवा) तितक्याच (तीन) अंगुलांनी सुरुवात करून ९६ अंगुलांपर्यंत (प्रभामण्डलाची) उंची असावी. एका अंगुलाने सुरुवात करून एक एक यवाने वाढ करीत, (६५)

त्याच्या $\frac{१}{२}$ कमी अशी जसजसे वर जावे तसतशी रुंदी क्रमाक्रमाने कमी करत जावी. ( ६६ )

[ श्लोक ६५$\frac{१}{२}$ चा अर्थ समजत नाही. ]

एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात व आठ अंगुले असे पुन:पुन्हा त्या (दण्डांच्या) संख्या ठरवून करावे. ( ६७ )

कर्त्याच्या इच्छेप्रमाणे तेथल्या दण्डांची संख्या असावी. निरनिराळ्या वृक्ष, लता, फुले इत्यादींनी ते सुशोभित करावे. ( ६८ )

त्याच्या वरती हाताच्या मापाने, शहाण्या माणसाने शिखर ( अग्निशिखा ? ) करावे. हे ब्राह्मणा, (प्रभामंडलाच्या ) भोवती एक तालाहून कमी मापाची ती ( शिखरे ) करावीत. ( ६९ )

शहाण्या माणसाने सूर्यमण्डल किंवा प्रभामण्डल याप्रमाणे करावे. त्याच्या ( शंकराच्या ) डाव्या बाजूला मागे सांगितल्याप्रमाणे देवी पार्वतीची मूर्ती असावी. ( ७० )

अशी सर्व लोकांचे कल्याण करणारी पहिली नृत्तमूर्ती असते. वरीलप्रमाणेच (परंतु) जटांच्या उजव्या बाजूला किंवा एका बाजूला गंगा दाखविलेली असते. ( ७१ )

शंकराच्या ( मूर्तीच्या ) अंगुलाच्या मापाने १६ अंगुले उंचीची ( गंगा ) असून स्त्रीच्या मापाप्रमाणे तिचे सर्व ( अवयवांचे ) माप असते. हृदयापाशी हात नमस्कार (मुद्रेत ) असतात. ( ७२ )

[ शिल्परत्न (भाग दुसरा ) २२.४६–४७$\frac{१}{२}$ प्रमाणे ६५.७१–७२$\frac{१}{२}$ मध्ये खाली दिल्याप्रमाणे सुधारणा करून अर्थ दिला आहे.

'एतत् स्यात् प्रथमं नृत्तं सर्वलोकहितावहम् ।
तदेव दक्षिणे पार्श्वे जटाग्रे जान्हवी भवेत् ॥ ४६ ॥
शंभोरर्चाङ्गुलेनैव षोडशाङ्गुलमुन्नता ।
स्त्रीमानोत्तुंगसंपूर्णा हृदयेऽञ्जलिसंयुता ॥ ४७ ॥
एवं जान्हवीसंयुक्तं नृत्तं यत्तद्द्वितीयकम् । ४७$\frac{१}{२}$ ।' ]

अशी ही जान्हवीसह असलेली दुसऱ्या प्रकारची नृत्तमूर्ती ( ७२$\frac{१}{२}$ )

वरीलप्रमाणेच पण डावा पाय अपस्मारावर ठेवलेला असतो. उजवा पाय उचललेला असतो व डावा पाय सरळ असतो. कपाळाच्या मध्यभागाच्या डावीकडे व डाव्या नाकपुडीवर व उभ्या पायाच्या घोटयावर असे ब्रह्मसूत्र टाकावे. उरलेले ( सर्व ) अगोदर सांगितल्याप्रमाणे करावे. असा हा तिसरा नृत्तमूर्तीचा प्रकार. ( ७३–७५ )

[ मूर्तीचा भार उजव्या पायावर न ठेवता डाव्या पायावर ठेवला एवढाच फरक पहिल्या व या तिसऱ्या नृत्तमूर्तीत आहे. ]

पसरलेला जटाभार ( किंवा ) जटामुकुट ( अथवा ) जटामण्डल यासह व विशेषत: पहिल्या नृत्तमूर्तीप्रमाणे अशी ही सर्व प्राणिमात्रांना हितकारक अशी चवथी नृत्तमूर्ती असते. (७६, ७६$\frac{१}{२}$ )

कानापर्यंत उजवा पाय वर उचललेला व डावा पाय वाकलेला असतो. आठ भूतांसह अशी ही पाचवी नृत्तमूर्ती असते. (७७, ७७$\frac{१}{२}$)

अभय ( मुद्रा ), शूल, पाश व डमरू उजव्या हातांत असतात. कपाल, अग्निपात्र व घण्टा ( डाव्या हातांत असतात. डावीकडील एक हात ) हत्तीच्या सोंडेप्रमाणे असतो. हत्तीच्या सोंडेप्रमाणे असलेला हात उजवीकडे वळलेला असतो. (७८, ७९)

[ ‘ अग्निपाशं ’ असा शब्द नसून ‘ अग्निपात्र ’ असा असावा तसेच ‘ गण्डं ’ हा शब्द नसून ‘ घण्टां ’ हा असावा. ]

सर्व सूत्रे ( पूर्व, मध्य इत्यादी ) पहिल्या नृत्तमूर्तीप्रमाणे असावीत. अशी याप्रमाणे ही पाचवी नृत्तमूर्ती असते. ( ८० )

[ अंशुमत्काश्यपात शुद्ध स्वरूपात हा श्लोक खालीलप्रमाणे आहे.

‘ यद्वत् प्रथमनृत्तस्य पूर्वसूत्रं प्रसारयेत् ।
चिन्हं पंचमनृत्तस्य एवमेवेति विद्यते ॥ ’ ]

सोळा हात असतात व डाव्या बाजूला गौरी असते. दोन्ही हात वर केलेले व त्यामुळे खांदे वर उचललेले व स्तनभाग पसरट झालेला दाखवावा. ( ८१ )

अभय ( मुद्रेत ), शूल, व पाश, खड्ग, लहान डमरू, ध्वज, वेताल ( ? ) व सूचिहस्त ( मुद्रेत ) असे उजवीकडील आठ हात असतात. ( ८२ )

अग्नि, हत्तीच्या सोंडेप्रमाणे, खेटक, विस्मयमुद्रेत, तसेच घण्टा, कवटी, वस्तरा, सूचिमुद्रेत असे डावीकडील आठ हात असतात. उरलेले सर्व पाचव्या नृत्तमूर्तीप्रमाणे असते. अशी सहावी इष्ट नृत्तमूर्ती असते. ती राजास व राष्ट्रास सुखकारक असते. ( ८३, ८४)

तीन डोळे, आठ हात असून मनोहर असा पसरलेला जटाभार असतो. डावा पाय वाकलेला असून अपस्मारावर ठेवलेला असतो. ( ८५ )

डोक्याच्या डाव्या बाजूला व उभ्या पायाच्या आंगठ्याच्या उजवीकडून, उजव्या पायाच्या आंगठ्याच्या अग्राला स्पर्श करून, ( ८६ )

तसेच आंगठ्यापासून १२ अंगुलांवर निर्गमन असलेले ( असे ) पूर्वसूत्र असावे. ( ८६½ )

[ श्लोक ८६–८६½ चा अर्थ असाही असू शकेल.

डोक्याच्या डाव्या बाजूला वर केलेल्या उजव्या पायाचा आंगठा असतो. या वर केलेल्या उजव्या पायाचा आंगठा कानापर्यंत आलेला असावा. या आंगठ्याचे पूर्वसूत्रापासून १२ अंगुले निर्गमन असावे. हा अर्थ वरच्यापेक्षा अधिक संयुक्तिक वाटतो. ]

अभय ( मुद्रा ), शूल व पाश आणि डमरू उजव्या हातांत असतात. कवटी, अग्निपात्र आणि तसेच विस्मय ( मुद्रेतील ) हात व हत्तीच्या सोंडेप्रमाणे असे डावीकडील चार हात असतात. ( ८७, ८८)

किंवा उजवा हात हत्तीच्या सोंडेप्रमाणे व डावा हात नागाप्रमाणे ( नाग धारण केलेला ?) असावा. कपाळाच्या मध्याच्या डावीकडून, उभ्या पायाच्या मध्यभागातून, डाव्या पायाच्या नळीच्या मध्यातून जाणारे ब्रह्मसूत्र टाकावे. त्या सूत्रापासून डाव्या पायाच्या गुडघ्याची कडा नऊ अंगुले बाहेर असते. ( ८९, ९० )

उंची दहा अंगुलांनी कमी असावी. डाव्या बाजूला गौरी असते. जगाच्या दुःखांचा नाश करणारी ही सातवी नृत्तमूर्ती सांगितली. ( ९१ )

रीलप्रमाणेच पण सहा हात असून अभयमुद्रा, डमरू त्याचप्रमाणे शूल उजव्या बाजूकडील हातांत असतात. कवटी, विस्मयमुद्रा व हत्तीच्या सोंडेप्रमाणे असलेला असे डावीकडचे तीन हात असतात. ( ९२, ९२½ )

[ ही आठवी नृत्तमूर्ती ]

किंवा तीन डोळे, चार हात असून जटामुकुटाने सुंदर दिसणारा, अभयमुद्रा व डमरू असलेले उजवीकडचे (दोन हात) व अग्नि असलेला आणि हत्तीच्या सोंडेप्रमाणे असलेला असे डावीकडचे दोन हात असतात. अपस्मार नसून पीठावर वाकलेला डावा पाय ठेवलेला असतो. (९३, ९४)

डाव्या पायाची करंगळी त्या पीठाच्या पुढच्या भागी आलेली असते. असा तो पाय युक्तीने वाकविलेला असतो. अशी नववी नृत्तमूर्ती करावी. (९५)

[ हा श्लोक शिल्परान २२.६५–६५½ प्रमाणे सुधारला आहे.

'ततः पुरस्थिता पीठे सव्यपाद कनिष्ठिका ॥ ६५ ॥

तत्पादं कुञ्चितं युक्त्या नवमं नृत्तमाचरेत् ।' ]

अशी नववी नृत्तमूर्ती सांगितली, आता यापुढे गंगाधर (मूर्ती) सांगतो. (९६)

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील नृत्तमूर्तींचे लक्षण नावाचे पासष्टावे पटल संपले.**

# सहासष्टावे पटल

## [ गंगाधरमूर्ती ]

मी आता गंगाधर (मूर्तीचे लक्षण) थोडक्यात सांगतो ते ऐक. उजवा पाय सरळ असून डावा पाय वाकलेला असतो. (१)

कपाळाच्या मध्यापासून नऊ यव अंतरावर, उजव्या डोळ्याची कडा व नाकपुडी यांच्या-मधून, (२)

खांद्यांचा मध्य व नाभी यांच्या डावीकडे दोन अंगुले अंतरावर व मेढ्रमूळाच्या मध्याच्या उजव्या बाजूला चार अंगुले अंतरावर व पाठीमागच्या बाजूच्या मध्यभागी हिक्का (पूर्व ?) सूत्र टाकावे (३, ३½)

उंची चार अंशांनी कमी असून, दोन्ही पायांमधले अंतर १८ अंगुले असते. पायाच्या मागच्या बाजूमधले (टाचांमधले) अंतर तीन अंश असते. विस्कटलेला जटाबन्ध असून मुख डाव्या बाजूला थोडे झुकलेले असते. (४, ५)

[ 'वसिष्ठस्य' च्या ऐवजी 'विश्लिथं' असा शब्द पाहिजे. ]

उजवीकडील खालचा हात देवीच्या स्तनावर ठेवलेला असतो व डाव्या खालच्या हाताने देवीला आलिंगिलेले असते. (६)

उजवीकडचा वरचा हात जटेवरील गंगेजवळ पगडीपर्यंत नेलेला असतो. डाव्या (वरच्या) हातात कृष्णमृग धारण केलेले असते. (७)

देवाच्या डाव्या बाजूला विरहकातर मुख असलेली देवी (पार्वती) असते. तिचा डावा पाय स्वस्तिक ( मुद्रेत) असून उजवा पाय वाकलेला असतो. ( ८ )

हे कल्पवित्तमा, देवीच्या दोन्ही जंघा एकाच सूत्रात ( समपातळीत ) असतात. उजवा हात पसरलेला ( खाली लोंबता ) असून डाव्या हातात फूल असते. ( ९ )

किंवा उजवा हात व प्रकोष्ठ तीन ठिकाणी बांधलेले असतात. ( उजवा ) तळहात कंबरेवर ठेवलेला असतो व (तो हात ) झोपलेले असताना जसा लांबविलेला असतो तसा असावा. ( १० )

[ या श्लोकाचा अर्थ झोपलेला असताना उदाहरणार्थ शेषशयन मूर्तीत असतो त्याप्रमाणे डोके ज्या हातावर ठेवलेले असते तो हात जसा तीन ठिकाणी मोडलेला असतो त्याप्रमाणे हा कंबरेवर ठेवलेला हात तीन ठिकाणी मोडलेला असतो. ]

सर्व वस्त्रांसह व सर्व अलंकारांसह असतो. भगीरथ मुनिश्रेष्ठांसह उजव्या बाजूला असतो. ( ११ )

[ ' भागीरथी 'च्या ऐवजी ' भगीरथं ' तसेच ' मुनिभिः पठ्यतेश्वरः 'च्या ऐवजी ' मुनिवरान्वितम् ' असे शब्द शिल्परत्न (दुसरा भाग ) २२. ७१½ वरून बदलून अर्थ केला आहे. ]

असा गंगाधर ( सांगितला ) त्यानंतर त्रिपुरान्तक ( मूर्ती ऐक ). ( १२ )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील गंगाधर मूर्तीचे लक्षण नावाचे सहासष्ठावे पटल संपले**

# सदुसष्ठावे पटल

## [ त्रिपुरान्तक मूर्तीचे लक्षण ]

आता अनुक्रमाने त्रिपुरान्तक मूर्तीचे लक्षण सांगतो. तिची उंची अनुक्रमाने तीन, चार व पाच अंगुलांनी कमी करावी. ( १ )

आभङ्ग, समभङ्ग व अतिभङ्ग असे ( मूर्तीच्या मुद्रेचे ) तीन प्रकार आहेत, व मूर्तीची उंची या ( अनुक्रमे तीन, चार व पाच अंगुलांनी ) कमी करून तिचे माप कल्पावे. ( २ )

पायाच्या दोन्ही आंगठ्यांमधले अंतर १६ अंगुले असल्यास त्यास आभंग ( मुद्रा ) म्हणतात. समभंगात ( हे अंतर ) १८ अंगुलांइतके असते; व ते ( अंतर ) २० अंगुले असल्यास त्याला अतिभंग म्हणतात. (या आंगठ्यांमधल्या दिलेल्या अंतराच्या ) तीन भागांपैकी एक भाग पायांच्या मागच्या भागांमधील (टाचांमधील ) अंतर असते. ( ३, ४ )

पगडीच्या डाव्या बाजूला, डोळ्याच्या कडेवरून व त्या (डावीकडील ) नाकपुडीच्या सीमेवरून, हनुवटीच्या डाव्या भागावरून, उजव्या स्तनाच्या डाव्या बाजूला, नाभीच्या उजवीकडून व डाव्या मांडीच्या उजव्या बाजूवरून तसेच उजव्या आंगठ्याच्या पाठीमागच्या बाजूच्या डावीकडून पूर्वसूत्र टाकावे. ( ५, ६ )

[ श्लोकार्ध ५½ त ' वामोरुसमपार्श्वके ' या ऐवजी ' वामोरोः सव्यपार्श्वके ' अशी सुधारणा करून अर्थ दिला आहे. ]

हे आभंग ( मुद्रेचे ) सूत्र सांगितले. आता समभंगाचे (पूर्वसूत्र) ऐक. कपाळाच्या मध्यावरून, नाकाच्या शेंड्यावरून व पायांच्या टाचांमधल्या अंतराच्या मध्यातून असे पूर्वसूत्र टाकावे. (निरनिराळ्या अवयवांचे पूर्वसूत्रापासून ) अंतर सांगतो. ( ७, ७½ )

त्या सूत्राच्या डाव्या बाजूला खांद्यांचा मध्यभाग एक अंगुले अंतरावर असतो. त्या सूत्रापासून डाव्या बाजूला हृदयाचा मध्य अर्धे अंगुल ( अंतरावर ) असतो. त्या सूत्रापासून उजव्या बाजूला नाभी व मेढ्रमूळ यांचे मध्य चार अंगुले अंतरावर असतात. ( ८, ९ )

(श्लोकार्ध ८½ त ' तत्सूत्रं वा येन्द्रथ मे मेढ्र तु मध्यमे ' दुरुस्ती केली ' सूत्रात् वामे हृदयमध्यमम् '. ]

त्या सूत्रापासून डावा गुडघा अर्ध्या अंगुले अंतरावर असावा. असे समभंग सांगितले, आता अतिभंग ऐक. ( १० )

पगडीच्या डाव्या बाजूला, डोळ्याच्या कडेवरून व नाकपुडीच्या सीमेवरून ( जाऊन ) स्तनमध्याच्या उजवीकडे ते सूत्र तीन अंगुले असते. ( ११ )

नाभीच्या मध्यापासून डावीकडे त्या सूत्राचे निर्गमन तीन अंगुले असते. ते सूत्र डाव्या गुडघ्याच्या कडेपासून अर्धा अंगुले अंतरावर असावे. ( १२ )

डाव्या पायाच्या मागच्या बाजूच्या उजव्या बाजूला पार्श्वसूत्र ( पूर्वसूत्र ? ) टाकावे. त्या पार्श्वसूत्राचे इतर अवयवांशी स्पर्श, अंतर्गमन किंवा निर्गमन हे समपादस्थानकाप्रमाणे असावे. ( १३ )

अशी तिन्ही भंग ( मुद्रांची ) सूत्रे सांगितली, त्यांचे मिश्रण करू नये. अतिभंग ( मुद्रेची ) त्रिपुरान्तक मूर्ती उत्तम, समभंगातील मध्यम व आभंगातील अधम समजतात. ( १४, १४½ )

उजवा पाय सरळ व डावा पाय वाकलेला असतो. उजवीकडील खालच्या हाताच्या वर नाभिसूत्रापर्यंत वरची दोन टोके असलेला ( व) सिंहकर्णमुद्रेने मध्यभागी धरलेला असा बाण असतो. ( १५, १६ )

[ बाणाचा मध्यभाग सिंहकर्णमुद्रेने धरलेला असून त्याची वरची टोके, नाभिसूत्रापर्यंत असतात.

'दक्षिणे पूर्वहस्तोर्ध्वं नाभिसूत्रावसानकम् ।' असा १५½ वा श्लोकार्ध सुधारून अर्थ केला आहे. ]

बाणाची लांबी २१ अंगुले असावी. ( तो बाण ) परमेश्वराच्या हातात ठेवलेला असून त्याचा परिघ करंगळीइतका असतो. ( १७ )

( बाणाचे ) मुख पाच अंगुले रुंदीचे व त्या ( मुखा ) ची उंची रुंदीइतकीच असते. मुखाची दोन्ही टोके सारख्या उंचीची असून त्यांची ( टोकांची ) उंची एका अंगुलाने जास्त असते. ( १८ )

( खालच्या ) डाव्या हातात कुशीच्या कडेपासून एक हात उंचीवर धनुष्य धरलेले असते. ( त्या धनुष्याचे वरचे टोक ) डोळ्यांच्या वर किंवा खाली एक, दोन किंवा तीन अंगुले असते. (१९)

त्याची उंची १०० अंगुले किंवा ५, ७ (अथवा) ९ अंगुले कमी अथवा जास्त अशी धनुष्याची लांबी नऊ प्रकारे सांगितली आहे. ( २० )

त्या (धनुष्याचा) परीघ पूर्ण आवळलेल्या मुठीइतका असून त्याची रुंदी मध्यभागी व दोन्ही टोकांशी ( क्रमाने ) कमी करीत आणावी. त्याच्या टोकांची रुंदी ( मूर्तीच्या ) मधल्या बोटाच्या रुंदीइतकी असावी, व ( निरनिराळ्या ठिकाणी ) वर्तुळे आखून व रंगांनी ( ते धनुष्य ) चित्रित करावे. ( २१ )

बाणाच्या रुंदीच्या एकतृतीयांश जाडी धनुष्याच्या दोरीची असते. धनुष्याच्या लांबीचे आठ भाग केले असता दोरीची लांबी सात भाग असते. ( २२ )

( दोरीच्या ) या लांबीवरून धनुष्याचा बांक सांगितला आहे. धनुष्य तीन ठिकाणी वाकलेले किंवा बालचंद्राप्रमाणे ( प्रतिपदेच्या चंद्रकोरीप्रमाणे ) वाकलेले असावे. ( २३ )

धनुष्याचा आकार असा असून ते लोखंडाचे किंवा लाकडाचे करावे. वरचे दोन हात कर्तरीमुद्रेत असून टंक व कृष्णमृग धारण केलेले असतात. ( २४ )

उजव्या हातात टंक असून डाव्या हातात हरिण धरलेले असते. जटामुकुटासह सर्व अलंकारांनी भूषविलेला असतो. ( २५ )

प्रवाळाप्रमाणे ( तांबूस ) कांती असून डाव्या बाजूला गौरी असते. पहिल्या प्रकारच्या त्रिपुरान्तक मूर्तीची ही लक्षणे सांगितली. ( २६ )

देवाचा डाव पाय अपस्मारावर ठेवलेला असतो, व उरलेले सर्व पूर्वीप्रमाणेच करावे. असे दुसऱ्या ( त्रिपुरान्तकमूर्तीचे ) लक्षण आहे ( २७ )

डावा पाय सरळ व उजवा पाय वाकलेला व ( पूर्व ) सूत्रापासूनचे अंतर दुसऱ्या बाजूने मोजावे व इतर सर्व वरीलप्रमाणेच करावे. ( २८ )

( असे ) तिसऱ्या ( मूर्तीचे ) लक्षण सांगितले. चवथ्या ( मूर्तीचे ) लक्षण ऐक. वरीलप्रमाणेच परंतु डावा पाय अपस्माराच्या डोक्यावर असतो. उरलेले सर्व पूर्वीप्रमाणेच असते असे चवथ्या हितकारक ( मूर्तीचे ) लक्षण सांगितले. ( २९ २९½ )

कंबर व बाण धरलेल्या हाताची मधली रेघ ह्या दोघांमधले अंतर १६ अंगुले किंवा १५, १४ किंवा १३ अंगुले, १२ अथवा ११ अंगुले असे सहा प्रकारचे असते. ( ३०, ३१ )

तेथील ( उजवीकडील ) वरच्या हाताच्या कोपराचे श्रोणीच्या बाजूपासूनचे अंतर तेवढेच असावे. कुशीपासून धनुष्यापर्यंत आणि तेथून धनुष्य धारण केलेल्या हाताचे मनगट यांमधले अंतर ( तेवढेच ) असावे. ( ३२ )

त्या ( धनुष्य धारण केलेल्या ) हाताचे कोपर हृदयाच्या सीमेपर्यंत वर आलेले सांगतात. किंवा एक, दोन, तीन, चार अथवा पाच अंगुले ( हाताचे कोपर हृदयाच्या सीमेच्या खाली ) असते. ( ३३ )

सर्वांमधले अंतर सामान्यपणे सांगितलेले असते तसे घ्यावे. वरीलप्रमाणेच परंतु दोन्ही खालचे हात हृदयापाशी कटक ( मुद्रेत ) असतात. ( ३४ )

डावा व उजवा हात अनुक्रमे वर व खाली गेलेले असतात. बाणाचे मूळ उजव्या हातात असून डाव्या हातात त्याचे टोक धरलेले असते. ( ३५ )

[ श्लोकार्ध ३४½ 'वामंदक्षिणकं हस्तं क्रमादूर्ध्वमधोमुखम्' अशी दुरुस्ती शिल्परत्न ( भाग दोन ) २२.८० वरून करून अर्थ दिला आहे. उजवा हात वरद व डावा हात अभय मुद्रेत असतो. ]

उजवीकडील वरच्या हातात टंक व डाव्या (वरच्या) हातात धनुष्य असते. उजव्या बाजूला भृगु ( ऋषी ) किंवा डाव्या बाजूला गौरी असते. (३६)

[ किंवा उजव्या हातात हरीण असते, भृगुच्या ठिकाणी मृगं करून हा अर्थ अधिक योग्य वाटतो. शिल्परत्न ( भाग दोन ) २२·८१ प्रमाणे ही दुरुस्ती आहे. ]

पायाखाली अपस्मार नसतो. अशी ही पाचवी ( त्रिपुरान्तकाची ) मूर्ती असते. असे चार हात असलेल्या ( त्रिपुरान्तक मूर्तीचे ) पाच प्रकार होतात. ( ३७ )

[ श्लोकार्ध ३६½ शिल्परत्न २२·८२ वरून दुरुस्त करून अर्थ दिला आहे. 'अपस्मारं विना कार्यं पंचमं समुदाहृतम् ।' ]

आता अतिभंग ( मुद्रेतील ) व आठ हात असलेल्या ( मूर्तीचे ) लक्षण सांगतो. उजव्या हातांत बाण, परशू, तलवार व यज्ञ ( कुंड ) असते. ( ३८ )

धनुष्य, विस्मय (मुद्रा), खेट व हरिण असे डाव्या हातांत असतात. (उजवीकडील) खालच्या हातापासून (डावीकडच्या खालच्या) हातापर्यंत ( अनुक्रमाने ही आयुधे धारण केलेली) असतात. (३९ )

जशी सुंदर दिसेल इतक्या उंचीची पार्वतीची मूर्ती असावी. सहावी ( मूर्ती ) अशी सांगितली, आता सातवी ( मूर्ती ) सांगतो. ( ४० )

बाण, चक्र तसेच शूल, टंक आणि वज्र उजव्या हातांत असतात. धनुष्य, शंख तसेच सूची ( मुद्रा ), विस्मय (मुद्रा ) व खेटक डावीकडच्या हातांत असतात. ( ४१, ४१½ )

डाव्या बाजूला पाच हात सांगतात व ( मूर्ती ) अतिभंगात असते. तसेच परंतु उजवा गुडघा डाव्या गुडघ्यावर ठेवलेला असावा. त्या अगोदर डावा पाय खाली रथावर ठेवलेला असतो. रथ अर्धवट मिटलेल्या कमळाप्रमाणे असून ते कमळ दोरीने वेढलेले असते (? ). ( ४२, ४३ )

[ शिल्परत्न ( भाग दोन ) २२·८६–८६½ प्रमाणे उजवा आंगठा तसेच गुडघा व डाव्या पायाचा तळवाही पुढे असलेल्या रथाच्या वर यथायोग्य रीतीने ठेवावेत असा अर्थ होतो. ]

अर्धवट मिटलेल्या कमळाच्या आत चार तोंडांचा व चार हातांचा ब्रह्मा असतो. त्याच्या उजव्या दोन हातांत वेणुदण्ड व कमण्डलू असतात. ( ४४ )

डावीकडच्या दोन्ही हातांत लहान कुंडी व पद्मपाश धारण केलेले असतात. या अर्धवट मिटलेल्या कमळाप्रमाणे असलेल्या रथाच्या खाली कांतिमान नंदीबैल असतो. ( ४५ )

कल्पवित्तमा, पूर्वी सांगितलेल्या रीतीने रथ करावा. हे उत्तम ब्राह्मणा, त्रिपुरान्तक (मूर्तीचे) आठ प्रकार सांगितले. ( ४६ )

प्रवाळाप्रमाणे तेजस्वी, सात्त्विक व राजस भाव असून, सर्व अलंकार घातलेला, मेघा ( ? ) प्रमाणे मुख असून तीन डोळे असतात. ( ४७ )

मागे सांगितलेल्या रीतीप्रमाणे केलेली देवीची मूर्ती त्या ( मूर्तीच्या ) डाव्या बाजूला असते. (वर दिलेल्या) सामान्य लक्षणांची त्रिपुरान्तक मूर्ती करावी. (४८ )

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील त्रिपुरान्तक मूर्तीचे लक्षण नावाचे सदुसष्टावे पटल संपले.**

# अडुसष्टावे पटल

## [ कल्याणमूर्तीचे लक्षण ]

आता कल्याणमूर्तीचे (शंकर-पार्वती विवाहाच्या मूर्तीचे) लक्षण सांगतो. कपाळाच्या मध्याच्या डाव्या बाजूवरून, डाव्या डोळयाच्या कडेवरून, डाव्या नाकपुडीच्या सीमेवरून, खांद्याच्या मध्यावरून ( पूर्वसूत्र ) टाकावे. नाभीच्या मध्यापासून उजवीकडे चार किंवा तीन अंगुलांवरून सूत्र नेऊन, सरळ असलेल्या पायाच्या घोटयाच्या मध्यातून ( या ) अनुक्रमाने सूत्र टाकावे. समभंगांत दोन अंगुलांनी उंची कमी असावी. ( १-३ )

[ श्लोकार्ध २ ' वेदवन्हयंगुलं तु वा ' असा सुधारून अर्थ दिला आहे.]

डावा पाय सरळ व उजवा पाय वाकलेला असावा. उजवीकडील खालच्या हातात गौरीचा उजवा हात धरलेला असतो. ( ४ )

डावीकडील ( खालचा ) हात वरदमुद्रेत असून दोन्हीकडच्या वरच्या हातांत उजवीकडे परशु व डावीकडे काळे हरिण असते. ( ५ )

जटामुकुटासह सर्व अलंकारांनी भूषविलेला, प्रवाळाच्या कान्तीचा देव असावा. त्याच्या बाजूला धान्याप्रमाणे श्यामल दिसणारी, पूर्वी सांगितलेल्या मापांची देवी असावी. तिच्या डाव्या हातात कमळ असते व लाजत, लांबविलेल्या उजव्या हाताने शंकराचा उजवा हात धरलेला असावा. (६-७½)

हे ब्राह्मणा, पार्वतीच्या सख्या श्री व भू या सर्व अलंकारांनी भूषविलेल्या व गौरीला कंबरे-जवळ हातांनी धरले आहे अशा ( दाखवाव्यात. ) ( ८, ८½ )

देवाच्या समोर ( पुढयात ) कुण्ड करावे व ( तेथे ) होम करीत असलेला प्रजापती दाखवावा. (९)

प्रजापतीची उंची शंकराच्या स्तनांपर्यंत असावी. चार हातांचा, चार तोंडांचा व सर्व अलंकारांनी भूषविलेला असतो. ( १० )

हरिणाचे कातडे आणि रुद्राक्षांची माळ अनुक्रमे डाव्या व उजव्या वरच्या हातांत धारण केलेली असतात व खालच्या डाव्या व उजव्या हातांत स्रुक् व स्रुव धारण केलेली असतात. ( ११ )

उत्तराभिमुख व पद्मपीठावर ( बसलेला ) प्रजापती असतो. देवी व महादेव यांच्या पुढयात पूर्वेला ( तो असतो. ) देवी शंकराच्या उजव्या बाजूला असते. (१२)

दक्षिणेकडे (उजवीकडे) तोंड केलेला विष्णू होमकुंडाच्या उत्तर दिशेला उभा असतो. शंकराच्या नाकापर्यंत श्रेष्ठ (विष्णूची) उंची असते; व स्तनापर्यंत (कनिष्ठ विष्णूची) उंची असते. ( १३ )

या ( अंतराच्या मधल्या अंतराचे ) आठ भाग करून केशवाचे उंचीप्रमाणे नऊ प्रकार होतात. श्यामल रंगाचा, समभंग ( मुद्रेत ) असून वरच्या हातांत शंख, चक्र असतात. ( १४ )

खालच्या दोन हातांपैकी एकानें उत्तम तीर्थोदक असलेला सोन्याचा कमंडलू धरला असून दुसरा नेहमी वरदमुद्रेत असणारा हात त्यावर ठेवलेला असतो. ( १५ )

अनादि गोत्रात उत्पन्न झालेल्या श्रीशंकर परमेश्वराला आदिगोत्रा उमा गौरी मी तुलाच देत आहे असे म्हणून वरद हाताने विष्णूने तीर्थोदक द्यावे. ( १६, १६½ )

आठही लोकपाल, विघ्नेश ( गणपती ), सिद्ध, यक्षगण इत्यादी तसेच ऋषी, गंधर्व, आप्सरा आणि इतर देवता ( असाव्यात ). ( १७,१८ )

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील कल्याणमूर्तीचे लक्षण नावाचे अडुसष्टावे पटल संपले.**

# एकोणसत्तरावे पटल

## [ अर्धनारीश्वराचे लक्षण ]

अर्धनारी ईश्वराच्या मूर्तीची लक्षणे सांगतो, ऐक. चार, सहा आणि दोन हात असलेली ( अशी ही मूर्ती ) सांगतात. ( १ )

समभंग व स्थानक या ( मुद्रांप्रमाणे ) तिची उंची कमीजास्त असते. उजवा पाय सरळ व दुसरा पाय वाकलेला असतो. (२)

डावीकडचा अर्धा भाग पार्वतीच्या रूपाप्रमाणे व उजवीकडचा अर्धा भाग महादेवाप्रमाणे असतो. अभयमुद्रा व परशु उजव्या हातांत असतात. वृषभाच्या मूर्तीवर डाव्या हाताचे कोपर टेकलेले असते. त्यामधले अंतर एक अंगुळे असते. त्याहून निराळा ( वरचा ) डावा हात कटक ( मुद्रेत ) असून फूल धारण केलेला असतो. ( ३, ४ )

दोन हातांची ( मूर्ती ) असेल तर उजवा हात वरदमुद्रेत व डाव्या हातात फूल धरलेले असते. उजवीकडची वस्त्रप्रावरणे शंकराप्रमाणे व डावीकडची श्री ( पार्वती ) प्रमाणे घातलेली असावीत. (५)

उजव्या बाजूला पुरुषाप्रमाणे स्तन व डाव्या बाजूला स्त्रीप्रमाणे पयोधर असावा. उजवा पाय वाकलेला व डावा पाय सरळ असावा. ( ६)

उजव्या हातात शूल धरलेला व डाव्या हातात फूल असावे. उजवा हात वरद मुद्रेत असून दुसरा ( डावा) हात बैलाच्या डोक्यावर ठेवलेला असावा. ( ७)

उजव्या हातात कवटी असून डावा हात पसरलेला (खाली लोंबता ) असावा. उजवीकडचा डोळा उग्र व डाव्या बाजूचा डोळा सौम्यशीतल असावा. (८)

रेशमी वस्त्र उजवीकडे अर्ध्या मांडीपर्यंत व डावीकडे घोटच्यापर्यंत असावे. असे विस्तारानें पवित्र अर्धनारीश्वराचे ( लक्षण ) सांगितले. ( ९ )

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील अर्धनारीश्वराचे लक्षण नावाचे एकोणसत्तरावे पटल संपले.**

# सत्तरावे पटल

## [ गजहामूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः गजहामूर्तीचे लक्षण सांगतो. कपाळाच्या मध्यभागावरून, नाकाच्या शेंड्यावरून, स्तनांच्या मध्याच्या डावीकडून, ( १ )

वृषाण्डाच्या मध्याच्या डावीकडून पूर्वसूत्र टाकावे. हे ब्राह्मणा, त्या सूत्राच्या उजव्या व डाव्या पायांच्या पाठीमागच्या भागांमधले ( टाचांमधले ) अंतर ३८ अंगुले किंवा ३६ अंगुले असते. (२, २½)

हे ब्राह्मणा, त्या सूत्रापासून डावीकडे उजव्या पायाचे अंतर २१ किंवा १९ अंगुले असते. (३, ३½)

चार किंवा आठ हात असतात. सर्व अलंकारांसह ( मूर्ती ) असते. चार हात असतील तर पाश व हत्तीचे कातडे उजव्या हातांत व डाव्या बाजच्या दोन हातांत गजमुख व हत्तीचे कातडे असते. (४, ५)

चार हात असे सांगितले, आता आठ हात सांगतो. हत्तीचे मस्तक, पाश, हत्तीचे कातडे हे उजव्या हातांत असतात. ( ६ )

हत्तीचे दात ( श्रृंग ), कवटी, हत्तीचे कातडे आणि विस्मय ( मुद्रा ) असे डाव्या बाजूकडील हात सांगतात. ( ७ )

शंकराच्या डाव्या पायाखाली हत्तीचेच मस्तक असते. मुकुटाच्या वरदेखील हत्तीचे शेपूट दाखवावे. ( ८ )

दोन्ही बाजूंना हत्तीचे पाय जसे युक्तीने दाखविता येतील तसे दाखवावेत. उरलेले हत्तीचे कातडे प्रभामंडलाप्रमाणे दाखवावे. ( ९ )

[ 'पार्श्वयोर्गजपादं तु' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. नृत्तमूर्तीच्या आजूबाजूला वर्तुळाकार प्रभामंडल असते तसे शंकराच्या पाठीमागे त्याच्या मूर्तीएवढे गजचर्म दाखवावे. ]

उजव्या हातांत शूल, तलवार, ( हत्तीचे ) कातडे व हत्तीचे दात धारण केलेले असतात. डाव्या हातांत कवटी, खेटक, तलवार आणि ( हत्तीचे ) कातडे असतात. ( १० )

कपाळाच्या मध्यातून, नाकाच्या अग्रावरून, उजव्या स्तनाच्या मध्यातून व डाव्या स्फिक्पिण्डाच्या मध्यातून ब्रह्मसूत्र टाकावे. ( ११ )

[ 'सव्यपीठस्य' च्या ठिकाणी 'स्फिक्पिण्डस्य' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ]

सरळ असलेला पाय हत्तीच्या मस्तकावर असतो. उजवा पाय उचललेला असून डावा पाय उत्कुटिक ( मुद्रेत ) असतो. ( १२ )

त्या पायाच्या टाचेचे स्फिक्पिण्डापासून अंतर चार अंगुले असावे. त्याच्या गुडघ्याची डावी बाजू कक्षसूत्राइतकी ( कुशीपर्यंत ) न्यावी. ( १३ )

अशी दोन प्रकारची गजहामूर्ती सांगतात. शंकराच्या डाव्या बाजूला त्याच्या कुशीपर्यंत येणारी व भ्यालेली पार्वती असावी. ( १४ )

अशा प्रकारच्या कल्पिलेल्या मूर्तीमुळे राजाला विजय मिळतो. ( १५ )

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील गजहामूर्तीचे लक्षण नावाचे सत्तरावे पटल संपले.**

## एकाहत्तरावे पटल

### [ पाशुपत मूर्ती ]

आता विशेषतः पाशुपत ( मूर्तीचे ) लक्षण सांगतो. चंद्रशेखर मूर्तीकरता सांगितल्याप्रमाणे समपाद स्थानक ( मुद्रा ) असावी. ( १ )

तीन डोळे, चार हात, वर वळविलेले केस असतात. ( हातात ) मोठे धनुष्य असते. ( महाकाय असतो ? ) उजवीकडील दोन हातांत अभय ( मुद्रा ) व शूल धारण केलेले असतात. ( २ )

डाव्या बाजूकडच्या दोन हातांत वरद ( मुद्रा ) व रुद्राक्षांची माळ असते. प्रवाळाप्रमाणे कांती असून, डोळे सौम्य व शांत असतात. ( ३ )

सर्व दागिन्यांसह असून किंचित हसरे तोंड असते. नेहमीच्या उत्सवात वापरात आणाव-याची ही मूर्ती उभी किंवा बसलेली असते. ( ४ )

वरीलप्रमाणेच परंतु अग्नीप्रमाणे तेजस्वी कांती असलेली, लाल डोळे व वाकड्या भुवया आणि टक लावलेली दृष्टी असून सर्पाचे यज्ञोपवीत घातलेले असते. ( ५ )

अग्निज्वालांप्रमाणे केस असतात. खूप रत्ने ल्यालेला असतो. शूल अधोमुख असून वरद-मुद्रेच्या हातात कवटी असते. (६)

किंवा हात अभयमुद्रेत नसून त्या हातात शूलाचे मूळ असते व वरदमुद्रेच्या हातात शूलाचे अग्र असते व असा शूल आडवा धरलेला असतो. ( ७ )

उजव्या हातांपैकी वरदमुद्रेतील ( अभयमुद्रेतील ? ) हातात टंक असतो. डाव्या हातात तलवार असते. पाशुपताच्या ह्या मूर्तीची बलिलिंगापाशी पूजा करतात. ( ८ )

ध्यान, पूजा यांच्यासाठी ही मूर्ती मी सांगितली, या मूर्तीचे ध्यान केले असता सर्व शस्त्रांचा तत्काळ विनाश होतो. ( ९ )

अशी रौद्रमूर्ती आणि प्रतिमा मात्र कधीही करू नये ( १० )

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील पाशुपतमूर्तीचे लक्षण नावाचे एकाहत्तरावे पटल संपले.**

# बहात्तरावे पटल

## [ कंकालमूर्तीचे लक्षण ]

आता कंकालमूर्तीची लक्षणे सांगतो. पायांत पादुका असतात. हे भिक्षा मागणाऱ्या कंकाल ( मूर्तीचे ) लक्षण आहे. ( १ )

रक्षणासाठी, परिवारमूर्तींपैकी एक, तसेच मोक्ष मिळविण्यासाठी ही मूर्ती करतात. उभी किंवा जाण्यास निघालेली अशी मूर्ती योग्य समजतात. ( २ )

उभी मूर्ती मूळमूर्ती म्हणून व चालत असलेली मूर्ती उत्सवाकरिता असावी. लाकडाची, लोखंडाची किंवा चुना, माती व वाळू यांची करावी. ( ३ )

किंवा दगडावरती त्याचे चित्र ( काढावे ) किंवा सांगितल्याप्रमाणे प्रतिमा करावी. अशी ही प्रतिमा मान, उन्मान इत्यादी मापांप्रमाणे करावी. ( ४ )

( किंवा त्या मूर्तीच्या ) अवयवांवरून बुद्धिमान माणसाने माप घेऊन त्यावरून अंगुले, यव, हस्त, ताल, वितस्ति यांचे माप घ्यावे. ( ५ )

[ मूर्तीच्या मधल्या बोटाच्या मधल्या पेराची लांबी किंवा मूर्तीची उंची ही अगोदर ठरवून मग अंगुले, यव वगैरे मापे त्यावरून कोष्टकाप्रमाणे घ्यावीत. ]

आय वगैरे शुभ होतील अशा रीतीने मूर्तीच्या शुद्धीसाठी ( पावित्र्यासाठी ) माप घ्यावे. ( मूर्तीची उंची ) खांब, अधिष्ठान किंवा दाराच्या उंचीइतकी असावी. ( ६ )

किंवा मूळ लिंगाच्याइतकी उंची किंवा त्याहून ६½ यव जास्त इतकी ( उंची घ्यावी. ) वरील दोन्ही मापांच्या मधल्या अंतराचे आठ भाग करून ( मूर्तीच्या ) उंचीचे नऊ प्रकार होतात.

उत्सवाचा उद्योग ( लहान, मोठा ) त्याप्रमाणे ( मापाचे ) सर्व विधी ( उंचीच्या निवडी-बाबत ) सांगतात. डावा पाय स्थिर असून उजवा पाय चालणारा ( दाखवावा ) असे सांगतात. ( ८ )

पायांत पादुका असतात आणि तसेच उजवा पाय वाकलेला असतो. ( डाव्या ) पायाच्या टाचेचा वरचा भाग दिसेल ( असा तो पाय ठेवून ) त्यावरून ब्रह्मसूत्र टाकावे. ( ९ )

उजव्या खालच्या हातात कर्षक धरलेले असते. किंवा ( उजव्या ) खालच्या हाताची तर्जनी व आंगठा हरणाला स्पर्श करीत आहेत ( असे दाखवावे. ) ( १० )

किंवा (त्या हातात धरलेले) दुर्वांचे अंकुर (शंकराच्या) योनीच्या सीमेपर्यंत आलेले दाखवितात. डाव्या हातात नाभीच्या कडेच्या समपातळीत भांडे असते. ( ११ )

डाव्या हातात डमरू असून तो हनुवटीच्या कडेच्या समपातळीत असतो. किंवा डाव्या हातात मोराच्या पिसांसह शूल असतो. ( १२ )

त्या शूलाच्या टोकापाशी कंकालाला त्याचे हात जेथे संपतात तेथून हृदयापर्यंत त्याला बांधलेले असते. ( १३ )

[ तत्कन्याच्यविकं भवेत् चा अर्थ समजत नाही. ]

( उंचीचे ) माप एक, दोन, तीन ( किंवा ) चार अंगुले कमीअधिक असावे. स्थानकाचे पूर्वसूत्र किंवा भंगाचे माप सांगतो, ते ऐक. ( १४ )

कपाळाच्या डाव्या बाजूने, डोळयाच्या कडेवरून, नाकपुडीच्या सीमेवरून, हनुवटीच्या डाव्या बाजूवरून, खांद्यांच्यामधून तीन अंगुले अंतरावरून व हृदयापासून चार अंगुले अंतरावरून, (१५)

( पूर्व ) सूत्र नाभीच्या डावीकडून दोन अंगुले अंतरावरून ( गेलेले असते. ) योनीचे निर्गमन ( पूर्वसूत्रापासून ) उजव्या बाजूला तीन किंवा चार अंगुले असते. ( १६ )

स्थिर असलेल्या डाव्या पायातून किंवा दोन्ही पायांच्या अंतराच्या मध्ये ( पूर्वसूत्र ) टाकावे. असे स्थानकमुद्रेचे ( पूर्वसूत्र ) सांगितले. आता चालत असलेल्या ( मुद्रेतील ) मूर्तीचे पूर्वसूत्र सांगतो. ( १७ )

चालत असलेल्या ( मुद्रेच्या ) मूर्तीचे पूर्वसूत्र कपाळाच्या डाव्या बाजूवरून डाव्या पायाचा घोटयाचा मध्य व ( त्याच्या ) दोन्ही बाजू यांच्या मध्यावरून सूत्र टाकावे. ( १८ )

( पूर्व ) सूत्र कपाळाच्या मध्याच्या उजव्या बाजूस दोन अंगुले अंतरावरून डाव्या बाजूच्या नाकपुडीच्या बाजूवरून, खांदे व हृदय यांच्या मध्यभागावरून ( १९ )

नाभीच्या डाव्या बाजूला दोन अंगुले अंतरावर व योनीच्या डावीकडे चार अंगुलांवर व डाव्या पायाच्या घोटयाला स्पर्श करील असे चालत असलेल्या ( मुद्रेच्या मूर्तीकरिता पूर्वसूत्र ) टाकावे. ( २० )

हे बुद्धिमंता, आभंग ( मुद्रे ) मध्ये सांगितल्याप्रमाणे उंची कमी करावी. चालत असलेल्या ( मूर्तीचे ) पूर्वसूत्रापासून हातांचे निर्गमन ( खाली दिल्याप्रमाणे ) असावे. ( २१ )

[ श्लोक ६७·१–२ मध्ये आभंग, समभंग व अतिभंग मुद्रांतील मूर्तींचे नतमान अनुक्रमे तीन, चार व पाच अंगुले घ्यावे असे सांगितले आहे. ]

डाव्या हाताचे निर्गमन व ( पूर्व ) सूत्र या दोघांमध्ये अंतर २४ किंवा २३ अंगुले असावे. ( २२ )

मनगटाच्या मध्यापासून किंवा दोन्ही बाजूंपासून असे हे ( डाव्या हाताचे ) निर्गमन तीन प्रकारचे सांगतात. डाव्या हातात भांडे असते. ( २३ )

त्याचे निर्गमन ( पूर्वसूत्रापासून ) १६,१७ किंवा १८ अंगुले असते. त्याचे ( डाव्या हाताचे ) कोपर नाभीच्या कडेपर्यंत असून त्याचे निर्गमन १४, १५ किंवा १६ अंगुले असते. ( २४, २४½ )

उजव्या हातातील गवत योनीच्या सीमेपर्यंत आलेले असते. एक दोन, तीन, चार, अंगुले ( अंतरावर ) मृगसूत्र टाकावे. ( उजव्या हाताची बोटे ) ज्ञानमुद्रा व सिंहकर्ण (मुद्रे-) प्रमाणे जसे सुंदर दिसेल तसे करावे. (२५, २६)

डावीकडच्या शूल धरलेल्या हाताच्या सीमेपाशी पूर्वसूत्र वरप्रमाणेच असून जटेपासून (त्या हाताचे) निर्गमन २४ अंगुले असावे. (२७, २७½)

शूलाच्या टोकाला किंवा (?) शहाण्या माणसाने कंकालाला बांधावे (बांधलेले दाखवावे). (२८)

उजवीकडील वरच्या हातानें डमरू त्याच्या मध्यभागापाशी धरलेला असतो. त्या (डमरू-) मध्याची रुंदी (डमरूच्या रुंदीच्या) नवव्या भागाइतकी असते. (२९)

कंबरेच्या दोन्ही बाजूंना कमळाच्या आकाराचे तीन अंगुलांचे लहान मण्ड असतात. (उजव्या वरच्या हाताची) तर्जनी सरळ असून तीत दोन वळी असतात. (३०)

अशी तर्जनी हनुवटीच्या कडेपर्यंत असते. मनगटाचे पूर्वसूत्रापासूनचे अंतर ४४ किंवा ४५ अंगुले असते. डाव्या हातात कवटीचे (भिक्षा) पात्र असून त्याचे ( पूर्वसूत्रापासून ) निर्गमन १२ अंगुले किंवा सहा अंगुले असते. ( ३१, ३२ )

हे ( पात्र ) एक अंगुले जाडीचे असून पूर्णपणे गोलाकार व कसलेही व्रण नसलेले असावे. उजव्या बाजूच्या ( कानात ) मकरकुण्डल व डाव्या बाजूला शंखपत्र ( कुंडल ) असते. ( ३३ )

जटाभार पसरलेला असतो किंवा केस बांधलेले असतात. उजव्या बाजूला चंद्रकोर व डाव्या बाजूला गंगा दाखवावी. ( ३४ )

( त्या जटाभाराच्या ) गाठीपाशी कवटी असून धत्तुराच्या फुलांनी बकपक्ष वेष्टिलेले असतात त्याचप्रमाणे रुईची फुले व दुर्वा यांनी डोक्यावरील जटाबन्ध वेष्टिलेला असतो व कंबरेला रुद्राक्षाच्या माळा असतात. ( ३५, ३५½ )

[ रुद्राक्षाच्या माळा जटाबंधावर असतात असे म्हणणे अधिक संयुक्तिक वाटते. ]

कोठ्यापाशी नागकंकण असून ते निरनिराळ्या रत्नांनी भूषविलेले असते. ( ३६ )

वाघाचे कातडे नेसलेला, भयंकर तोंडाचा, भस्मचर्चित असून तेजस्वी अवयव असलेला व किंचित हसरे मुख असलेला, ( ३७ )

अशी कंकाल नावाची ( मूर्ती ) असते व ती खांद्यावर ठेवलेली असते. अनेक ( मनुष्य ) प्राणी व स्त्रिया याची सेवा करतात व याला नमस्कार करतात. ( ३८ )

सोन्याचे बलिपात्र धरलेले भूत पुढे असून त्या पात्रात अन्न घालत ( वाढत ) असलेली स्त्री दाखवावी. ( ३९ )

वस्त्र खाली आल्यानें ज्यांचा योनिभाग काहीसा उघडा पडला आहे अशा संभ्रमित मनाच्या बऱ्याच स्त्रिया दाखवाव्यात. ( ४० )

कंबरेच्या उजव्या बाजूला लहानशी सुरी बांधावी. सोन्यासारखा रंग असलेली लहान सुरी उपबन्धानें बांधलेली असते. ( ४१ )

दोन्ही बाजूंचे हात निरनिराळ्या नागांनी भूषविलेले असतात. भीतियुक्त हृदयांनी व संभ्रमित मनानें नेहमी अनित्य व नित्यानंद शंकराची ऋषी, देव, गंधर्व, सिद्ध, विद्याधर इत्यादी सेवा वगैरेंनी पूजा करीत आहेत. ( ४२, ४३ )

वारा रस्ता झाडतो, पाऊस सडा टाकतो, स्तोत्र म्हणणारे ऋषी व देव फुलांची वृष्टी करीत आहेत. ( ४४ )

ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अर्थववेद ज्याची पुनःपुन्हा स्तुती करीत आहेत. चामड्यांची वाद्ये, कास्याची वाद्ये, वीणा तसेच छिद्र असलेली वाद्ये तसेच शंख या ( पाचही ) तऱ्हेच्या वाद्यांचा आवाज येत आहे. तुम्बरू, नारद इत्यादी लक्षणांसह जयवाद्ये वाजवीत आहेत. ( ४५, ४६ )

चंद्र, सूर्य, देव व त्यांच्या स्त्रिया चामरे ढाळीत आहेत अशी ही मूर्ती सर्व लोकांच्या उपकाराकरिता घडवावी. ( ४७ )

देवाबरोबर असलेल्या भुताने योनीच्या (खालच्या) कडेपर्यंत वस्त्र नेसलेले असते. (हे) भूत पाच तालात असून त्याचे मान व उन्मान ( लांबी, रुंदी व जाडीची मापे ) योग्य त्या प्रमाणात असावीत. ( ४८ )

भुताने डोक्यावर भांडे घेतलेले असून ते दोन्ही हातांनी धरलेले ( किंवा ) स्पर्शिलेले असते. ( घट्ट धरलेले नसते.) पात्राची रुंदी २० अंगुले असते. ( ४९ )

त्या ( पात्रा ) ची खोली १० अंगुले असून जाडी एक अंगुले असावी. ( शंकराच्या ) उजव्या बाजूला पहिल्या ( उजव्या ) पायापासून गुडघ्यापर्यंत डोके येईल इतक्या उंचीची हरिणी असावी. ( ५०, ५०½ )

देवाच्या पूर्वसूत्रापासून ( निरनिराळ्या अवयवांचे ) स्पर्शमान ( अंतर ) सांगतो. नाकाच्या अग्रापासून डाव्या ( पायाच्या ) आंगठ्याच्या मुळापर्यंत ( पूर्व ) सूत्र टाकावे. जटांचे टोक ( पूर्वसूत्रापासून ) २० किंवा २३ अंगुले ( अंतरावर ) असते. ( ५१, ५२ )

कूस व नाकाचे अग्र यांना ( पूर्व ) सूत्र स्पर्श करते. या सूत्राच्या डाव्या बाजूला आंगठ्याच्या मुळाचे निर्गमन १३ अंगुले असावे. ( ५३ )

त्या सूत्रापासून उजवा आंगठा नऊ अंगुले, १०, ११ किंवा १२ अंगुले अंतरावर असावा. ( ५४ )

सूत्रस्थानापासून डाव्या टाचेपर्यंतचे अंतर २२ किंवा २३ अंगुले असते. ( ५५ )

सूत्राच्या बाजूला उजव्या आंगठ्याच्या कडेपर्यंत खाली एक, दोन, तीन, चार, पाच किंवा सहा अंगुले निर्गमन असते. ( ५६ )

पीठाच्या उजव्या बाजूला मात्र (हे निर्गमन) चार, पाच (किंवा) सहा अंगुले असते. पायाच्या तळव्याच्या लांबीइतकीच पादुकांची लांबी असते. ( ५७ )

[ श्लोक ५१ ते ५७ चा अर्थ अंदाजाने लावला आहे. ]

पादुकांची उंची तीन अंगुले असून तर्जनी व आंगठा यांच्यामध्ये मिटलेल्या कमळासारखा (आंगठा) असावा. ( ५८ )

[ 'पद्मकम्' ऐवजी 'पादुकम्' असा शब्द घेऊन अर्थ दिला आहे.]

कमळाची उंची दोन अंगुले असून ते सुंदर व पूर्ण वर्तुळाकृती असावे. ( ५८½ )

श्रीगन्ध (नावाच्या) रम्य अशा कैलास (पर्वताच्या) शिखरावरून भगवान परमेश्वर, ऋषींना प्रेमाने भेटण्यासाठी, दण्डकारण्यात राहणाऱ्या मुनींच्या ( विघ्नांच्या ?) पूर्ण शांतीसाठी, ( ५९, ६० )

त्यांच्या कल्याणासाठी व पौरन्ध्र्यांचा ( ? ) सहजपणे घात करण्यासाठी कडदोऱ्याशिवाय, नग्न, भिक्षेकऱ्याचे रूप घेतलेला, त्रिलोकींचे रक्षण करणारा असा हा परमेश्वर, 'हे ब्राह्मणहो, कंकालाच्या मोक्षासाठी, कैलासाहून मी भिक्षा मागत आहे' असे म्हणत फिरतो. ( ६१, ६२ )

काश्यप म्हणाले, "तुम्ही वर्णन केलेल्या या कंकालाची ( पूजा करून ) फळ काय ?" शंकर म्हणाले, "हे ब्राह्मणा, याच्यापुढे तेच मी सविस्तरपणे सांगतो. ( ६३ )

तेव्हा मी ( तिन्ही ) लोकांत अभय देत भिक्षा मागितली. सर्व लोक व त्यांत राहणारे सर्व प्राणी ( घाबरून ) कापू लागले ( ६४ )

जगाच्या सुस्थितीसाठी, सर्व लोकांवर उपकार करण्यासाठी व त्यांचे भय निवारण्यासाठी मी मांसाच्या भिक्षेची प्रार्थना केली ( ६५ )

( लोकांची ) कंकालापासून सुटका केल्यानंतर, हे ब्राह्मणा, मी त्याचा हवि दिला. भिक्षेनंतर या कंकालाची सुटका करून सर्वत्र भीती नाहीशी होईल." ( ६६ )

काश्यप म्हणाले – [ हे संदर्भहीन आहे ]

अशी कंकाल ( मूर्ती ) सांगितली. आता हरिअर्धहर ( मूर्ती ) ऐक. ( ६७ )

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील कंकालमूर्तीचे लक्षण नावाचे बहात्तरावे पटल संपले.**

## त्र्याहत्तरावे पटल

### [ हरिहर मूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः हरिहर ( मूर्तीचे ) लक्षण सांगतो. ती ( मूर्ती ) आर्जव, सुस्थित, स्थानक व समपादस्थानक या मुद्रांमध्ये असावी. ( १ )

उजवा ( हात ) अभय ( मुद्रेत ) व डाव्या ( हातात ) पूरिमासह कटक असते. उजव्या ( हातात ) परशु व डाव्या ( हातांत ) शंख व आयुध ( गदा किंवा चक्र ) धारण केलेले असतात. ( २ )

डावीकडे मुकुट व उजवीकडे जटामुकुट शोभत असतो. ( उजवीकडचे शरीर ) प्रवाळाच्या रंगाप्रमाणे ( व डावीकडचे शरीर ) श्यामल रंगाचे असते. त्या त्या भागावर ( शंकर व विष्णू यांच्या प्रत्येकी अर्ध्या भागावर ) यथोचित अलंकार घातलेले असावेत. ( ३ )

उजवीकडचा डोळा उग्ररूप तर डावीकडचा डोळा सुशीतल (सौम्य मुद्रेचा) असतो. त्याच्या कपाळावर अगदी थोडासा दिसेल असा ( शंकराचा तिसरा ) डोळा ( दाखवावा.) ( ४ )

( एक बाजू ) सर्व वस्त्रे घातलेली तर ( दुसरी ) दिगम्बररूप असावी. डोक्यावर चक्र असावे, त्याचे लक्षण सांगतो ( ५ )

( त्या चक्राची ) रुंदी ११ अंश असून त्याच्या एका भागाने त्याची जाडी असते. ते पूर्ण वर्तुळाकृती किंवा कमळाकृती असावे. ( ६ )

डोक्यावरील चक्राच्या रुंदीच्या सात भागांपैकी एक भाग डोक्यावरील चक्राच्या देठाची, हे ब्राह्मणश्रेष्ठा, रुंदी असते. ( ७ )

चक्राच्या रुंदीच्या एकतृतीयांश भाग इतके अंतर चक्र व डोके यांच्यामध्ये असते. कपाळपट्टीच्या पुढे ( कपाळपट्टीच्या पातळीच्या खालपर्यंत ) डोक्यावरील चक्राचा देठ येतो. ( ८ )

[ चक्राच्या देठाचा शेवट मूर्तीच्या कंबरेच्या वर तीन अंगुलांवर होतो असे शिल्परत्न ( भाग दोन ) २२·१३६त दिले आहे. ]

चक्र तर्जनीने धरलेले असते. त्याच्या मध्यभागी फुलांची माळ असावी. सर्व देव व देवी यांच्या ( मूर्ती ) बाबत असेच करावे. ( ९ )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील हरिअर्धहर लक्षण नावाचे त्र्याहत्तरावे पटल संपले.**

## चौऱ्याहत्तरावे पटल

### [ भिक्षाटन मूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः भिक्षा मागत फिरत असलेल्या महेश्वराचे लक्षण सांगतो. पायात पादुका असून डावा पाय सरळ असतो. ( १ )

उजवा पाय किंचित उचललेला असून पावलाची उंची नऊ यव असावी. कपाळाच्या मध्याच्या उजव्या बाजूला नऊ किंवा आठ यव अंतरावरून, ( २ )

नाकाच्या अग्रावरून, खालच्या ओठाच्या डावीकडून व खांद्यांच्या मध्याच्या डावीकडून, हृदयाच्या मध्यभागावरून व नाभीच्या उजवीकडून १६ यव अंतरावरून, ( ३ )

सरळ ठेवलेल्या पायाच्या घोटयाच्या मध्यातून पूर्वसूत्र टाकावे. उंची कमी करून आभंग-मुद्रा किंवा समभंगमुद्रेत असावा. ( ४ )

पायात पादुका असतात किंवा नसतात. जटाभार पसरलेला किंवा वर्तुळाकृती बांधलेला असतो. ( ५ )

जटाभार खाली आलेला ( ? ), नग्न व अधोमुख असावा. कपाळावर पट्टा असून तो अर्ध्या कवटीने सुशोभित केलेला असतो. ( ६ )

सर्व दागिने घातलेला, कडदोऱ्याशिवाय, पांढऱ्याशुभ्र रंगाचा, सांगितलेल्या मापाचा व नागांनी भूषविलेला असतो. ( ७ )

उजवीकडचा खालचा हात हरिणाच्या मुखाच्याजवळ असावा. डावीकडचा खालचा हात वरदमुद्रेत असून त्याने भिक्षापात्र धरलेले असते. ( ८ )

हे ब्राह्मणा, उजवीकडील वरच्या हातात डमरू धरलेला असतो. डाव्या ( वरच्या हातात ) सौम्य असे मोराचे पीस धरलेले असते. ( ९ )

उत्तरीय वस्त्र पांढरे असून कंबरेला नागाचा विळखा असतो. पांढरे यज्ञोपवीत असून निळया रंगाचा (?) त्रिपुण्ड धारण केलेला असतो. ( १० )

पद्मपीठावर ( मूर्ती ) असावी. उरलेली ( सर्व लक्षणे ) कंकालमूर्तीसारखी असावीत. ( १० )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील भिक्षाटनमूर्तीचे लक्षण नावाचे चौऱ्याहत्तरावे पटल संपले.**

# पंचाहत्तरावे पटल

## [ चंडेशानुग्रह मूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः चण्डेशानुग्रह (मूर्तीचे लक्षण) सांगतो. उमेसह (शंकरमूर्तीप्रमाणे) सर्व असावे. मुख डाव्या बाजूला असून किंचित खाली लवलेले असते. (१)

उजवा हात अभयमुद्रेत नसून तो वरदमुद्रेत असावा. खाली असलेल्या चंडाच्या मूर्तीवर बाजुबंद घातलेला डावा हात ठेवलेला असतो. (२)

हृदयापाशी भक्ती पूर्वक दोन्ही हात जोडून अंजली (मुद्रा) केलेला, (शंकराच्या) आसना-खाली सुखासन घालून बसलेला व सोन्यासारखा रंग असलेला चंडेश असतो. (३)

[ चंडेशासारखा रंग असलेला असाही अर्थ करता येईल. शिल्परत्नात (भाग दोन) २२·१४५½ त 'स्वर्णसन्निभः' असे म्हटले आहे तेव्हा तशी सुधारणा करून अर्थ दिला आहे. ]

शहाण्यामाणसाने देवी व महादेव यांच्यामध्ये स्कन्दमूर्ती ठेवू नये. चण्डेशानुग्रह (मूर्तीचे लक्षण) सांगितले. आता दक्षिणा (मूर्तीचे) संपूर्ण (लक्षण) सांगतो. (४)

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील चण्डेशानुग्रह नावाचे पंचाहत्तरावे पटल संपले.**

# शहात्तरावे पटल

## [ दक्षिणामूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः दक्षिणामूर्तीचे लक्षण सांगतो. उजवा पाय (खाली) लांबविलेला असून डाव्या पायाच्या नळीचे अग्र उजव्या पायाच्या अग्राजवळ ठेवावे; डावा पाय मुडपलेला असावा. (१, १½)

कपाळाच्या उजवीकडून, उजव्या डोळ्याच्या कडेवरून व तिकडील नाकपुडीपासून तीन यव अंतर ठेवून, नाभीच्या मध्यभागावरून, मेढ्रमूळाच्या मध्यावरून असे पूर्वसूत्र टाकावे. (२, ३)

काहीशी अधोमुख, चार हात असून उजवीकडील खालच्या हातात रुद्राक्षांची माळ धरलेली असते. (४)

(डावीकडील) खालचा हात वरदमुद्रेत असतो किंवा आठ हातांची (मूर्ती) असते. डाव्या गुडघ्यावर वरदमुद्रेतील हाताचा तळवा (टेकलेला) असतो. (५)

डाव्या गुडघ्यावर (डाव्या हातात) दण्ड असल्यास कोपर ठेवावे. वरच्या डाव्या हातात अग्नि किंवा नाग असतो. (६)

( श्लोकार्ध फार अशुद्ध आहे. ) . . . जटाभार पसरलेला किंवा जटा वर्तुळाकृती बांधलेल्या असतात. ( ७ )

( जटेवर ) डाव्या बाजूला धत्तुराची फुले व नाग असून उजवीकडे चंद्रकोर असते. चेहरा हसरा असतो. सर्व दागिन्यांनी भूषविलेला असतो. ( ८ )

पांढरे उत्तरीय वस्त्र आणि पांढरे यज्ञोपवीत असते. तीन डोळे असून गोऱ्या रंगाचा असतो. उजव्या व डाव्या ( कानांत ) मकरकुण्डले असतात. ( ९ )

दोन्ही कानांत शंखपत्र असतात किंवा ( वलयाकार ) कुंडलांनी ते अलंकारिलेले असतात. गळचातील रुद्राक्षांच्या माळांनी व ( इतर ) हारांनी ( ती मूर्ती ) भूषविलेली असते. ( १० )

वाघाचे कातडे नेसलेले असते. सर्व दुःखांचा त्याग केला आहे अशी, ( मूर्ती ) असावी. नारद, जमदग्नि, वसिष्ठ ( व ) भृगु ( मूर्तीच्या ) उजव्या बाजूला व भरद्वाज, शुनक आणि अगस्ति ( मूर्तीच्या ) डाव्या बाजूला दाखवितात. वडाच्या झाडाखाली किन्नर इत्यादी नमस्कार करताना ( दाखवितात ). लांबविलेल्या पायाचा तळवा अपस्मारावर ठेवलेला असतो. ( ११–१२½ )

त्या ( लांबविलेल्या ) पायाच्या टाचेपासून १४ अंगुले अंतरावरून ( पूर्व ) सूत्र (टाकावे.) त्या ( लांबविलेल्या ) पायाच्या गुडघ्यापासून ( पूर्व ) सूत्राचे अंतर १२ अंगुले असते. अपस्मार काळचा रंगाचा असतो व नाग फणा करून उभा असतो तसे तोंड वर केलेला असतो. हे कल्पवित्तमा, **धर्मव्याख्यान** ( मूर्तीची ) अशी कल्पना करावी. ( १३–१४½ )

वरीलप्रमाणेच पण डावा पाय कुटिकासन (मुद्रेत) असून हे उत्तम ब्राह्मणा, खालच्या दोन्ही हातांत युक्तीने वीणा धरलेली (दाखविलेली) असते. इतर सर्व पूर्वीप्रमाणेच, अशा रीतीने **वीणाधर** (मूर्ती) करावी. (१५, १६)

वरीलप्रमाणेच परंतु वीणेशिवाय, ज्ञानमुद्रेत व अभयमुद्रेत ( दोन्ही खालचे हात ) असतात. डावीकडील हात पसरलेला असून डाव्या गुडघ्यावर कोपर (ठेवलेले) असते. (१७)

उजव्या वरच्या हातात रुद्राक्षांची माळ व डाव्या ( वरच्या ) हातात कमळ ( अब्ज किंवा उत्पल ) असते. पांढराशुभ्र रंग असून इतर सर्व पूर्वीप्रमाणेच करावे. सर्व अलंकारांसहित असलेली ही **ज्ञानमूर्ती** सांगतात ( १८, १८½ )

हे ब्राह्मणा, स्फिक्पिण्डाच्या खाली दोन्ही पायांचे तळवे ( एकमेकांस चिकटून ) ठेवावेत. हृदयापाशी आतमध्ये वळलेला हात ज्ञानमुद्रेत असावा. डावा हात वरदमुद्रेत असून मेढ्रपीठावर ठेवावा. ( १९, २० )

उजव्या ( वरच्या ) हातात रुद्राक्षांची माळ असून डाव्या ( वरच्या ) हातात कमळ असावे. स्वतःच्या नाकाच्या अग्राकडे दोन्ही डोळे लागलेले असून ( नासाग्रदृष्टी असून ) शरीर आर्जव मुद्रेत असावे. ( २१ )

लांब जटा असलेल्या ऋषींनी सेविलेली अशी ही **योगमूर्ती** सांगतात. हिचे ध्यान दुःखाची निवृत्ती करते. ( २२ )

उजवा पाय लांबविलेला असून डावा पाय कुटिकासनाच्या मुद्रेत असावा. शरीराला व कुटिकमुद्रेच असलेल्या पायाला वेढणारा योगपट्ट असतो. हे ब्राह्मणा, डाव्या गुडघ्यावर डावा हात पसरून उरलेले सर्व पूर्वीप्रमाणेच असले म्हणजे तिलादेखील **योगमूर्ती** म्हणतात. ( २३, २४ )

मांड्यांवरती परस्परविरुद्ध पायांच्या टाचा ठेवलेल्या असतात. हे ब्राह्मणोत्तमा, जंघांच्या मध्यावरून योगपट्ट गेलेला असतो. ( २५ )

खालचे दोन्ही हात पसरून ( दोन्ही ) गुडघ्यांवर ठेवलेले असतात. उजवीकडील वरच्या हातात रुद्राक्षांची माळ असून डाव्या ( वरच्या ) हातात कमण्डलू असतो. ( २६ )

वर्तुळाकृती जटा असून ( डोक्यावर ) कवटी व चंद्रकोर असते. मान निळ्या रंगाची असून शंखाप्रमाणे, कुन्दाच्या फुलाप्रमाणे किंवा चांदण्यांप्रमाणे शुभ्र वर्णाचा असतो. ( २७ )

पाठीमागच्या बाजूला वृक्ष दाखवावा. निरनिराळ्या सापांनी भूषविलेला, गळ्यातील माळा, कानावरील माळा व छातीवरील दुर्वा शोभत असतात. वडाच्या झाडाच्या खाली असून ज्याची सेवा ऋषी करीत आहेत अशी ही सर्व पापांचा नाश करणारी **योगमूर्ती** प्रसिद्ध आहे. ( २८, २९ )

अशी अनेक प्रकारांच्या दक्षिणामूर्तींची लक्षणे ( असतात. ) ( ३० )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील दक्षिणामूर्तीचे लक्षण नावाचे शहात्तरावे पटल संपले.**

# सत्त्याहत्तरावे पटल

## [ कालहामूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः कालहा ( कालाला मारणारी ) मूर्तीचे लक्षण सांगतो. हे श्रेष्ठ ब्राह्मणा, उंची आठ, नऊ किंवा दहा अंगुलांनी कमी करावी. ( १ )

किंवा ११ अथवा १२ अंगुलांनी कमी असावी. कपाळाच्या उजवीकडून, उजव्या डोळ्याच्या मध्यभागातून, हिक्कासूत्राच्या डाव्या बाजूला, डाव्या स्तनाच्या उजव्या बाजूला, नाभीमध्याच्या डावीकडे आठ यव अंतरावर ( पूर्व ) सूत्र टाकावे. ( २, ३ )

मेढ्रमूळाच्या डाव्या बाजूला सहा अंगुलांवर टाकावे. सरळ असलेल्या पायाच्या घोट्यामधून पूर्वसूत्र टाकावे. (४)

पहिल्या नृत्तमूर्तीचा उजवीकडील पाय जसा स्थितमुद्रेत असतो त्याप्रमाणे देवाचा उजवा पाय पद्मपीठावर स्थितमुद्रेत असतो. (५)

त्याचप्रमाणे ( पहिल्या नृत्तमूर्तीत वर्णिल्याप्रमाणे) डावा पाय वर उचललेला असून वाकलेला असतो व पायाचा तळवा उचललेला असून, वर उचललेल्या पायाचे अग्र कालाच्या हृदयावर ठेवलेले असते. ( ६ )

दाढा बाहेर दिसत असून तीन डोळे व जटामुकुटाने अलंकारिलेला असतो. चार किंवा आठ हात असतात. ( ७ )

उजवीकडील खालच्या हातात शूल व खट्वांग धरलेले असते. उजवीकडील वरच्या हातात परशु असून तो वरदमुद्रेत असतो. (८)

डावीकडील खालचा हात अधोमुख सूचीमुद्रेत असून तो नाभीच्या कडेच्या समपातळीत असतो. सूचीच्या अग्रापासून पूर्वसूत्र १६ किंवा १४ अंगुलांवर असते. ( ९ )

शूल धरलेल्या हाताचे मनगट कानापासून तेवढ्याच अंतरावर असावे. डावीकडील वरचा हात विस्मयमुद्रेत असावा. ( १० )

हिक्कासूत्राच्या समपातळीत टंक धरलेला हात असून त्याचे मुखापासून अंतर तेवढेच (१६ किंवा १४ अंगुले ) असावे. विस्मयमुद्रेच्या अनामिकेचे अग्र पगडीच्या कडेपर्यंत ( समपातळीत ) वर उचललेले असते. ( ११ )

( मूर्तीच्या ) मानेचा शेवट व शूल धरलेल्या हाताच्या मनगटाचा शेवट हे समपातळीत असतात. अशी चार हातांची मूर्ती सांगितली; आता आठ हातांची (मूर्ती) ऐक. (१२)

उजव्या हातात शूल, परशु, वज्र आणि तलवार असते. ( व डाव्या हातांत विस्मयमुद्रा, खेटक, पाश आणि सूची मुद्रेत असतात. ) दोन हात व दोन पायांची, मोठ्या दाढा असलेली व हातात पाश घेतलेली, (१३)

[ कंसातील जास्त माहिती अंशुमत् काश्यपातून दिली आहे. ]

करण्डमुकुट घातलेली व रक्ताची धार लागलेली, फार घाबरलेली व छातीपाशी हातांत पाश घेऊन नमस्कार करीत असलेली, पाय फाकलेली व तोंड वरती करून निजलेली (अशी कालाची मूर्ती असते.) ( १४, १४½ )

कालहामूर्ती अशी सांगितली तशीच लिंगोद्भव (मूर्ती सांगतो). ( १५ )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील कालहामूर्तीचे लक्षण नावाचे सत्याहत्तरावे पटल संपले.**

# अठ्याहत्तरावे पटल

## [ लिंगोद्भवमूर्तीचे लक्षण ]

आता विशेषतः लिंगोद्भवमूर्ती सांगतो ( ती ) ऐक. लिंगाकाराच्या मध्यात चंद्रशेखरमूर्ती-प्रमाणे ( शंकराची मूर्ती ) असते. ( १ )

नळीपासून खाली पाय लिंगात सामावलेले असतात. (ते दाखवीत नाहीत.) डाव्या बाजूला वरच्या अंगाला ब्रह्मा हंसरूपाने व विष्णू वराहाच्या रूपाने त्याच रीतीने ( खालच्या अंगाला ) उजव्या बाजूला असतो. ( २, २½ )

[ शिल्परत्न २२.१७८ प्रमाणे विष्णू वराहरूपाने व ब्रह्मा हंसरूपाने दाखवितात. ]

विष्णू उजव्या बाजूला व पितामह ( ब्रह्मा ) डाव्या बाजूला छातीपाशी हातांनी अंजलिमुद्रा करून ( म्हणजे नमस्कार करीत ) उभे असतात. याला लिंग ( उद्भवमूर्ती म्हणतात. ) ( ३, ३½ )

लिंग, विष्णू व ब्रह्मा हे अनुक्रमाने लाल, काळा व सोनेरी रंगाचे असतात. अशी लिंगोद्भव ( मूर्ती ) सांगतात. ( आता ) वृक्षसंग्रहण ऐक. ( ४,५ )

[ देवमूर्तीसाठी अरण्यातून लाकूड शोधून आणण्याच्या कामास वृक्षसंग्रहण म्हणतात. ]

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील लिंगोद्भव ( मूर्तीचे ) लक्षण नावाचे अठ्ठयाहत्तरावे पटल संपले.**

# एकोणऐंशीवे पटल

## [ वृक्षसंग्रहण ]

आता विशेषतः वृक्षसंग्रहण ( लाकूड निवडून आणण्याचा विधी ) संपूर्णपणे सांगतो. देव व देवींच्या (मूर्तींच्या) शूलासाठी ( लाकडी सांगाड्यासाठी योग्य ) झाड सांगतो. ( १ )

स्त्रीलिंगी, पुल्लिंगी व नपुसकलिंगी असे झाडांचे तीन प्रकार आहेत. ( वजनाने ) हलके, चिकणमातीत उगविलेले, काम करण्यास कठीण, ज्याला सुगंध कमी असलेली फळे व फुले असतात, जे मजबूत व भरीव असते, समशीतोष्ण असे दोन्ही प्रकारचे व दिसावयास सुंदर असते अशा झाडास पुल्लिंगी म्हणतात. देवमूर्तींच्या (लाकडी सांगाड्यासाठी ) ते (चांगले असते) असे सांगतात. ( २–३½ )

मृदु, चिकणमातीत उगवलेले, काम करण्यास फार नाजूक, मुळापासून टोकाकडे क्रमाक्रमाने बारीक होत गेलेले, आणि लोंबती फुले असलेले, अत्यंत नाजूक ( मार्दवयुक्त ) व ( स्पर्शास ) फार थंड असलेले, खूप तेलकट व रसयुक्त असे स्त्रीलिंगी झाड सांगतात. व ते देवीच्या शूलासाठी ( सांगाड्यासाठी) योग्य असते. (४–६)

ज्यांची मुळे, फळे आणि तसेच फुले ही ( आकाराने ) लहान असून अत्यंत निर्बल असतात असे झाड षण्ढ म्हणून सांगितले जाते. (७)

चन्दन, चम्पक आणि तसेच रक्तचन्दन, चाल ( ? ), खैर आणि त्याचप्रमाणे सोमशीर्ष, तिन्दुक, अर्धनारीशिव तसेच राजात आणि मयूरक, पद्मक, कुटज आणि सप्तपर्णी व सत्वक ही अनुक्रमाने शूलासाठी योग्य सांगितली आहेत. त्यांचा आतला भाग ( शूलासाठी ) घ्यावा. (८–९½)

ज्यांची पाने जीर्णशीर्ण आहेत, ज्यांचे (नैसर्गिक) वैभव सोडून गेले आहे, ज्याला शीर्ष नाही किंवा तीन शिखा आहेत, आपणहून मोडून पडलेले झाड, त्याचे त्याचेच ( आपोआप ) शुष्क झालेले, दुःस्थितीत असलेले, अत्यंत कठीण, ज्याच्या आश्रयास पशू व पक्षी आहेत, राजवाड्याजवळील, मजुरांच्या वस्तीजवळील, आगीने जळालेले, दुसऱ्या कामाकरिता वापरून झालेले असे वृक्ष प्रयत्नपूर्वक त्यागावेत. ते जर वापरले तर कामाचा नाश होतो. तेव्हा सर्व प्रयत्नांनी दोष असलेले वृक्ष पूर्णतः टाळावेत. (१०–१३)

शुभ पंधरवड्यात, नक्षत्रांत व (शुभ) वारी योग्य वृक्षांचा संग्रह करावा. आचार्य आणि शिल्पी यांनी झाडाच्या जागी जावे. (१४)

वृक्षाखाली असलेले गवत वगैरे काढून लेपन (सारवण) करावे. हा मन्त्र म्हणून आठही दिशांकडे बली टाकावा. (१५)

"या वृक्षाच्या आश्रयास राहणाऱ्या देव, दानव व पिशाच, नाग, गरूड, गन्धर्व आणि (जे कोणी) सिद्ध, विद्याधर असतील त्यांनी मूर्तीकरिता लागणाऱ्या या झाडाला स्वतःच्या फायद्यासाठी सोडून जावे." असे म्हणून फुलांसह (तसेच) रक्तचंदन व गन्धजलांसह दहीभाताचा बली द्यावा. (१६, १७½)

वृक्षाच्या ईशान्य भागी कर्त्याने होम करावा. वाळूचे एक हात मापाचे स्थण्डिल करावे. अग्निकार्यात सांगितल्याप्रमाणे अग्न्याधानादी सर्व करावे. (१८, १९)

हे ब्राह्मणा, समिधा, तूप, चरु यांनी पवित्र होम करावा. हृदयमन्त्राने समिधांचा व मूलमन्त्राने तुपाचा हवि द्यावा. (२०)

अघोर मन्त्राने चरुचे हवन करावे. प्रत्येकाच्या १०८ आहुती द्याव्यात. जयाने सुरुवात करून अभ्यातान ते राष्ट्रभृच्चपर्यंत होम करावा. (२१)

त्यानंतर अग्नी विझवून, पवित्र पाण्याने झाडाला प्रोक्षण करावे. 'शिवात्मक...' मन्त्राचा जप करून वृक्षाला स्पर्श करावा. (२२)

वृक्षाच्या पूर्वदिशेकडे त्याचे मुख व पश्चिमेकडे पाठ असते. उजवी बाजू दक्षिण (दिशेला) असून डावी बाजू उत्तरेकडे असते हे जाणून व लक्षात घेऊन त्या (वृक्षा-)ची तोडणी करावी. अस्त्रमन्त्राचा जप करून, वृक्ष दोन भाग व मूळ एक भाग असे तीन भाग करावेत. (२३, २४)

झाडाचे जे दूध ते स्रुक्, स्रुव यांच्यात (जमा करावे ?) 'अस्त्रस्रुवः...' या मन्त्राने शक्तिहोम करावा. (२५)

झाडाचे मूळ व उरलेला भाग याचा क्रमाने स्थपतीने जप करावा (?) पूर्व किंवा उत्तरेकडे झाड पडले तर ते शुभदायक असते. (२६)

(याहून) दुसऱ्या दिशेकडे पडलेले झाड प्रयत्नाने त्यागावे. त्यानंतर फांद्या तोडाव्यात. खोडाचा आतला भाग कमळाप्रमाणे करावा. (२७)

पंचगव्य, गंधजल यांनी स्नान घालून व गंध लावून अलंकृत करावे. कोऱ्या कापडाने त्याला झाकून दर्भाच्या बारीक दोऱ्यांनी रथात, शिबिकेत ठेवावे, किंवा शहाण्या माणसाने खांद्यावर धरून (वाहून न्यावे.) (२८, २८½)

......... सुतारशाळेकडे नेण्यास सांगावे. (२९)

[श्लोकार्धाचा पहिला भाग अशुद्ध आहे.]

(कर्म) मण्डपात सडा शिंपडून, गायीच्या शेणाने तो सारवून काढावा. पंचगव्य, गंधोदक यांनी स्नान घालून, गन्ध लावून (जेथे लाकूड ठेवावयाचे ती जागा) अलंकृत करावी. पीठ व चूर्ण (रांगोळी) यांनी अलंकृत करून त्यामध्ये शहाण्या माणसाने लाकूड ठेवावे. (३०, ३०½)

शूलाच्या लांबीइतके, विद्वान माणसाने, आयताकार स्थण्डिल करावे. रुंदी ( लांबीच्या ) निम्मे व ( उंची ) त्याच्या निम्मे किंवा चार अंगुले (उंचीचे) असे उत्तम (स्थण्डिल) करावे. त्यावर पूर्वेच्या बाजूला अग्र येईल व खाली मुख येईल असे ते शूलाकरिता असलेले लाकूड ठेवावे. (३१, ३२)

विद्वान माणसाने (त्या लाकडाचे) सम पंधरवडे किंवा (ते) कोरडे होईपर्यंत त्याचे रक्षण करावे. सांगितले त्यापेक्षा अधिक ( कालावधीपर्यंत त्याला कोरडे ) होऊ द्यावे, त्याबद्दल घाई मात्र करू नये. ( ३३ )

**अंशुमद्‌भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील वृक्षसंग्रहण नावाचे एकोणऐंशीवे पटल संपले.**

# ऐंशीवे पटल

## [ शूलाचे लक्षण ]

आता विशेषतः उत्तम शूलाचे ( लाकडी सांगाड्याचे ) लक्षण सांगतो. दण्डाची लांबी नुसत्या शरीराइतकी सांगितली आहे. ( १ )

त्याच्या ( दण्डाच्या) पोटाच्या ठिकाणच्या मधल्या भागाची रुंदी ( मूर्तीच्या ) चार भाग रुंदीपैकी एक भाग असावी. त्या (दण्डाच्या) मुळाच्या रुंदीच्या ⅛ ने अग्राची रुंदी कमी असावी. (२)

दण्ड नाभीपर्यंत चौरस व खांद्यांपर्यंत अष्टकोनी असावा. त्याच्यावरील भाग गोल सांगितला असून, उरलेला इतर भागही गोलाकार असावा. (३)

वंशदण्डाची लांबी ३२ अंगुले असावी व रुंदी ६½ अंगुले किंवा ७½ अंगुले असावी. ( ४ )

रुंदीच्या निम्मे जाडी असते. वक्षदण्डाच्या अग्रांची ( शेवटांची ) रुंदी चार अंगुले सांगतात. मध्यापासून टोकांकडे क्रमाक्रमाने ( वक्षदण्ड ) कमी कमी होत जातो. ( ५ )

वक्षदण्डाच्या मध्यभागी ( रुंदीच्या ) निम्मे किंवा तीन अंगुले ( व्यासाचे ) छिद्र असावे. हिक्कासूत्राच्या उंचीच्या निम्म्यापासून १४ अंगुलांपर्यंत वक्षदण्डाचा वरचा भाग असून तेथे वंशदण्डाची योजना करावी. ( ६, ६½ )

हे ब्राह्मणा, कटिदण्डाची लांबी १६ अंगुले असावी. त्याची रुंदी आठ अंगुले व जाडी चार अंगुले असावी. ( कटिदण्डाच्या ) मध्यभागी चार अंगुले रुंदीचे छिद्र असून ते नाभीच्या खाली पाच अंगुले असते. ( ७, ८ )

कटिदण्डाच्या वरच्या भागी ध्वशदण्डाची ( वंशदण्डाची ? ) योजना करावी. हे ब्राह्मणा, ( तो ध्वशदण्ड ) वक्षदण्डाला व कटिदण्डाला बांधलेला असावा. ( ९ )

या विधीनें पाहिजे त्याप्रमाणे कांशक (दण्ड ? ) करावे. एक, दोन, तीन, चार, पाच, सहा, सात किंवा आठ हातांसाठी आणि पायांसाठी वाकडे दण्ड असावेत. ( १०, १०½ )

या दण्डांची रुंदी दोन अंगुले असून त्यांची संख्या हातांच्या संख्येइतकी असावी. ( ११ )

वक्षदण्डाच्या रुंदीला हातांच्या संख्येने भागितले असता शिखांची रुंदी येते. ( हातासाठी असलेल्या दण्डांची) रुंदी मुळाकडे व अग्राकडे क्रमाने कमी करीत जावी. (१२)

कटिदण्डाच्या शिखांची लांबी तीन अंगुले असून त्यांना ( पायांचे ) दंड बसवितात. त्यांची रुंदी १½ अंगुले असावी. ते गोलाकार असून त्यांची जाडी तितकीच ( १½ अंगुले ) असावी. ( १३ )

मूर्ती उभी असेल तर मांडीच्या लांबीत आठ अंगुले जास्त घालून तितकी मांडीच्या शूलाची लांबी असावी. ( १४ )

मांडीच्या लांबीत अधिक आठ अंगुले घालून ऊरुदण्ड करावा. मांडीकरिता असलेल्या दण्डाला गोल छिद्र करून, शहाण्या माणसाने, कटिदण्डाच्या टोकांना असलेल्या शिखांत तो बसवावा. ( १५, १५½ )

मांडी व जंघा यांच्या सीमेपाशी गुडघ्याचे दोन भाग करून त्यात जंघेच्या दंडाची शिखा बसवावी. तेथे शहाण्या माणसाने जंघेची लांबी, शिखेची लांबी तीन अंगुले जास्त घालून, वाढवावी. ( १६, १७ )

[ श्लोक १५ ते १७ गोळाबेरीज अर्थ दिला आहे.
श्लोक १८ ते १८½ अशुद्ध पाठ असल्याने अर्थ दिलेला नाही. ]

जो पाय स्थानकमुद्रेत म्हणजे सरळ असेल त्याच्यासाठी ( मांडी व जंघा यांचा ) सांधा न करता ( मांडी व जंघा मिळून लांबीचा ) पायाचा दण्ड असावा. ( १९ )

जंघेच्या लांबीनंतर ( खालच्या ) टोकाला नळीकरिता शूल ( दण्ड ) ठेवावा. ( २० )

मांडीच्या मधल्या भागाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग मांडीच्या दण्डाची रुंदी असते. मांडीच्या दण्डाच्या टोकाची ( कटिदण्डाच्या बाजूची ) रुंदी त्याच्या पाऊणपट असावी; व जंघेच्या मुळापाशी ( दण्डाची ) रुंदी तेवढीच ( पाऊणपट ) असावी. जंघेच्या अग्राची ( पावलाकडील भागाची ) रुंदी जंघेच्या मुळापासच्या दण्डाच्या रुंदीच्या तीन भागांपैकी एक भाग कमी ( ⅔ ) इतकी असावी. ( २१, २१½ )

नळीच्या लांबीचे तीन भाग करून त्याच्या दोन भाग लांबीचा ( पावलासाठी ) दण्ड असावा. त्याच्या अग्राची रुंदी ( दण्डाच्या मध्यभागाच्या ) रुंदीच्या ⅔ असावी. अशी पावलाच्या दण्डाची रुंदी असावी. पावलाच्या दण्डाला तो जेथे जंघादण्डाच्या टोकाला जोडावयाचा तेथे भोक पाडून तो गुळगुळीत करून मजबूत बसवावा. आता हातांकरिता जे दण्ड वापरतात त्यांची माहिती सांगतो. ( २२-२४ )

हाताच्या मुळापाशी (दण्डाची ) रुंदी तीन अंगुले सांगितली आहे. ( हाताच्या ) अग्राची रुंदी दोन अंगुले असून प्रकोष्ठाची मुळापाशी रुंदी तेवढीच असावी. ( २५ )

प्रकोष्ठाच्या ( दण्डाच्या ) मुळाची रुंदी २½ अंगुले असावी. प्रकोष्ठाच्या अग्राची ( मनगटापासच्या टोकाची ) रुंदी त्याच्या मुळाजवळच्या रुंदीच्या निम्मे असावी. ( २६ )

हात व प्रकोष्ठ यांच्या कोपराचा सांधा गुडघ्याच्या सांध्यासारखाच असावा. शिखेचे माप दोन अंगुले असे योजावे की तो सांधा मजबूत होईल. ( २७ )

वंशदण्डाच्या दोन्ही बाजूंना पार्श्वदण्डांची योजना करावी. त्यांची लांबी (वक्षदण्डाच्या बाजूंपासून) कंबरेच्या (कटिदण्डाच्या) बाजूंपर्यंत असून रुंदी तीन अंगुले असावी. (२८)

[श्लोकार्ध २७½ खालीलप्रमाणे सुधारून अर्थ दिला आहे.

'पार्श्वयोर्वंशदण्डस्य पार्श्वदण्डं तु योजयेत्' ही सुधारणा शिल्परत्न (भाग दोन) अध्याय १७ तून घेतली आहे. वरती बारीकसारीक सुधारणा दिलेल्या नाहीत. पाठापेक्षा अर्थ जरा वेगळा वाटल्यास तो वरील संदर्भाप्रमाणे सुधारणा करून घेतला आहे असे समजावे.]

(पार्श्वदण्डाचे) निर्गमन वंश (वक्ष?) दण्डाइतके असून खाली व वरती त्यांना शिखा असतात. वक्षदण्डाच्या अग्रांपाशी पार्श्वदण्डांचे अग्र ठेवावे. दोन्ही पार्श्वदण्डांचे मूळ व अग्र (अनुक्रमे कटिदण्डात व वक्षदण्डात) बसविलेले असतात. (२९, २९½)

हात आणि पायांचे तळवे तांब्याच्या पत्र्याचे करावेत. ते मूर्तीच्या कपड्यांत बसवावे किंवा शूलाला बांधावेत. (३०, ३०½)

देवांच्यासाठी (देवमूर्तींसाठी) शूल असा असावा. देवींकरिता असलेला लाकडी सांगाडा सांगतो. (३१)

मध्यभागाच्या रुंदीचे तीन भाग करून एक भाग रुंदी वंशदण्डाची असते. त्याच्या टोकांची रुंदी एकअष्टमांशाने कमी असावी व ती (टोके) पूर्ण गोलाकार असावीत. (वक्षदण्डाची लांबी) हातांपर्यंत असावी किंवा हातांपासून (त्यांच्या) अर्ध्या अंतराइतकी असावी. उरलेला भाग वक्षदण्डाची लांबी असून त्याची रुंदी (वंशदण्डाच्या रुंदीच्या) निम्मे असावी. (३२, ३३)

त्याच्या निम्मे जाडी सांगतात. आता कटिदण्ड सांगतो. त्याची रुंदी पाच अंगुले व लांबी तीन अंगुले असावी. (३४)

['बाहुदं'च्या ठिकाणी 'बहलं' पाहिजे.]

उरलेले (दण्ड) पूर्वीप्रमाणेच करावेत. आता आसनमुद्रेतील (मूर्तीच्या) शूलाची माहिती ऐक. बसलेल्या (मूर्तीकरिता) वंशदण्डापासून (कटिदण्ड) आठ अंगुले अंतरावर असावा. पाठीचे माप चार अंगुले असून उरलेले वंशदण्डाच्या छिद्रात बसवावे. जंघेच्या दण्डाचे टोक सहा अंगुले, शहाण्या माणसाने, बैठकीत ठेवावे. (३५, ३६)

[श्लोकार्ध ३५½त 'कर्तशुपोशनम्'च्या ऐवजी 'गर्ते तु वेशनम्' अशी सुधारणा करून अर्थ दिला आहे.]

मूर्तीच्या गर्भात जितका दण्डाचा प्रवेश असतो तितकाच मूर्तीच्या खाली (बैठकीत) दण्डाचा भाग असावा. शूल असा सांगितला. आता उपशूल सांगतो. (३७)

भितीच्या (जाडीच्या) मध्यापासून सुरुवात करून वक्षदण्डापर्यंत उपशूलाची लांबी सांगतात. (वक्षदण्डापेक्षा उपशूल) आठ अंगुलांनी कमी असतो. (३८)

उपशूलाचे निर्गमन चार अंगुले असून ते, शहाण्या माणसाने, समतल व शूलास योग्य असे ठेवावे. शूलाच्या रुंदीइतके मधले छिद्र असून तेथे दोन शिखा असतात. (३९)

[श्लोकार्ध ३९ खालीलप्रमाणे सुधारून अर्थ दिला आहे.

'शूलव्याससमं मध्याच्छिद्रं तद् द्विशिखान्वितम्।']

( उपशूलाचे ) मूळ भिंतीच्या मध्यभागी असून, शहाण्या माणसाने, ( ते ) मूळ ( भिंतीत ) मजबूत बांधावे. वक्षदण्ड व कटिदण्ड वंशदण्डाला छिद्रांत मजबूत बांधून ते संधि-खिळ्यांनी पुन्हा अधिक मजबूत करावेत. वक्षदण्डाप्रमाणेच उपशूलाची लक्षणे असतात. (४०, ४१)

[ श्लोकार्ध ३९½ खालीलप्रमाणे सुधारला.

'भित्तिमध्यात्तु शूलस्य मूलं बध्वा दृढं बुधः ।' ]

उपशूलाची ( शूलाशी असलेली ) शिखा वंशदण्डाच्या अग्रापाशी केलेल्या छिद्रात बसवावी व तो सांधा लोखंडी किंवा लाकडी खिळ्यांनी मजबूत करावा. ( ४२ )

प्रतिमेसाठी शूल (लाकडी सांगाडा) सांगितला. त्यात जसे सांगितले तसे करावे. शूलाचे लक्षण सांगितले, शूलाच्या स्थापनेची ( माहिती ) सांगतो. (४३ )

[ या अध्यायातील श्लोक फार अशुद्ध आहे. अर्थ काही वेळा गोळाबेरीज सांगितला आहे. शिल्परत्न ( भाग दोन ) अध्याय १७ ची दुरुस्तीसाठी बरीच मदत घेतलेली आहे. आकृत्यांवरून शूल कसा करावा ते अधिक स्पष्टपणे समजेल. ]

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील शूललक्षण नावाचे ऐंशीवे पटल संपले.**

# एक्यांशीवे पटल

## [ शूलस्थापनेचा पूजाविधी ]

आता विशेषत: शूलाच्या उत्तम स्थापनेविषयी ( माहिती ) सांगतो. नांगरणी झाल्यानंतर चांगला महिना, वार व लग्न निश्चित करून ( शूलाची ) स्थापना करावी. त्याच्यापुढे अंकुरार्पण करावे. प्रासादाच्या पुढच्या बाजूला चौरस मण्डप बांधावा. ( १, २ )

पाच ( अथवा ) सात किंवा तीन पद लांबीचा सोळा किंवा बारा खांबी ( मण्डप बांधावा ). ( ३ )

( मण्डपाची ) जमीन आठ अंगुले उंच असावी. भिंतीची रुंदी व उंची जसे ( द्रव्य ) मिळेल त्याप्रमाणे असून सर्व बाजूंनी, तिच्या निर्गमन वगैरेंसह ( ती ) मजबूत असावी. ( ४ )

तुळई व खांबांवर जेथे आडवे बांबू असतात तेथे त्यांना गोलाकार छिद्रे वगैरे ठेवावीत. नारळ इत्यादी ( योग्य त्या ) विधानाने ( त्या मण्डपात ) ठेवून मोती पुढे लावलेले आहेत असे दर्भाचे हार असावेत. तरंगांनी वेष्टिलेला व उत्तम तोरणांनी सजविलेला, चार दारांसह व खांबांना (कापड) गुंडाळलेला असा ( मण्डप ) असावा. ( ५, ६ )

चारी दारांशिवाय ( कोठेही ) छिद्र असू नये किंवा एक लहान जाळी असावी. मण्डपाच्या तीन भागांपैकी एक भाग वेदिकेची उंची ( रुंदी ? ) सांगतात. ( ७ )

तीन अंगुले रुंद व उंच व मधल्या बाजूला उघडता येते अशी लहान पेटी आरशाप्रमाणे गुळगुळीत ( करून ) व समपातळीत ठेवून तीवर ( मूर्तीचा ) आकार रेखावा. ( ८ )

( खाली ) दिलेल्या पद्धतीने तिच्याभोवती अग्निकुंडे करावीत. पूर्वदिशेपासून ( अनुक्रमे ) चौरस, धनुष्याकार, वर्तुळाकार व पद्‌माप्रमाणे ( अशी कुण्डे असावीत. ) ( ९ )

शंकर (ईशपद) व इंद्र ( पद ) यांच्या दरम्यान वर्तुळाकार कुण्ड असावे. विशेषतः केवल ( एकटया शंकराच्या ) मूर्तीसाठी ही कुण्डे सांगितली. ( १० )

जर (शंकर) मूर्ती गौरीसह असेल तर त्या कोनात ( गौरी ज्या बाजूला आहे त्या कोनात ) अर्ध्या पानाप्रमाणे असलेले ( योनि ) कुण्ड असावे. उरलेली कुण्डे वर दिल्याप्रमाणेच असावीत. ( ११ )

ब्राह्मणाने कुण्डांच्या लक्षणांप्रमाणे सर्व कुण्डे करावीत. गोमयाने सारवून, पीठांनी ( व ) चूर्णांनी (रांगोळीने ) ती अलंकारावीत. ( १२ )

तेथे ब्राह्मणभोजन घालावे व नंतर पुण्याहवाचन करावे. महेंद्रपदापर्यंत विधिपूर्वक होम करावा. ( १३ )

वेदिका व अग्निकुंडांपाशी पर्यग्निकरण करावे. ( मूर्ती स्थापनेसाठी ) ठरविलेल्या दिवसाच्या आदल्या रात्री तेथे ( मण्डपात ) रहावे. ( १४ )

वेदिकेवरील स्थण्डिल आठ द्रोण साळींनी करावे. देठासकट असलेल्या नारळाच्या आठ पानांनी, तांदूळ, तीळ, दर्भ लाह्या व फुले यांनी ( ते स्थण्डिल ) अलंकारावे. झोपावयाच्या ठिकाणी ( शूल जेथे आडवा ठेवावयाचा तेथे ) वस्त्रे ठेवावीत. ( १५, १६ )

धूपदीपांसह फुले आणि गंध यांनी ( त्या स्थण्डिलाची ) पूजा करावी. मण्डपाच्या उत्तरेकडील बाजूला स्नानमण्डप असावा. ( १७ )

त्याच्या मध्यभागी लाकडाची बैठक ( चौरंग ) ठेवून, ब्राह्मणाने त्याच्यावर शूल पूर्वाभिमुख स्थापावा व त्याला पंचगव्याने अभिषेक करावा. ( १८ )

'शुचि हव्य......' इत्यादी मन्त्रपूर्वक गन्धोदकाने स्नान घालावे. अशा रीतीने देव व देवी यांची स्थापना करून ( त्यांची ) गन्ध ( व ) फुले यांनी पूजा करावी. ( १९ )

त्यानंतर देवांच्या ( देव व देवीच्या ) उजव्या हातांना कौतुक बांधावे. सोने किंवा कापसाच्या दोराने कवच म्हणून ( ते कौतुक ) बांधावे. ( २० )

वाद्ये वाजत असताना, कुश गवताच्या लांब काडयांच्या जुडीसह शूल, डोके पूर्वेकडे येईल व तोंड वरती असेल अशा रीतीने, आडवा ठेवावा. ( २१ )

त्याच्या डाव्या ( बाजूला ) उमा देवीचा शूल शहाण्या माणसाने, आडवा ठेवावा. त्यांच्या ( देव व देवीच्या शूलांच्या ) आग्नेयेकडील भागात दोन वस्त्रे ठेवावीत. ( २२ )

कुश गवताच्या जुडीसह, सर्वांगाला वेष्टून, सूत व वस्त्र गुंडाळलेल्या व एक द्रोण पाण्याने पूर्ण भरलेल्या ( कुंभाला ) शिवकुंभ म्हणतात. ( २३ )

त्याच्या निम्मे ( अर्धा द्रोण ) इतक्या पाण्याने संपूर्ण भरलेला व पूर्वीप्रमाणेच सूत इत्यादींसह गौरीबीज असलेला ( असा ) हा गौरीकुंभ असतो. ( २४ )

त्यांच्या ( देव व देवी यांच्या शूलांच्या ) मुळाच्या मध्यापाशी कुंभ ठेवून त्यांना गंध वगैरे वाहावेत. विशेषतः गौरीकुंभात त्याचा मन्त्र म्हणून तो ठेवावा. ( २५ )

त्यांच्याभोवती सूत वगैरेंसह असलेले आठ घरे ठेवून विद्येशाच्या ( गणेशाच्या ) मूलमंत्रांनी त्यांची स्थापना करावी. ( व ) गन्ध वगैरे वाहावेत. ( २६ )

वास्तुहोम इत्यादींच्या कुंडात ब्राह्मणाने अग्नीची स्थापना करून अग्निकार्यात सांगितल्या-प्रमाणे अग्न्याधान इत्यादी करावेत. ( २७ )

अग्नीसाठी पूर्वेकडील कुंडात आग्नेय दिशेकडे अग्नी दिसेल असा ठेवावा. हे ब्राह्मणा, दक्षिणेकडे उम्बर ( व ) नैर्ऋत्येकडे खैराची लाकडे (कुंडात) रचतात. (२८)

प्रतिमा असेल तर पश्चिमेकडे, मयूर ( चित्र ?) असेल तर वायव्य दिशेकडे, वस्त्रावर चित्र काढले असेल तर उत्तरेकडे ( कुंडात ) खैराची लाकडे रचावीत. ( २९ )

गौरीसह शंकरमूर्ती असेल तर प्रमुख ब्रह्मवृक्षाच्या समिधा ( त्या त्या कुंडांत ) रचाव्यात. गौरीशिवाय ( शंकरमूर्ती ) असेल तर विद्याकुंडात (?) ब्रह्मवृक्षाच्या समिधा रचाव्यात. ( ३० )

'हृदय' मन्त्राने समिधांची, 'पुरुष...' मन्त्राने तुपाची आहुती द्यावी. 'अघोराने' चरुचे हवन करावे. प्रथम आहुती डाव्या बाजूला द्यावी. (३१)

चरु 'ईशान' मन्त्राने, तीळ 'शिरस' मन्त्राने होमावेत. सर्षपाची ( मोहरीची ) कवचाने आहुती द्यावी. याला शिखामङ्गल म्हणतात. ( ३२ )

'गलमस्त्रेण' या मन्त्राने प्रत्येकी शंभर आहुती द्याव्यात. देव व देवी यांच्या योग्य व सारख्याच ( संख्येच्या ) व्याहृति म्हणून आहुती द्याव्यात. ( ३३ )

'जयादि', 'अभ्यातान' व 'राष्ट्रभृच्च' या मन्त्रांनी होम पुरा करावा. दिशांना अनु-लक्षून वेदातील स्तोत्रे म्हणावीत ( ? ) ( ३४ )

[ श्लोक ३४½ फार अशुद्ध आहे. त्याचा अर्थ दिलेला नाही. ]

देव व देवी यांच्या मूलमन्त्रांनी तुपाच्या १८ आहुती द्याव्यात व नंतर भस्मस्नान करावे. ( ३५, ३५½ )

पांढरे उत्तरीय वस्त्र पांघरलेल्या, पांढरे यज्ञोपवीत धारण केलेल्या, पांढऱ्या माळा व (गंध इत्यादींचा) लेप लावलेल्या, तीन पंचांगभूषणे धारण केलेल्या, पवित्र हातांनी सकलीकृतविग्रह केलेल्या, प्रसन्न मुद्रेच्या, पवित्र व उत्तम कुळीच्या आचार्याने गर्भागारांत प्रवेश करून एकाशीतिपद (८१ घरे असलेली आकृती) आखावे. ( ३६–३८)

किंवा मण्डूक नावाचे ( वास्तु ) पद ( मण्डल ) (६४ घरे असलेले) किंवा ४९ पद असलेली आकृती ब्रह्माचे स्थान लक्षात ठेवून गर्भगृहात काढावी. ( ३९ )

गर्भागाराच्या पाठीमागच्या भागात, त्या उत्तम ब्राह्मणाने देवीच्या (देवाच्या ?) अंशात स्थानक (उभ्या मूर्तीसाठी बैठक) व मानुषपदात आसन (बसलेल्या मूर्तीसाठी बैठक) स्थापावी. (४०)

बसलेली मूर्ती असल्यास भद्रपीठाची बैठक असावी, उभी मूर्ती असेल तर बैठक वेदिकेची असावी. अगोदर सांगितलेल्या रीतीप्रमाणे पीठाची रुंदी, उंची वगैरे असावीत. (४१)

[ ५८ वे पटल पहावे. ]

सुंदर दिसेल अशा रीतीने पीठ करून त्यावर आधार नावाचा दगड (शिला) ठेवावा. पीठाच्या मापाच्या पाऊणपट मापाचा आधार शिलेचा तळ (खालचा भाग) असावा. (४२)

किंवा पीठाइतकी लांबी व त्याच्या निम्मे जाडी असावी. ईश्वराची मूर्ती स्थानक मुद्रेत असेल तर हे श्रेष्ठ ब्राह्मणा, तिच्या पायाखाली आधारशिलेच्या वर रत्नजडित आंगठी ठेवावी. त्याची (आंगठी ठेवावयाच्या खोबणीची) खोली सहा अंगुले सांगतात व (रुंदी) तीन अंगुलांची असावी. (४३, ४४)

(या खोबणीच्या) मुळापाशी नऊ रत्ने किंवा सोन्याचे भांडे ठेवावे. शूलाच्या पायाच्या खाली सहा अंगुले लांबीच्या (खोबणीत), बुद्धिमान माणसाने, पूर्वीप्रमाणे (तो शूल) पक्का मजबूत बसवावा. (४४½-४५½)

[ 'होमपात्र' या शब्दाऐवजी 'हेमपात्र' असा शब्द घेऊन अर्थ केला आहे. ]

मूलमन्त्राचा उच्चार करीत गर्भागारात प्रवेश करावा. (वर सांगितलेल्या) पदावर मजबूत अष्टबन्धाने विशेषतः चुन्याने मूलमन्त्रासह शूल दृढ बसेल असे करावे. (४६, ४७)

विशेषत: त्याच्या डाव्या बाजूला पार्वतीचा शूल त्याच रीतीने (मजबूत) बसवावा. आधार-शिला आयताकृती असून तिचे दोन भाग करावेत. (४८)

पाच, सहा (किंवा) सात अंगुले व्यासाचा खड्डा करून तेथे गर्भागाराच्या विभागासह गर्भन्यास करावा. (४९)

[ शंकराची एकटी मूर्ती असेल तर ८१ पद किंवा ६४ अथवा ४९ पदांचे मंडल आखून मूर्ती कोठे स्थापावी ते दिले आहे. (श्लोक ३९-४०) गौरीसह शंकराची मूर्ती असेल तर त्या गर्भा-गारातील ज्या विभागात एकटी शंकराची मूर्ती असेल त्याचे दोन भाग करून एका भागात देवीची स्थापना करावी. ]

पूर्वी सांगितलेल्या विधीने गन्ध, फुले यांनी संपूर्ण पूजा करावी. पूर्वीप्रमाणे गर्भभाजन करून शूलाचे मूल स्थापन करावे. (५०)

याच्यापुढचे काम विशेषत: शिल्पीने करावयाचे असते. सर्वलक्षणसंपन्न अशा स्थपतीला शिल्पी म्हणतात. (५१)

शिल्पाचे काम करणाऱ्या स्थपतीने योग्य रीतीने (शास्त्रोक्त) मूर्ती करावी. किंवा (त्याहून) निराळी मूर्ती पाहिजे असल्यास मालकाच्या इच्छेप्रमाणे त्याने (स्थपतीने) ती करावी. (५२)

तेथे (शूलस्थापनेच्या जागी व शूलस्थापनेनंतर) आचार्याची सोन्याचे पाच निष्क देऊन पूजा करावी. शूलाच्या स्थापनेचा (विधी) सांगितला, रज्जुबन्धाची (माहिती) ऐक. (५३)

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील शूलपाणिलक्षण नावाचे एक्यांशीवे पटल संपले.**



१. वक्षदंड
२. प्रकोष्ठशूल
३. बाहुशूल
४. पार्श्वदंड
५. जंघाशूल
६. नळी
७. वंशदंड
८. कटिदंड
९. जंघाशूल
१०. उपशूल

आकृती ८०·१ : लाकडी सांगाड्याचे निरनिराळे अवयव



आकृती ८०·२ : मूर्तीकरिता जुळविलेला लाकडी सांगाडा



आकृती ८०·३ : माती लिंपून दोऱ्या बांधून केलेली मूर्ती

# त्र्यांशीवे पटल

## [ रज्जुबन्धलक्षण ]

आता विशेषतः विस्ताराने रज्जुबन्ध (शूलाला दोरी गुंडाळावयाची क्रिया ) सांगतो. शूलाचे सर्व बन्ध तांब्याच्या पत्र्यांनी मढवून काढावेत. (१)

शूलाला अष्टबंधाचा लेप ( प्रथम ) देऊन नंतर दोरी गुंडाळावी. श्रीवेष्टक, कुन्दुरुष्क, गुग्गुळ आणि त्याचप्रमाणे गूळ, सर्जक, गेरू हे तुपात व तेलात घालून अष्टबन्ध होते. ( २, २½ )

श्रीवेष्टक चार भाग, कुन्दुरुष्क तीन अंश, ( व ) गुग्गुळ पाच भाग असावे. गूळ एक अंश सांगतात. सर्जक आठ अंश व गेरू तीन भाग (घ्यावेत.) ( ३, ४ )

त्या सहा जणांची बारीक भुकटी करून ते तूप व तेलात मिसळावे. मातीच्या भांड्यात ठेवून ( मंदाग्नीवर ) उत्तम प्रकारच्या मेणासारखे होईपर्यंत (शिजवावे. ) ( ५ )

[ श्लोकार्ध पाच अशुद्ध आहे. शिल्परत्न (भाग २ ) १८–१०½ त दिले आहे, 'आसिच्य घृततैलाभ्यां मन्दाग्नौ पच्यतामिदम् ।' व यावरून वर अर्थ दिला आहे ]

अशा रीतीने केलेल्या ( अष्टबन्धाचा ) शूलाला लेप देऊन नंतर रज्जुबंध (दोऱ्या गुंडाळावयाचा विधी ) करावा. दोरांचा मध्य नाभी असून मूलाधारापासून वर जाणाऱ्या तीन दोऱ्या असतात. ( ६ )

[ श्लोकार्ध सहा शिल्परत्न ( भाग दोन ) श्लोक १८–१३½ प्रमाणे सुधारून अर्थ दिला आहे. ]

मधली ( दोरी ) सुषुम्ना म्हणून प्रसिद्ध आहे. पिंगला तिच्या उजव्या बाजूस व इडा तिच्या डाव्या बाजूस असते. या वर जाणाऱ्या मुख्य ( तीन नाड्या ) आहेत. ( ७ )

त्यांच्या ( दोऱ्यांचा ) परिघ दोन अंगुले असून त्या तीन पदरांच्या असाव्यात. ह्या तीनही नाड्या भुवयांच्या मध्यापाशी एकत्र होतात. ( ८ )

[ श्लोकार्ध आठ मध्ये 'मूलमेढ्रावसानकम्' या ऐवजी 'योगं भ्रूमध्यमे भवेत' अशी दुरुस्ती करून अर्थ दिला आहे. ही व यापुढील सर्व दुरुस्त्या शिल्परत्न ( भाग दोन ) अध्याय १८ वरून केल्या आहेत. ]

तेथील ( मूलाधाराजवळच्या ) नाडीच्या मुळापासून निरनिराळ्या १८ नाड्या निघतात. ( त्यांची नावे ) विमला, घोषिणी, पृथ्वी, वाहिनी, तेजसा, वायवी, गगनी तसेच मर्दिनी, आणि घोषिणी, रसवर्ती, मृदंगी, आणि त्याचप्रमाणे स्रंसिनी, शब्दस्पृशांगी, पूर्णा, सुर्सिही, वारिधारिणी, वाहिनी आणि तामसी अशी सांगतात. त्या १८ सांगितल्या आहेत. ( ९–११ )

प्रत्येक नाडी तीन यव व्यासाची व तीन तीन पदरांची ( किंवा ) दोन पदरांची असते. त्यांच्यामधील पहिल्या सहा नाड्या मांडीच्या मुळापाशी असतात. ( १२ )

मांडीच्या मुळापासून निघून क्रमाने (पायाच्या) नळीपर्यंत त्या (नाड्या) लांब गेलेल्या सांगतात. (या नाड्या) पिंगला नाडीच्या मुळापासून निघालेल्या असतात. (१३)

शब्दस्पृशांगीपासून (तामसीपर्यंत) ज्या सहा नाड्या आहेत त्या इडेच्या मुळापासून निघून डाव्या पायाला गुंडाळतात. (१४)

[ विमला ते वायवी या सहा नाड्या पिंगलेपासून निघून त्या उजव्या पायांना गुंडाळतात असा स्पष्ट उल्लेख श्लोक १३ नंतर असावयास हवा होता.

तसेच श्लोक आठ नंतर माहिती पाहिजे की, सुषुम्ना, इडा व पिंगला या वंशदंडावरून येऊन भ्रूमध्यावर एकत्र होतात व नंतर त्यांचे पुन्हा सात निरनिराळ्या नाड्यांत विभाजन होते. या नाड्यांची नावे कुहू, पुष्पा, गांधारी, हस्तिजीवा, यशस्विनी, शंखिनी, अलंबुषा अशी असतात. गांधारी नाडी सर्व अवयवांत, हस्तिजिव्हा हृदयापर्यंत, पुष्पा उजव्या कानापर्यंत, यशस्विनी नाडी डाव्या कानापर्यंत, अलंबुषा मेढ्रमुळापर्यंत व कुहू गुदापर्यंत, शंखिनी नाभीपर्यंत अशा या नाड्या गेलेल्या असतात. यांतील पहिल्या चार नाड्या तीन यव व्यासाच्या व उरलेल्या तीन नाड्या चार यव व्यासाच्या असतात. ही माहिती शिल्परत्न (भाग दोन) १८·१८–२१ मध्ये दिली आहे. ती या पुस्तकात नाही. ती चुकून गाळली गेली असावी. ]

(त्या सहा नाड्या) नळीच्या अग्राच्या पुढे आल्यावर सहाही (नाड्यांची) टोके एकवटतात. उरलेल्या नाड्या ज्या पाठीच्या कण्यावर व त्याच्या बाजूंना असतात (सुषुम्ना व इडा आणि पिंगला) त्या (सर्वांची) मुळे सुषुम्ना नाडीपासून निघालेली असतात. (१५)

वक्षदण्डाच्या वर हातांकडे तिरप्या गेलेल्यांमध्ये गगनी, मर्दनी व तशीच रोहिणी या नाड्या उजव्या हातावर गुंडाळतात. (१६)

रसवर्ती, मृदंगी व स्रंसिनी या डाव्या हातावर असतात. हाताच्या मुळापासून (तिघी निरनिराळ्या निघून) हाताच्या अग्रापाशी (कोपरापाशी) त्यांची टोके एकत्र येतात. (१७)

त्याच्यापुढे त्यांच्या उजव्या व डाव्या प्रकोष्ठांवर (प्रत्येक प्रकोष्ठावर) आठ शाखा होतात. बाहुमुळापासून (प्रकोष्ठापासून) तळहातापर्यंत या आठ नाड्या नेलेल्या असतात. (१८)

[ श्लोक खालीलप्रमाणे सुधारला आहे–

'तदग्रादष्टशाखाः स्युर्दक्षिणेऽदक्षिणे तथा ।
बाहुमूलात्तलान्तं तु नाड्योऽष्टौ प्रसारिते ॥' ]

त्यांची अग्रे मनगटापाशी एकत्र करावी. अशाच रीतीने डाव्या हातालादेखील दोऱ्या गुंडाळाव्यात. (१९)

[ श्लोकार्ध १८½ असा सुधारला, 'एकीकृत्य तदग्राणि मणिबन्धावृतं यथा ।' ]

अशा या मूर्तीच्या २८ (३४ ?) प्रमुख नाड्या हे तन्त्रवित्तमा, कल्पाव्यात. (२०)

[ येथे काश्यपऋषींना मुद्दामहून तन्त्रवित्तम म्हटले आहे. येथे आलेले नाडीशास्त्र हे योगविद्येत येते म्हणून हे संबोधन. ]

त्यांच्यापासून हे ब्राह्मणा, निरनिराळ्या आठ आठ नाड्या निघतात, व त्यांच्यापासून अनेक प्रकारच्या नाड्या निघतात व त्या सर्व अवयवांत असतात. (२१)

७४ हजार नाड्या सांगतात. नाडींनी (दोऱ्यांनी) वेष्टिलेला शूल जुन्या वाळलेल्या औदुंबराच्या पानाप्रमाणे दिसतो. ( २२ )

[ औदुंबराच्या वाळलेल्या पानांत जसे शिरांचे जाळे दिसते तसेच शूलाभोवती दोऱ्यांचे जाळे दिसते. ]

पिकलेल्या नारळाच्या शेंड्या तुपात घोळवून त्यांतील उपयोगी भाग घ्यावा व निरुपयोगी भाग टाकून द्यावा. ( २३ )

[ श्लोकपाठ अशुद्ध आहे. अर्थ अंदाजाने केला आहे. शिल्परत्न ( भाग दोन ) १८·१२-१३ प्रमाणे पिकलेल्या नारळाच्या कवट्या पाण्यात भिजत ठेवाव्यात. त्यांतील उपयोगी शेंड्या तेवढ्या घ्याव्यात व त्यातील उरलेला नको असलेला भाग काढून टाकावा. ]

नाड्या अशा रीतीने ( शूलाला ) लावून नंतर त्यांच्यावर गोलाकार सहा यव परिघाच्या दोऱ्या पक्क्या बांधाव्यात. ( २४ )

त्यानंतर दोऱ्या प्रदक्षिण रीतीने दोऱ्यांना बांधाव्यात. हृदयावर दोरींचे आठ पाकळ्यांचे कमळ शहाण्या माणसाने बांधावे. ( २५ )

त्याचा ( त्या कमळाचा ) देठ नाभीच्या सीमेपाशी सुषुम्नेला बांधावा. जे कमळ मी तुला आता सांगितले ते ( शूलाच्या ) जीवस्थानी असते. ( २६ )

मूलमन्त्राचे स्मरण करून त्यानंतर रज्जुबंधन करावे. रजुबन्धन असे सांगितले, आता त्यानंतर मातीवरील संस्कार ( सांगतो. ). ( २७ )

**अंशुमद्भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील रज्जुबन्धनाचे लक्षण नावाचे ब्यांशीवे पटल संपले.**

## त्र्यांशीवे पटल

### [ मातीच्या स्थिरीकरणाची माहिती ]

हे सुव्रता, थोडक्यात मातीच्या स्थिरीकरणाची ( माहिती ) मी सांगतो. जांगल, अनूप आणि संमिश्र ( साधारण ) अशी तीन प्रकारची माती असते. ( १ )

एक अंगुळे खोलीचा ( ही ) खड्डा करणे जेथे शक्य नाही ती जांगल ( प्रकारची माती ) असते. वाळूचे प्रमाण कमी असलेली, खणण्यास सोपी, तीन हात सुंदर असणारी अशी मजबूत अनूप ( प्रकारची माती ) असते. त्यांच्या मिश्रणाप्रमाणे गुणधर्म असलेल्या मातीस संमिश्र म्हणतात. ( २, ३ )

पवित्र व सुंदर जागी पाण्याच्या वेगाने नदीकाठची किंवा तलावातील वाहून आलेली पांढरी, तांबडी, पिवळी किंवा काळ्या रंगाची ओली माती भांड्यामध्ये जमा करून त्यातील पाणी निचरून टाकावे. भांड्यातील ओली माती त्यात अगदी थोडे पाणी राहून कठीण होईल इतकी कोरडी

झाल्यानंतर लाख (व) क्षीरवृक्षाच्या सालीपासून तयार केलेल्या क्वाथाच्या पाण्यासह, हे ब्राह्मणा, ती (माती) खूप घोटावी. फार थोडे पाणी असलेल्या त्या मातीचे गोळे करावे. (४, ५, ६)

[क्वाथ – क्षीर वृक्षाच्या साली त्यांच्या आठपट पाण्यात घालून ते पाणी उकळावे. पाणी एकपट इतके राहिले म्हणजे त्याला क्वाथ म्हणतात.

शिल्परत्न (भाग दोन) १९.६ वरून श्लोकार्ध ८३.५½ खालीलप्रमाणे संपूर्ण निराळा पाठ घेऊन अर्थ केला आहे.

'लाक्षाक्षीरत्वचोद्भूतक्वाथतोयेषुमर्दयेत् ।'

शिल्परत्नात पुढील क्रिया दिली आहे की खैर व अर्जुन (सादडा) यांचा क्वाथ मातीत जितका मुरेल तितका मिसळावा व नंतर ती माती इतकी घोटावी की तिचे घट्ट गोळे बनतील. त्यानंतर त्यात त्रिफळाचा (हिरडा, बेहडा व आवळा यांचा) क्वाथ मिसळून पुन्हा घट्ट गोळे बनतील इतकी ती माती घोटावी.]

वरील माती इतकी घोटावी की तिच्या गोळ्यांवर तळहाताच्या रेषा सहज उमटू शकतील. या मातीचे आठ यव व्यासाच्या गोळ्या कराव्यात. (७)

११ अंगुले परिघ किंवा व्यास असलेल्या (दगडगोट्यांना) मुक्ता म्हणतात. वाळू व दगड तितकेच (मातीइतकेच) शहाण्या माणसाने बारीक करावेत. (८)

(वर तयार केलेल्या) मातीच्या चार भागांपैकी एक भागाइतकी दगडासह वाळू (ची भुकटी) त्यात घालावी व त्रिफळाचे पाणी घालून ती दहा, आठ किंवा सात दिवस चांगली मळावी. (९)

यव, गहू, माष आणि अतसीची पाने यांचे चूर्ण (मातीत) मातीच्या एकअष्टमांश भाग घालावे. त्यात नारळाचे पाणी घालून त्यानंतर भांड्यात ते दहा वगैरे (आठ किंवा सात) दिवस चांगले घोटावे. श्रीवेष्टक, गुग्गुळ आणि तसेच कुन्दुरुष्क, सर्जरसाचे चूर्ण (यांचे समभाग मिश्रण) माती १५ भाग असेल तर एक भाग टाकावेत. शहाण्या माणसाने भांड्यात ही माती टाकून दहा वगैरे दिवस तिचे चांगले मर्दन करावे. (१०–१२)

[श्लोकार्ध ८½ 'मृदं वेदकृतैकांशं' असा सुधारला. श्लोकार्ध ९½ 'यवगोधूममाषांश्चाप्यतसीपत्रकं तथा ।' असा सुधारला. श्लोकार्ध १०½ 'पात्रेषु मर्दयेत् सम्यग् दशाहादिक्रमेण तु ।' असा सुधारला. श्लोकार्ध १२ 'दधिना' हा शब्द 'दशाहादि' असा घेतला व अर्थ केला आहे.]

सुंठ आणि पिप्पली तसेच मिरे आणि हळद यांचे समभाग चूर्ण करून ते $\frac{1}{10}$ भागाने मातीत मिसळावे. (१३)

मध, दूध व तूप यांच्यासह भांड्यात ती माती खूप खलावी. कपित्थ आणि बेल यांचा डिंक समप्रमाणात घेऊन मातीच्या $\frac{1}{8}$ भागाने तेलाबरोबर मिसळावे व खूप घोटावे. त्यात कुष्ठ, गेरू (व) हरिताल हे देखील मिसळावे. (१४, १५)

चन्दन, अगरू, कापूर (व) गोरोचन यांचे समभाग चूर्ण मातीच्या तीस अंशांनी मिसळावे. (१६)

अतसीच्या तेलासह, हे आचार्योत्तमा, ती माती खूप घोटावी. सोने, चांदी, मोती यांचे चूर्ण, निर्ऋतिराळ्या दिशांकडच्या धान्यातील (माती), समुद्रातील, नांगराच्या फाळाजवळची, हत्तीच्या

दातावरची, बैलाच्या शिंगावरची, विशेषतः गाय व हरिण यांच्या शिंगावरची ( यांपैकी ) जेथली मिळेल तेथली निरनिराळे सुगंध असलेली माती, कपित्थाच्या डिंकाबरोबर किंवा मधूकाच्या डिंका-बरोबर खूप घोटावी. ( १७–१९ )

पाच रात्रींपर्यंत असे करून ( अशी माती खलून ) नारळाच्या शेंडीचे दीड ते दोन अंगुले लांबीचे तुकडे करून ते मातीच्या चवथ्या भागाइतके किंवा निम्म्या भागाइतके मातीत मिसळावेत. (२०, २१)

दोरीने बांधलेल्या लाकडी सांगाड्यावर या मातीचा एक, दोन किंवा तीन अंगुले जाडीचा थर द्यावा. ( २२ )

[ श्लोक अत्यंत अशुद्ध आहे. शिल्परत्न ( भाग दोन ) १९·२३ च्या साहाय्याने अंदाजाने अर्थ दिला आहे. ]

त्यानंतर, हे ब्राह्मणा, मातीचा लेप कोरडा होऊ द्यावा. मातीचा प्रत्येक नवा थर ( पहिला लावलेला थर ) हळूहळू कोरडा झाल्यानंतर निरीक्षण करून लावावा. ( २३ )

शूलाच्या बाहेरील रुंदीचे चार भाग करून एक भागापेक्षा जास्त जाडीचा ( मातीचा ) थर लावणे योग्य समजतात. ( २४ )

[सांगाडा व मूर्तीचा बाहेरील भाग, उदाहरणार्थ बाहुदण्ड व त्याच्यावर माती थापून शेवटी त्याला गोलाकार यथायोग्य आकार आणल्यानंतरचा भाग यांच्यामधली रुंदी चार भागांत विभागून वर दिलेल्या स्थिरीकृत मातीचे थर लावावेत. प्रत्येक ओल्या थराची जाडी ¼ भागापेक्षा थोडी जास्त असावी म्हणजे तो थर वाळल्यानंतर ती जाडी ¼ भागाइतकी कमी होईल. ]

नंतर दुसरा भाग व ( तो वाळल्यानंतर ) तिसऱ्या भागापर्यंत त्या त्या ठिकाणी योग्य तितक्या जाडीचा मातीचा लेप लावावा. ( २५ )

[ मातीच्या थरांची जाडी कोठे जास्त तर कोठे कमी असते. ]

उरलेला भाग काही काळ जाऊ देऊन, चवथ्या भागाचा काही भाग वल्कलांनी आच्छादावा व उरलेला भाग कापसाच्या धाग्यांसह जो कल्क असतो त्याने पुरा करावा. ( २६ )

[ सर्वांत बाहेरचा लेप कल्काचा लावावा. ]

मातीचे हे स्थिरीकरण सांगितले, ( त्यानंतर ) कल्कसंस्कार सांगतो. ( २७ )

**अंशुमद्भेदांतर्गत काश्यपशिल्पातील मातीच्या स्थिरीकरणाची माहिती नावाचे त्र्यांशीवे पटल संपले.**

# चौऱ्यांशीवे पटल

## [ कल्कसंस्कार ]

आता अनुक्रमाने कल्क तयार करण्याचा विधी सांगतो. हे ब्राह्मणा, नदीतील, सरोवरातील किंवा मोठ्या विहिरीतील अथवा धान्याच्या शेतातील पाण्याने वाहून आणलेली अशी कठीण, (जवळजवळ) भुकटीइतकी बारीक व थोडीशी जाड वाळू असलेली अशी बारीक वाळू गोळा करून, खलून ती स्वच्छ धुवून काढावी. ही वाळू वाळवून नंतर तिची बारीक भुकटी करावी. (१-३)

[ श्लोक २ व २½ अंशुमत् काश्यपावरून असा दुरुस्त केला–

सदृढाश्चूर्णतुल्याभाः स्थूल वालुकमिश्रिता ।
संग्राह्य शर्करा ह्येषां पेष्य प्रक्षालनं कुरु ॥ ]

त्रिफळयाचे पाणी घालून त्या (वाळूच्या भुकटीचे) लहान लहान गोळे करावेत व ते वाळू द्यावेत. कपित्थाचा डिंक तीन प्रकारांनी (प्रमाणांनी) त्यात मिसळतात. (४)

[ 'तिलोदकसमं' या ऐवजी 'त्रिफलोदकेन' अशी दुरुस्ती केली. 'अबन्धनिर्यासजलं' या ऐवजी 'कपित्थनिर्यासजलं' अशी दुरुस्ती केली. ]

एक भाग डिंकात पाच भाग, साडेपाच व सहा भाग पाणी घालून केलेल्या मिश्रणांना अनुक्रमे सूत, स्वच्छजल व सेक (जल) म्हणतात. (५)

[ शुद्ध पाठ– पञ्चगुणं तु निर्यासात् सार्धं वा पञ्चषड्गुणम् ।
सूतं स्वच्छजलं चैव सेकश्चेति क्रमोदितम् ।। ]

(वाळूच्या भुकटीच्या) गोळयांत स्वच्छ व सेकजल ही क्रमाने मिसळून ते मिश्रण लोण्याइतके मऊ होईल इतके घोटावे. कापसाचे तन्तूदेखील अगदी मऊ करून (पिंजून) त्यात घालावेत. (६)

[ श्लोक ५½ दिल्याप्रमाणे सुधारून अर्थ केला आहे.

स्वच्छ सेकजलैः पिण्डं पेषयेन्नवनीतवत् । ]

कर्दळीच्या दांडयामध्ये जशा रेषा दिसतात तशा (कापसाच्या) रेषा दिसतील इतके ते मिश्रण मर्दन करावे. हा पहिला कल्क आहे व तो पहिला थर म्हणून लावावा. (७)

[ शुद्ध पाठ– कल्कभिन्नं तु यत्तन्तु कदलीदण्डतन्तुवत् ।
एतत् कल्कं समालिप्य प्रथमं कल्कमेव हि ॥

सूतजल घातलेला कल्क तो पहिला त्याने पहिला लेप द्यावा. दुसऱ्या व तिसऱ्या लेपासाठी अनुक्रमे स्वच्छजल व सेकजल टाकून वाळूची भुकटी घोटावी. हे अनुक्रमे दुसऱ्या व तिसऱ्या थरासाठी कल्क वापरावेत. ]

(कपित्थाच्या) डिंकात तिप्पट, साडेतीनपट किंवा चौपट (या प्रमाणात) मिरी व त्रिफळा (यांची भुकटी) घालावी. याला त्रियव म्हणतात. (८)

[ शुद्धपाठ– निर्यासात् त्रिगुणं सार्धत्रिगुणं वा चतुर्गुणम् ।
मरीचित्रिफलं ह्येवं त्रियवं परिपठ्यते ॥ ]

हे मिश्रण वर दिलेल्या (अनुक्रमे सृत, स्वच्छ व सेकजल) पाण्यात घालून (पाणी घातलेल्या कल्कात घालून) ते सर्व घोटून काढावे. त्यानंतर क्रमाक्रमाने दोन किंवा तीन यव जाडीचा कल्काचा लेप लावावा. (९)

[ शुद्ध पाठ – तेषु चान्यजलाभ्यां तु मर्दयेत्तु पुनःपुनः ।
क्रमेण लेपयेत् कल्कं द्वियवं त्रियवं घनम् ॥ ]

लेप कोठेही छिद्र वगैरे उरू न देता हळूहळू लावावा. तो दोन महिने, दीड किंवा एक महिना पुन्हा वाळू द्यावा. ( १० )

[ त्रिसमासं हा शब्द सार्धमासं असा सुधारून अर्थ केला आहे.]

हे ब्राह्मणा, नंतर नारळाच्या शेंडीच्या घासणीने त्याला घासून काढावा. ( खरदुरा करावा. ) नंतर स्वच्छ जलातला कल्क लावून अवयवांची मापे पुरी करावीत. ( ११ )

[ शुद्ध पाठ – कूर्चं न्यस्त्वा ततो विप्र पेषण्या पेषयेत् क्रमात् ।
ततः स्वच्छजलैः कल्कं प्रमाणान्तं तु पूरयेत् ॥

मापापेक्षा हा कल्क ( किंचितसा ) जास्त लावून, मापे अचूक आहेत की नाहीत याचा शोध घेऊन अंग, उपांग व प्रत्यंग ही त्यांच्या लक्षणाप्रमाणे करावीत. ( १२ )

[ श्लोक ११½ चा शुद्धपाठ – बहु कृत्वा प्रमाणं तु शोध्यमानं समानयेत् । ]

हात, पाय, पोट इत्यादींना ‘ अंग ’ असे म्हणतात. ( अंगावरील ) दागिन्यांना उपांग म्हणतात व मूर्तीचे चिन्ह जे वाहन त्याला प्रत्यंग म्हणतात. ( १३ )

[ प्रत्यङ्गं चाह नार्हणा याची दुरुस्ती प्रत्यङ्गं चिन्हवाहनम् अशी करून अर्थ दिला आहे. ]

कपित्थाचा डिंक व पाणी एकास साडेतीन या प्रमाणात घेऊन त्यात भिजविलेले वस्त्र मूर्तीला गुंडाळावे. त्यावर नंतर कल्काचा लेप द्यावा. (१४)

[ शुद्ध पाठ – कपित्थस्यैव निर्यासात् तत् सार्धत्रिगुणाम्भसा ।
पटच्छाद्यं तु कर्तव्यं कल्कमालेपयेत्ततः ॥ ]

या कल्काचा लेप ½ किंवा 1/10 यव जाडीचा असावा. कपित्थाच्या डिंकाचे पाणी नारळाच्या शेंडीने त्यावर शिंपडून तो थर घासणीने घासावा. ( खरदुरा करावा. ) ( १५ )

[ शुद्धपाठ– तत्कल्कं तु यवाष्टांशदशभागपरं ततः ।
निर्यासतोयं कूर्चेन सेच्य पेष्या तु पेषयेत् ॥ ]

त्याच्यावर ( कल्काच्या या लेपावर ) चिक्कणाने दागिन्यांचा उठाव त्यांच्या लक्षणां-प्रमाणे करावा व त्यावर ( सर्व मूर्तीवर ) पांढऱ्या रंगाचा थर द्यावा. ( १६ )

[ शुद्धपाठ– मण्डनानि तदूर्ध्वे तु मण्डयेल्लक्षणान्वितम् ।
पश्चाद्वै चिक्कणं लिप्य श्वेतवर्णं ततो लिपेत् ॥ ]

असे मूर्तीचे कल्क संस्कार सांगतात. ( १७ )

[ या पटलातील शुद्धपाठ रौरवागम, भाग २, पान ६८ यात दिलेल्या अंशुमत् काश्यपातील उताऱ्यावरून घेतलेले आहेत. ]

**अंशुमद्‌भेदान्तर्गत काश्यपशिल्पातील कल्कसंस्कारलक्षण नावाचे चौऱ्यांशीवे पटल संपले.**

# पंच्यांशीवे पटल

## [ वर्णसंस्कार ]

आता विशेषतः वर्णसंस्काराचे लक्षण सांगतो. शंकरापासून परमसद्भाव निर्माण झाला. द्रव्यापासून चंद्राचा जन्म झाला ( ? ) ( १ )

शंकरापासून शक्ति निर्माण झाली, तिच्यापासून नाद झाला. त्याच्यापासून सर्वाची (अग्नीची ? ) उत्पत्ती झाली, त्याच्यापासून वायू निर्माण झाला. ( २ )

वायूपासून पाणी झाले व त्यापासून ( पाण्यापासून ) पांढरी, तांबडी तसेच पिवळी व काळी अशी चार प्रकारची पृथ्वी झाली. ( ३ )

पाण्यापासून पांढरा, अग्नीपासून तांबडा (रंग) झाला. पृथ्वीगोलापासून पिवळा व आकाशाच्या निळचा रंगापासून काळा ( रंग ) निर्माण झाला. ( ४ )

विष्णू, महेश्वर, गौरी व रुद्र हे अनुक्रमाने त्या रंगांचे प्रमुख आहेत. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य ( व ) शूद्र हे अनुक्रमे पांढरा इत्यादी वर्णांचे असतात. ( ५ )

पांढरा, तांबडा, पिवळा व काळा हे (रंगांचे ) चार ( मुख्य ) प्रकार आहेत. श्वेत, शुक्ल, धवल, अतारक व मोत्याप्रमाणे पांढरा रंग असे पांढऱ्या रंगाचे पाच प्रकार आहेत. ( ६, ६½ )

शंखाच्या रंगाचा तो शुक्ल ( पांढरा ) रंग हा अत्युत्तम समजतात. चांदीप्रमाणे आणि गायीच्या दुधाप्रमाणे धवल ( पांढरा ) रंग असतो. तारेच्या रंगाप्रमाणे पांढरा त्याला अतारक म्हणतात. (७, ८)

अरुण, रक्त, शोण आणि अग्नीप्रमाणे (तांबड्या रंगाचे) चार प्रकार होतात. अरुण अशोकाप्रमाणे व कमळाच्या फुलाप्रमाणे रक्त रंग असतो. शुकपुष्पाप्रमाणे शोण रंग असतो व राक्षसाचा पाटल रंग ( ? ) असतो. (९, ९½ )

सोनेरी, पिंगट, पिवळा व हरितालाप्रमाणे (असे ) पिवळ्या रंगाचे चार प्रकार आहेत. (१०)

सोन्याप्रमाणे सोनेरी, पुण्ड्राप्रमाणे पिंगट व हळदीप्रमाणे पिवळा व हरितालाप्रमाणे पिवळा रंग असतो. ( ११ )

[ पुण्ड्र हा कमळाचा प्रकार आहे. तसेच हळदीप्रमाणे पिवळा हा दुरुस्तीप्रमाणे अर्थ आहे. ]

निळा, सावळा, काळा व कृष्ण असे ( काळ्या रंगाचे ) चार प्रकार आहेत. ढगांच्याप्रमाणे निळा, सावळा निळ्या कमळाप्रमाणे, मोराच्या पिसाऱ्याप्रमाणे काळा व कृष्ण भृगुपत्राप्रमाणे असतो. असे मुख्य रंगांचे सोळा प्रकार होतात. (१२, १३ )

जमिनीवर सांडलेल्या रक्ताप्रमाणे (? ) व जातिलिंगाप्रमाणे असे तांबड्या रंगाचे दोन प्रकार सांगतात. ( १४ )

गोदावरी नदीपाशी सापडणाऱ्या हरितालाप्रमाणे तसेच अंबाडीच्या फुलाप्रमाणे असे पिवळ्या रंगाचे ( दोन प्रकार होतात. ) ( १५ )

[ अर्थ अंदाजानें लावला आहे. ]

काळ्या दगडाच्या भुकटीसारखा सावळा वर्ण असतो. दिव्याच्या काजळीचा कृष्णवर्ण सांगतात. ( १६ )

असे मूळ रंग असून त्यांच्यापासून अनेक प्रकारचे रंग मिळविता येतात.

[ श्लोकार्ध १७ व श्लोक १८ चा अर्थ समजत नाही. ]

काश्यपातील वर्णसंस्कार लक्षण संपले.

निरनिराळ्या रंगच्छटा अनुक्रमाने थोडक्यात सांगतो. पिवळ्या रंगात पिवळा मिसळला म्हणजे तसाच पूर्ण (गडद ) पिवळा रंग मिळतो. ( १९ )

नारळाचे पाणी (पिवळ्या रंगात) मिसळले म्हणजे छातीतील रक्ताप्रमाणे तांबडा रंग मिळतो. त्यात चुना मिसळला म्हणजे प्रेताचा ( फिक्कट ) पांढरा रंग मिळतो. ( ? ) ( २० )

हे सुव्रता, राजावर्त व काळ्या रंगाचे दगड हे चुन्याच्या कामासाठी लोक उत्तम समजतात. ( २१ )

[ हा संदर्भविहीन श्लोक दिसतो. ]

हे ब्राह्मणश्रेष्ठा, या रंगांच्या मिश्रणाने मिळणारे रंग सांगतो. पांढरा व तांबडा हे समप्रमाणात मिसळले म्हणजे गौर रंग मिळतो. ( २२ )

पांढरा व पिवळा हे समप्रमाणात मिसळलेत तर त्याला (गौर रंगाला ) पूरक असा रंग मिळतो. पांढरा व कृष्ण हे समप्रमाणात मिसळले तर सावळा रंग ( ? ) मिळतो. ( २३ )

पांढरा, कृष्ण व पिवळा समभाग मिसळलेत तर 'शारच्छवि' नावाचा प्रसिद्ध रंग मिळतो. (२४)

[ श्लोकार्ध २४ शिल्परत्न ( भाग पहिला ) श्लोक ४६·१३५ प्रमाणे दुरुस्त केला आहे.

'शारच्छवीति विख्यातं वर्णकारसुखप्रदम् ।' ]

पांढरा, तांबडा व पिवळा मिसळून संमिश्रक ( ? ) मिळतो. तांबडा व पिवळा समप्रमाणात मिसळले म्हणजे बकुळीच्या फळाप्रमाणे रंग मिळतो. ( २५ )

हा ज्वालेच्या रंगाप्रमाणे असून अग्निवर्ण म्हणून प्रसिद्ध आहे. पिवळ्यात त्याच्या दुप्पट तांबडा रंग मिसळला म्हणजे गडद लाल रंग मिळतो. (२६)

(पिवळा व तांबडा) या दोघांच्या समप्रमाणातील मिश्रणाला छवर्ण (विवर्ण ? ) असे म्हणतात. तांबड्या रंगात त्याच्या दुप्पट विषाचा (काळा ) रंग मिसळला म्हणजे गुळाचा रंग मिळतो. ( २७ )

पिवळ्यात त्याच्या निम्मे विषाचा रंग मिसळून कपिल ( तांबूस ) रंग मिळतो. पांढरा व त्याच्या पावपट तांबडा मिसळून खापराचा रंग मिळतो, ( २८ )

त्याच्यात ( पांढरा + ¼ तांबडा या मिश्रणात ) निळा रंग जास्त मिसळल्यास धान्याच्या अंकुरांप्रमाणे रंग मिळतो. श्याम रंग व कुंकवासारखा लाल रंग निम्मा घेऊन किंवा लाखेत ( लाक्षारस ) काळा ( रंग ) मिसळला असता जांभळाप्रमाणे रंग मिळतो. जातीफळाप्रमाणे लाखेचा जो रस त्यास लोहित ( तांबडा ) रंग म्हणतात. ( २९–३०½ )

कृष्ण व निळा रंग समप्रमाणात मिसळल्यास केसांचा रंग मिळतो. धान्याप्रमाणे सावळा आणि तांबडा यांच्या मिश्रणाने मंजिष्ठेप्रमाणे रंग मिळतो. कृष्ण व पिवळा रंग समप्रमाणात मिसळल्यास मधासारखा रंग मिळतो. (३१, ३२)

कृष्ण रंगात त्याच्या दुप्पट पिवळा रंग मिसळल्यास मनुष्यासारखा रंग मिळतो. मानुषरंगात तांबडा रंग जास्त मिसळल्यास हिरवा (?) रंग मिळतो. (३३)

[श्लोक ३४ ते ३६ पाठ अत्यंत अशुद्ध असल्याने अर्थ लावता आलेला नाही.]

**अंशुमद्‌भेदांतर्गत काश्यपशिल्पातील वर्णसंस्कार लक्षण नावाचे पंच्यांशीवे पटल संपले.**



# काश्यपशिल्प–सूची

